श्री सयाजी साहित्यमाला-पुष्प ६५ वें.

# मराठी रियासत-मध्यविभाग १

( सन १७०७ ते १७४० )

छत्रपति शाहू, पेशवे बाळाजी विश्वनाथ व बाजीराव.

लेखक

गो. स. सरदेसाई, बी. ए. बडोदें.

प्रकाशक

गणेश महादेव आणि कंपनी,

६२१ गिरगांवरोड, मुंबई

आवृत्ति दुसरी.

सन १९२५.

किंमत तीन रुपये

११८१

# गो. स. सरदेसाईकृत पुस्तकें.

| | | |
|---|---|---|
| १ मुसलमानी रियासत | | आवृत्ति खलास. |
| २ मराठी रियासत पूर्वविभाग | | ,, |
| ३ ,, ,, | मध्यविभाग १, रु. २—१२ १७०७—१७४० | तयार |
| ४ ,, ,, | मध्यविभाग २, रु. ३—० १७४०—१७६१ | ,, |
| ५ ,, ,, | मध्यविभाग ३, रु. २—४ पानिपत प्रकरण | ,, |
| ६ ,, ,, | मध्यविभाग ४ माधवराव पेशवे | छापत आहे. |
| ७ ब्रिटिश रियासत नवीन आवृत्ति रु. ३—० | | तयार |
| ८ शालोपयोगी भारतवर्ष | रु. १ | ,, |
| ९ बालोपयोगी महाराष्ट्राचा इ. रु. ०—४ | | ,, |
| १० महाराष्ट्राच्या इ. सोप्यागोष्टी रु. ०—६ | | ,, |
| ११ इंग्लिश भाषेची गृहशिक्षा किं. ८ आणे | | ,, |

श्री.

# जाहिरात.



आपल्या देशी भाषेच्या साहित्याची अभिवृद्धि करण्याच्या सद्धेतूनें श्रीमंत पतितपावन सर सयाजीराव महाराज साहेब गायकवाड, सेनाखासखेल, समशेर-बहादूर, जी. सी. एस्. आय्., जी. सी. आय्. ई., एलएल. डी., ह्यांनीं कृपावंत होऊन दोन लक्ष रुपयांची रक्कम अनामत ठेविली आहे, तिच्या व्याजांतून "श्रीसयाजी साहित्यमाले"त विविध विषयांवर पुस्तकें तयार करण्यांत येत असतात.

"हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास—मराठी रियासत–मध्यविभाग १," हें स्वतंत्र पुस्तक असून तें उक्त मालेंतील "इतिहास-गुच्छां"त पांसष्टावें पुष्प ह्मणून रा. रा. गोविंद सखाराम सरदेसाई बी. ए. यांचेकडून तयार करवून इ. स. १९२० सालांत प्रथम प्रसिद्ध करण्यांत आलें होतें.

सदरहु ग्रन्थाच्या पहिल्या आवृत्तीच्या सगळ्या प्रतींचा खप होऊन गेल्यानें ही दुसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्यांत येत आहे.

| | | |
|---|---|---|
| भाषांतर शाखा,<br>विद्याधिकारी कचेरी<br>बडोदें, ता. ३०-४-१९२५. | न. शि. शा.<br>भा. म. | नं. के. दीक्षित<br>विद्याधिकारी,<br>बडोदें राज्य. |



# मराठी रियासत, मध्य वि. ४

( स. १७६१ ते १७७४ ),

## छापत आहे !

यांत थोरल्या माधवरावांची कारकीर्द, त्यांचा हृदयद्रावक मृत्यु, नंतर नारायणरावांचा वध, सवाई माधवरावांचा पुरंदरावर जन्म व राघोबादादाचें उद्वेगजनक आख्यान वगैरे महत्त्वाचे विषय आले आहेत. पृष्ठ संख्या सुमारें ४५०.

पत्ताः---गणेश महादेव आणि कंपनी.

६२१ गिरगांवरोड-मुंबई.

# प्रस्तावना.



श्री शिवछत्रपतींच्या उदयापासून शाहूच्या आगमनापर्यंत मीं मराठी रियासतीचा **पूर्वविभाग** कल्पिला आहे. शाहू छत्रपतीपासून मराठशाहींत फार मोठें रूपान्तर होऊन तिजवर पेशवाईचा छाप बसला. ह्या पेशवाईचा परमोच्च बिंदु माधवरावाचे अखेरीस येतो. तेथपर्यंतच्या भागास मी मराठी रियासतीचा **मध्यविभाग** असें नांव दिलें आहे. माधवराव पेशव्याचे मृत्यूनंतर राज्यास उतरती कळा लागून शेवटीं मराठशाहीचा अंत झाला, त्या काळास **उत्तरविभाग** हें नांव देतां येईल. पूर्वविभाग एकाच पुस्तकांत प्रसिद्ध केला आहे. मध्यविभागांत अनेक मोठी प्रकरणें व धडामोडी येत असल्यामुळें त्याचे चार भाग झाले आहेत ते असेः—

**मध्यविभाग** १ स. १७०७–१७४०, बाळाजी विश्वनाथ व बाजीराव.
**मध्यविभाग** २ स. १७४०–६१, नानासाहेब, दक्षिणचा कारभार.
**मध्यविभाग** ३ स. १७५०–६१, नानासाहेब, पानिपत प्रकरण.
**मध्यविभाग** ४ स. १७६१–७२, पेशवा माधवराव.
**उत्तरविभागाचे** किती खंड होतील तें आतांच सांगतां येत नाहीं.

**मध्यविभाग** १ हा या पुस्तकांतील पहिल्या दोन पेशव्यांचा विषय कैक वर्षांपूर्वी प्रथम लिहिला, त्या वेळीं ऐतिहासिक संशोधनास हल्लींच्या इतकी तीक्ष्णता आलेली नव्हती; अर्थात् तो सर्व विषय अलीकडील संशोधनानुसार प्रस्तुतच्या विशुद्ध स्वरूपांत फिरून प्रसिद्ध करण्यांत येत आहे. या कारणास्तव या पुस्तकास पहिल्याची द्वितीयावृत्ति असें म्हणणें वास्तविक युक्त नाहीं. अलीकडे शिवकालीन जंत्री प्रसिद्ध झाल्यानें ऐतिहासिक कागदांची संगति जुळविणें सुकर झालें; आणि अनेक तज्ञ मित्रांचें साह्य घेऊन व त्यांजबरोबर कित्येक वादग्रस्त मुद्यांची चर्चा करून, निरनिराळया बाबती शक्य तितक्या निर्दोष स्वरूपांत आतां दाखल केल्या आहेत. तथापि प्रत्यक्ष शिवछत्रपतींच्या जन्मकालासंबंधानें अजून निश्चय होत नाहीं; मग असे वादग्रस्त अनेक मुद्दे अद्यापि ठिकठिकाणीं

पहिल्या दोन पेशव्यांसंबंधानें राहिलेले मला ठाऊक आहेत. तपशीलाविषयीं मतभेद असला तरी अनेक संशोधकांच्या सतत चर्चेनें मराठशाहींतील मुख्य घडामोडींची संगति आतां बहुतेक ठरल्यासारखी झाली आहे, हें या पुस्तकांतील विवेचनांत निदर्शनास येईल.

औरंगजेबाचा मृत्यु इ. स. १७०७ च्या फेब्रुवारींत झाल्यानंतर, एप्रिल महिन्यांत शाहूची सुटका होऊन पुढील जानेवारीचे आरंभीं त्याचा राज्याभिषेक सातारा येथें झाला. एवढ्या कालावधींत अनेक वादग्रस्त मुद्दे असल्यामुळें, शाहूच्या सुटकेपासूनचा भाग पूर्वार्धांत आला असूनही, तो पुनरपि या मध्यविभागांत दुरुस्त करून घेतला आहे. ऐतिहासिक संशोधन अद्यापि पुष्कळ व्हावयाचें असल्यामुळें,दरएक विधानाचे आधार जेथच्या तेथें देणें जरूर असतें; परंतु सामान्य वाचकांस अशा आधारांचा व्याघात होतो तो न व्हावा, म्हणून ते बहुधा खालीं टीपेंत व कित्येक प्रसंगीं त्या त्या कलमाचे विवेचनांत सर्व एकत्रच दाखविले आहेत. येणेंकरून सामान्य वाचक व विशिष्ट अभ्यासक अशा दोघांचेंही काम होईल. आधारांत घेतलेल्या कागदांच्या मित्या कित्येकांच्या मुळांत नव्हत्या; कित्येकांत चुकीच्या दाखल झाल्या होत्या; व कित्येकांच्या संदर्भानें बसवितां आल्या, त्या सर्व मी जमेस धरून स्वीकारिल्या आहेत. संशोधनाच्या सोयीसाठीं व ठिकठिकाणीं विखुरलेल्या वाङ्मयाचा योग्य परामर्ष अभ्यासकांस घेतां यावा म्हणून, आधारनिर्देश जरा सढळपणेंच केला आहे. पुस्तकांत नकाशा अवश्य पाहिजे हें मी जाणतों. महाराष्ट्राचा परिपूर्ण नकाशा तत्कालीन स्थिति दाखविणारा प्रत्येक खंडात पाहिजे. मराठशाहींतील बऱ्याचशा प्रसिद्ध मोहिमा सातारा, पुणें, नगर, औरंगाबाद या टापूंत झालेल्या असल्यामुळें, कृष्णा व नर्मदा या दोन नद्यां मधल्या प्रदेशाचा नकाशा पुस्तकांत घातला आहे, तोच इतर भागांतही मी घेणार आहें. दुसरा एक नकाशा कृष्णा ते कावेरी नदीपर्यंतचा दिला म्हणजे बहुधा सर्व काम भागेल. प्रस्तुतची आपली परिस्थिति लक्षांत घेतां, राष्ट्रेतिहासाचें हें काम हळू हळूच सुधारून परिपूर्ण होणार आहे हें ध्यानांत बाळगून, त्यांतील उणीवा प्रेमभावानें मला कळवाव्या, अशी सर्व वाचकांस माझी विनंति आहे. हें पुस्तक प्रसिद्ध केल्यानें स्वीकृत कार्याची मजल उत्तरोत्तर समाप्तीकडे चालेली पाहून माझ्याप्रमाणेंच वाचकांसही आनंद झाल्याशिवाय राहणार नाहीं. सर्वांनीं लोभ ठेवावा ही विनंति.

कडोर्दे, ता. १ मे १९२५. गो. स. सरदेसाई.

## चुकांची दुरुस्ती.

### प्रथमच केलेली बरी.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| पृ. | ३८ | ओळ | ८ | ‘ स. १७०८ च्या ’ बद्दल ‘ स. १७०८ चा ’. |
| ,, | १४९ | ,, | ५ | ‘ स. १७२७ ,, ‘ स. १७२० ’. |
| ,, | १७१ | ,, | ४ | खालून ‘ पंताजी ’ ,, ‘ दत्ताजी ’. |
| ,, | ३०४ | ,, | २० | ‘मराठ्यांनीं’च्या पुढें ‘ हल्ले सुरू केले तेव्हां पोर्तुगीझांनीं ’ हे शब्द वाढवावे. |
| ,, | ३१९ | ,, | ९ | खालून, ‘ शहर ’ बद्दल ‘ परत ’. |
| ,, | ३५२ | ,, | १५ | ‘ उरीख ’ बद्दल ‘ तुकोजी ’. |
| ,, | ३८४ | ,, | १६ | ‘ राणोजी ’ शब्द गाळावा. |
| ,, | ३८४ | ,, | १७ | ‘ राणोजी ’ बद्दल ‘ राणाजी ’ वाचावें. |

# संकेत-निर्देश.

इ. ऐ.–इतिहास व ऐतिहासिक.

इ. सं.–इतिहास संग्रह. ऐ. चरि.–ऐतिहासिक चरित्रें. जु. ऐ. गो.-जुन्या ऐतिहासिक गोष्टी. ऐ. टि.–ऐतिहासिक टिपणें. पे. द.–पेशवे दप्तरांतील माहिती., प्रा. म. स.–प्राचीन मराठे सरदार.

का. सं. श.–काव्येतिहास संग्रह शकावली.

खं.–राजवाड्यांची मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें, खंड.

जे. श.–जेधे शकावली, चतुर्थ संमेलन वृत्त, भारत इतिहास संशोधक मंडळ.

वा. इ.–वार्षिक इतिवृत्त. पं. सं. वृ.–पंचम संमेलन वृत्त इत्यादि.

त. क.–तह व करार मदार.

ना. भो. ब.–नागपुरकर भोसल्यांची बखर, व. क्रा. कागदपत्र.

पुरं. रो.–पुरंदरे रोजनिशी खंड ६.

ब्र. च.–ब्रह्मेंद्र स्वामींचें चरित्र.

म. सा. छो. ब.–मराठी साम्राज्याची छोटी बखर.

वि. ज्ञा. वि.– विविध ज्ञान विस्तार.

शा. ब.–शाहू महाराजाची बखर चिटणिसी.

शा. रो. व मा. रो.–शाहूची व माधवरावाची रोजनिशी, पेशवे दप्तर.

सत्का.–सत्कार्योत्तेजक सभा भाग.

स. प.-सनदा पत्रें, कै. या.–कैफियती व यादी. पारसनिसकृत.

ह. ब.–हरिवंशाची बखर.

# अनुक्रमणिका.




पृष्ठ.

## प्रकरण प

### मराठी राज्यावर शाहूची स्थापना.

१ सुटका व दक्षिणेंत प्रयाण ... १
२ ताराबाईशीं कलह, खेडची लढाई ५
सातारा काबीज, राज्याभिषेक १०
४ सांगण्यावरील मोहीम .. १४
५ धनाजीचा मृत्यु व योग्यता २०
६ कासवखाडावरील मोहीम ... २३

## प्रकरण दुसरें.

### बाळाजी वि.चा शाहूस उपयोग.

१ बाळाजी विश्वनाथ, पूर्वपीठिका. २६
२ सेनापति चंद्रसेनाचा फितवा. ३२
३ हरणाचा तंटा स. १७११ ३६
४ शिवाजीची कैद व संभाजीची स्थापना ... ... ३९
५ खटावकरांचें बंड ... ४३
६ बाळाजी विश्वनाथाची पेशवाईवर नेमणूक ... ४४
७ कान्होजी आंगऱ्याशीं तह ५१
८ दमाजी थोरातांचें पारिपत्य ५९

## प्रकरण तिसरें.

### मोगल रियासतीवर चढाई.

१ मोंगलांवर मराठ्यांची चढाई ६४

पृष्ठ

२ बादशाही दरबारांतले पक्ष ६५
३ दाऊदखानपन्नीचा कारभार ६८
४ निजामुल्मुल्कचा कारभार ६८
५ निजामाचे दक्षिणेंतील व्यूह ७१
६ सय्यदबंधु, पूर्वपीठिका ... ७४
७ रजपुतांच्या स्नेहाचा बाळाजीस फायदा... ... ७७
८ हुसेन सय्यदाचा दक्षिणेंतील कारभार, चौथाईचा तह ... ८०
९ मराठ्यांचें दिल्लीस प्रयाण ८५
१० राज्यक्रान्ति व सनदांची प्राप्ति ८९
११ मातुश्री येसूबाईचा शेवट ९४

## प्रकरण चवथें.

### बाळाजी वि.चा राज्यकारभार.

१ स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी ९६
२ उत्पन्नाची वांटणी ... १००
३ या व्यवस्थेचे दोष ... १०४
४ सरंजामी पद्धतीचा उगम... १०७
५ मराठशाहीच्या फैलावाचें बीज ११६
६ मूळच्या उद्देशाचा विपर्यास ११९
७ या पद्धतीची आवश्यकता १२०
८ संभाजीचें आज्ञापत्र ... १२२

पृष्ठ

प्रकरण पांचवें.

बाळाजीचा मृत्यु व योग्यता.

१ कऱ्हाड कोल्हापुरची मोहीम १२३
२ बाळाजीचा मृत्यु व परिवार १२४
३ योग्यता ... ... १२७

प्रकरण सहावें.

बाजीराव मोगल दरबार.

१ पेशवाईवर नेमणूक ... १३५
२ हिंदुपदपातशाहीची भावना १३९
३ सय्यदांच्या कारभाराची अखेर १४२
४ खांडव्याची लढाई ... १४५
५ बाळापुरची लढाई ... १४८
६ सय्यदांचा हिंदूंकडे ओढा १५१

प्रकरण सातवें.

बाजीरावाचा निजामास शह.

१ हालचाली व त्यांचें रहस्य १५३
२ निजाम बाजीरा.चा पहिला रंग १५८
३ साखरखेड्यांची लढाई. ... १६६
४ बाजीरावाची चढाई, प्रति निधीशी वाद ... १७१
५ चित्रदुर्ग व श्रीरंगपट्टणच्या स्वाऱ्या ... ... १७६
६ निजामाची चढाई व शाहूची तारांबळ ... ... १८३

पृष्ठ.

७ पालखेडावर निजामाचा कोंडमारा.... ... १९४
८ रघूजी भोसल्याचा उदय १९९

प्रकरण आठवें.

दोघां राजबंधूंचा समेट.

१ संभाजीचा पाडाव ... २०२
२ शाहू संभाजीची भेट ... २०८
३ वारणेचा तह ... ... २१२
४ संभाजीचा पुढील आयुःक्रम. २१४

प्रकरण नववें.

सेनापति दाभाड्यांचें चारित्र्य.

१ खंडेराव दाभाडे. ... २१६
२ गुजराथच्या चौथाईचा झगडा २१८
३ पेशवे सेनापतींचा वेबनाव. २२७
४ डभईची लढाई, दाभाड्यांचा पाडाव ... ... २३३
५ दाभाडे प्रकरणाचा राज्यकारभारावर परिणाम ... २३८
६ पिलाजीचा खून ... २४२

प्रकरण दहावें.

जंजिऱ्याची मोहीम, आंग्रे व पेशवे

१ मोहिमेचीं पूर्वकारणें ... २४४
२ स्वारीची वाटाघाट व तयारी २४८
३ पाहिली जोराची मोहीम २५१

पृष्ठ

४ अव्यवस्था व फसगतीचीं कारणें ... ... २५७
५ सादी साताचा पाडाव व तह २६१
६ आंगऱ्यांचा गृहकलह ... २६५
७ संभाजी व मानाजी आंगऱ्यांचा तंटा ... २६८
८ ब्रह्मेंद्रस्वामीचें जीवन चरित्र २७४
९ ब्रह्मेंद्रस्वामीची योग्यता ... २८०

## प्रकरण अकरावें.

### वसईचा अपूर्व संग्राम.

१ भूगोलिक व राजकीय परिस्थिति ... ... २८८
२ युद्धाचीं कारणें. ... २९२
३ ठाणें व साष्टी काबीज ... २९४
४ माहिमचा घोर संग्राम, ... तारापुरचा हल्ला ... २९६
५ वसईचा पाडाव ... ३००
६ तहाचीं कलमें ... ३०२
७ पोर्तुगीझ युद्धांत इंग्रजांचें ... वर्तन ... ... ३०४
८ कॅ. जेम्स इंचबर्डची वकीलात ३०६
९ कॅ. गोर्डनची सातान्यास वाकिलात. ... ... ३०७
१० शाहू छत्रपतीची मिरजेवर स्वारी ... ... ३१२

पृष्ठ

## प्रकरण बारावें.

### माळवा व बुंदेलखंड.

१ माळव्यांतील उद्योगाचा आरंभ. ... ... ३१६
२ राजा गिरिधर बहादुर. ३१८
३ चौधरी रावनंदलाल मंडलोई ३२०
४ सारंगपुरची लढाई. ... ३२१
५ तिरलाची लढाई. ... ३२४
६ माळव्यांची व्यवस्था ... ३३३
७ मल्हारराव होळकर. ... ३३४
८ राणोजी सिंदे. ... ३३५
९ उदाजी पवार धार. ... ३३६
१० बंगसाचा पाडाव. ... ३३८
११ गोविंदपंत बुंदेले. ... ३४३
१२ माळवा बुंदेलखंडकडील राजकारण ... ... ३४४

## प्रकरण तेरावें.

### मराठ्यांची दिल्लीवर चढाई.

१ चौथाईची मागणी व बाजीरावाचें कर्ज. ... ३४८
२ कमरुद्दीनखानाचा पाडाव. ३५१
३ चौथाईच्या सनदांची प्राप्ति. ३५५
४ बाजीरावाचा दिल्लीवर हल्ला. ३५६
५ बादशहाची त्रेधा व शाहूची कळकळ. ... ... ३६१

पृष्ठ

६ भोपाळ निजामाचा पाडाव ३६९
७ भोपाळवर संग्रामाची चिकित्सा... ... ३७५
८ नादिरशाहची स्वारी ... ३७८
९ मराठे वकिलांनीं केलेलें या प्रळयाचें निदान. ... ३८२
१० स्वारीच्या वेळची परिस्थिति ३८७
११ नासिरजंगावरील स्वारी व बाजीरावाचा मृत्यु. ३९०

## प्रकरण चौदावें.

### बाजीरावाची योग्यता.

१ बाजीराव व चिमाजी कौटुंबिक ३९१
२ मस्तानीचा वृत्तान्त, संतति ३९५
३ शनिवारवाडा, पुणें ... ३९९
४ बाजीरावास संस्कृत पत्रें... ४०२
५ बाजीरावाची योग्यता ...
(१) कर्तबगारीचा अंदाज ४०३
(२) शाहू, बाजीराव, निजाम ४०७
(३) कागदपत्रांचा अंदाज ४१४
(४) कारभाराची अव्यवस्था ४१९
(५) मराठशाहीच्या वृद्धींतील दौर्बल्यबीज ... ४२१

पृष्ठ

६ बाजीरावाच्या वेळचीं घराणीं
१ इचलकरंजीकर, २ बर्वे, ३ हुणमंते, ४ पेठे, ५ जोशी चासकर, ६ कदमबांडे, ७ जाधव, ८ पारसनीस ४२५

### वंशावळी.

१ खटावकर ... ४४
२ निजाम ... ... ७०
३ पेशवे ... ... १२६
४ भोसले नागपुरकर ... २००
५ दाभाडे सेनापति ... २१०
६ कुलाब्याचे आंग्रे ... २६६
७ राजा गिरिधर ... ३२०
८ राव नंदलाल मंडलोई... ३२१
९ गोविंदपंत बुंदेले सागरचे ३४३
१० मस्तानीचा वंश ... ३९८
११ इचलकरंजीकर घोरपडे ४२६
१२ बर्वे नेवरेकर ... ४२७
१३ हुणमंते ... ... ४२९
१४ पेठे ... ... ४३०
१५ जोशी चासकर ... ४३०
१६ कदम बांडे ... ४३२
१७ जाधव सिंदखेडकर ... ४३३
१८ छत्रपतींचे पारसनीस ... ४३४

# गणेश महादेव आणि कंपनीचीं

## आजकालचीं पुस्तकें.

| | |
|---|---|
| १ मराठशाहीची ढाल. | ।। |
| २ हिंदुत्व [ डॉ. सावरकर ] | १ |
| ३ स्वामी रामतीर्थ भाग १ [ कै. फडके ] | २।। |
| ४ शृंगेरीची लक्ष्मी. [ प्रो. भानू ] | २ |
| ५ सैतानी—संक्रांत. [ नाटक ] [ श्री. चौगुले ] | १ |
| ६ कुठें ? [ सौ. कमलाबाई सोहनी ] | १ |
| ७ निवडक लेख. [ चापेकर ] | २।। |
| ८ स्वराज्याचा श्रीगणेशा [ श्री. नाथमाधव ] | २। |
| ९ स्वराज्याची घटना ,, | २। |
| १० स्वराज्याची स्थापना ,, | २। |
| ११ स्वराज्याचा कारभार ,, | २। |
| १२ स्वराज्यावरील संकट ,, | २। |
| १३ मराठी रियासत मध्य वि. १ [ श्री. सरदेसाई ] | ३ |
| १४ मराठी रियासत, मध्य वि. ३ [ श्री. सरदेसाई ] | २। |
| १५ मराठी रियासत मध्य वि. ४ ,, | ३ |
| १६ ब्रिटिश रियासत पूर्वार्ध | ३।। |
| १७ श्री एकनाथ चरित्र [ श्री. पांगारकर ] | ।।।० |
| १८ भक्तिमणिमाला ,, | १।। |
| १९ जोसेफ मॅझिनी [ श्री. जोगळेकर ] | २ |
| २० मानवी कर्तव्यें ,, | १ |
| २१ वीर वैरागी [ श्री. ग. दा. सावरकर ] | १ |
| २२ गोमांतक [ ऐ. काव्य ] महाराष्ट्र भाग ] | २ |
| २३ माधवानुज [ कविता ] [ क. मोडक ] | २ |
| २४ महात्मा गांधी [ श्री. सीताकान्त ] | २। |
| २५ अजिंक्यतारा [ श्री. ना. ह. आपटे ] | १।। |
| २६ ग्रेटब्रिटनची शासनपद्धति [ श्री. रं. वि. लक्षीत ] | ।।= |
| २७ निकोलाय लेनिन [ श्री. भिडे ] | -।।।- |
| २८ नवजीवन [ नाटक ] [ श्री. अस्नोडकर ] | ०।।= |

# प्रकरण पहिलें.

## मराठी राज्यावर शाहूची स्थापना.

१. शाहूची सुटका व दक्षिणेंत प्रयाण, मे १७०७.

२. ताराबाईशीं कलह, खेडची लढाई, नोव्हेंबर १७०७.

३. सातारा काबीज, राज्याभिषेक, जानेवारी १७०८.

४. रांगण्यावरील मोहीम, मार्च–जून १७०८.

५. धनाजीचा मृत्यु व योग्यता, जून १७०८.

६. कामबक्षावरील बादशहाची मोहीम, जाने० १७०९.

शाहूच्या सुटकेचा हा भाग मराठी रियासतीच्या पूर्वार्धांत सांगितलेला आहे. परंतु त्याचा संबंध या पुढील घडामोडींशीं असल्यामुळें तो आतां नवीन माहितीसह या प्रकरणांत घेतला आहे.

**१. शाहूची सुटका व दक्षिणेंत प्रयाण** ( मे १७०७ ).—शिवछत्रपतीचा नातू , संभाजीचा पुत्र शाहू याचा जन्म ता. १८–५–१६८२ रोजीं झाला. ता. ३–११–१६८९ रोजीं रायगड किल्ला बादशहाचे हस्तगत झाला, तेव्हां मातुश्रीसह शाहू पकडला जाऊन कैदेंत पडला. स. १७०७ च्या फेब्रुवारींत औरंगजेब मरण पावल्यावर, त्याचा दुसरा मुलगा अजीमशहा यानें दिल्लीकडे प्रयाण करितांना शाहूस बरोबर नेलें. पुढें नर्मदेच्या पार गेल्यावर झुल्फिकारखान वगैरेंच्या सल्ल्यानें अजीमशहानें शाहूस मोकळा करून दक्षिणेंत पाठविलें.


ए. नकाशा, महाराष्ट्र—
नर्मदा तहत् कृष्णा
स्केल ७०मेला बरोबर १ इंच
मराठशाहींतील प्रसिद्ध मोहिमा व त्या
वेळचीं स्थळें समजावीं अशी योजना
या नकाशांत ठेविली आहे.
उ०— बाजीरावाची पालखेड
मोहीम उत्तरेस प्रयाण तुटकी रेघ.
दक्षिणेस प्रयाण सलग रेघ..
दाटी झाल्यामुळें सर्वच स्थळें या
नकाशांत देतां आलीं नाहींत.
काठेवाड.
नर्मदा नदी
तापी नदी
छोटाउदेपुर उर्फ अलीमोहन
बडवाणी
सिंधवा
खांडवा
बिजागड
कोकमांडा
सुलतानपुर
चोपडा
बऱ्हाणपुर
गावीलगड
इलिचपुर
नंदे
भडोच
नांदोद
सुरत
नवसारी
सोनगड
साल्हेर
लांबकानी
चोरवड
जळगांव
मुसाबळ
मलकापुर
रवेलगपुर
अमरावती
वर्धा
धुळें
सटाणा
मालेगांव
आसई
सावरखेडा
बाळापुर
अकोला
करंजा
रामनगर उर्फ धरमपुर
दमण
उंबरगांव
डहाण
मनमाड
पारद
जाफराबाद
दिंडोरी
चांदवड
नाशिक
जव्हार
आनंदवल्ली
गंगापुर
कोपरगांव
दौलताबाद
सिंधखेड
औरंगाबाद
पालखेड
चेरुळ
वाशिम
चांदा
माहीम
वसई
कल्याण
ठाणें
टोके
पैठण
मुंगी
पूर्णा नदी
माहूर
उमरखेड
येदलाबाद
जुन्नर
शेवगांव
मुंबई
करंजा
अलिबाग
चौल
जंजिरा
श्रीवर्धन
तळेगांव
पुणे
रेवदंडा
लोणी
श्रीगोंदे
जामखेड
बीड
धारूर
नांदेड
निरमळ
गोदावरी नदी
सिंहगड
सासवड
जेजुरी
पेडगांव
पाटस
धामर
कंधार
कनकापुर
भोर
वाई
महाबळेश्वर
प्रतापगड
सुपें
इंदापुर
परेंडा
मांजरा नदी
उदगीर
नीरा नदी
तुळजापुर
औसा
नळदुर्ग
चिनापुर
अंजनवेल
सातारा
पंढरपूर
सांगोले
सोलापुर
अक्कलकोट
भालकी
बेदर
मेदक
कऱ्हाड
माण
गुलबर्गा
मालखेड
अवगड
संगमेश्वर
रत्नागिरी
सांगली
मिरज
जत
उंबराणी
विजापुर
गोवळकोंडा
हैदराबाद
विशाळगड
कोल्हापुर
राजापुर
पन्हाळगड
विजयदुर्ग
मुधोळ
सुरापुर
कपाटसंगम उर्फ कडुलूर संगम
कर्नूळ
नदी
घटप्रभा नदी
गुलगुले
रायचूर
कृष्णा

सवाई जयसिंग वगैरे रजपूत राजे अजीमशहाचे स्वारींत होते. शाहूचा व सवाईजींचा घरोबा पूर्वीपासूनचा होता[1]. त्यांनीं शाहूच्या सुटकेस मदत करून त्यास मेजवान्या वगैरे केल्या; आणि सर्वांचा निरोप घेतल्यावर, नर्मदेच्या उत्तरेस नेमावर नजीक दोन्हा ह्मणून गांव आहे तेथून शाहूची सुटका होऊन तो परत फिरला[2]. अजीमशहानें १३ एप्रिलचे सुमारास बऱ्हाणपुरावरून उत्तरेस प्रयाण केलें, यावरून ता. १ मेच्या अजमासें शाहू परत फिरला असें समजण्यास हरकत नाहीं. नर्मदेवरून पूर्वेच्या बाजूनें पुनः बऱ्हाणपुरावर न येतां शाहू पश्चिमच्या बाजूनें सातपुड्याच्या डोंगरांतून बीजागड, सुलतानपुर या वाटेनें खानदेशांत आला[3]. निघतांना शाहूबरोबर शेंपन्नासांहून ज्यास्त फौज नव्हती. मातुश्री वगैरे मंडळी कैदेंतच दिल्लीस गेली, त्यांजबरोबर उद्धव योगदेव राजाज्ञा यास पाठवून, मोरोपंत सबनीस, कृष्णाजी महादेव जोशी, नाशीककर गदाधर भट व हिंदुस्थानी ब्राह्मण शुक्रजी मनरंजन करणार, ही मंडळी शाहूनें बरोबर आणिली. जोत्याजी केसरकर पातशाही ताकिर्दीचे कागद घेण्यास मागें ठेविला होता, तो लवकरच येऊन शाहूस मिळाला. या सर्वांनीं रस्त्यानें पुष्कळ श्रम साहस केले. बीजागड परगण्यांत मोहनसिंग जमीनदार पुंडाई करून होता, त्यास भेटून शाहूनें त्याजकडून द्रव्य, माणसें वगैरे मदत घेतली. मोहनसिंगानेंच शाहूची तजवीज पुढें सुलतानपुर नंदुरबारपावेतों करून दिली. सुलतानपुर ( हल्लीं ता. शहादें ) परगण्यांत तापी नदीचे उत्तरतीरीं कोकरमंडा नांवाचा किल्ला आहे. त्यांत अंबू पांडे ( पुंडे ? ) नांवाचा गृहस्थ सुरतपासून बऱ्हाणपुरपावेतोंचा प्रदेश लुटून गबर झाला होता, त्यास शाहूनें सामील करून घेतलें; आणि तापी नदी उतरून नंदुरबारवरून तो धुळ्याचे वायव्येस सुमारें पंधरा मैलांवर लांबकानी येथें जूनच्या आरंभीं आला. त्यापूर्वीच मे महिन्यांत शाहूचा सासरा रुस्तुमराव जाधव, सावित्रीबाईचा बाप, शाहूच्या मदतीस आला असावा असें दिसतें.[4] ' तुह्मी स्वामीचे आप्तविषयी लोक, कित्येक कार्यास आलां, ह्मणोन तुह्मांस दस-हजारी मनसब मुकर्र केला असे ',( ता. २५ मे १७०७. )[5] लांबकानी येथें शाहूचा जम फारच चांगला बसला. तेथील जहागीरदार सुजनसिंग रावळ यानें शाहूस भरपूर

१ शा. रो. १९८. २ आर्व्हिन १ पृ. १२. याच्या तारखा नवीन कालमानाच्या बारा दिवसांनीं अधिक आहेत. ३ खाफीखान. ४ शा.म. रो. २०३. ५ खं.२०-६०.

मदत केली. 'तुह्मीं स्वामिकार्यास अंतर केला नाहीं' असे शाहूचे उद्गार आहेत[१]. मराठशाहींत शाहूचा खरा प्रवेश लांबकानींसच झाला असें दिसतें. कारण येथेंच त्यास अनेक मराठे सरदार, आपला खरा धनी परत आला, अशा भावनेनें सामील झाले. त्यांत मुख्य इसम परसोजी ऊर्फ परशुराम भोसले होय. 'सरदारी करून राहत असतां परसोजी व साबाजी भोसले बंधु फौजबंदी करून शाहू महाराजांस आडवे येऊन भेटले. शाहू राज्याधिकारी नाहींत ऐसें ताराऊसाहेबांनीं उत्तर केलें असतां, परसोजींनीं पुरतेपणीं अंगीकार करून राज्यासनीं बैसविलें[२].' 'स्वामी परराष्ट्रांतून स्वराज्यांत आले, त्या प्रसंगीं तुह्मी परसोजी भोसल्यांची जमेनिशी करीत असतां, त्यांचे तर्फेनें स्वामींचे दर्शनास येऊन लांबकानींचे मुकामीं दर्शन घेतलें. परसोजीस फौजेनिशीं स्वामींचे दर्शनास आणिलें. ते प्रसंगीं तुह्मीं सेवा बहुत एकनिष्ठेनें केली,' असें शाहू बापूजी सोनाजी दिघे यास लिहितो.[३] हा बापूजी दिघे रोहिडखोऱ्यांतील वतनदार राजारामाचे वेळेपासून शंकराजी नारायण सचिवाचे बरोबर मोगलांशीं लढत असून, त्यास पदातीं पन्हाळसहस्री हा किताब होता. त्यास परसोजी भोसल्यानें राजाराम महाराजांपासून आपल्या जमेनिशीचे कामावर नेमून घेतलें होतें. शाहू खानदेशांत येतांच त्याचा पक्ष स्वीकारण्याविषयीं बापूजीनें परसोजीचें मन वळविलें. 'परसोजीनें जमावसहित येऊन शाहूची भेट घेतली[४].' शाहूचा जम दक्षिणेंत चांगला बसण्यास प्रथम हेच दोन इसम मुख्य कारण झाले. यांच्याचमुळें शाहू राज्याचा खरा वारस अशी लोकांत खातरजमा होऊन, बागलाणांत वावरणारे हैबतराव निंबाळकर व नेमाजी शिंदे यांनीं शाहूचा पक्ष स्वीकारला. तसेंच पिंगळे पेशव्यांचा हस्तक पारोळ्याचा चिमणाजी दामोदर हाही शाहूस मिळाला. हे उपकार जाणून बापूजीस पुढें शाहूनें सात गांवच्या कुलकर्णाची सनद दिली.[५]

लांबकानीचा मुक्काम शाहूस चांगलाच यशस्वी झाला. 'स्वामीचा अभ्युदय प्रसंग होऊन या प्रांतीं आगमन झालें हें ऐकतांच तुह्मीं जमावानिशीं लांबकानीस हजर होऊन सेवाधर्म केला. त्यावरून सालांना दोन हजार होन स्वार मुक्रर केले असे,' अशी रखमाजी किन्हळे यास ११-६-०७ ची आज्ञा आहे. अशीं आणखी किती तरी पत्रें शाहूनें लिहिलीं असलीं पाहिजेत.

---

१ शा. रो. १९५. २ ऐ. टि. १-५८. ३ इ. सं. जु. ऐ. गो. २ पृ. १९. ४ पे. द. पृ. ११९ व १९. ५ इ. सं. जु. ऐ. गो. २ पृ. १४–१६. ६ खं.६-६.

तेथून पुढें आग्नेयीकडे चोरवड ( ता. एरंडोल ) येथें जुलई महिन्यांत शाहूचा मुक्काम झाला. येथून ता. ९-७-१७०७ रोजीं शाहूनें मतोजी जेधे देशमुख यास खालील पत्र लिहिलें:--' तुह्मी स्वामीचे पुरातन एकनिष्ठ सेवक या प्रसंगी स्वामीचे दर्शनास येऊन सेवा करावी. स्वामी तुमचें ऊर्जित विशेषात्कारें करतील. पुढें कुच दरकुच येतच आहों. ' ता. २४-७-१७०७ रोजी शाहू खानदेशांत कुसुंबी येथें होता[२]. अशाच प्रकारें लहान मोठ्या व्यक्तींस पत्रें पाठवून. व रयतेस दिलादिलासा देऊन शाहूनें त्यांचें साह्य मिळविलें. पुढें शाहू अहंमदनगरास आला, आणि निदान ऑक्टोबर अखेरपर्यंत तो नगरच्याच बाजूस राहून आपला बंदोबस्त करीत होता. ता. १-११-१७०७ रोजी शाहू लिहितो, ' स्वामी मजल दरमजल पुढें येतात. तर तुह्मी भीमातीरास अगोदर दर्शनास येणे.[४] ' इतका लांब मुक्काम नगरच्या बाजूस करण्याचीं अनेक कारणें होतीं. पुण्यास मराठशाहीचें ठाणें होण्यापूर्वी, अहंमदनगर हेंच उत्तर महाराष्ट्रांतलें मध्यठिकाण, प्राचीन राजधानी शहर व औरंगजेबाच्या स्वारीचें केंद्र होतें. शाहूच्या मनांत तर येथेंच आपली राजधानी करावी असें होतें. परंतु दक्षिणचें हें नाकें मुसलमानांचे हातून जावें अशी झुल्फिकारखानाची व बादशहाची इच्छा नव्हती. नगराहूनच शाहूनें चुलती ताराबाईशीं राज्याची वाटघाट केली: आणि ती आपणास विरोध करणार हें कळल्यावर. पुढें जो झगडा होणार त्यांत निश्चित जय मिळेल अशी खात्री वाटल्याशिवाय, ' भीवेरे अलीकडे स्वामीचें स्वराज्य[५] समजून. ' शाहू भीमा उतरून अलीकडे आलाच नाहीं. त्यास ताराबाईशी झगडण्याकरितां, मराठमंडळ आपल्या बाजूस आणावयाचें असून, त्यासाठीं मोगलांचा पाठिंबा त्यास अवश्य पाहिजे होता. ह्मणून नगर येथें औरंगजेबाच्या मृत्युभूमीचें दर्शन घेतल्यावर तो मुद्दाम औरंगाबादेनजीक खुल्दाबाद ऊर्फ रोजा ह्मणून बादशहाची कबर होती, तिचे दर्शनास गेला. तिकडे असतांच पारदचा युद्धप्रसंग झाला असावा. पारद गांव दौलताबादेच्या वायव्येस सुमारें २५ मैलांवर शिवेर परगण्यांत आहे. तेथें एक लहानशी गढी असून अंमल मोगलांचा होता.

१ पहा वंशावळ म. रि. पू. पृ. १७३. २ खं. १५.३५८.
३ पे. द. पृ. १०. ४ खं. १८.४६. ५ पे. द. पृ.२ २.

शाहूचे लोक सामान वगैरे आणण्यास गेले असतां, गांवचे पाटलांनीं त्यांजवर गोळ्या झाडून मोगलाई तर्फेनें गांव भांडविला. त्यावरून शाहूनें हल्ला करून गांव मारून फत्ते केला. पाटील शहाजी लोखंडे पडला, ते समयीं पाटलाची स्त्री होती तिनें आपला मूल आणून महाराजांचे पालखींत टाकिला व बोलली, 'यास वांचवावें, अन्यायी होते ते मारले गेले.' त्यावरून समाधान पावून मुलास व आईस आपले आश्रयास घेऊन, ठाणें फत्ते झालें, यास्तव मुलाचें नांव फत्तेसिंग भोसले ठेविलें. हा फत्तेसिंग भोसले पुढें शाहूपाशीं प्रसिद्धीस आला. त्यास केवळ राजपुत्राप्रमाणें वागवून अक्कलकोटची जहागीर दिली, तें संस्थान अद्यापि चालत आहे. पारद गांवच्या लोखंडे पाटलांस शाहूनें तो गांव स. १७१५ त इनाम करून दिला. फत्तेसिंगास दिलेल्या सनदा वगैरे स्मरणीय आहेत[१]. पारदचा प्रसंग स. १७०७ च्या ऑगस्ट सेप्टेंबरमध्यें घडला असावा.

**२. ताराबाईशीं कलह, खेडची लढाई,** नोव्हेंबर १७०७.—या पूर्वीच आपण बादशहापासून निघून परत स्वदेशीं येत आहों, असें शाहूनें ताराबाईस कळविलें होतें. त्यावरून संतोष पावून तिनें त्याचा सत्कार केला असता तर, पुढील झगडा टळला असता. परंतु ताराबाईनें शाहूशीं विरोध आरंभिला. तिचे उद्देश व्यक्त करणारें एक अस्सल पत्र नुकतेंच उपलब्ध झालें, तें महत्त्वाचें असल्यानें समग्रच देणें जरूर आहे.

'स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ३४ सर्वजितसं० आश्विन शु० तृतीया, सौम्यवासरे, क्षत्रियकुलावतंस श्रीराजा शिवछत्रपति यांणीं सोमनाईक देसाई व देशकुलकर्णी ता. सेनवडें यांसी आज्ञा केली ऐसीजे: राजश्री शाहूराजे तास्रांचे निर्बंधांतून निघाले आहेत, म्हणून हुजूर वर्तमान आलें. येशास, हें राज्य थोरल्या कै० स्वामींनीं बहुत श्रमें करऊन, सर्वार्थे संपूर्ण केलें होतें. ते राजश्री संभाजीराजे काका यांणीं विध्वंसून कलासवासी स्वामी राज्याधिकारी झाले. त्यांणीं स्वपराक्रमें नूतनच राज्य संपादिलें. स्वामींनीं त्याचें संरक्षण करून तास्राचा पराभव केला. राज्याची अभिवृद्धि होत चालली. दुसरी गोष्टी. हें राज्य थोरल्या कै. स्वामींनीं तीर्थरूप. कै० स्वामीस द्यावेंसें केलें होतें. ऐसें असतां त्यांस या राज्याशीं संमंध नाहीं. त्या डोहणियांत जे मिळाले आहेत

१ जु. ऐ. गो. २·४; पे. द. पृ. १२, १७६, १८०.

व मिळतील त्यांस नतीजा पाववायाची आज्ञा करून, रा. जयसिंग जाधवराऊ सेनापति व हंबीरराव मोहिते सरलष्कर व वरकड सरदारांस फौजेनशीं पाठविले आहेत. रा. परशराम पंडित प्रतिनिधि यांसही रवाना केले आहे. ज्यांचें अनुसंधान त्यांकडे लागलें असेल त्यांचा हे मुलाहिजा होणार नाहीं, शासन करितील. तुह्मी वतनदार एकनिष्ठ आहां. तुह्मांपासून अनसारखी वर्तणूक होणार नाहीं. परंतु शाहूराजे यांजकडील कागदपत्र तुह्मांस आले असतां कांहीं वर्तमान हुजूर लिहिलें नाहीं ह्मणजे काय ! त्यांकडून माणूस आले तेच कैद करून पाठवावयाचें होतें. ते गोष्टी न केली. यामध्यें बरें काय विचारिलें आहे ! याउपरी ऐसें करीत न जाणें. त्यांकडील कागदपत्र घेऊन माणूस येईल ते कैद करून हुजूर पाठवीत जाणें. कदाचित कोण्ही त्यांकडे अनुसंधान लावील, सावता राखेल, तरी त्याचा उबार राहणार नाहीं. तुम्ही अनसारिखा प्रसंग मनांत आणाल, कागदपत्र येईल तो पन्हाम कराल, तरी तुमचें बरें होणार नाहीं. वतनापासून दूर व्हाल हें जाणोन, स्वामीच्या पायांशी निष्ठा धरून राहोन, लिहिले-प्रमाणें वर्तणूक करणें. जाणिजे. मर्यादेयं विराजते. लेखनसीमा. सुरु सूद बार.[१]
हें ता. १७-९-१७०७ चे पत्र या झगड्यांत महत्त्वाचा पुरावा होय. यांत शाहू खोटा आहे असें ताराबाई प्रतिपादित नाहीं; शिवाजीनें कमावलेलें राज्य संभाजीनें घालविलें, पुढें तें राजारामानें कष्टानें नवीनच साध्य केले असें ह्मणते. संभाजीनें आपल्या आईस क्रूरपणानें मारिलें हे राजारामानें विसरणें शक्य नव्हतें. शिवाय शिवाजीनेंही मृत्युपूर्वी राज्य संभाजीस न देतां राजारामास दिलें होतें. संभाजीच्या मुलाचा त्याजवर बिलकुल हक्क नाहीं असें ताराबाई सांगते. शिवाजीचा जन्म[२] ता.९-६-१६९६चा असल्यामुळें, तो या वेळीं अकरा वर्षांचा होता आणि कारभार ताराबाईच पाहत होती. शाहू खोटा आहे हा बखरकारांचा उल्लेख ताराबाईनें तोंडी उच्चारला असेल; परंतु कागदांत तसा उल्लेख ती करीत नाहीं. बखर-कारांच्या मतें ताराबाईनें असा पुकारा केला की हा कांहीं खरा शाहू नव्हे, तोतया आहे, यास मारून टाकावा. रामचंद्रपंत अमात्य, परशुराम प्रतिनिधि,

१ मावळेकर देसाई सेतवडेकर हल्लीं रा० अंमदाबाद यांचे दप्तरांतील. नीलकंठ मोरेश्वर प्रधान व परशुराम त्र्यंबक प्रतिनिधि यांचे शिक्के पत्रावर आहेत. वि. ज्ञा. वि. १९२४ माहे फेब्रुवारी. २ स. प. पृ. १७६.

शंकराजी सचिव, नीलकंठ मोरेश्वर प्रधान, सेनापति धनाजी, खंडो बल्लाळ या प्रमुख मंडळींस जमवून तिनें कळविलें कीं, संभाजीनें दौलत गमावली, ती राजाराम साहेबांनीं कष्ट सोसून राखिली. तर शाहू खरा असो किंवा खोटा असो, त्यास नाहींसा करावा. दूधभाताचें ताट आणून त्यावर हात ठेवून तिनें वरील मंडळींकडून शपथक्रिया घेतली. अशी शपथ धनाजी व खंडो बल्लाळ यांनीं केलेली दिसत नाहीं. 'खोटा असला तर अवश्य लढून मारूं, पण खरा असला तर आपण त्याशीं लढणार नाहीं,' असें त्यांचें ह्मणणें होतें. कान्होजी आंगरे हा आणखी एक बलिष्ठ सरदार पश्चिम किनाऱ्यावर होता, त्यास भेटीस आणवून त्याचें इमान ताराबाईनें घेतलें. ह्मणूनच तो पुढें शाहूशीं विरुद्ध गेला. या झगड्यांत मराठमंडळाची भावना कशकशी बदलत गेली तें ध्यानांत आणिल्यास पुढील भानगडी चांगल्या समजतील.

संभाजीला मारल्यावर रायगड किल्ला बादशहानें ता. ३-११-१६८९ रोजीं काबीज केला आणि शाहूस पकडून नेऊन त्यास 'हफ्तहजारी' केलें व शाहू राजे नांव ठेविलें.[1] तेव्हांच मराठी राज्यांत दुफळी उत्पन्न करण्याचा बादशहाचा डाव होता. निर्भेळ स्वातंत्र्यवादी पक्ष जोरांत असल्यामुळें, त्याच वेळीं शाहूला बादशहानें मराठी राज्यावर नेमिलें नाहीं. जिंजी घेतल्यावर पुढें औरंगजेबाची सरशी होत गेली. नंतर राजाराम मरण पावला आणि अल्पवयी शिवाजी व ताराबाई यांचे हातीं सत्ता आली. रामचंद्रपंत व इतर मंडळी यांनीं आपली शिकस्त केली असतांहि स्वराज्यपक्षास ह्मणण्यासारखें यश न येतां बादशहाचीच सरशी होती. जनतेचें लक्ष दृश्य परिणामाकडे असतें. पुढें शाहू सुटून आला तो, त्याच्या मवाळ स्वभावानुरूप बादशाही सनदेचा व कृपाछत्राचा पाठिंबा घेऊन आला. तेव्हां त्याजशीं सुद्धां जर पुनः झगडाच सुरू केला, तर त्या वेळच्या विपन्न स्थितींत कदाचित् सर्वच नाहींसें होण्याचा प्रसंग आला असता, तेव्हां तूर्त शाहूचा सत्कार करून हळूहळू राज्याचा जम तडजोडीच्या भावनेनें बसवून, मराठमंडळानें पुढील मार्ग काढिला. निर्भेळ स्वातंत्र्यवादी रामचंद्रपंत मानला तर बाळाजी विश्वनाथ व बाजीराव हे शाहूस हाताशीं धरून त्याच्या द्वारें समाजाच्या भावना सिद्धीस नेणारे मवाळ पुढारी असें

१ जे. श. पृ. २०२.

म्हणतां येईल. रामचंद्रपंतानें मवाळ शाहूस तीव्र विरोध केला नाहीं. म्हणूनच ताराबाईचा त्याजवर पूर्ण विश्वास नव्हता. अडचणीच्या प्रसंगीं 'सर्वनाशे समुत्पन्ने अर्धं त्यजति पंडितः' हा न्याय ओघानेंच उद्भवतो, हें आयर्लंडसारख्याच्या उदाहरणावरून लक्षांत घेण्याजोगें आहे. ही तडजोड सिद्धीस जाऊन शाहूची लायकी चार दोन वर्षांत मराठमंडळास पटूं लागली, आणि ताराबाईवरची त्यांची भक्ति ओसरत गेली. बहुतेक लहानमोठे सरदार प्रसंग ओळखून शाहूस मार्मील झाले. औरंगजेबाचे पश्चात् बादशाही धोरणही नरम पडलें. तरी ताराबाई आपला तीव्र भाव सोडीना, तेव्हां तिलाच प्रतिबंधांत ठेवून मराठमंडळानें आपला भाव सिद्धीस नेला. शाहूनें ही परिस्थिति ओळखून प्रतिस्पर्धी मंडळीस नरमाईनेंच वागविलें.

भीमेच्या पलीकडे राहून शाहूनें नानाप्रकारचा उद्योग केला. प्रांतांतील वसूल घेऊन, त्यांस तो सनदा देऊं लागला, लोकांचे तंटे तोडून व्यवस्था करूं लागला, आणि फौज ठेवून किल्लेकोटांचा बंदोबस्त करूं लागला. या त्याच्या उद्योगाचे कागद नानाप्रकारचे उपलब्ध आहेत.× शाहूच्या या खटपटीस प्रतिजबाब देण्यांतही ताराबाईनें अप्रतिम तडफ दाखविली. किल्लेकोटांस, अधिकाऱ्यांस व रयतेस आपापल्या पक्षांत ओढण्याच्या या वेळच्या ताकिदी शाहू व शिवाजी या दोघांच्याही किती तरी उपलब्ध आहेत. यांमुळें एकंदरींत दोघांच्या मनाची कशी त्रेधा उडाली असावी याचें अनुमान होतें. ' शाहू तांब्राच्या सेनेंतून आले आहेत ते कागदपत्र चालवितील, नसता कथला करितील, तरी त्यांस संबंध नाहीं. त्यांचे कागदपत्र एकंदर न घेणें, त्यांकडे वसूल न देणें, त्यांचा कागदपत्र मानील त्याचा परिच्छिन्न मुलाहिजा होणार नाहीं ' अशी शिवाजीची ताकीद ता. १६-९-१७०७ ची पारनेरच्या देशमुखांस आहे. नगर औरंगाबादचे बाजूस भोसल्यांचीं घराणीं होतीं, त्यांचीं मनेंही शाहूनें आपल्या बाजूस वळविलीं असावीं. रायभानजी राजे भोसले नांवाचा एक गृहस्थ या वेळीं प्रमुखपणें, केव्हां मोगलांकडे, केव्हां ताराबाईकडे व केव्हां शाहूकडे, असा वावरत असल्याचे अनेक उल्लेख आहेत. शाहूनें त्यास बादशहाकडे आपला वकील

×पहा जगदाळ्यांचे पाटीलकीचा निवाडा ( १५.५९ ); पिसाळांचा तंटा खं ३. पृ. ६६-६७.

ह्मणून पाठविलें होतें.[१] दुहींच्या या प्रसंगांत अनेक प्रमुख गृहस्थ दोनही पक्षांकडे संधान राखून आपला स्वार्थ साधीत होते. शाहूच्या वडील बहिणीचा नवरा शंकराजी महाडिक पूर्वी कांहीं काळ शाहूबरोबर बादशहाचे प्रतिबंधांत होता, तो, हल्लीं शाहू परत आल्यावर त्यास आपलें विस्मरण झालें ह्मणून, मनाची तळमळ दाखवितो, तर इकडे तोच गृहस्थ, 'आपण आमचा परामर्ष घेत नाहीं, उपेक्षाच केली आहे, हें महाराजांस उचित नव्हे.' असें तो शिवाजीस लिहितो.[२] या शंकराजीस शाहूनें ता. ७-१०-०७ रोजीं कळविलें कीं, 'सांप्रत आम्ही घालेघाट चढून कडेवळितांन आलों आहों. येथून मजल दरमजल पुढें येऊं तों तुम्हीं पोख्त जमाव घेऊन लौकर दर्शनास येणें. विलंब सर्वथा न लावणें.' इतक्यावरही हा शंकराजी महाडिक शाहूस मिळाल्याचें दिसत नाहीं. पुढें चार दोन महिन्यांतच तो ताराबाईचे तर्फेनें उद्योग करतांना दिसतो. प्रतिनिधि, सेनापति, सचिव वगैरे प्रमुख मंडळीस सुद्धां इकडे आड व इकडे विहीर असें होऊन, त्यामुळें अनेक भानगडी कशा उपस्थित झाल्या तें पुढें दिसून येईल.

शाहूनें मात्र या प्रसंगीं धैर्य, तडफ, निश्चय व मनमिळाऊ धोरण इत्यादि अनेक गुण चांगलेच व्यक्त केले. खरें ह्मटलें तर ही त्याची तडफ चांगला जम बसल्यावरही शेवटपर्यंत टिकती तर शककर्त्या महाराजांच्या तोडीचा हा पुरुष झाला असता, असें या आरंभींच्या त्याच्या उद्योगावरून वाटूं लागतें. आपली परिपूर्ण तयारी होईपर्यंत सामेअलीकडे येण्याची घाई त्यानें केली नाहीं. चार पांच महिनेपावेतों दूर राहूनच अनेकांच्या भेटी घेऊन, आपल्या खरेपणाची व कर्तबगारीची जी छाप त्यानें मराठमंडळावर बसविली, तिच्यामुळेंच त्याला पुढें यश आलें. नाहीं तर योग्य जम बसलेल्या ताराबाईपुढें तो हरला असता. नवंबर १५ चे पुढें दीपवाळीनंतर शाहूला शह देण्याकरितां ताराबाईच्या फौजा चाकणेच्या बाजूस आल्या. तेव्हां खेडकडूसच्या सुमारें उभयतांची चकमक झडून शाहूचा वरचष्मा झाला. या लढाईचा तपशील अस्सल कागदांत उपलब्ध नसल्यामुळें अनेक विरोधी बखरींवर भिस्त ठेवावी लागते. प्रतिनिधि व धनाजी जाधव यांस ताराबाईनें चाळीस हजार फौजेनिशीं शाहूवर रवाना केलें. 'त्यांबरोबर खंडो बल्लाळ यांस दिल्हें असतां, स्वामीस गुप्तरूपें भेटून सेनापति

---

१ खं. १५·२८९, व पृ. १०२; खं. ८. ५६,६१. २ प्रा. म. स. पृ. ९ व १५.

व सरदार यांच्या खातरजमा करून सर्वांस स्वामीचे लक्षीं आणिलें. लढाई झाली, प्रतिनिधि पळून गेले. पुढेंही स्वामीचे ठायीं निष्ठा धरून आंगरे वगैरे मातुश्रीचे लक्षांतील सरदार व स्थळें स्वामीचे लक्षांत आणण्याचा उद्योग केला,' हा चिटणिसाच्या सनदेंतील प्रत्यक्ष शाहूचा उल्लेख आहे. 'फौजांस यश आल्यास चाकर तुमचे, नाहीं तर सरदारांची वाट ते आमची,' असें खंडोबानें ताराबाईस अगोदरच कळविलें होतें. सारांश, धनाजी लढाईंत उदासीन राहिला. प्रतिनिधीचा मोड होऊन, त्याचे दहा पांच हजार स्वार सांपडले. प्रतिनिधि चाकणास आले. परशुराम भोसले यांचे खातरजमेमुळें बिंब खरें अशी सर्वांची खात्री झाली. दुसरे दिवशीं प्रतिनिधि पुनः शाहूवर चालून जाणार होता, परंतु आदल्या रात्री फितव्याच्या वाटाघाटी झाल्यामुळे, प्रतिनिधीचे लोकही लढण्यास पुढे जाईनात, तेव्हां प्रतिनिधि पुण्यावरून साताऱ्यास जाऊन किल्ला बळावून बसले. जाधवराव शाहूस भेटून रुजू झाले. राजश्रीचा पुण्यप्रताप मोठा, जे जे ताराबाईनें नेमले, त्यांवर छाया पडली. शस्त्र उचलण्याची छाती झाली नाहीं. एवंच खेडच्या लढाईत शाहूस जय मिळण्याची खटपट खंडो बल्लाळाची होय. त्यांत बाळाजी विश्वनाथाचेंही अंग असण्याचा संभव आहे, त्याचा संदर्भ पुढें येईल.[1]

**३. सातारा काबीज, राज्याभिषेक**, डिसेंबर, जानेवारी १७०८.— खेड येथें जय मिळाल्याबरोबर त्याचा फायदा लगोलग शाहूनें घेतला. एक महिन्याचे आंत साताऱ्यावर जाऊन तो किल्ला त्यानें हस्तगत केला, आणि प्रधा-

१ रा. प. पृ. २१९. २ पे. ब. खं. ८, व का. सं. प. या, पृ. ५२७; ऐ. स्फु. ले. २·१. ही खेडची लढाई कधी झाली त्याची मिति उपलब्ध नाहीं. हें खेड कोणतें त्याचाही निश्चय होत नाहीं. नगर जिल्ह्यांत भीमेच्या कांठीं दुसरें खेड आहे. चाकणचा उल्लेख आहे त्यावरून जुन्नरकडचें खेड लढाईचें ठिकाण असावें. हेंही भीमेच्या उत्तरकांठी असून, खेड व कडूस यांचेमध्यें भीमा आहे. मात्र नगरकडून साताऱ्याकडे जाण्यास जुन्नरकडे पश्चिमच्या बाजूस वळण्याचें शाहूस प्रयोजन नव्हतें. तसेंच त्या वेळचा हा प्रदेश कडेवळित प्रांतांत मोडत होता असें तत्कालीन उल्लेखांवरून दिसतें.

नांच्या वगैरे नेमणुका करून राज्यकारभाराची सुरुवात केली. विधियुक्त राज्याभिषेक पुढें यथावकाश झाला, परंतु प्रधानांच्या व इतर नेमणुका लगेच केलेल्या दिसतात. नीलकंठ मोरेश्वर प्रधान ताराबाईकडे राहिला, त्याचा भाऊ बहिरव मोरेश्वर शाहूस मिळाला. त्यास शाहूनें आपली प्रधानकी दिली. डिसेंबर १५च्या कागदावर बहिरोपंत प्रधानाचा शिक्का आहे. शाहूनें या प्रसंगीं अप्रतिम मनमिळाऊपणा दाखविला. सूड घेण्याची प्रवृत्ति यत्किंचित् ठेविली नाहीं. लोकांस दिलदिलासा देऊन, त्यांस अभयपत्रें व आश्वासनें दिलीं. ताराबाईचे पक्षास सामील झाल्याबद्दल किंवा उघडपणें तिला मदत करीत असतांही, त्यांचे पारिपत्याचा विचार शाहूनें मनांत आणिला नाहीं. पिंगळ्यांनीं दोहोंकडची प्रधानकी आपल्याच घरांत संभाळिली, तोच कित्ता इतरांनींही शक्य तितका उचलिला. खेडाहून साताऱ्यास कोणत्या मार्गानें शाहू आला, तें निश्चित ठरवितां येत नाहीं. आळंदी[1], तुळापुर[2], पुणें[3], सुपें[4], जेजुरी[5], वीरवाल्हें[6], शिरवळ[7], रोहिडा[8], दहिगांव[9], वर्देनचंदन इतक्या स्थलांचा उल्लेख भिन्नभिन्न ठिकाणीं येतो. या वेळीं पिसाळांच्या व जगदाळ्यांच्या देशमुखीसंबंधानें धनाजी जाधवानें शाहूस नाना प्रकारें गळ घालून, खऱ्या मालकांच्या हक्कांस न जुमानतां, स्वतःच्या शिफारसी करून शाहूला इतकी भंडावून सोडलें की शेवटीं जाधवाच्या वर्तनाचा शाहूस अगदीं वीट आला, आणि एव्हांपासूनच तो बहुतेक शाहूचे मर्जीतून उतरला. या तंट्यांचे निवाडे करण्याचें लफडें शाहू साताऱ्यावर येतांना व पुढेंही कांहीं काळ त्यास निस्तरावें लागलें. जेजुरीस देवदर्शन करून ब्राह्मणभोजन व दानधर्म केला; वीर येथेंही कुलस्वामी सिद्धाचें दर्शन घेऊन तो शिरवळावर आला. येथेंच शाहूनें सचिवाचें प्रकरण उरकलें. नजीक रोहिडा किल्ल्यावर शंकराजी नारायण सचिव होता, त्यास भेटीस बोलाविलें. 'क्रियेस स्मरोन आले नाहींत. तेव्हां महाराजांनीं सांगून पाठविलें कीं आम्ही भेटीस येतों, हें ऐकून देहत्याग केला. दुसरे दिवशीं महाराज किल्ल्याखालीं गेले, तों शव वरून उतरलें. हें पाहून, वर जाऊन स्त्री येसूबाईचें समाधान बहुतप्रकारें

× खं. १५·३६०. १, ७ खं. १५–५७; २, ३, ५, ६, ९, १० शा. म. च. ४ जु. ऐ. गो. २–१६; ७, ८ का. सं. प. या. पृ. ५२८. २ खं. १५·५९;३·६४.

केलें.[1] पंडित यांस बोलाविलें असतां न आले, हिरकणी खाऊन मेले.[2] 'सांप्रत शंकराजीपंतास देवाज्ञा झाली' हा उल्लेख १५-१२-०७ च्या पत्रांतला असून[6] २०-१२-०७ ची शिवाजीची सनद शंकराजीपंताच्या शिफारसीवरून दिलेली आहे. ही शिफारस सनदेच्यापूर्वी थोडे दिवसच झालेली असावी. अर्थात् शंकराजी सचिव १० डिसेंबरचे सुमारास शाहूचा मुक्काम शिरवळावर असतां मरण पावला असें ठरतें. नीरेच्या कांठीं अंबवडें येथें पंतानें देहविसर्जन केलें.[4] असा उल्लेख आहे, त्याचा मेळ वरच्यांशीं बसवूं लागल्यास, पंतानें रात्रीं हिरकणी खाऊन प्राणत्याग केला. आणि त्याचें शव अंबवड्यास आणून सकाळीं अंत्यविधीस पावलें, असा निष्कर्ष निघतो. शंकराजीपंत नाहींसा होतांच राजगड, प्रचंडगड (तोरणा), विचित्रगड (रोहिडा) वगैरे किल्ले आपोआप शाहूच्या हस्तगत झाले; पुरंदर व सिंहगड हे दोन किल्लेही पुढें लवकरच शाहूचे ताब्यांत आले. शिरवळाहून दहिगांवावर येऊन तेथून चंदनवंदनचे हवालदारांस पत्रें पाठविलीं. ते येऊन भेटले. त्यांचा सन्मान करून किल्ले घेतले; आणि लगेच सातारा हवालीं करण्याविषयीं प्रतिनिधीस पत्रें पाठविलीं. सातारा हस्तगत होण्यास फारसा विलंब लागला नाहीं. ताराबाई तर तेथील बंदोबस्त प्रतिनिधीवर सोंपून अगोदरच पन्हाळ्याकडे गेली होती. सातारा हस्तगत झाल्याशिवाय, माघ शु॥ १ म्हणजे १२ जानेवारीस शाहूनें राज्याभिषेक करून घेतला नसता. 'आजपासून आठवे दिवशीं किल्ला घेऊं,' अशी शाहूनें निश्चिति केली, 'त्यास धनाजी वगैरे हांसले,' असा उल्लेख आहे, तोच संभवनीय दिसतो. किल्ल्याचा बंदोबस्त शेखमिरा याजकडे असून त्याचीं मुलेंमाणसें वाईस होतीं तीं शाहूनें पकडून साताऱ्यास आणिलीं.आणि तोफेनें त्यांस उडवून देतों असा धाक घातला. त्याबरोबर शेखमिऱ्यानें प्रतिनिधीस बोध केला कीं किल्ला शाहूचे स्वाधीन करावा. तें प्रतिनिधि मानीना, तेव्हां त्यास अकस्मात कैद करून शेखमिऱ्यानें किल्ला शाहूचे हवालीं केला. संकल्प केल्यापासून आठवे दिवशीं शनिवारीं सकाळाच किल्ला हस्तगत होऊन शाहूनें फत्तेची नौबत वाजविली. त्यावरून पुढें मराठशाहींत शनिवारीं नौबत वाजविण्याचा प्रघात पडला. बहुधा हा शनिवार स. १७०८ चा पहिलाच असावा. ता १० मार्च १७०८च्या

---

१ का. सं. प. या. पृ. ५२८. २ खं. १५.२८९. ३ खं. १५.२८८. ४ पे. द. पृ. १८८. ५ ना. भो. ब. २१. ६ खं. १५.३६०.

सनदेंत शाहू लिहितो,[१] ' किल्ले सातारा भांडत होता, शेखमिरा जमावानिशीं किल्ल्यांत होते. स्वामीच्या पायाशीं निष्ठा धरून किल्ला स्वामीस अनुकूळ करून दिला, सबब नूतन इनाम करून दिला असे. ' किल्ला हातीं येतांच शाहूनें दरबार भरवून आपल्या नांवचे शिक्के करून राज्यकारभार सुरू केला. आजूबाजूचे परळी, वर्धनगड, महिमानगड वगैरे किल्ले हस्तगत होण्यास विलंब लागला नाहीं.

शके १६२९ सर्वजित् संवत्सरी माघ शु. १ सोमवार ता. १२ जानेवारी सन १७०८ रोजीं जन्मनांव शिवाजी राजे ऊ. शाहू महाराज यांस राज्याभिषेक झाला[२]. कामदारांच्या नेमणुका या पूर्वींच प्रसंगोपात्त करण्यांत आलेल्या यथाविधि कायम करण्यांत आल्या. पेशवा बहिरोपंत पिंगळे, सेनापति धनाजी जाधव, सचिव नारो शंकर, मंत्री रामचंद्रपंत पुंडे, सुमंत महादाजी गदाधर, अमात्य बाळकृष्ण वासुदेव ऊ. अंबूराव हणमंते, न्यायाधीश होनाजी अनंत, पंडितराव मुद्गलभट अशीं मुख्य पदें तूर्तातूर्त देण्यांत आलीं. याशिवाय परसोजी भोसले यास सेनासाहेबसुभा हें पद देण्यांत येऊन, त्याचीच सर्व मदत शाहूस असल्यामुळें,त्याच्या घराण्यास शाहूनें कधीं अंतर दिलें नाहीं.परसोजीजवळ आनंदराव महादेव प्रभु देशपांडे मुरार बाजीचा पुतण्या काम करीत असून तो ताराबाईस सोडून शाहूस मिळाला, त्याजकडे पोतनिशी व खासनिशी सांगितली. हैबतराव निंबाळकरास सरलष्कर केलें. खंडो बल्लाळास चिटणिसी देऊन, परशुरामपंत अटकेंत असल्यामुळें प्रतिनिधिपद प्रल्हाद निराजीचा मुलगा गदाधर प्रल्हाद यास तूर्तातूर्त देण्यांत आलें.

माघ शुद्ध १ शके १६२९ ता.१२ जानेवारी १७०८ पासून मार्गशीर्ष वद्य ३ शके १६७१, ता. १५ डिसेंबर १७४९, पावेतों शाहू छत्रपतीची कारकीर्द झाली. शाहूच्या पश्चात् मराठी राज्याचा कारभार बहुधा पेशव्यांनीच प्रमुखपणें चालविला. पेशव्यांच्या घराण्यांतील पहिला पुरुष बाळाजी विश्वनाथ यास ता. १७ नोव्हेंबर सन १७१३ रोजीं शाहू छत्रपतीनें पेशवाईचें काम दिलें. तेव्हांपासून शाहूच्या अखेरपावेतों त्या कुटुंबांतले लागोपाठ तीन पेशवे झाले.शाहूच्या मृत्युनंतर ता.०४ जानेवारी १७५० रोजीं रामराजा छत्रपति झाला. तो सिंहा-

१ पे. द. पृ. १०. २ मोघम माघमास सर्वत्र आढळतो. मिति फक्त ' रुमाल १ ' या पुस्तकांत पृ. ११८. वर आहे.

सनावर असतांच ता. २३ जून सन १७६१रोजीं तिसरा पेशवा बाळाजी बाजीराव मरण पावला. राजपुरुषांच्या हयातीवरून इतिहासाचे कालखंड पाडण्याचा प्रघात आहे. या नियमास अनुसरून मराठी रियासतीच्या या विभागांत शाहू छत्रपतींची कारकीर्द हा पहिला मोठा खंड पडतो. परंतु ही कारकीर्द मोठी असल्यामुळें विवेचनाच्या सोयीसाठीं पेशव्यांच्या नांवावरून तिचे पोटभाग पाडणें प्रशस्त आहे. शिवाय चालू अभ्यासक्रमांत व लौकिक प्रचारांत पेशव्यांच्या नांवानेंच मराठशाहीचा कारभार ओळखिला जातो.

**४. रांगण्यावरील मोहीम**, मार्च–जून, १७०८.—शाहू व ताराबाई यांच्या झगड्यास भाऊबंदकीचें युद्ध असें नांव देतां येईल. इंग्रजींत यास सिव्हिल वॉर म्हणतात. अशा युद्धानें देशाचें नुकसान भारी होतें. आपल्याच फौजांनीं आपला देश उद्ध्वस्त होतो. परंतु शाहूनें निकरावर आल्याशिवाय खुबीनें हा युद्धप्रसंग हळूहळू मिटविला. परिस्थितीच्या मानानें या झगड्याचे भाग पाडतां येतील. पहिला भाग शाहूच्या सुटकेपासून राज्याभिषेकापर्यंतचा. दुसऱ्या भागांत रांगण्याची मोहीम घालतां येईल. त्यापुढचा भाग कोल्हापुरास संभाजीची स्थापना झाली तोंपावेतोंचा. त्यानंतर मराठशाहीच्या राजकारणास अगदीं निराळें वळण लागलें.

आरंभापासूनच शाहूच्या कारभाराचें एक मुख्य धोरण असें दिसतें, कीं प्रतिपक्षांशीं व विरोधकांशीं शक्य तितकें सामदामानें वागून त्यांजवर आपला शह बसवावयाचा. असें करण्यांत थोडासा अपमान किंवा नुकसान झालें तरी सहन करावयाचें, परंतु युद्ध करून प्राणहानि करण्यास किंवा कडक शिक्षा देण्यास शाहूचें मन सहसा धजत नसे. या त्याच्या मृदु स्वभावानें कांहीं प्रसंगीं फायदे झाले, तसे नुकसानही झालें, असें म्हणण्यास हरकत नाहीं. राजकारणांत केव्हां केव्हां अत्यंत निष्ठुरपणा धारण करून प्रकरणें संपवावीं लागतात, व धाक बसवावा लागतो. तसें न केल्यामुळें शाहूचे अनेक व्यवहार रेंगाळत चालले, हाताखालचे लोकांत शिस्त व दहशत राहिली नाहीं, आणि राज्यकारभार ढिला झाला. राज्याभिषेक झाल्याबरोबर ताराबाईच्या पक्षाशीं कसें वागावयाचें हा त्याजपुढें पहिला मोठा प्रश्न होता. पूर्वींच्याच तडफेनें त्यानें पुढील उद्योग चालविला असता तर, अल्पावकाशांत तो चुलत मंडळीस

ठिकाणावर बसवूं शकला असता. तसें न करितां खंडेराव दाभाडे वगैरेंच्या आग्रहावरून ताराबाई व शिवाजी यांस त्यानें स्वतंत्र प्रदेश तोडून देऊन तडजोड आरंभिली. ताराबाई कोल्हापुर पन्हाळा प्रांतांत होती. तोच दक्षिणेकडचा मुलूख त्यांस तोडून देऊन त्यांनीं आपल्या वाटेस जाऊं नये, असा तह लगेच ह्मणजे १६ जानेवारी सन१७०८त सुचवून तंटा मिटविण्याचें काम शाहूनें आरंभिलें.[1] वारणा नदीची हद्द ठरविण्याचा जो तह पुढें २३ वर्षांनीं ठरला, त्याचा पहिला उपक्रम अगदीं याच वेळीं असा झालेला आहे. हा तह कबूलकरून ताराबाई शाहूस उखडून काढण्याचा उद्योग सोडून स्वस्थ बसती, तर शाहूही राज्याचा हिस्सा तोडून देऊन या कौटुंबिक भांडणांतून मोकळा झाला असता. परंतु ताराबाईनें तर निकराचा झगडा सुरु केला. रामचंद्रपंत अमात्य तिच्या बाजूनें कसून प्रयत्न करीत होता. मात्र तो तिच्याविषयीं नेहमींच साशंक असे. ' तुह्मी घडोघडी मनांत संदेह करावा हें उचित नाहीं, येविशीं उदंड सांगितलें अगर लिहिलें तें तुम्हांस प्रमाण वाटत नाहीं, ' असें ताराबाईच पंतास लिहिते.[2] उलट पक्षीं शाहूही पंतांचे वडील भावास आपल्या बाजूस वळवीत होता.[3] तात्पर्य शाहूच्या तडजोडीचा उपयोग झाला नाहीं. परशुरामपंत, धनाजी, खंडो बल्लाळ इत्यादिकांस लिहिलेलीं ताराबाईचीं पत्रें पाहिलीं ह्मणजे तिचा उद्देश व्यक्त होतो.[4] तिनें प्रसिद्धगड ऊ. रांगण्याची मजबुदी करून शाहूशीं झगडण्याचा उद्योग चालविला. आंग्रे व वाडीकर सावंत यांची तिला मदत होती.[5] संताजी घोरपड्याचा भाऊ बहिरजी हिंदुराव याचा मुलगा सिधोजी हिंदुराव हा बलवान सरदार ताराबाईस मिळून होता. सन १७०८ च्या फेब्रुवारींतच शाहूनें ताराबाईवर चाल केली. ' कुच करून पन्हाळियावर गेले. तेथून पंचगंगेवर गेले.[6] मार्गी वसंतगड वगैरे घेतले. पन्हाळे पावनगड घेऊन, कोल्हापुरीं ठाणें बसवून रांगण्यावर गेले. वाटेंत स्थलें काबीज केलीं. तसाच परशुराम त्रिंबकाच्या कारभाऱ्यानें विशाळगडही शाहूच्या स्वाधीन केला. ताराबाईनें वाडीकर खेमसावंत व कान्होजी आंग्रे यांस रांगण्याचा बचाव करण्यास बोलाविलें. शाहूनें किल्ल्यास वेढा घातला. हल्ला करून किल्ला घेण्याचा हुकूम

१ खं. २०.२८२. २ खं. ८.६८. ३ खं. ८.६३. ४ खं. ८.६४–६६. ५ खं. ८.६२. ६ खं. ३.६४.

सोडून स्वतः शाहू फौजेबरोबर घोड्यावर बसून डोंगर चढत असतां, घोड्याचा पाय अकस्मात् घसरला. खंडोबल्लाळ चिटणीस नजीक होता. त्यानें एका झाडाला आपल्या पायाचा नेट देऊन घोडा ओढून धरिला, आणि शेखमिरा जवळ होता, त्यानें शाहूस एकदम खालीं ओढून घेतलें. याप्रमाणें आपला जीव वांचविल्याबद्दल शाहूनें पुढें दोघांसही इनामें करून दिलीं. शाहूपुढें आपला निभाव लागत नाहींसें पाहून, रामचंद्रपंतानें ताराबाईस व दोघां राजपुत्रांस चोरवाटेनें किल्ल्यांबाहेर काढून मालवणाकडे लावून दिलें, आणि सेनापति पिराजी घोरपडे व त्याचा मदतनीस नारोपंत, यांसह आपण आंत राहून कित्येक महिनेपर्यंत किल्ला झुंजविला. शेवटीं रांगणा किल्ला पडण्याच्या बेतांत आला, तेव्हां वेढा उठवून महाराजांस घेऊन परत जाण्याविषयीं रामचंद्रपंतानें धनाजीकडून शाहूची समजूत घालून सर्व लष्करासह परत कूच करविलें. वाटेंत विशाळगडचा अधिकारी निळो बल्लाळ, खंडोबल्लाळाचा भाऊ याजला भेटीस बोलावून जिंकिलेल्या मुलखाची व्यवस्था त्याजकडे सोंपिली. संवत्सर प्रतिपदेस ह्मणजे १२ मार्चला शाहूचा मुक्काम रांगण्याचे बाजूस चिकवाडी, पाटगांव, माणगांव येथें होता[१]. तो पुनरपि जून ता. २४ ला शाहू पन्हाळ्यावर असल्याचा उल्लेख आहे[२]. यावरून रांगण्याखालीं शाहूचा तळ सुमारें तीन महिने झाला. वाडीकर खेमसावंतास मदतीबद्दल ताराबाईनें गोंवून इनामें वगैरे देऊन आपल्या बाजूस वळविलें.[३] परंतु पुढें त्यानें दुर्बुद्धि धरून दुष्टाचरण आरंभिलें असें ताराबाई लिहिते, त्यावरून तोही बहुधा वर्ष सहा महिन्यांत शाहूस सामील झाला. ता. ३१मार्च रोजीं ताराबाई लिहिते, 'शाहू राजा रांगण्याखाले गोंऊन पन्हाळा आहे त्यासंधीमध्यें ज्यांनीं त्यांनीं कार्य करून दाखवावें.' हमीदखान, हिंदुराव घोरपडे व नारो महादेव एकत्र आले होते. विजापुरास दाखल होऊन चालोन यावें असें केलें आहे. स्वामीही त्या प्रांतें फौजबंदी येत आहेत. घोरपड्यांचा हिसाब आहे असें नाहीं, मारून गर्देस मिळविले जातील. रांगणेकर वळवळ करितात, त्यांस फावलें, इत्यादि मजकूर शाहूनें शंकराजी मल्हारिक यास लिहून आपल्या मदतीस बोलाविलें[६]

१ खं. १५-५९. २ खं. जु. ए. गो. २ पृ. १४.
३ खं. ८-६२. ४ खं. ८-६७. ५ खं. ८-६८.
६ प्रा. म. म. पृ. १८.

रांगण्यावर मोर्चे देऊन लढाईचें काम जें काय झालें तें बहुधा परसोजी भोसल्यानें केलें. धनाजी जाधव वगैरे मंडळीचें लक्ष लढण्याकडे फारसें नव्हतें. तो व आणखी पुष्कळ मंडळी शाहूपासून देशमुखी वतनांच्या सनदा करून घेण्यांत दंग होती. या देशमुखीच्या तंट्यांचे या वेळचे किती तरी कागद उपलब्ध आहेत. जगदाळे व पिसाळ यांचे खटले धनाजीच्या आग्रहावरून चालू होते. त्यांत विरुद्ध बाजूनें हिंदुराव घोरपडे सामील झाला. अमात्याचा मुतालिक असलेला बाळाजी विश्वनाथ, सचिवाचा मुतालिक दत्ताजी शिवदेव, नारोराम शेणवी ही मंडळी शाहूबरोबर असून, लढण्यापेक्षां तडजोडींतच दंग असावी. रामाजी नारायण कोल्हटकरास पाटगांवचे मुक्कामींच परसोजीचे मध्यस्थीनें शाहूनें वृत्ति करून दिली.[१] 'कोल्हापुरचे देशमुखीचें वतन कै. काकास्वामींनीं (राजारामानें) खंडेराव दाभाडे यांस दिलें होतें. ते स्वामीच्या पायांशीं विरुद्धाचरण करून बदलोन गेले, या निमित्त त्यांचें वतन दूर करून स्वामींनीं दरुणी महाल दुसरा वाडा (दुसरी बायको) यांस दिलें, त्यांनीं तें मानीव पुत्र फत्तेसिंगभोसले यांस दिलें.[२] (ता. ७ जुलई १७०८.) अशा अनेक भानगडी मिटवीत असतां, ताराबाई रांगण्यांतून निघून गेलीसे पाहून, पावसाळा आल्यामुळें, मोर्चे कायम ठेवून, शाहू पन्हाळ्यास परत आला; आणि याच सुमारास ह्मणजे जून १७०८त, सेनापति धनाजी जाधव वारणेच्या कांठीं वडगांव येथें पायाचा व्रण असाध्य होऊन मरण पावला. तेणेंकरून पुढील राजकारणांस थोडें बहुत निराळें वळण लागलें.

ताराबाईच्या स्वभावामुळेंही तिचा पक्ष कसा खालावला हें खालील हकीकतीवरून दिसून येतें.[३] 'रामचंद्रपंत हे ताराबाईचे मुख्य कारभारी होते, तरी अलीकडे त्यांचा त्यांवर विश्वास नव्हता. त्यांची सारी भिस्त परशुरामपंतांवर होती. परशुरामपंत व रामचंद्रपंत यांचें वैमनस्य होतें. त्यामुळें रामचंद्रपंतांनीं जो कारभार करावा, तो प्रतिनिधींनीं ताराबाईस भलतेंच समजावून मोडवावा, असें नेहमीं होऊं लागलें. त्यामुळें रामचंद्रपंत यांस राग येऊन त्यांनीं शाहूमहाराजांस कांहीं उत्तेजनपर निरोप पाठविला. हें वर्तमान ताराबाईस कळतांच त्यांनीं रामचंद्रपंतांच्या पायांत रुप्याची बेडी घालून त्यांस वसंतगडावर कैदेंत ठेविलें. त्या योगानें रामचंद्रपंतांस अर्थातच अधिक क्रोध येऊन त्यांनीं धनाजी जाधव

१ खं. ३-१८३. २ पे. द. पृ. १२. ३ इचलकरंजी इ० पृ. २२.

वगैरे मराठे सरदार फितूर करून त्यांस शाहू महाराजांकडे पाठवून दिलें. परशुरामपंत प्रतिनिधि लढाईच्या इरायानें शाहूमहाराजांवर चालून गेला खरा, परंतु लढाईंत जाधवराव वगैरे सरदार तिकडे मिळालेले पाहतांच तो पळून साताऱ्यास आला. नंतर शाहू महाराजांनीं सातारा काबीज करून परशुरामपंतास कैद केलें. हें वर्तमान येतांच ताराबाईनीं रामचंद्रपंतांस कैदेंतून सोडून रांगण्यास आणिलें; आणि आपला मुलगा शिवाजी व सवतीचा मुलगा संभाजी या दोघांस रामचंद्रपंतांच्या मांडीवर बसवून राज्यसंरक्षण करण्याविषयीं त्यांची विनवणी केली, तेव्हां रामचंद्रपंत पुनः राज्यकारभार चालवूं लागले. इचलकरंजीचे संस्थापक नारो महादेव याची त्यांस उत्तम प्रकारची मदत होती. रामचंद्रपंताचें मन वळविल्यावर, त्याच्या मार्फत धनाजी जाधव, खंडो बल्लाळ व परशुरामपंत यांनाही शाहूकडून फोडून, आपल्या बाजूस आणण्याचा प्रयत्न ताराबाईनें केला, पण हा बेत फारसा सिद्धीस गेला नाहीं. '

भाऊबंदकीच्या या झगड्यांत लोकांच्या मनांत लढण्याचा आवेश बिलकूल नव्हता असें ह्मटलें तरी चालेल. स्वतः ताराबाई मात्र त्वेषानें लोकांस भर देई, शिवाजीच्या नांवानें अनेक आज्ञापत्रें काढी, आणि शाहूस मिळणाऱ्यांची जोराजोरानें निर्भर्त्सना करी. तिच्या तोंडावर उलट बोलण्याची छाती नसल्यामुळें लोक होस हो ह्मणत, आणि दूर गेल्याबरोबर स्वार्थाकडे नजर देऊन प्रसंग पडेल तसे वागत. आपआपल्या वतनांबद्दल इकडे शिवाजीच्या व तिकडे शाहूच्या दोघांच्याही सनदा ते मिळवून ठेवीत. कारण, न जाणों, उद्यां जो अधिकारावर कायम होईल त्याची मर्जी राखणें त्यांस जरूर होतें. ' शाहूराजे यांजकडील कागदपत्र माणूस आपणाकडे आले नाहींत. जर ही गोष्ट आपणाकडे शाबीत जाहली तरी स्वामीनें शासन कीरतील त्यास मान्य आहों. आज्ञा जाहालिया सेवेसी येऊं. ह्मणून कित्येक तपासिलें भावभक्तिनिष्ठेने लिहिलें तें विदित झालें. तुह्मी वतनदार एकनिष्ठ वर्तणूक करीत असतां, नसतें तुफान तुह्मांवर कोण ठेवूं पाहतो ! हुजूर दर्शनास येणें. ' असें ता. १०-११-१७०७ रोजीं शिवाजी ज्या वतनदारास लिहितो त्यासच पुढें तीन महिन्यांनीं तारीख २ मार्च १७०८ रोजीं शाहू लिहितो, ' तुह्मी विनंतिपत्र पाठविलें

---

१ खं. ८.६४.६६.

तें प्रविष्ट होऊन एकनिष्ठेचें वर्तमान लिहिलें तें सर्व विदित झालें. तरी तुम्ही राज्यांतील वतनदार, तुमचे हातें प्रयोजन घेऊन स्वामी चालवितील. स्वामींचे दर्शनास येणें.[१]' या मामल्याचे कागद शेंकडो असून, त्यांवरून लोकांस या घरगुती झगड्यासंबंधानें काय वाटत होतें त्याची कल्पना होते. शाहूच्या स्वभावांत ताराबाईची तीव्रता नसून, त्यास बादशाही पाठिंब्याचा जोर असल्यामुळें, त्यास आपल्या अधिकारासंबंधानें मनांत यत्किंचित् संशय असलेला दिसत नाहीं. अभिषेकाच्या वेळेसच त्यानें बादशहाकडे वकील पाठवून कळविलें कीं, ' आमची चुलती व सर्व नोकर लोक मिळोन फितूर करून आह्मांवर फौजा रवाना केल्या. आह्मांस बुडवावें, आपण राज्य करावें, अशी चित्तीं द्वेषबुद्धि धरून असें केलें. त्यास बादशाही हुकुमानें देशीं राज्यावर आलों तों हा प्रसंग पडला त्यास, श्रींवरें शूरत्वें करून लढाई केली, तों बादशाही कृपेंकरून फत्ते पावलों. नोकर लोकांस धरून नसेती केल्या. बंदोबस्ती करण्याचा क्रम चालला आहे. बादशहांचा हुकूम कीं ' मनुष्य जरेंवत राखावें, रयत लोकांचें संरक्षण करावें, इनसाफ वगैरे खुद्द जातीनें पाहवा, बंडे बुडवावीं ह्मणजे धका नाहीं. त्याप्रमाणें हुकूम चित्तीं दृढतर धरून हिंदुशास्त्राप्रमाणें राज्यपद्धतीनें चालत आहों, ही खबर कळावी ह्मणून अर्जी देऊन वकील पाठविले. यांनीं हुजूर अर्जदास्त रसीद करून तुह्मांकडील नोकरांचे मुखें साकल्य मजकूर श्रुत केला. तुह्मांस जमेदारीबद्दल पेशजी फर्मान मिळाला आहे, त्याप्रमाणें मुलकाचा वगैरे बंदोबस्त ठेवून कायम झालां, हा फायदा तुह्मांस बादशाहीकृपेनें झाला हा संतोष मानीत आहों,' असें बादशहा शाहूस २७–५–१७०८ रोजीं कळवितो. शाहूचा वकील रायभानजीराजे भोसले ह्मणून यावेळीं बादशहाकडे जाये करीत होतो. याच वेळीं शाहूचें लक्ष बाहेरच्या मुलखगिरीवरही होतें हें ध्यानांत ठेविलें[३] पाहिजे. शंकराजी महाडिक यास त्यानें कर्नाटकच्या कामगिरीवर नेमिलें, आणि शिवाजीच्या वेळप्रमाणें त्या प्रदेशांत आपला अंमल बसवियाचा हुकूम करून त्यास रुजू होण्याविषयीं शाहूनें कर्नाटकच्या तमाम पाळेगारांस आज्ञापत्रें पाठविलीं, तीं २६–६–१७०८ चीं, ह्मणजे शाहू पन्हाळ्यावर

१ इ. ऐ. सरदे० घ. १९–२०. २ खं. १५.२८९. ३ खं. ८.५६,६१.

असतांची आहेत.[१] महाराष्ट्राबाहेर दृष्टिक्षेप ठेविल्यानें, पूर्वीप्रमाणें सर्व देशाचें राज्य आपण पाहत आहों, ताराबाईनें आपल्या ताब्यांत राहून सुखानें नांदावें, असें शाहूनें सुचविलें. कोंकणाकडे तर शाहूचें लक्ष होतेंच. मुंबईचा **प्रेसिडेंट सर निकोलस वेट** याजकडे त्यानें पैसा, दारूगोळा, तोफा व लष्कर मागितलें. पण ही त्याची विनंति प्रेसिडेंटानें मान्य केली नाहीं.[२] स. १७०८ च्या अखेरीस शाहूनें ताराबाईचा नाद सोडून आपली फौज सातारा प्रांतीं आणिली. तेव्हां ताराबाईनें मालवणाहून परत येऊन पन्हाळा किल्ला पुनरपि हस्तगत केला. परंतु शाहू आतां प्रत्यक्ष तिच्या वाटेसच गेला नाहीं. वारणेची हद्द ठरवून कोल्हापूर प्रांतांत तिनें वावरावें असा सोय शाहूनें ठरवून दिली.[३] तथापि परसोजी भोसले शाहूच्या बाजूनें कोल्हापुर प्रांतीं स. १७०९ पर्यंत होता. तो बहुधा ताराबाईच्या हालचालींवर लक्ष ठेवण्यासाठीं असावा. यापुढे थोड्याच महिन्यांत परसोजी मरण पावला.[४] स. १७०९ च्या मार्च महिन्यांत शाहू पुरंदरावर असून पावसाळ्यांत किल्ले वंदनगडावर छावण्या करून राहिले. तेथून कूच करून आक्टोबरांत मर्ढ्यावरी मुक्काम झाला.[६] यावेळीं बहादुरशहा दक्षिणेंत असून शाहूची एक नजर बादशाहावर व एक आपल्या कारभारावर होती.

रांगण्याहून परत येऊन ताराबाई पन्हाळ्यास राहूं लागली, आणि शाहूनें तिला स्वस्थ राहूं दिलें, तेव्हां शाहूस नाहींसा करण्याचा नाद तिनेंही हळूहळू सोडून दिला. रामचंद्रपंतानेंही एकंदर धोरण ओळखून कोल्हापूर संस्थान आपलें समजून राहण्याची तिला सल्ला दिली. रांगणा किल्ला व सावंतवाडीचा प्रदेश कोल्हापुरचे लगत्याचा असल्यामुळें, रामचंद्रपंतानें आंग्र्याची मदत घेऊन आणि विशाळगडचा कृष्णाजी भास्कर याजबरोबर फौजा पाठवून सावंतास नरम केलें आणि त्याजपासून अनुकूल तह ठरवून घेतला. अशा रीतीनें स. १७०९ व १७१० दोन वर्षें गेलीं, त्या अवधींत लढणें असें ह्मणण्यासारखें आलें नाहीं.

५. **धनाजीचा मृत्यु व योग्यता.**—स. १७०८ च्या जून महिन्यांत धनाजी वारला, या मितिसंबंधानें संशय राहत नाहीं. ता. ८-६-१७०८ रोजीं

---

१ इ. सं. प्रा. म. स. पृ. १०-१२. २ प्रं. ड. ३ म. सा. छो. ब. ६७. ४ सत्का० ९. २१८, २१९. ५ ना. भो. का. प. ले. ५०. ६ खं. ३.६२,६४; व पे. द. पृ. १६८.

चंद्रसेन सेनापति असल्याचा कागद आहे,[1] त्यावरून जाधवांच्या कैफीयतींत भूमिदानाची सनद छ २ जमादिलावल शके १६३२ ह्मणजे ९ जुलई १७०८ ची आहे. तीं खरी ठरते. हें भूमिदान उत्तरकार्यप्रसंगीं केलेलें असल्यामुळें धनाजीचा मृत्युकाल निश्चित ठरतो. मृत्युसमयीं धनाजीची बायको गोपिकाबाई इनें सहगमन केलें. त्या प्रसंगीं धनाजीचे तिघेही मुलगे, व थोरल बायकोचा संताजी व धाकटीचे चंद्रसेन व शंभुसिंग असे जवळ होते. धनाजीची स्मशानयात्रा फार मोठी होऊन, त्याचा अंत्यविधि मोठ्या बहुमानानें करण्यांत आला. संताजी नामर्दी असून बापापासून अलग, साताऱ्यानजीक बोरगांव पाळी येथें वडिलोपार्जित वतनावर राहत असे. चंद्रसेन बापाचा आवडता होता, त्यासच शाहूनें सेनापतिपद व यथापद्धति बहुमानवस्त्रें, जरीपटका वगैरे साताऱ्याहून पाठवून दिलीं; आणि शंभुसिंग यास चंद्रसेनाचा सुतालिक नेमिलें.

धनाजीच्या कर्तबगारीविषयीं पूर्वीं उल्लेख आलाच आहे. त्याविषयीं ताराबाई लिहिते.'जाधवराव कैलासवासी स्वामींचे संपूर्ण कृपेस पात्र झाले. ते आपल्या कर्तृत्वावरीच हुकूम-बारदार एकनिष्ठवरी झाले. राज्याभिवृद्धीविषयीं त्यांहीं कांही सामान्य कसाला, श्रमसाहस केला नाहीं. जीविताची तमा न करितां स्वामिकार्यीच तत्पर राहून, कैलासवासी स्वामींनीं जे समयीं हुकूम केला, ते समयीं कर्नाटकांत फौजांनी धावून जाऊन, प्राप्त झालीं संकटें निरसन करून, स्वामिसेवकांचें सुख त्यांहींच अनुभविलें व सेवाधर्मेकरून त्यांहींच कैलासवासी स्वामीस संतुष्टविलें. तेव्हां स्वामीस मशारनिल्हेविना दुसरे प्रिय कीं प्राण ( कोणी ) होते असें नाहीं. सर्व प्रकारें कार्यास येतील हा भरंवसा दृढ मनीं मानिला होता. तदनुरूपच राव मशारनिल्हेनीं स्वामींचे चरणीं चित्तालय करून, औरंगजेबासारखा मोठा शत्रु राज्यांत पसरला असतां, आपल्या शूरत्वाच्या व कर्तेपणाच्या योगें, शत्रूचा हिसाब न धरितां, राज्याचे संरक्षणार्थ असाधारण कसला केला ! स्वामींच्या तपोबलप्रभावें करून शत्रु पराभव पाविल्याचें यश मशारनिल्हेस प्राप्त झालें. धनाजीचे पश्चात् शाहूनें सेनापतिपद लगेच चंद्रसेनास दिलें.[2] चंद्रसेन विशेष कर्तृत्ववान् होता. परंतु त्याचा ओढा ताराबाईकडे असून शाहूच्या विरुद्ध वागल्यामुळें त्याची व बाळाजी विश्वनाथाची पुढें चुरस

१ इ. ए. गिजेर ले. ९४. ३ पृ. ७१. २ भा. व. पु. १ प. या. ५०.

लागली. नंतर त्यांचा तंटा विकोपास जाऊन दोघांची लढाई झाली आणि शाहूनें बाळाजीस आश्रय दिला, तेव्हां चंद्रसेन उघडपणें मोगलांस मिळून अखेरपावेतों शाहूचे विरुद्ध वागला. स. १७११ त याचें सेनापतिपद काढून शाहूनें ते ऑक्टोबर स. १७११ चे सुमारास संताजीस दिलें. ता. १६–२–११ रोजी चंद्रसेन सेनापति असल्याचा उल्लेख आहे. संताजीकडून काम नीट होईना म्हणून शाहूनें मानसिंग मोरे यास सेनापति केलें. नोव्हेंबर स. १७१२ पासून मानसिंगाच्या शिक्याचे कागद सांपडतात[3]. मानसिंग मोऱ्याचा उपयोग शाहूस चांगला झाल्याचे दिसत नाहीं. थोरात व आंगरे यांजवरील स्वाऱ्यांत मोरे नव्हता. त्याजकडील सेनापतिपद काढून तें ता. ११– –१७१७ रोजीं शाहूनें खंडेराव दाभाड्यास दिलें, तें त्याच घराण्यांत कायम झालें. सामान्यतः हीं पदें वंश-परंपरा चालविण्याकडे शाहूचा कल होता. फक्त नालायक किंवा विरुद्ध वागणारे दिसले त्यांस शाहूनें दूर करून नवीन इसम नेमिले.

मानसिंग मोरे राजारामाचे वेळेपासून राज्यांत खपणारा असून तो पुढेंही शाहूपाशीं कामगिऱ्यांवर होता. सेनापतिपद त्याजकडून काढण्याचें कारण बहुधा त्याचें दुखणें असावें. ता. २०–११–१७१६ रोजीं त्यास शाहूनें औष-धोपचार करण्याविषयीं लिहिलें आहे.

धनाजीसारखीच हैबतराव निंबाळकर सरलष्कर याची निष्ठा शाहूच्या ठिकाणीं पुष्कळदां डळमळत असे. चंद्रसेनाचा व बाळाजीचा बेबनाव झाला, तेव्हां हैबतरावासच चंद्रसेनावर शाहूनें पाठविलें, आणि त्यानें चंद्रसेनाचा परा-भव केला. पुढें सेनापतिपद आपणास मिळावें अशी हैबतरावाची अपेक्षा होती ती शाहूनें पुरविली नाहीं, म्हणून त्यानें कांहीं काळ रुसवा केला असावा. तरी स. १७१४ त तो स्वामिकार्यावर पडला[6] म्हणून त्याच्या बायकोस इनाम गांव देऊन मुलगा सुलतानजी यास सरलष्कर पद शाहूनें दिलें. स. १७१५ पासून

१ पे. द. पृ. १३ व खं. २१ गिजरे ले. ९७. २ निवाडे पृ. १. ३ पे. द. पृ. ८, व खं. १५. ३२१, ३२२. या कागदांची तारीख ८–१२–१७०९ दिलेली चूक असून ती ६–११–१७१२ पाहिजे, असें आंतील मजकुरावरून ठरतें. ४ निवाडे पृ. ७५. ५ शा. रो. १५८. ६ पे. द. पृ. १४.

१७२७ पावेतों सुलतानजी सरलष्कर आहे. स.१७२७ चे सुमारास कांहीं आगळिकीवरून सुलतानजीचें सरलष्करपद शाहूनें काढून दावलजी सोमवंशी यास दिलें. स. १७३२त आनंदराव सोमवंशी सरलष्कर होता.

**६. कामबक्षावरील मोहीम,** (जानेवारी १७०९.) ताराबाईशीं झगडय़ांत शाहूचा मुख्य आधार बादशहाकडचा होता हें वर सांगितलेंच आहे. स. १७०७ च्या जून महिन्यांत अजमशहा मारला जाऊन जुलईंत बहादुरशहानें आपण बादशहा झालों ही खबर शाहूस कळविली, आणि त्यास दहा हजारी मनसब देऊन, ताराबाईच्या अर्जास न जुमानतां, शाहूस फौज घेऊन आपल्या मदतीस बोलाविलें[२]. स. १७०७ च्या नोव्हेंबरांत रजपुतान्यांतील बंडावे मोडण्यासाठीं बादशहा तिकडे गेला आणि तिकडील व्यवस्था लावून स. १७०८ च्या मार्चांत अजमीर येथें आला. तेव्हां त्यास वर्तमान समजलें कीं दक्षिणेंत विजापुर येथें कामबक्षानें बादशाही पद धारण केलें आणि स्वतंत्र नाणीं पाडिलीं. तेव्हां कामबक्षावर चालून जाण्यासाठीं बहादुरशहा मे महिन्यांत नर्मदा उतरून अलीकडे आला आणि नोव्हेंबरांत बेदरपर्यंत पोंचला.

बादशहानें शाहूची मदत मागितली, तेव्हां शाहूनें नेमाजी शिंदे ह्यास मदतीस पाठविलें. ता. ९ जानेवारी १७०९ रोजीं हैदराबाद नजीक लढाई होऊन कामबक्षाचा शेवट झाला. ह्या मदतीबद्दल बादशहानें मराठे सरदारांचा मोठा गौरव केला. ही संधि साधून शाहूनें आपले वकील बादशहाकडे पाठवून सरदेशमुखीच्या हक्कांची सनद करून मागितली. ही विनंति मान्य करून बादशहानें शाहूस सनदा द्याव्या, असा झुलफिकारखानाचाही आग्रह पडला. इतक्यांत ताराबाईनेंही आपले वकील बादशहाकडे पाठवून हक्कांची मागणी केली. खानखानान मुन्यिमखान वजीर याचें व झुलफिकारचें पटत नसून वजिरानें ताराबाईच्या मागणीस पुष्टि दिली. दोनही पक्षांनीं आपआपल्या शिफारशीची बादशहापाशीं इतकी शिकस्त केली, कीं त्याच्यानें कोणाचेंही बोलणें मोडवेना. सरदेशमुखीचीं फर्मानें लिहून सुद्धां तयार झालीं होतीं. अशा अडचणींत वजीर मुन्यिमखानानें नवीन शक्कल काढिली कीं, शाहू व ताराबाई ह्यांनीं आपसांत

---

१ शा. रो. २२, २७,२६५,५२, ५४: खं. ६·१२, खं. ३·१५७.

२ खं. ८·५४,५५,५६. या कागदांच्या तारखा चूक आहेत.

लढून भांडणाचा निकाल करावा, नंतर विजयी पक्षास सनदा देण्यांत येतील. हा तोड बादशहानें पसंत केला; आणि आपण परत निघाला. स. १७०९ च्या मे महिन्यांत त्याचा मुक्काम अहंमदनगरावर होता. तेथून औरंगाबाद वगैरे ठिकाणीं राहून नोव्हेंबरांत नर्मदा पार होऊन बादशहा उत्तरेंत गेला. ताराबाईला स्वस्थ बसविल्याशिवाय सरदेशमुखीच्या सनदा मिळणें शक्य नाहीं असें शाहूस दिसून आलें. तसेंच शाहूस बादशाहाचा पाठिंबा केवढा आहे हीही गोष्ट मराठमंडळाचे नजरेस आली. ताराबाई व शाहू शक्य तितक्या साधनांनीं आपआपले पक्ष सबळ करीत होते. एकमेकांच्या ताब्यांतील गढ्या व ठिकाणें हस्तगत करणें, सरदार फोडणें, वतनांच्या लालुचीनें अगर धाकदपटशानें लोकांस वळविणें, या उद्योगांत दोनही पक्षांचे लोक मुलखांत कशी बेबंदशाही माजवीत होते हें तत्कालीन कागदांवरून दिसून येतें[1].

बादशाहीं कैदेंतून शाहूची सुटका होऊन त्याचा जम बसविण्यास त्यास अनेक व्यक्तींचें साह्य कारण झालें. त्या सर्व व्यक्ती व त्यांच्या खटपटी यांविषयीं आपणास फारच थोडी माहिती आज मिळते. उदाहरणार्थ, रायभानजी राजे भोसले या नांवाचा एक वजनदार गृहस्थ शाहूचे बाजूनें अतिशय उद्योग करीत होता असे उडते उल्लेख आढळतात. हा रायभानजी शहाजीचे नाटकशाळेचा पुत्र होय. त्याशिवाय भिवजी व प्रतापजी असे आणखी दोन दासीपुत्र शहाजीचे होते.[2] बहुधा हा रायभानजी येसूबाई व शाहू यांजबरोबर बादशहाचे कैदेंत असावा. संभाजी वगैरे त्यांस काका म्हणत असल्यामुळें त्याचें नांव प्रचारांत रायभानजी काका असें पडलें होतें. झुल्फिकारखान वगैरे सरदारांशीं संधान ठेवून तो मराठी राज्याची संरक्षा आपल्याकडून शक्य तितकी ठेवी. बादशाहीचा पाठिंबा शाहूस पूर्णपणें मिळवून देण्याचा उद्योग या रायभानजीचा असावा; आणि यापूर्वीच्या उद्योगाचें स्मरण शाहूच्या मनांत ताजें असल्यामुळेंच पुढें अखेरपर्यंत शाहू बादशहाच्या विरुद्ध वागण्यास नाखूष असे. शाहू दक्षिणेंत आल्यावर रायभानजी हा त्याचा वकील म्हणून बादशहाजवळ राहिला होता. कामबक्षास जिंकण्यास बहादुरशहा दक्षिणेंत आला, तेव्हां त्याजपासून आपली सुव्यवस्था लावून घेण्याचा उद्योग रायभानजीमार्फत शाहूनें केला[3]. यादव

१ खं. ३·४५३. २ रु. १ पृ. ८७. ३ खं. १५·२८९, ५९.

व जगदाळे यांच्यामध्यें मसूरच्या देशमुखीसंबंधानें तंट्याचा महजर ता. १८-३-१७०८ चा झाला. त्याजवर रायभानजी राजे भोसले अशी साक्ष आहे. याच सालीं परशुराम त्रिंबकास प्रतिनिधिपद देण्याची खटपट शाहूजवळ रायभानजीनें केली. ' रायभानजी, स्वामी व आह्मी ऐसे एकचित्त असतां जरी आम्हांस पडत असेल तरी त्यास हात देऊं ' असें परशुराम त्रिंबक शाहूस लिहितो.[1] यावरून रायभानजीचें सामर्थ्य व्यक्त होतें. मात्र या सामर्थ्याचा मुख्य आधार बादशहा होता हें लक्षांत ठेविलें पाहिजे. ' रायभानजी काका यांचे जहागिरीस उपद्रव देऊं नये ' अशी शाहूची आज्ञा गदाधर प्रल्हादास म. १७०९ जुलईंतील आहे.

प्रभावळीचे गणोबानायक सरदेसाई व त्याचे कारभारी कृष्णाजी भास्कर हे शाहू येतांच आपलें वतन सांभाळण्यासाठीं त्यास जाऊन भेटले, याबद्दल शिवाजीनें त्यांस तंबी दिली, आणि गणोबा नायकाचें वतन काढून तें त्याचा भाईबंद कान्होजी नाईक यास दिलें. अशा सनदांवरून पुढें वतनदार कुटुंबांत अनेक प्रकारचे तंटे मात्र उपस्थित झाले. त्यांचे कागदांत या भानगडी पाहवयास सांपडतात.[3]

या सुमारास शाहूनें आणखी दोन बायका केल्या. एक राणोजी शिर्क्यांची कन्या सकवारबाई थोरली धनीण ह्मणून पुढें प्रसिद्ध झाली आणि दुसरी सगुणाबाई धाकटी राणी. पहिल्या दोन बायका शिर्क्यांकडील अंबिकाबाई व जाधवांकडील सावित्रीबाई व मातुश्री येसूबाई या अद्यापि दिल्लीसच अटकेंत होत्या. सगुणाबाई सालस असून तिजवर शाहूचें प्रेम विशेष होतें. तथापि रक्षा विरूबाई इचें वजन शाहूजवळ मोठें असून तिचीच देखरेख या लहान राण्यांवर व घरांतील कारभारावर असे.

१ खं. ८.६१, ५६. २ पुरंदरे द. अप्रकाशित.
३ खं. २१.१८, १९, ३०, ३१.

# प्रकरण दुसरें.
## बाळाजी विश्वनाथाचा शाहूस उपयोग.

१. बाळाजी विश्वनाथ, पूर्वपीठिका.
२. सेनापति चंद्रसेनाचा फितवा, ऑगस्ट, १७११.
३. हरणाचा तंटा, स. १७११.
४. शिवाजीची कैद व संभाजीची स्थापना, स. १७१४.
५. खटावकराचें बंड, स. १७१२–१३.
६. बाळाजी वि०ची पेशवाईवर नेमणूक ( १६–११–१७१३. )
७. कान्होजी आंग्र्याशीं तह ( ता. ८–२–१७१४. )
८. दमाजी थोराताचें पारिपत्य ( स. १७१६–१८. )

**१. बाळाजी विश्वनाथ, पूर्वपीठिका.**—मराठशाहीच्या पूर्वार्धाच्या इतिहासांत भोसले कुलास प्राधान्य आहे, त्याप्रमाणें उत्तरार्धाच्या इतिहासांत भटकुलास प्राधान्य आलेलें आहे. भोसल्यांच्या कर्तृत्वशक्तीनें अनेक क्षत्रिय व इतर जातींचीं कुलें प्रसिद्धीस आलीं, त्याप्रमाणें भट घराण्याच्या कर्तबगारीनें मुख्यतः पुष्कळशीं ब्राह्मणकुलें उत्तरकालीन मराठशाहींत लौकिकास चढलीं.

पुण्याच्या आजूबाजूस देशस्थ ब्राह्मणांचा भरणा मोठा असून शिवाजीनें स्वराज्य स्थापन करतांच अनेक देशस्थ कुटुंबें भराभर स्वराज्याच्या कारभारांत पुढें आलीं. सासवडजवळच्या प्रदेशास कऱ्हेपठार ही संज्ञा होती, त्यांत कैक वर्षांपूर्वी बेदरकडील देशस्थ ब्राह्मणांनीं व वाई प्रांतांतील मराठे कुटुंबांनीं येऊन वसती केली; आणि पाटिलक्या वगैरे खरेदी करून नांदत असतां, त्याच घराण्यांची मदत शिवाजीस मुख्यतः झाली. राघो बल्लाळ अत्रे, नीळकंठराव सरनाईक, गोपिनाथपंत बोकील, श्यामराव अंबाजी, श्रीपत बाबूजी, तुकोपंत पुरंदरे वगैरे देशस्थ घराणीं राजकारण, जमाबंदी इत्यादि कारभारांत प्रसिद्धीस आलीं. त्यांचे वंशज पुढें पेशवाईतही प्रमुख होते. याच बाजूस केव्हां तरी कोंकणांतील कित्येक घराण्यांनीं येऊन वसती केली. किनाऱ्यावरील प्रभु कुटुंबेंही ब्राह्मणांप्रमाणेंच वरघांटीं येऊन मराठशाहीच्या कारभारांत दाखल झालीं होतीं.

कोंकणांतील मंडळींचा उद्योगाकरितां वरघाटीं जाण्याचा प्रघात जुना आहे. तत्राप शिवाजीचें राज्य स्थापन होतांच त्याचें गोब्राह्मण प्रतिपालनाचें ब्रीद ऐकून, कोंकणांतले ब्राह्मण देवस्थानांच्या वगैरे संबंधानें धर्मादाय व वृत्ति संपादण्याकरितां देशावर येऊं लागले. आरंभीं त्यांचा उद्योग धर्मादाय मिळविण्यापुरताच होता. पण बुद्धिमत्तेमुळें हळूहळू त्यांचा प्रवेश राज्यकारभारांत होऊं लागला. राजारामाच्या वेळेपासून अशा उद्योगास अवकाश मिळतांच ते विशेष पुढें आले. आंगरे व सीदी यांच्या चुरशींत बऱ्याचशा कोंकणस्थ ब्राह्मणांस मुद्दाम राज्यकारस्थानांत पडावें लागलें; आणि एकाच्या अनुकरणानें दुसरा अशी भरती होत गेली. उत्तर मराठशाहींत कोंकणस्थांचें माहात्म्य पुष्कळ वाढलें. भट हें आडनांव कोंकणस्थ ब्राह्मणांत आहे. बाळाजी विश्वनाथ भट याचें घराणें कित्येक शतकांपासून पश्चिम किनाऱ्यावर श्रीवर्धन येथें नांदत होतें. या घराण्याकडे श्रीवर्धन परगण्याची देशमुखी असल्यामुळे, त्यांस देसाई किंवा देशमुख असें म्हणत. बाळाजी विश्वनाथ, बाजीराव, बाळाजी बाजीराव, रघुनाथराव हे सर्व आपणांस श्रीवर्धनचे देशमुख ह्मणवून घेण्यांत भूषण मानीत. बाळाजी विश्वनाथ देशमुख दंडाराजपुर असा उल्लेख असलेले कागद पुष्कळ आहेत.[१]

मुंबईच्या दक्षिणेस समुद्रकिनाऱ्यावर बाणकोट खाडीच्या उत्तरतीरीं हरिहरेश्वर व श्रीवर्धन हे प्रसिद्ध गांव आहेत. हे गांव हबशाच्या ताब्यांत असून तेथें हें भट घराणें पूर्वापार नांदत होतें. या दोन गांवांवर भट घराण्याची पराकाष्ठेची भक्ति असे. त्यांवरचा अंमल जरी हबशाकडे होता, तरी उत्तर मराठशाहींत पेशव्यांचीच सत्ता तेथें प्रमुख होती. श्रीवर्धन गांवांतील सोमजाई, लक्ष्मीनारायण बहिरी, काळेश्री इत्यादि सर्व देवतांना नैवेद्य वगैरेची व्यवस्था पुढें पेशव्यांकडूनच झाली. तेथील ब्राह्मणांना पेशव्यांकडून दरसाल साडेबत्तीस खंडी भात धर्मादाय पोंचत असे. ग्रामपंचायतींत हे पेशवे देशमुख या नात्यानें भाग घेत असत, आणि देशमुखीच्या गांवांत यत्किंचित् कमी जास्ती झालें तर त्याची वर्दी ताबडतोब त्यांजकडे जाई. तेथील आपली देशमुखी चालविण्यास पेशव्यांनीं आपला एक प्रतिनिधि ठेविला होता.[२] रा. राजवाडे ह्मणतात, दंडाराजपुरीची

१ खं. २१·८, सरदे. घ. पृ. २१. २ इ. वृ. व सं. वृ. १८३७.

देशमुखी स. १४७८ च्या सुमारास भटांच्या घराण्यांत आली. त्यानंतर सुमारें शंभर वर्षांनीं ह्मणजे स. १५७५ च्या सुमारास बाळाजी विश्वनाथाच्या पूर्वींचा चौथा पुरुष महादजी हा देशमुखीवर होता. ही देशमुखी दुसऱ्या बाजीरावाच्या कारभारापर्यंत ह्मणजे स. १८१८ पावेतों भट घराण्याकडे होती.

बाळाजी विश्वनाथास शाहूनें पेशवाईपद दिलें, त्यापूर्वी तो किंवा त्याचे वडील देशावर केव्हां आले आणि त्यांनीं काय काय कामगिऱ्या केल्या त्याची खात्रीलायक माहिती मिळत नाहीं. अलीकडे अनेक संशोधकांनीं ठिकठिकाणचे उल्लेख संदर्भानें जुळवून थोडीबहुत संगति लाविली आहे. बाळाजी विश्वनाथाचा भाऊ विठ्ठलपंत व स्त्री राधाबाई यांच्या हस्ताक्षरांचे लेख शक १६०१ चे नाशिकचे तीर्थोपाध्ये हिंगणे यांच्या चोपड्यांत उपलब्ध झाले. तसेंच बाळाजीचा बाप व आजा घांटावर येऊन शिवछत्रपतीचे पदरीं नोकरी करीत होते असेही उल्लेख क्वचित ठिकाणीं आहेत. सासवडजवळ सराटे गांवची पाटिलकी पुढें बाळाजीनें खरेदी केली; आणि त्याचे मेहुणे बर्वेही सराट्यास येऊन राहिले. त्याच भागांतले पुरातन रहिवासी पुरंदरे हे पूर्वीपासूनच छत्रपतींच्या नोकरींत असून मल्हार तुकदेव शाहू दक्षिणेंत येत असतां त्यास खानदेशांत जाऊन भेटला. अर्थात बाळाजीस पेशवाई देतांना अंबाजीपंत पुरंदरे यास शाहूनें आपल्या मार्फतीचा ह्मणून बाळाजीजवळ नेमिलें. पुरंदऱ्यांस पेशव्यांनीं पुढें आणिलें असें नसून पुरंदऱ्यांकडूनच पेशव्यांची शिफारस शाहूकडे झाली असा प्रकार दिसतो.

हबशाच्या राज्यांत ब्राह्मणांचा छळ किती होत असे याचें वर्णन पहिल्या भागांत आलेंच आहे. गोब्राह्मण प्रतिपालक शिवाजीला चिडविण्याचें हबशांचें तें एक नेहमींचें साधन होतें. बाळाजीच्या घराण्यास प्रत्यक्ष जाच किती व काय झाला याची हकीकत दंतकथेपलीकडे उपलब्ध नाहीं. बाळाजीचा वडील भाऊ जानोजी हा देशमुखीवर असून बाळाजी हा चिपळूण येथें जकात वसुलीच्या कामावर होता. आंग्रे व सीदी यांचें वांकडें असून सीदीचा पाडाव करणें हेंच आंग्र्यांचें मुख्य काम होतें. त्या कामांत निरनिराळ्या ठिकाणच्या सीदीच्या नोकरांस वश करून आपणाकडे घेण्याचा आंग्र्यांचा प्रयत्न सुरू होता. बाळाजीनें आंग्र्यांशीं अशा प्रकारचें कांहीं तरी कारस्थान केलें असावें

त्या संशयावरून सीर्दानें त्याचा वडील भाऊ जानोजी यास गोणत्यांत बांधून समुद्रांत बुडविलें, अशी आख्यायिका आहे. बखरकार ह्मणतात की, या दहशतीनें बाळाजीनें देशांतर करण्याचा निश्चय केला. मुलांमाणसांसह श्रीवर्धन सोडून बाणकोट खाडीच्या दक्षिण तीराजवळ वेळास ह्मणून गांव आहे, तेथें भानु आडनांवाचे बाळाजीच्या घरोब्याचे एक स्नेही राहत होते, त्यांजकडे तो आला. तेव्हां त्रिवर्ग बंधु भानुही बाळाजीबरोबर देशावर जाण्यास सिद्ध झाले, 'आह्मांस भाकर मिळेल, तीतला चतकोर तुह्मांसही मिळेल.' असें बाळाजीनें भानूंस आश्वासन दिलें. बाळाजीस पेशवे पद मिळाल्यावर त्यानें शाहूकडून राज्याची फडनिशी भानूंस देवविली. त्याप्रमाणें भानु व बाळाजीपंत हे सातान्यास जाण्याच्या इराद्यानें निघून पुरंदर किल्ल्यानजीक सासवडास आले व सासवडचे कुळकर्णी व देशपांडे अंबाजीपंत पुरंदरे याजकडेस मुक्कामास उतरले. पुढें रोजगाराविषयी सर्व मंडळीचा बोलणी होऊन पुरंदरे सुद्धां मंडळी सातान्यास आली. सातान्यास महादाजी कृष्ण जोशी याचा व भानूंचा परिचय होता. कृष्णाजी जोशी नाईक हा अगोदरच मराठशाहीत नांवाजलेला असून तो व त्याचा मुलगा महादाजी यांचें शाहूपाशी चांगलें वजन होतें. त्यांस भानु व भट भेटले; पुढें त्यांची हुशारी पाहून, धनाजी जाधवानें त्यांस आपल्याजवळ घेतलें व त्यांच्या हुशारीमुळें धनाजीचा त्यांजवर लोभ बसला. बखरकारांच्या या हकीकतींत फारसें तथ्य दिसत नाहीं. चिपळुणास असतां स. १६९७ च्या सुमारास बाळगोंळी यांचे मार्फत बाळाजीची ब्रह्मेंद्रस्वामीशी ओळख झाली, आणि त्याच्या वशिल्यानें बाळाजीचा मराठशाहींत प्रवेश झाला, अशीही एक आख्यायिका आहे. या गोष्टी आतां अस्सल कागदांवरून निराधार ठरत आहेत.

• १ स. १७०३ तील जानोजी विश्वनाथ ह्याच्या हातची नोंद त्र्यंबकच्या तीर्थोपाध्याच्या चोपडींत सांपडलेली रा. राजवाड्यांनी इतिहास व ऐतिहासिक मासिकांत दाखविली आहे. याचा अर्थ इतकाच की, जानोजीस ठार मारल्यावर बाळाजीनें देशत्याग केला असें नाहीं. शाहू राज्य करूं लागल्यावर सन १७०८–१० व पुढेंही सीर्दीशी झगडे चालू असून त्यांत शाहूला बाळाजीनें मदत केली, त्याचा सूड ह्मणून जानोजी विश्वनाथास पुढें केव्हां तरी सीर्दीनें ठार मारला असल्याचा संभव आहे.

बाळाजी विश्वनाथ हा कोंकणांत आरंभीं प्रतिष्ठित गृहस्थ असून वरघांटीं आल्यावरही अनेक कामांत त्यानें आपली प्रतिष्ठा वाढविली. देशमुखी[1] मामले दंडाराजपुरी व अधिकारी श्रीवर्धनः सभासद; सरसुभेदारी[2] प्रांत पुणें व दौलताबाद, मुख्य देशाधिकारी व लेखक महालानिहाय; मुतालिक पंतसचिव, व सेनाकर्तेः इत्यादि उपपदें त्यास वेळोवेळीं लावलेलीं तत्कालीन कागदांत आढळतात. रामचंद्र नीळकंठ, श्रीकराचार्य पंडितराव व इतर अष्टप्रधान त्यास मोठ्या गौरवानें सरकारी कामें सांगत. तंटे तोडण्यासाठीं मजलस भरवीत त्यांच्या निवाड्यांत पुष्कळ ठिकाणीं बाळाजीची साक्ष आहे. सामान्यतः स. १६९६ पासून तो सरसुभेदार होता असें म्हणतां येतें; म्हणजे त्यापूर्वी दहावीस वर्षे तो इकडे वावरत असून त्यानें शिवाजीची कारकीर्द थोडीबहुत पाहिली असावी. मराठशाहीची अंतःस्थिति, कारभाराचीं धोरणें आणि वसुलाची व लष्करी पद्धति, यांचें ज्ञान त्यास चांगलें होतें. सासवड, पुणें, पुरंदर व सिंहगड या टापूवर पेशव्यांची भक्ति पराकाष्ठेची होती. भीमेच्या कांठीं औरंगजेबाची छावणी असतां शाहू व येसूबाई यांस बाळाजीचा उपयोग घडलेला असून, तेव्हांपासूनच शाहू त्यास ओळखीत होता. स. १६८० च्या पूर्वी वीस वर्षांचा असतां तो देशावर आला असें धरल्यास त्याचा जन्म स. १६६० चा असूं शकेल. म्हणजे पेशवाई मिळण्याचे वेळीं त्याचें वय ५३ किंवा थोडें जास्त असावें. कोंकणांतून आलेल्या लहानशा कारकुनास शाहूनें एकदम पेशवाईपद दिलें हा समज खरा नाहीं. सरसुभेदारीचीं कामें करणारा व अनेक लढायांत व अडचणींत सांपडलेला असतां, त्यास घोड्यावरही बसतां येत नव्हतें हें म्हणणें बिलकूल विश्वसनीय मानतां येत नाहीं. ' बाळाजी विश्वनाथ व पुरंदरे मिळोन जाधवराव सेनापति यांजकडील बाबतीच्या मामलती मक्त्यांनीं करून मोगलाईतील हजार, पांचशें स्वार होते. ' असा उल्लेख बखरींत आहे. त्यावरून असें दिसतें कीं बाळाजी हा सरसुभेदार असतां अनेक प्रकारचीं व अनेक व्यक्तींचीं कामें करीत असला पाहिजे. धनाजी जाधवाचे सरंजाम व वतनें ठिकठिकाणीं होतीं त्यांचा वसूल करून देण्याचें काम कैक वर्षे बाळाजीनें केलें, हाच मुख्यतः त्याचा व धनाजीचा संबंध. म्हणजे धनाजीच्या हाताखालीं तो कारकुनी करी असा

१ इ. ग्. सरदे० घराणें ले. २ पे. द. पृ. १२२.

अर्थ नाहीं. त्या वेळचा सरसुभेदार म्हणजे वसूल, निवाडे, बंदोबस्त, सावकारी वगैरे कामें ज्याचीं जशीं पडतील तशीं करणारा, आणि त्याबद्दल वेतन अगर ठरीव मेहनताना घेणारा इसम असे. मोगलाईत मुद्दां बाळाजीचा प्रवेश होता असें निश्चित म्हणतां येतें. शाहू येण्याच्या अगोदर महाराष्ट्राचा सर्वच मुलख मराठे म्हणत आपला, व मोगल म्हणत आपला. मराठ्यांचीं वतनें मोगलाईत व तिकडच्यांचीं वतनें स्वराज्यांत, अशी कांहीं अनिश्चिति असून, प्रत्येकास खासगी व्यवस्था ठरवून उत्पन्नाच्या बाबती वसूल कराव्या लागत. तसा प्रकार बाळाजी व धनाजी यांचा होता. वास्तविक दौलताबाद प्रांत म्हणजे मोगलांचा, त्याचा सरसुभेदार स. १७०४ त बाळाजी कसा असूं शकेल, अशी शंका येते. परंतु नगर व दौलताबाद यांजमधील पुष्कळसा मुलख उभयतांचा होता. मोगली सुभेदाराच्या हाताखालीं काम करून मुद्दां बाळाजी त्यांचा वसूल उत्पन्न करून त्यांस देत असेल. त्यासाठीं हजार पांचशें फौज बाळगल्याशिवाय कोणतेंच काम त्या अंदाधुंदीच्या काळांत भागण्याजोगें नव्हतें. इतकें खरें कीं, स्वराज्याप्रमाणेंच मोगली राज्यांतील व्यवहार, बाळाजीस चांगले माहीत होते. तिकडील लहान मोठ्या अधिकाऱ्यांशीं त्याचा विशेष परिचय होता. रामचंद्रपंतानें राजनीतीत गोंवलेलीं कारभाराचीं प्रधान तत्त्वें जरी बाळाजीस अवगत होतींशीं दिसत नाहींत, तरी तत्कालीन व्यवहारांत तो दक्ष व चिरपरिचित असल्यामुळें, शाहू इकडे आल्याबरोबर बाळाजीच्या अनुभवाचा त्यास चांगला उपयोग होऊं लागला. त्याची स्थापना ताराबाईचे हातें महादाजी कृष्ण जोशी यानें रांगण्याचे मुक्कामीं केली असाही एक उल्लेख आहे.[२] यावरून तिच्या सात वर्षांच्या कारभारांत त्याची कर्तबगारी तिला चांगली माहीत झाली होती. शाहूनें त्यास हाताशीं धारण्याचें प्रयोजन यावरून स्पष्ट होतें. बाळाजीपंत अमात्याचा मुतालिक असल्याचा उल्लेख[३] स. १७०८ चा आहे, याचा अर्थ असा कीं त्या सालच्या जानेवारींत, शाहूनें राज्याभिषेकप्रसंगीं अमात्यपद अंबूराव हणमंते यास दिलें तेव्हांच अंबूरावाची लायकी दिसून आलेली नसल्यामुळें, बाळाजीस त्याचा मुतालिक नेमिलें असावें. याच वेळीं मयत सचिव शंकराजी नारायण याचा मुलगा लहान असल्यामुळें त्यास सचिव पद देऊन दत्ताजी शिवदेव यास त्याचा मुतालिक

१ पे. द. १२४. २ पं. सं. ब्र. ले. १.२. ३ खं. १५ पृ. १०८.

नेमिले होतें. सेनाकर्ते पद मात्र त्यास शाहूनें केव्हां दिलें तें नक्की होत नाहीं. नाना यत्नांनीं पैसा व सेना जमवून त्यानें शाहूस अडचणींतून सोडविलें ह्मणून शाहूनें त्यास हें पद दिलें, असें त्या शब्दाच्या अर्थावरून ठरविणें बरोबर नाहीं. अगोदरच सेनाकर्ते असलेल्या बाळाजीस ता. २१-८-१७११ रोजीं लष्कर जमवायची आज्ञा करून शाहूनें सरंजाम दिला तो सेनाकर्ते पदाचा नव्हे.[१] तें पद पूर्वीच निघालेलें असून स. १७००त नरहरि रुद्र[२] याजला होतें. पुढें होनाजी अनंताचें काढून तें बाळाजीस देण्यांत आलें. तें पद बाळाजीनें आपल्या नांवापुढें लावल्याचा एक कागद ता. २० नोव्हेंबर स. १७०८ च्या केसरींत छापलेला आहे. सन १७१३त पेशवाई देतांना बाळाजीचें तें पद काढून पुनः शाहूनें होनाजी अनंतास दिलें. सारांश, बाळाजी विश्वनाथ हा राजारामाच्या वेळेपासून रामचंद्र नीलकंठ, धनाजी जाधव, ताराबाई, शाहू इत्यादि तत्कालीन प्रमुख व्यक्तींच्या चांगल्या परिचयाचा व्यवहारदक्ष गृहस्थ होता. स. १७०२ व १७०३ च्या कागदांवर बाळाजीची मुद्रा आहे ती अशीः—श्री उमाकान्तपदांभोजभजनासम्मुन्नतेः । बाळाजी विश्वनाथस्य मुद्रा विजयतेतराम ॥ यांत शंकराच्या सेवेनें आपण योग्यतेस चढलों असें तो दर्शवितो.

ताराबाई व शाहू यांच्या झगड्यांत बाळाजीनें शाहूचाच पक्ष कां स्वीकारिला हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. राज्यावर खरा हक्क कोणाचा या प्रश्नाची महती विशेषतः संबंध असणाऱ्या व्यक्तींनाच वाटत असते. सामान्य जन या हक्काचा विचार न करितां स्वतःच्या मतलबानें वागत असतात. बाळाजीला मोंगलांचें बळ व ताराबाईचें कर्तृत्व यांची चांगली कल्पना होती. रामचंद्रपंताचें व ताराबाईचें पटत नसून त्यास तिनें कैदेंत सुद्धां टाकिलें. तिचा पुत्र शिवाजी तर भ्रांत ह्म॰ वेडसरच होता, तेव्हां ताराबाईचाच मराठमंडळानें पुरस्कार केल्यास, आतां मोगलांशी पुनः झगडावें लागणार, त्यापेक्षां शाहूचाच पक्ष स्वीकारिला असतां, त्यांत राष्ट्राचें व आपलेंही हित आहे, अशी बाळाजीची भावना शाहू सुटून येत असतांनाच झाली असली पाहिजे. शाहू खानदेशांतून नगराकडे आला, तेव्हां बाळाजी त्या बाजूस असून तिकडचे लोकांस शाहूच्या पक्षांत आणण्यांत बाळाजीचा उपयोग घडला असावा. चिमणाजी दामोदराचा

१ शा. रो. १०१. २ म. प. प्र. १८२.

व बाळाजीचा विशेष घरोबा होता, तेव्हां परसोजी भोसले, चिमणाजी दामोदर इत्यादि मंडळींनीं शाहूचा जम बसवून दिला, त्यांत बहुधा बाळाजीचेंही अंग असावें. शाहू सुस्वभाव, हुशार व बादशाही पाठिंबा असलेला पाहून, त्याच पक्ष स्वीकारल्यानें आपला मतलब चांगला साधेल अशा बुद्धीनेंच बाळाजीनें त्याचा पुरस्कार केला; आणि आपण जो हा शाहूचा पुरस्कार करितों, त्याबद्दल आपणास कांहीं तरी मोठें पद शाहूनें द्यावें अशी त्याची मागणी होती. पण जुन्या अधिकाऱ्यांचीं पदें काढून त्यांस दुखविणें इष्ट नसल्यामुळें, शाहूनें बहुधा राज्याभिषेकप्रसंगीं किंवा त्यानंतर लवकरच प्रथम सेनाकर्तेपद बाळाजीस दिलें. एकदां एक पक्षाचा अंगीकार केल्यावर त्याचीच तड पोंचविणें जरूर असून, शाहूसही बाळाजीसारख्या चाणाक्ष व एकनिष्ठ सेवकाची अत्यंत जरूर होती. जुने सर्व प्रधान दोनही पक्षांकडे चित्त ठेवणारे होते, तसा बाळाजी नव्हता. बाळाजी व खंडो बल्लाळ यांचाही अंतस्थ विचार अगोदरपासूनच ठरला असल्याचा संभव आहे. धनाजीचें मन खेडच्या लढाईचे वेळीं वळविण्यांत खंडो-बल्लाळाप्रमाणें बाळाजीचेंही अंग असण्याचा संभव आहे. अनेक कामांत जेव्हां बाळाजीचें एकनिष्ठ वर्तन शाहूच्या नजरेस आलें, तेव्हांच त्यानें त्यास पुढें पेश-वाईचें पद दिलें.

या कारस्थानांत **ब्रह्मेंद्रस्वामीचें** अंग अंतस्थ रीतीनें असावें असा तर्क होतो. स्वामीनें हिंदुस्थानभर प्रवास केलेला होता. प्रवासाअंतीं महाराष्ट्रांत सातारा वगैरे प्रांतांत फिरून, शेवटीं त्यानें कोंकणांत परशुराम येथें वास्तव्य केलें. बाळाजीचा व त्याचा परिचय असून, त्याच्या हुशारीवरून बाळाजी राज्याच्या उपयोगी चांगला पडेल आणि तो पुढें नशीब काढील असें स्वामीस वाटलें, आणि तसा उद्योग त्यानें केला. स्वामीच्याच वशिल्यानें सरदार मंडळींत बाळाजीच्या ओळखी झाल्या असल्या पाहिजेत.

बाळाजीची व शाहूची गांठ कशी पडली यासंबंधाचा एक त्रोटक उल्लेख मुजुमदारांच्या कैफीयतींत आहे, तो असा. 'जाधवराव फौजबंद असल्यामुळें राजश्री शाहूछत्रपतींचा प्रवेश होईना. सबब हरतऱ्हेनें प्रयत्न करितां हें मनांत आणून महाराजांनीं आमचे वडील **नारो गंगाधर** यांस भेटीस बोलाविलें. भेट झाल्यावर राजश्रींनीं आज्ञा केली कीं, धनाजी जाधव यांचे फौजेंत जाऊन

आपलें कार्य संपादन करावें. मग नारो गंगाधर जाधवराव यांचे लष्करांत जाऊन, बाळाजी विश्वनाथ यांस भेटून महाराजांकडील मजकूर बोलिले, कीं महाराजांची चाकरी करून दाखवावी, म्हणजे तुम्हांस मोठें पद देतील. असें बोलोन निश्चय केला. नंतर **बाळाजी विश्वनाथ** यांनीं कारस्थान करून धनाजी जाधव यांस भय घालून, ते मोगलाईंत निघून गेले. तेव्हां बाळाजी विश्वनाथ यांची व राजश्रींची भेट आमचे वडील नारो गंगाधर यांनीं केली. मग महाराजांचे समागमें साताऱ्यास जाऊन राज्याचा बंदोबस्त करून राज्यकारभार करूं लागले, ( शके १६२९ ). पुढें शके १६३५ विजयनाम संवत्सरे माघमासीं बाळाजी विश्वनाथ यांस पद दिलें ते समयीं आमचे वडील **नारो गंगाधर** यांस मुज्मूचें पद दरखाचें देऊन वस्त्रें महाराजांनीं दिलीं[१]. '

**२ सेनापति चंद्रसेनाचा फितवा,** ऑगस्ट १७११.–कोल्हापुरास आपली व्यवस्था लावून ताराबाईनें अष्टप्रधान व अधिकारी वगैरे निराळे नेमिले. यापुढें पुनः शाहूच्या वाटेस ती न जाती तर येथेंच तंटा मिटला असता. परंतु स. १७११ त चंद्रसेन जाधवाच्या मदतीनें तिनें पुनः कारस्थान उभारिलें, त्याचें निरसन करणें शाहूस भाग पडल्यामुळें, बाळाजीचें व चंद्रसेनाचें उघड वांकडें आलें. ता. २७·८·१७११ चें शिवाजीचें पत्र चंद्रसेनास गेलें तें येणें प्रमाणें. (आरंभीं चंद्रसेनाचे पत्रांतील उतारा आहे.) ' आमची निष्ठा स्वामींच्या चरणीं, स्वामींची सेवा करावी व यशकीर्ति संपादावी; रा. जाधवराव ( धनाजी ) स्वामींच्या पायांव्यतिरिक्त दुसरें दैवत जाणत नव्हते. राज्यांत दुही निर्माण झाली, ते प्रसंगीं त्यांनीं प्रतिज्ञापुरःसर स्वामिसंनिध बोलोन स्वार झाले; परंतु कालगतीनें सर्वांची बुद्धि एका प्रकारें पाहली. तन्मुळें त्यांचा ( आपणास साह्य करण्याचा) हेतु पूर्ण करावा, हें अंतःकरणीं धरून, आजपर्यंत याच मानीं राहून, राजश्री आप्पाजी थोरात, दमाजी थोरात, शहाजी निंबाळकर, संताजी पांढरे आदिकरून सामील करून घेऊन, शाहूनीं केल्या लोभाची आस्था न धरितां, त्यांसही वैमनस्य दर्शवून, प्रतिनिधि व रा. खंडेराव दाभाडे, स्वामींच्या लोभाचे सेवक, ह्या प्रसंगांत आणावे, ह्या अर्थे आपल्या समाधानास या उभयतांस पाठविणें, म्हणून मुद्दाम सांगून पाठविलें, त्यावरून उभयतांस पाठवून दिलें; त्यांच्या

१ मानजीकृत कैफीयती यादी वगैरे. २ भा व. प. या. १ ले. ५०.

व आपल्या भेटी जाहल्या व रा. हैबतराव निंबाळकर यांचीहि भेट जाहली. तों आपण, रा. थोरात, खंडेराव दाभाडे, संताजी पांढरे, बसोन घाट घडला होता, तो निंबाळकर यास सांगतांच त्यांचे चित्तीं हेंच होतें. मग आम्ही अवघे वर्तमान सरदार कटांत घेऊन प्रतिनिधि यांस विचारांत घेतलें. स्वामींची द्वाही फिरविली. खुशाली केली; आगे गडकिल्यांस आम्हीं आपलीं व पंडित मशार-निल्हेचीं पत्रे पाठविलीं आहेत. या उपरी नीट सातारियाखालें चालून जाऊन राज्यांतील दुही निःशेष करितां स्वामींनीं खुशाली केली पाहिजे.’ आपण शाहूचे पक्षाचा अंगीकार कधींच केला नाहीं असें चंद्रसेन वर म्हणतो.

वरील पत्राचा ताराबाईकडून चंद्रसेनास खालील जबाब गेला. “ आपण लिहिलेलें वर्तमान श्रवणगोचरें करून संतोषातिशय झाला, तो पत्रारूढ किती काय म्हणून करावा ? कार्यकर्तव्य, पराक्रमी, मायेचे हिंदु सेवक असावे, ते तुम्हां-मारिखेच कृतकर्मे असावे. रा. जाधवराव ( धनाजी ) यांनीं कै. रा. स्वामींचे वेळेपासून राज्याभिवृद्धीविषयीं केले श्रम साहस, व सांप्रत दुहीमुळें राज्याभि-वृद्धीस झाला अपाय, चित्तांत आणून, पुढें स्वामींचें राज्य वृद्धीतें पाववून, यश-कीर्ति संपादावी हें मनीं धरून, जो अर्थ विशदें लिहिला तो उचित व यथार्थित लिहिला . तरी तुम्ही दीर्घद्रष्टेच आहां. हें राज्य समग्र ताम्राक्रांत झालें असतां, कै. स्वामींनीं लहानापासून थोरास आपली माया लावून, अवधियांवरी सद्-यत्नें कृपामृतवृष्टि करून दिनप्रतिदिनीं राज्य वृद्धिंगत पावविलें, ते प्रसंगीं कै० स्वामीचे संपूर्ण कृपेस पात्र एक जाधवराव मात्र झाले, तों पुढें दुहीचा प्रसंग प्राप्त झाला. दुही निःशेष करावी म्हणून स्वार होऊन गेले. त्यास विपरीतकाल-वशें सर्व लोकांस एक प्रकारें मोह प्राप्त झाला, तन्मुळें मशारनिल्हेचा कृतसंकल्प सिद्धीतें न पावला. त्यांचे पुत्र तुम्ही, त्यांजसारिखें कृतकर्मे आहां. तुम्हांव्यति-रिक्त त्यांचा संकल्प आणखी कोण शेवटास नेतो ! राज्याभिवृद्धीचा उपाय मायेच्या सेवकाविना दुसऱ्याचे मनांत कसा येईल ! तरी दुही निःशेष करून स्वामीचें शासन चालविण्याचा संकल्प सफल करावा. प्रतिनिधि, दाभाडे व मोरे यांस एकाग्रतेनें जवळ आणावयाचा विचार कल्पून, आपलें कर्तेपण प्रगट केलें ही गोष्ट कांहीं साहजिक केली नाहीं. हे तुमची दीर्घदृष्टि व आगेजणी व बुद्धीचें वैभव व शूरत्वाचा प्रसंग मनन करून पाहतां, दुसरा सास्यता आहे असें

नाहीं. तुह्मांसारिखे बुद्धिप्रगल्भ पराक्रमी पुत्र जाधवरावास होऊन स्वामीचे सेवेसीं तत्पर झाले. तुमच्या भरंवशानें स्वामी निश्चिंत आहेत. एकाग्रता होय तें करणें आणि संतोषाचें वर्तमान हुजूर लिहून पाठविणें. प्रतिनिधिही स्वामींच्या मायेचेच सेवक आहेत. गडकिल्ले यांस त्यांहीं व तुह्मीं पत्रें पाठविलीं ही गोष्ट उत्तम केली. पुढेंही ज्यास जें लिहिणें तें लिहावें. स्वामींनींही हुजूरहून गडकिल्ल्यांस व हशम नोकरांस पत्रें पाठविलीं आहेत. रा. हैबतराव निंबाळकर सरलष्कर यांची चित्तवृत्ति स्वामींचे चरणीं दृढ आहे. त्यांस समाधानपत्र पाठवावें ह्मणून लिहिलें, त्यांचें सर्व प्रकारें स्वामींस अगत्य आहे. हल्लीं तुमच्या लिहिण्यावरून स्वामींनीं त्यांस समाधानपत्र सादर केलें आहे. त्याचप्रमाणें थोरात व खंडेराव दाभाडे व संताजी पांढरे यांनीं तुमच्या चित्ताचे ठायीं एकरूप होऊन महत्कार्य संपादिलें; येणेंकरून स्वामी त्यांवर संतुष्ट आहेत. त्यांचींही पत्रें हुजूर आलीं होतीं, व स्वामींनीं त्यांस चित्तानुरूप समाधानपत्रें पाठविलीं आहेत. तसेंच रा. मानसिंग मोरे, शहाजी निंबाळकर, आदिकरून कुल सरदारांना समाधानपत्रें पाठविलीं आहेत. अतःपर कोणीं संशय मनांत आणावा असें नाहीं. मध्यें कांहीं दिवस काळाची गति कुटिल होती, तथापि स्वामींच्या चित्तीं कोणा एकाचें वैषम्य किंवा संदेह नाहीं. अवघ्यांच्या विचारें स्वामिकार्याची सिद्धि करावी अशीच स्वामींनीं अवघ्यांस आज्ञापत्रीं आज्ञा केली आहे. सर्व गोष्टींनीं मातोश्री साहेब व स्वामी बहुत संतोषी आहेत. तुह्मीं जें कर्तव्य लिहिलें तें निःशेष करून संतोषाचें वर्तमान लिहून पाठवावें.' यावरून मा[तोश्रींचे अंतःक]रस्थानाची स्पष्टता होते.

चंद्रसेनाच्या या फितुरी वर्तनामुळें त्याजवर शाहूचा विश्वास मुळींच बसला नाहीं, आणि बाळाजी तर हरतऱ्हेनें शाहूचा जम बसवीत होता. चंद्रसेनाच्या हालचाली व बेत बाळाजीकडूनच शाहूस कळत असावे. यामुळें चंद्रसेनाचें व बाळाजीचें उघड वैर उपस्थित होऊन त्यास हरणाचा तंटा कारण झाला तो असा.

**३. हरणाचा तंटा**—( स. १७११ चा उन्हाळा ). दमाजी थोरात, उदाजी चव्हाण वगैरे बंडखोरांच्या बंदोबस्तासाठीं शाहूनें चंद्रसेनास रवाना करून बरोबर बाळाजीस दिलें. त्या स्वारींत क्षुल्लक कारणावरून त्यांचा तंटा जुंपला. एके मुक्कामीं लष्करचें कूच होत असतां एक हरण उठलें, त्याचे पाठीस

बाळाजीच्या पथकांतील **पिराजी राऊत** नांवाचा सरदार लागला. पळतां पळतां, मुक्कामावर डेरे राहुट्या लागल्या होत्या, त्यांत **व्यासराव** ह्मणून जाधवरावाकडील एक ब्राह्मण कारकून होता, त्याचे राहुटींत तो हरण शिरले. त्याबरोबर व्यासराव व पिराजी यांचा झगडा लागून पिराजी आपली शिकार मागूं लागला. व्यासराव ह्मणाला, 'आह्मी ब्राह्मण, आमचे राहुटींत आलें त्याचें संरक्षण आह्मी करणार.' शेवटीं पिराजीनें भाला टाकला तो व्यासराव पुढें झाला त्यास तो लागला, जखम झाली. हें वर्तमान पिराजीनें बाळाजीस जाऊन कळविलें. इकडे व्यासरावानें जाधवाकडे फिर्याद केली. तेव्हां पिराजीस आमचे स्वाधीन करा असें जाधवरावानें बाळाजीस कळविलें. बाळाजीनें उत्तर दिलें, 'पिराजी आह्मांस शरण आला आहे, त्यास काय शिक्षा करावयाची ती आह्मीच करितों.' त्यावरून दोघेही आग्रहास पडले. जाधवानें बाळाजीवर फौज रवाना केली व पिराजीस पकडून आणण्यास सांगितलें. तें पाहून बाळाजी आपल्या पथकासह कूच करून निघाला. जाधवरावानें पाठलाग सुरू केला. तेव्हां बाळाजी पळत पळत पुरंदर किल्ल्यावर सचिवाच्या आश्रयास गेला. त्याउपर जाधवानें बारामतीवरून पुण्यास येऊन लगोलग पुरंदरास शह दिला व इकडे सचिवास सांगून पाठविलें, कीं 'बाळाजीस काढून द्या, नाहीं तर तुमचा खराबा करूं.' यावरून सचिवानें बाळाजीस घालवून दिलें. बाळाजी बाहेर पडून, कुटुंब, मुलें व **अंबाजीपंत** पुरंदरे यांसह निघून, पांच-सातशें नवे स्वार ठेवून निरेवर आला. तेथें लढाई होऊन बाळाजी पराभव पावला. तेव्हां तो परिंचे (ता. पुरंदर) गांवावरून पांडवगडच्या रानांत शिरला. या वेळीं बाळाजीच्या शिलेदारांत **पिलाजीराव जाधव वाडीकर** व परिंच्याचा **नाथाजी धुमाळ** हे दोन गृहस्थ होते, त्यांनी व राजश्री कान्होजी राजे शिर्के यांणीं अद्भुत युद्धप्रसंग करून बाळाजीस व त्याचे कुटुंबास वाईनजीक पांडवगडचे किल्ल्यावर सुरक्षित पोचविलें. या स्वारीत बाळाजीचा मुलगा बाजीराव यास लढाइचा पहिला अनुभव मिळून त्याचा पिलाजी जाधवावर लोभ जडला.

१ इ. वृ. शके १८३५ पृ. ४६६. २ शा. म. ब. व म. द. रु. २ पृ. ७३.

पांडवगडाहून बाळाजीनें ही हकीकत महाराजांस कळविण्याकरितां अंबाजी पुरंदरे याजला साताऱ्यास पाठविलें. अंबाजी व खंडो बल्लाळ यांचा स्नेह होता. त्यांच्यामार्फत शाहूस सर्व हकीकत कळली, तेव्हां त्यानें बाळाजीस साताऱ्यास बोलावून घेतलें. शाहूनें त्यास आश्रय दिल्यामुळें चंद्रसेनाचें कांहीं चाललें नाहीं. तथापि त्यानें शाहूकडेही निरोप पाठविला की, 'स्वामींनीं बाळाजीस माझ्या स्वाधीन करावें; त्यास आश्रय दिल्यास आह्मांस महाराजांचे पाय सुटतील.' त्यावरून चंद्रसेनाचें मन शाहूच्याविरुद्ध कसें बनत चाललें होतें हें दिसून येतें. जाधवाची ह्या उद्धटपणाबद्दल खोड मोडण्याकरितां शाहूनें हैबतराव निंबाळकरास बोलाविलें. तो अहंमदनगराकडे होता, तो लगेच फलटणास आला. चंद्रसेन पांडवगडाजवळ होता हें प्रकरण विकोपास न जावें ह्मणून शाहूनें खटपट केली. पण चंद्रसेनास ती मान्य झाली नाहीं. चंद्रसेन पांडवगड सोडून निघाला, त्याची व हैबतरावाची गांठ आंदरकींच्या घांटाखालीं जेऊर येथें पडून एक लढाई झाली, ( सन १७११ मार्च-एप्रिल ), तींत जाधवाचा पुरा मोड झाला. नंतर तो पळून रहिमतपुरावरून पन्हाळ्यास गेला व उघडपणें ताराबाईस मिळाला. हा प्रकार स. १७११चे ऑगस्टनंतरचा असला पाहिजे.

या प्रचंड उठावानें अनेक प्रमुख मंडळींची मनें शाहूसंबंधानें डळमळूं लागलीं. सावंत, आंग्रे, जाधव चंद्रसेन, खंडेराव दाभाडे ही मंडळी तर ताराबाईचे पक्षांत भक्कम होतीच, पण चंद्रसेनाचे चिथवणानें हैबतराव निंबाळकरही शाहूची दुरवस्था पाहून त्यास सोडण्याचे बेतांत आला. परसोजी भोसले व चिमणाजी दामोदर हे दोघेच शाहूच्या बाजूचे राहिले, पण ते खानदेशाकडे होते. या प्रसंगीं बहिरोपंत पिंगळ्यानें शाहूला कांहीं एक करामत दाखविली नाहीं; बाळाजीनें मात्र या संधीचा उपयोग करून पिलाजी जाधव, पुरंदरे वगैरेंच्या मदतीनें पैसा व फौज जमविली. 'बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते यांसी लष्करचा जमाव करावयाची आज्ञा करून जमावाचे बेगमीबद्दल महालमोकासे मिळून सरंजाम पंचवीस लाख दिला.मु. किले सातारा(२१-८-१७११).'चंद्रसेनास शाबासकी देणारें शिवाजीचें पत्र वर दिलेलें ता. २७ ऑगस्टचें आहे, म्हणजे चंद्रसेन आपणास सोडून गेल्याचें समजतांच शाहूनें नवीन फौज जमविण्याचा उद्योग चालविला आणि चंद्रसेनाचें सेनापतिपद काढून, तें त्याच्या भावास दिलें. जाध-

व से शक्य तितकें कमी दुखविण्याचा शाहूचा विचार होता. चंद्रसेन गेल्याबद्दल हताश न होतां, बाळाजीनें शाहूस धीर दिला. महादाजी कृष्ण, बाबूजी नायकाचा चुलता कृष्णाजी नाईक वगैरे सावकारांकडून अंबाजीपंताचे साह्यानें कर्ज काढून बाळाजीनें नवीन फौज लगोलग बनविली. या सावकारांच्या कर्जास तारण पाहिजे म्हणून शाहूकडून बाळाजीनें पंचवीस लाखांचा सरंजाम करून घेतला; आणि शाहूच्या मंडळींत उत्साह उत्पन्न करून कारभारांत प्रमुखत्व संपादिलें. अंगांत कसब पाहिजे व तें दाखविण्याची संधि आली पाहिजे. चंद्रसेन गेल्यानें बाळाजीला हा योग साधला. कृष्णाजी नाईक जोशी यांनीं मोगलाईंतून येतेसमयीं श्रम साहस करून एकनिष्ठेनें सेवा केली, त्यासमयीं पोतदारीच्या सनदा दिल्या आहेत, त्याप्रमाणें वंशपरंपरेनें चालविणें. पूर्वीचे पोतदार श्रीगोंदेकर पुढें ताराबाईकडे राहिले, सबब शाहूनें आपली पोतदारी कृष्णाजी नायकास दिली. परशुरामपंत प्रतिनिधि शाहूकडे होता तोही ताराबाईशीं सामील होणार, असें दिसल्यावरून ता. २०–११–१७११ रोजीं त्यास कैद करून सरंजाम, घर जिंदगी सुद्धां जप्त केलें.[1] पुढें हळूहळू चंद्रसेनाचें कारस्थान मोडून शाहूनें आपला जम बसविला. चंद्रसेन पुढें मराठेशाही सोडून मोगलांस मिळाला त्याचें वर्णन पुढें येईल. सन १७१२ साल शाहूचें विवंचनेंत जाऊन त्यापुढें त्याचा जम हळूहळू बसला, तेव्हां दोन महत्त्वाच्या गोष्टी घडल्या, एक कोल्हापुरास संभाजीची स्थापना व दुसरी बाळाजी विश्वनाथाची पेशवाईवर नेमणूक.

**४. शिवाजीची कैद व संभाजीची स्थापना.** ( स. १७१४ ).— चंद्रसेनाच्या कारस्थानांत रामचंद्रपंताचें अंग होतेंसें दिसत नाहीं. त्याच्या पाठबळाशिवाय ताराबाईचा उद्योग यशस्वी होण्याजोगा नव्हता. तिचा पंताशीं पुनः बेबनाव होऊन ताराबाई कैदेंत पडली. ती स्वतः लिहिते. ‘ कालपरत्वें आमचा प्रसंग विसकळित होऊन संभाजीराजे व राजसबाई यांणीं गिरजोजी यादव, अंताजी त्रिमळ व गडकरी व तुळोजी शितोळे यांसी पुढें करून किल्ले पन्हाळा येथें संभाजीराजे यांसी राज्यपदास बैसविलें. आह्मांस संकटीं घातलें, बहुत निकड केली. ’ शिवाजी या वेळीं फक्त कैदेंत पडला; मरण पावला ह्मणून उल्लेख

१ शा. रो. १२० व पे. द. पृ. ३२५.

आहेत ते खरे नाहींत. तो २४ मार्च स. १७२६ रोजीं कैदेंतच देवी येऊन वारला.[1] त्याच्या दोघी बायका भवानीबाई व पार्वतीबाई याही कैदेंत पडल्या. या राज्यक्रान्तीच्या संबंधांत शाहूचें अंग होतें कीं काय याचा खुलासा होत नाहीं. थोडें बहुत शाहूचें अंग त्यांत असल्यामुळें संभाजी त्याचा मिंधा राहिला. शाहूविषयीं ताराबाईचा ताम्रभाव संभाजी व राजसबाई यांचे मनांत वागत नसल्यामुळें घरगुती भांडणांतून शाहूचें मन मोकळें होऊन त्यास बाहेरच्या कामांत मन घालण्यास सवड झाली. शिवाजी स. १७१२त[2] पदच्युत झाला, आणि त्याच वेळीं संभाजी गादीवर आला असे उल्लेख आहेत ते बहुधा खरे नाहींत. कदाचित् दोन गोष्टींच्या दरम्यान वर्ष दोन वर्षांचें अंतर असण्याचाही संभव आहे. उपलब्ध कागदांत ३·२३९ चें ता. ११·११·१७१३ चें शिवाजीचें आज्ञापत्र आहे, व इतिहास संग्रहांत पेशवे दप्तरांतील कागदांत शिवाजीचीं तीन आज्ञापत्रें ता. १-४·१७१४ चीं आहेत, आणि जय संवत्सरीं म्हणजे ५·३·१७१४ च्या पुढें संभाजी गादीवर आला असा उल्लेख स. प. २०५ वर आहे, यावरून स. १७१४ त केव्हां तरी तो गादीवर आला असें धरून चालण्यास हरकत नाहीं.

या दोघां राजपुत्रांच्या जन्मकाळासंबंधींही संशय आहेत. स. प. पृ. १७६ वर ता. ९-६-१६९६ रोजीं जिंजी येथें राजारामास पुत्र झाला असा उल्लेख असून, त्याच तारखेस जेधे शकावलींत ' पुत्र झाला, नांव शिवाजी ठेवलें ' असा मजकूर आहे. अर्थात् हा ताराबाईचा शिवाजी होय याविषयीं संशय राहत नाहीं. खं. ३·१६७ पृ. १७३ व १७४ वर राजारामास पुत्र झाल्याबद्दल पांच चावर जमीन इनाम दिल्याची सनद १-४-१६९१ ची आहे. हा पुत्र संभाजी असेल तर तो शिवाजीहून वयानें पांच वर्षांनीं मोठा ठरतो; आणि त्याची आई राजसबाई ताराबाईहून कनिष्ठ असल्यामुळें राजारामाचे पश्चात् ताराबाईनें संभाजीस बाजूस करून आपल्या मुलास गादीवर बसविलें असें होईल. कदाचित् संभाजी शिवाजीहून लहान असेल तर स. १६९१ सालीं झालेला तिसराच एक मुलगा असून तो पुढें जगला नाहीं असे म्हणावें लागेल. बहुधा

१ का. सं. प. या. ले. ४९२; भा. व. श. पृ. ७; म. द. रु. १ पृ. १३२.

२ इ. वृ. १८३४ ले. ६० व पे. द. पृ. २७७—२८१ नं. ३, ४, ५ ता. १·४·१७१४ चे कागद. २८-६-१७१४ पर्यंत शिवाजीचे कागद सांपडतात.

संभाजीच वयानें मोठा असून शिवाजी थोडासा वेडसर असल्यामुळें स. १७१४त शिवाजीस बाजूस सारून संभाजी गादीवर येऊं शकला असें दिसतें. संभाजीचीं शाहूस गेलेलीं कित्येक पत्रें उपलब्ध आहेत तीं पाहतां शाहूच्या बद्दल त्याचे मनांत प्रेमभाव व आदर बराच होता असें वाटतें. येसूबाई देशीं आल्याबद्दल अभिनंदनाचें[1] व शाहूची बायको सावित्रीबाई मरण पावल्यावर सांत्वनाचें[2] हीं दोन उपलब्ध पत्रें बहुधा स. १७१९-२० किंवा त्यापुढचीं आहेत. संभाजी पुढें निजामास मिळून शाहूवर चढाई करून आला आणि शाहूनें त्याजवर स्वारी करून त्यास नरम केलें, त्या एका प्रसंगाशिवाय उभयतांचें वांकडें असें नव्हतें. मात्र शाहूच्या मनांत संभाजीविषयीं प्रेमभाव नव्हता, नाहीं तर आपले पश्चात् त्यासच राज्य देण्याच्या खटपटीस त्यानें अनुमोदन दिलें असतें.

मोगल घराण्यांतील पुरुषांप्रमाणें आपल्या दायादांचा नाश करण्याइतकें कठोर अंतःकरण शाहूचें नव्हतें. राजारामानें किती श्रमसाहस करून राज्य संभाळिलें हें शाहूस ठाऊक होतें. शिवाय नोकरचाकर आप्तसोयरे वगैरे सर्व कुटुंबाचे एकच असून कोल्हापुर व सातारा यांचे दरम्यान हरएक व्यवहार सारखे चालूच होते. ताराबाई, राजसबाई व त्यांचीं मुलें हीं सर्व आपलीं आप्तच, त्यांस मारावयाचें नाहीं, त्यांचें शक्य तितकें चालवावयाचें; अशाच शाहूची उदार बुद्धि होती. संभाजीचे व्यवहार ठरविण्यांत शाहू केवळ स्वतःच्या बुद्धीनें वागत होता, पेशवे किंवा इतर कोणी यांची मधस्थी किंवा ढवळाढवळ त्यानें या बाबतींत चालूं दिली नाहीं. हें घरगुती प्रकरण त्यानें सर्वस्वी आपल्याच हातीं ठेविलें. वारणेची हद्द ठरवून राज्याचा हिस्सा सुद्धां प्रथमपासूनच त्यानें यांस तोडून दिला. ' खंडेराव दाभाडे शाहूस घेऊन ताराबाईचे भेटीस पन्हाळ्यावर आला. उभयतांची भेट जाहल्यानंतर सर्व मराठमंडळास मेजवानी केली. आईसाहेब व महाराजांनीं एक पात्रांत भोजन केलें. ते वेळेस ओलणें होऊन वारणेपार संभाजी महाराजांचें राज्य ठरवून दिल्हें.'[3] संभाजीनें पुढें निजामाशीं गुप्त कारस्थानें करून व शाहूकडील मंडळीस फितवून पराकाष्ठेचा उपद्व्याप मांडिला, म्हणूनच पुढें त्यांजवर स्वारी करणें शाहूस प्राप्त झालें. तूर्त ताराबाई

---

१. वि. ज्ञा. वि. नोव्हें. १९२१, रा. गुप्ते. २. महाराष्ट्र साहित्य मार्च १९२३, रा. गुप्ते. ३ का. सं. दाभाड्यांची ह. पृ० ६.

ठिकाणीं बसतांच अष्टप्रधान, दरकदार, सरकारकून, कारखानदार, यांच्या नेमणुका करितांना, जे संभाजीराजे यांचे लक्षीं राहिले व दुलग आहेत असें दिसून आलें, त्यांस दूर करून, बंदोबस्ताचे उपयोगी निःसीम सेवा करणारे असे आपल्या खात्रीचे इसम शाहूनें नेमिले. कोणता तरी एक पक्ष कायमपणें स्वीकारा अशी फरज सर्वांस पाडून, विशेष हातापाईवर न आणितां त्यानें सर्व लहानथोर मंडळींस गप्प बसविलें. मुलखांतील दंगे मोडून शांतता प्रस्थापित करण्यास या धोरणाचा अवलंब शाहूस फारच फायदेशीर झाला. 'जे जे अष्टप्रधान, कारखानदार व दरकदार येऊन निष्ठेनें राहिले, त्यांचे अधिकार त्यांस देऊन चालविले. वडील असून आईसाहेबांकडे राहिले, आणि धाकट्यांनीं सेवा केली, त्या धाकट्यांसच पदें दरख दिल्हे. सर्वांचे सन्मान करून आपले लक्षीं लाविलें. सर्व मनुष्यमात्रांस कृपा, ममता लावून वेध लाविला. तैनाता, नेमणुका, जमिनी, इनामगांव ज्याचे जसे श्रम, साहस, सेवा, त्याप्रमाणेंच बक्षिसें द्यावीं. गुण तितका प्रगट करून घ्यावा, अवगुण घेऊं नये.' असे उल्लेख आहेत.[1]

ताराबाईच्या स्वभावासंबंधानें पाहतां तिच्या कारस्थानांनीं जुने अनुभवी मुत्सद्दी निरुपयोगी झाले; आणि जे नवीन होतकरू व साहसी लोक पुढें आले, त्यांस पाठबळ मिळालें नाहीं. याच स्वभावामुळें प्रस्तुत तिला बंदिवास प्राप्त झाला, आणि शाहूच्या निधनोत्तर कांहीं वर्षें जरी तिनें पुनः खटपटी केल्या, तरी तिच्या आयुष्याची एकंदरींत सुमारें चाळीस वर्षें कैदेत गेलीं, म्हणजे तिला कोठें तरी अडकवून ठेवण्यांतच राष्ट्रकर्त्यांस राज्याची सुरक्षितता वाटली असें दिसून येतें.

संभाजी गादीवर आल्यावर रामचंद्रपंत अमात्यही कायमचा घरीं बसला. तो अनुभवी व धोरणी पुरुष वेळ पडेल तसा वागणारा नव्हता. त्यानें राजारामाचे पश्चात् ताराबाईचा पुरस्कार केला. तिचा आधार संपतांच, किंवा तिच्याशीं बेबनाव झाला असतांही तो शाहूस किंवा संभाजीस मिळाला नाहीं. शिवाजीच्या वेळेपासून राज्याची एकनिष्ठ सेवा केलेला असा हा एकच पुरुष मराठ्यांचे इतिहासांत मोठा सन्मान्य दिसतो. त्याचा राज्यकारभाराचा अनुभव त्यानें लिहिलेल्या राज्यनीतींत ओतलेला आहे त्यावरून त्याची कर्तबगारी व्यक्त

---

१ शा. म. च.

होते. स. १७१६ नंतर अमात्य म्हणून त्याचे कागद उपलब्ध नाहींत. त्यापुढें त्याचा मुलगा भगवंतराव याजला अमात्य पद मिळालें. रामचंद्रपंताचा मृत्युकाळही निश्चित नाहीं. खं.८–१५२ वरून तो सुमारें स.१७३४पावेतों हयात असावा, म्हणजे तोंपर्यंत त्याचें वय ऐंशींच्या वर गेलें असलें पाहिजे. कारभारांत आपलें प्रयोजन राहिलें नाहीं असें समजतांच सर्व कामें सोडून केवळ संन्यासवृत्तीनें अज्ञातवासांत उत्तरायुष्य घालविणारे रामचंद्रपंतासारखे धैर्यवान पुरुष फारच विरळा दिसून येतात.

५. **खटावकराचें बंड,** ( स. १७१२-१३ )—बाळाजी विश्वनाथाचा संबंध येणाऱ्या प्रकरणांत हें कृष्णराव खटावकराचें बंड मो तें. शिवाजीचे पश्चात् जी मोगलांची धामधूम पंचवीस वर्षांवर झाली, त्यांत अनेक ब्राह्मण मराठे वगैरे घराणीं मोगलांचे आश्रयास जाऊन मराठ्यांचे राज्यास त्रास देत होतीं, त्यांचा बंदोबस्त करणें शाहूस प्राप्त झालें. यांस त्या वेळीं पुंड अशी संज्ञा बखरकरांनीं दिलेली आहे. त्यांतलाच हा खटावकर होय.

कृष्णराव खटावकर हा जातीचा देशस्थ ब्राह्मण, शंभुमहादेवाचे डोंगराजवळ खटाव येथें राहून, मोगलांच्या तर्फेनें मराठ्यांस उपद्रव करीत असे. संभाजीच्या वधापासून हा ब्राह्मण औरंगजेबास मिळून असल्यामुळें, त्याजकडून त्यास राजा असा किताब व खटावची ठाणेदारी मिळाली होती. ग्रँट डफ यास या खटावच्या घराण्याकडून एक फारशी पत्र मिळालें होतें. तो ह्मणतो कीं ह्या ब्राह्मण घराण्यांत बायकांत पडद्याची चाल होती. कांहीं दिवस बुध व मलवडी येथील पाडग्यांच्या देशमुखीचें उत्पन्न खटावकरांकडे होतें. अद्यापि खटाव गांवांत कांहीं उत्पन्न त्याच घराण्याकडे चालत आहे. सुमारें दहा वीस वर्षें तरी ह्या घराण्याकडून मोगलांचें साह्य उत्तम प्रकारें होत होतें. हें घराणें विद्वान् म्हणून नांवाजलेलें होतें. कृष्णरावानें संस्कृतांत लिहिलेली विष्णुसहस्रनामावरची द्वैतमताची सुंदर टीका उपलब्ध आहे. कृष्णरावाचे बापाचें नांव भगवंतराव व आजाचें राघवपंडित. भगवंतरावानें मोगलांची नोकरी धरून प्रतिष्ठा मिळविली. संभाजीच्या मरणानंतर बादशाहाकडून कृष्णरावास खटाव परगण्याची जहागीर मिळाली, तेथें ते पुढें कोट बांधून राहूं लागले. असा हा कृष्णराव खटावकर मूळापासूनच मोगलांकडे होता. सन १७१२ च्या आरंभीच शाहूनें

बाळाजीस फौज देऊन त्यांजवर पाठविलें. त्या वेळेस अटकेंत असलेल्या परशुरामपंत प्रतिनिधीचा दुसरा मुलगा श्रीपतराव महाराजापाशीं होता; त्यास परशुरामपंतानें सांगून पाठविलें, ' तुम्हीं सेनाकर्ते यांजबरोबर लढाईत जाऊन आपली सर्थ करून महाराजांस संतोषित करून आम्हांस सोडवावें, अगर मरून जावें. ' त्याप्रमाणें श्रीपतराव लढाईस जाऊन मोठ्या शिकस्तीनें खटावकराशीं लढला; खटावकरानेंही लढण्याची शिकस्त केली, पण शेवटीं मोड होऊन कृष्णराव व त्याचा वडील मुलगा मारले गेले; मग दुसरे दोघे मुलगे शरण आले. तेव्हां तह करून महाराजांस भेऊन भेटून पदरीं पडले, ह्मणून शाहूनें त्याला क्षमा करून खटाव गांव इनाम देऊन तैनात वगैरे करून पदरीं ठेविलें. हें इनाम पुढें स. १७२८ त दिल्याची सनद आहे.

खटाव गांव सातारा रेल्वेच्या पूर्वेस १५ मैल आहे. संभाजीचे राघव व कृष्णाजी असे दोघे मुलगे त्र्यंबकेश्वराच्या गिरीवर अनुष्ठान करीत, त्यांपैकीं कृष्णाजीस बादशहानें प्रथम खटावची ठाणेदारी दिली. पुढें त्याचे वंशज निजामाचे राज्यांत बाराहळ्ळीस जाऊन राहिले. राघवाचा नातू कृष्णराव यानें खटाव येथें दत्तमंदिर बांधून नवीन ग्रंथ उतरून घेण्याकरितां १२ लेखक निरंतर बसविले होते. तो न्याय व व्याकरण या शास्त्रांत निष्णात असून शूर होता. जेजुरीचा खंडोबा यांचा कुलस्वामी होय. तेथील खंडोबाचें देऊळ कृष्णरावानें बांधिलें, तें कायम टेकून सर्वांवरचें आवार पुढें अहल्याबाई व तुकोजी होळकर यांनीं पुष्कळ वाढविलें. चंपाषष्ठीच्या दिवशीं खंडोबास पहिला नैवेद्य खटावकरांचा होतो.[1]

**खटावकरांचा वंश**

संभाजी अगर नारोपंत
- राघो संभाजी
  - भगवंतराव
    - कृष्णराव [ शाहूनें प. डाव केला. ]
- कृष्णाजी

८ बाळाजी विश्वनाथाची पेशवाईवर नेमणूक (१६-११-१७१३). शाहू व ताराबाई यांचा अमदा महाराष्ट्रांत चालू झाल्या राज्यांतील तमाम

---
1. इ. सं. १८३७ ले. १९३, व जु. ए. गो. २-२५.

वतनदार व कामगार यांची आपली कमाई सांभाळण्यासंबंधानें मोठी भांदल उडाली. चंद्रसेन जाधव, रामचंद्र नीळकंठ वगैरे कित्येक ताराबाईचे पक्षांत राहिले, तर पेशवे, प्रतिनिधि वगैरे कित्येकांनीं आपल्याच कुटुंबांतील एक पुरुष इकडे तर एक तिकडे अशी वांटणी करून निभावणूक चालविली. मुलखांतील वतनदार तर दोनही पक्षांकडून सनदा मिळवून, वेळ पडेल तसें वागून वतनाच्या बचावास लागले. अशी धरसोड सुमारें पांच वर्षे चालली. ता. २४-१२-१७०८ रोजीं शाहूनें नासिकचा सुकासा खंडेराव दाभाड्याकडे होता, तो काढून बाळाजी विश्वनाथ सेनाकर्ते यास दिला.[1] स. १७११त चंद्रसेनाचा फितवा झाला त्याचें निरसन होऊन स. १७१२ चे अखेरीस शाहूचा जम बहुतेक बसला, आणि एक एका प्रकरणाचे निकाल शाहूनें सामदामानें लाविले. अष्टप्रधान, सरदार व इतर मंडळी यांच्या नेमणुका करितांना शाहूचें मुख्य धोरण कसें होतें हें मागें सांगितलेंच आहे. निळो मोरेश्वर पिंगळे कोल्हापुरास राहिला आणि त्याचा भाऊ बहिरोपंत यास शाहूनें आरंभींच पेशवाईवर नेमिलें होतें. परंतु बहिरोपंताचा उपयोग शाहूस मुळींच झाला नाहीं; आणि या पांच वर्षांच्या काळांत एकाही प्रकरणांत त्यानें स्वयंस्फूर्तीनें पुढाकार घेऊन शाहूस मदत केल्याचा दाखला नाहीं. निळोपंताचा तिसरा भाऊ केसोपंत हाही कोल्हापुरासच राहिला, तेव्हां पिंगळे कुटुंब सोडून नवीनच लायक इसमास पेशवाई देण्याचा विचार शाहू करीत असतां, त्याच्या अनेक साह्यकर्त्यांपैकीं बाळाजी विश्वनाथ हाच अनुभवी, कर्तबगार व राजनिष्ठ असा सेवक शाहूस दिसला. परशुरामपंतास प्रतिनिधिपद पुनः देण्याविषयीं बाळाजी विश्वनाथाची विशेष भीड होती. तें उपकार स्मरून बाळाजीस पेशवे पद देण्याविषयीं परशुरामपंतानें आपली भीड शाहूपाशीं खर्चिली. यावरून उभयतांचा स्नेह चांगला जुळला असावा. खंडो बल्लाळाचें साह्य या कामीं बाळाजीस चांगलें झालें. बहिरोपंतास आंगऱ्यानें पकडिलें, तेव्हां आपण अडून बसत नाहीं, दुसरा पेशवा नेमून, लोकांचीं पदें काढून घेण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं आहे, ही गोष्ट आंगऱ्याचे निदर्शनास आणण्याची जरूर असल्यामुळें, मुद्दाम घाईघाईनें बाळाजीस पेशवाईचा अधिकार देऊन शाहूनें त्यास लगेच

---

१ अप्रकाशित. २ हा स. १७१६ च्या पुढें वारला. [illegible] त्याचे शिक्के सांपडतात. सत्का. ९.

आंगऱ्यावर पाठविलें; आणि या बिकट कामाचा निकाल शाहूची इभ्रत राखून बाळाजीनें केला, येणें करून शाहूच्या आदर व बाळाजीची मान्यता वाढली. आपणास कांहीं तरी मोठें पद शाहूनें द्यावें, अशी बाळाजीची मागणी शाहूकडे होती ती अशा प्रकारें परिपूर्ण झाली. ' तुह्मां सारिखे अतुलपराक्रमी सेवक असतां, स्वामींनीं याचा दृष्टांत बाळगावा असा प्रकार नाहीं,' असे बाळाजीविषयीं शाहूचे उद्गार[1] आहेत, यावरून पांच वर्षे कसून परीक्षा घेतल्यावर, जवळच्या मंडळींत हा इसम शाहूस सर्वांत लायक दिसला, तेव्हांच त्यास त्यानें पेशवा केलें. विशेषतः बाळाजी हरहुन्नरी, पडेल तें काम उरकणारा, व्यवहारदक्ष व कारस्थानी असल्यामुळें त्यास शाहूनें हाताशीं धरिलें. रामचंद्रपंताइतका तो निःस्वार्थी नव्हता. तो मतलबी तर खराच, परंतु एकदां स्वीकार केल्यावर तड पोंचविणारा होता. शाहूस धरसोडीचा इसम नको होता. जुनी मंडळी प्रसंग पडेल त्याप्रमाणें दोन दगडांवर हात ठेवणारी होती, ती शाहूस नको होती. बहिरोपंत कैदेंत अडकल्यानें स्वतःच नालायक ठरला. दोन प्रकारच्या लहान व मोठे शत्रूंच्या चक्रव्यूहांत शाहू सांपडलेला असून त्यांतून सुटण्यास बहिरोपंत उपयोगी पडला नाहीं. तेव्हां ज्याची राजनिष्ठा कधींही ढळणार नाहीं असा इसम शाहूनें मुख्य कामासाठीं नवीनच हाताशीं धरिला. ' कर्ता ब्राह्मण पेशवाईस योग्य ' असे त्याजबद्दल खंडोबल्लाळाचे उद्गार आहेत. स. १७१३ त दक्षिणच्या सुभ्यावर निजामाची नेमणूक होऊन मराठेशाहीवर नवीनच संकट कोसळलें, त्यामुळें बाळाजीसच पेशवेगिरी देणें शाहूस जरूर वाटलें. अमुक एका विशिष्ट कामगिरीचें बक्षिस ह्मणून शाहूनें हें पद त्यास दिलें असें नाहीं. बाळाजीच्या लायकीमुळें व शाहूच्या परिस्थितीनें सहजगत्या तो योग आला. वस्त्रें देण्याचें कृत्य [2]मांजरी येथें झालें, साताऱ्यास झालें नाहीं. मांजरीहून परभारेंच बाळाजी लोहगडावर आंगऱ्याचे भेटीस गेला.

' मुख्य प्रधानपदाचीं वस्त्रें, बादली सणगें सहा, व जवाहीर, शिरपेच तुरा, कंठी, चौकडा, ढाल, तलवार, शिक्के, कट्यार, व चौघडा, साहेबनौबत, हत्ती, घोडे, जरीपटका, वगैरे देऊन मौजे मांजरी प्रांत पुणें, या मुक्कामीं बाळाजीस

---

१ पत्र रा. य. रा. गुप्ते यांजकडून. २ मांजरी हडपसरचे दक्षिणेस पुण्याहून ८ मैल.

मुख्य प्रधान केलें.[१] पेशवे पदास सरंजाम महाल वगैरे दिल्हे. पो. कर्डी रांजणगांवें वगैरे पांच महालांचें सरदेशमुखीचें वतन नानास दिल्हें.[२] अंबाजीपंत पुरंदरे यास शाहूनें आपल्या तर्फेनें बाळाजीचा मुतालिक नेमिलें. उलट पक्षीं रामाजीपंत भानु यास बाळाजीनें महाराजांकडून फडणिसी देवविली. वरील सरंजामानें पेशव्यांचें वास्तव्य पुण्यास प्राप्त झालें. परंतु प्रत्यक्ष कसबा पुणें शाहूनें त्यांस पुढें २-४-१७२६ रोजीं इनाम दिलें.[३] अमात्य पद अंबूराव हणमंते यास असून शिवाय नारो गंगाधर ऊ० आयाबा मजूमदार यास मुजूमदारी दिली. हाच गृहस्थ हल्लींच्या मुजुमदारांचा पूर्वज होय. अमात्य व मुजुमदार यांचीं कामें एकच, यावरून ही नवीन मुजुमदारी पेशव्यांची असावी. आनंदराव रघुनाथ भोपळे व नारोराम शेणवी हे दोन कर्ते इसम शहाणे व मोगलाईंतील माहितगार पूर्वी जाधवरावाजवळ होते. चंद्रसेन फुटून गेल्यावर त्याजकडील या दोन इसमांस शाहूनें मोठ्या युक्तीनें आपल्या बाजूस आणिलें, तेव्हां त्यांस प्रधानमंडळांत पदें देणें भाग पडलें. कदाचित् असा भाव दाखवून त्यांस फोडून आणिलें असेल. रामचंद्रपंत पुंड्याचें मंत्रिपद काढून नारोराम यास देण्यांत आलें; आणि सुमंतपद महादाजी गदाधर याचें काढून आनंदराव रघुनाथ यास देण्यांत आलें. या अष्ट प्रधानांच्या मानगडी इतक्या वेळां झालेल्या आहेत आणि त्यांचे उल्लेख इतके अनिश्चित व अव्यवस्थित आहेत, कीं प्रत्येक पदाची संगतवार हकीकत देणें शक्य नाहीं; व राज्यकारणांवर ज्यांचा परिणाम घडला नाही, त्या नेमणुकांच्या घालमेलींचें इतिहासांत महत्त्वही नाहीं. महजरांवरील साक्षी म्हणून या पदाधारी इसमांचीं नावें ठिकठिकाणीं दाखल आहेत.[४] सोयीप्रमाणें नेमणुका झालेल्या दिसतात.

प्रतिनिधि व सेनापति या दोन पदांच्या नेमणुका महत्त्वाच्या आहेत. डिसेंबर स. १७०७ त शाहूनें प्रतिनिधीस कैद करून सातारा काबीज केला, तेव्हां राज्याभिषेकसमयीं तें पद प्रल्हाद निराजीचा मुलगा गदाधरभट्ट यास देण्यांत

१ ता. १७ नोव्हेंबर स. १७१३. या शिवाय शके १६३५ माघ शु. ५ (का. सं. प. या. ४९३) व आषाढ शु. ५ (इ. वृ. १८३४ पृ. २१५) असे भिन्न उल्लेख आहेत, ते बरोबर दिसत नाहींत. २ पुणें व शिरूरचे दरम्यान हिंगणगांवचे उत्तरेस. ३ शा. रो. १०६. ४ पद्दा खं. २० पृ. ५३; वतनपत्रें व निवाडे पृ. ७५.

आलें. परंतु ' गदाधराचा भट्टी कारभार, यथास्थित बंदोबस्त न होय, ' म्हणून गदाधराचें पद काढून स. १७११ त तें त्याचा भाऊ नारो प्रल्हाद यास देण्यांत आलें. ता. ३०-११-१७१० रोजीं गदाधराचा शिक्का असून, १-६-१७११ रोजीं नारो प्रल्हादाचा आहे.[1] इकडे परशुरामपंतास शाहूची चलती दिसून येतांच उभयपक्षीं समजुतीचे प्रयत्न चालले. त्यांत पंतानें शाहूस कळविलें कीं, ' स्वामींनीं आज्ञा सांगोन पाठविली तदनुरूप श्रीवरील पुष्पें व रोटी ऐशी शपथ पाठविली आहे. आमचें चित्त निखालस स्वामींच्या पायांशीं आहे. हें जीवित केवळ स्वामींच्या अन्नाचें आहे. स्वामींनीं दया करून प्राण वांचविला, हा कृतोपकार आयुष्य असेल तों विसरणार नाहीं. याउपरी स्वामींनीं मनांत संदेह येऊं नेदून पत्रीं संदेहास्पद लिहीत न जावें. स्वामींनीं आपला पाठिंबा उभा केला ऐसें चित्तांत येऊं द्यावें. ' यावरून प्रतिनिधीच्या मनाची तळमळ व्यक्त होते. हें पत्र अमात्यांचे दप्तरांत मागाहून गेलें असून रायभानजी काका भोसले यांचे मार्फत स. १७०८ तच वरील उपक्रम झाला.

अशा रीतीनें ता. २०-८-१७०८ रोजीं शाहूनें परशुरामपंतास अमात्यपद दिलें.[2] पुढें कांहीं काळ प्रधानपद सुद्धां विकृति संवत्सरीं म्हणजे स. १७१० त परशुरामपंतास दिल्याचे दाखले आहेत.[3] परंतु पुढें ता. १६-१२-१७१० रोजीं त्यास पुनः प्रतिनिधिपद शाहूनें दिलें.[4] ता. २०-९-१७११ च्या पत्रावर त्याचा शिक्का प्रतिनिधि म्हणून आहे, त्यावरून नारो प्रल्हादाचें प्रतिनिधि पद काढून परशुरामपंतास दिलें, यांत संशय राहत नाहीं.[5] परंतु त्याच वेळीं चंद्रसेनाचें कारस्थान रंगास येऊन, परशुरामपंत सुद्धां कांहीं दिवस विशालगडास गेला होता.[6] या वेळीं ताराबाईनें आपला प्रतिनिधि कृष्णाजी परशुराम यास नेमिलें होतें तरी परशुरामपंताचें पद काढून घेतलें नव्हतें; शिक्के सर्वत्र पूर्वीचे त्याच्याच नांवचे चालू होते.[7] चंद्रसेनाचे कारस्थानांत परशुरामपंताचें अंग आहे असें वाटल्यावरून शाहूनें पंतास कैद करून, नारो प्रल्हाद यास प्रतिनिधि केलें असावें.[8] ' त्यावरी पंतांकडून स्वामिसेवेस अंतर पडलें. हे सवबे-

---

१ स. त्का. ९ ले. २२९ व ३०२. २ शा. रो. १५१. ३ इ. ऐ. देवरूख दे. ले, ३२८. ४ शा. रो. ११९. ५ खं. १५. ३६१. ६ प्रभानवल्ली दप्तर अप्रकाशित ७ खं. ३. २३९; व सत्का. ९.४१२, ४१४. ८ सत्का. ९. २३३

सरदेशमुखी वतन ता. २०-११-१७११ रोजी अनामत करण्यांत आलें. मशार-निल्हेस कैद करून सरंजाम व घर जिंदगीसुद्धां जप्त केलें.'[1] ममतेनें वागविल्यावरही जेव्हां पंत शाहूच्या विरुद्ध वागूं लागला, तेव्हां त्यास चांगली दहशत बसेल अशी सजा करण्याचें शाहूनें मनांत आणिलें. त्याचे डोळे काढावयाचे वगैरे जो प्रसंग बखरकारांनीं वर्णिला आहे तो या वेळचा असला पाहिजे. खंडो बल्लाळास वर्तमान समजतांच तो धावत महाराजांकडे गेला, व अशा अविचारी क्रूर कृत्यानें आपल्याच पक्षाची शक्ति कमी होईल, पराक्रमी सेवक माणूस असे मारूं नयेत, अघटित कामावर घालून मारावे, इत्यादि नाना प्रकारें महाराजांची समजूत खंडोबानें घातली. तेव्हां आपल्या स्वभावानुरूप शाहूनें परशुरामपंताची शिक्षा रद्द करून त्यास पुनरपि कैदेंत ठेविलें, आणि प्रतिनिधिपद नारोप्रल्हाद यास सांगितलें. ( सन १७१२ ? ). परशुरामपंताच्या धरसोडीचा हा परिणाम होय. या प्रसंगांतील चिटणिसाचा उपकार स्मरण्याकरितां प्रतिनिधीच्या घरीं श्राद्धाच्या दिवशीं चिटणिसांकडील एका खाशास जेवणास बोलावून, त्यास ब्राह्मणांबरोबर भोजनास बसविण्याची वहिवाट बरेच दिवस चालली होती, असें सांगतात. पुढें चंद्रसेनाचें कारस्थान मोडल्यावर बाळाजी विश्वनाथ व खंडो बल्लाळ यांच्या भिडेस्तव स. १७१३ च्या अखेरीस शाहूनें पुनः परशुरामपंतास प्रतिनिधिपद दिलें. खटावकरावरील स्वारींत शिकस्त करण्याबद्दल पंतानें आपल्या मुलास सांगितलें, तोही प्रकार या सुमारचाच असला पाहिजे. पदाच्या कायम सनदा मात्र ता.८-४-१७१४ रोजीं दिलेल्या आहेत.[2] सातारच्यास परशुराम पंताचा कायमपणा झाल्यावर मग कोल्हापुरास कृष्णाजी परशुरामही कायम प्रतिनिधि झाला. तोच हल्लींच्या विशाळगडकरांचा पूर्वज. परशुरामपंत ज्येष्ठ शु.८ शके १६४० ता.२६-५-१७१८ रोजीं वारला;[3] वद्य ८ घेतल्यास ता.१०-६-१७१८ येते. त्याचे पश्चात् श्रीनिवासराव. यास शाहूनें प्रतिनिधिपद दिलें. परशुरामपंतास कृष्णाजी, त्र्यंबकराव, श्रीपत उर्फ श्रीनिवास, सदाशिव आणि जगजीवन

---

१ शा. रो. १२०; पे. द. पृ. ३२५. २ खं. २ पृ. १९ व मेहेंदळेकृत चरित्र पृ.४९, ३ भा. व श. पृ. ३, व इ. ऐ. देवक. दे. ले. ३२८.

ऊर्फ दादोबा, असे पांच मुलगे असून त्यांपैकीं श्रीनिवासराव हा, चुलता माधवराव यास दत्तक दिला होता. परंतु शाहूनें तें दत्तविधान रद्द करून श्रीनिवासरावास आपल्याजवळ आणून प्रतिनिधि केलें, आणि त्याजवर अखेरपर्यंत अकृत्रिम लोभ ठेविला. गोदूबाई व येसूबाई अशा दोन मुली परशुरामपंतास होत्या. त्याच्या बायकोचें नांव बयाबाई. परशुरामपंताची योग्यता ठरविण्याइतकी माहिती उपलब्ध नाहीं. तो चतुर व अनुभवी होता. कांहीं दिवस त्यानें पेशवेगिरीचें व अमात्याचेंही काम केल्याचा उल्लेख सांपडतो.[१] त्याचे अंगीं अनेक गुण होते. ताराबाईची सेवा त्यानें एकनिष्ठपणें केली. शाहू आल्यावर त्याची तारांबळ झाली, आणि त्याचा पराक्रम गाजला नाहीं. मुख्य प्रधानकी त्यास देण्याचा शाहूनें विचार काढिला, तेव्हां त्यानें तें काम बाळाजी विश्वनाथास देवविलें. जमीन महसुलाच्या व हिशेबी कामांत परशुराम त्रिंबक फार चांगला वाकब होता. त्यानें जमिनींची पाहणी करून वसुलाचे धारे बांधिले. त्याचा संस्कृत व मराठीं कवनें छापिलेलीं आहेत. त्याचें वृंदावन माहुलीस आहे.

याप्रमाणें अष्टप्रधान, दरकदार, सरकारकून वगैरे नेमिले. नवीन व पूर्वीचे उपयोगी ऐसे पाहून घालमेल करून, यथापद्धति बहुमान देऊन, सर्वांनीं राज्याचे बंदोबस्तांत निःसीम सेवा करावी ऐशी आज्ञा केली. देवब्राह्मण ह्यांचे इनाम, अग्रहार, पूजा, नैवेद्य, नंदादीप व उत्साह वगैरे यथायोग्य चालावे, अतिथि विन्मुख जाऊं नये असें ठरविलें. सारांश, पेशव्याबरोबरच राज्यांतील इतर सर्व नेमणुका नवीन करण्यांत आल्या.

सेनापतीच्या बाबतींत मात्र शाहूला सुदैव लाभलें नाहीं, हें पेशव्यांस पुढें येण्यास एक कारण झालें. जुन्या मंडळींनाच सांभाळून घेण्याच्या उद्योगांत, खंडेराव दाभाडे, मानसिंग मोरे वगैरे मंडळी त्यानें अजमावून पाहिली. खंडेराव दाभाडे जुना सेवक सुस्वभावी होता, परंतु बदललेल्या परिस्थितींतील राज्याचें धोरणें ध्यानांत घेऊन सेनेची हुकमत गाजविण्याची ताकद त्यास नव्हती. पेशव्याचे तंत्रानें वागून त्यानें कांहीं वर्षें निभाव केला. पण शाहूची त्याजवर इतराजी झाली.

[१] खं. १५. १७३, खं. २०. १६५; सत्का. ९.१५५.

त्याचा मुलगा त्रिंबकराव जास्त कर्तृत्ववान् असल्यामुळें त्याचाव बाजीरावाचा खटका उडाला. बाजीरावच युद्धकलेंत निपुण असल्यामुळें, दुसऱ्यांचें तेज त्याच्यापुढें लोपून गेलें;आणि जी नवीन शिंदेहोळकरांसारखी मंडळी राज्यांत तयार झाली, ती पेशव्यांचे हाताखालीं उदयास आली. स्वतंत्र नवीन इसम शाहूनें तयार केले असते तर मराठी कारभारांत निराळा जोम आला असता.

**७ कान्होजी आंगऱ्याशीं तह** ( ता. ८–२–१७१४ ).—ताराबाइचे पक्षांतील प्रबल साथीदारांत कान्होजी आंगरे असून, चंद्रसेनाचा व शाहूचा बेबनाव झाल्यावर ताराबाइचे तर्फेनें कान्होजी शाहूस फारच त्रास देऊं लागला. कान्होजीच्या आजाचें नांव सेखोजी व बापाचें तुकोजी. स्वराज्यांतील आंगऱ्यांची कामगिरी, पश्चिम किनाऱ्यावरील त्यांचे पराक्रम व पाश्चात्य नाविकांशीं त्यांनीं केलेला अपूर्व झगडा, यांचें वर्णन पूर्वी आलेंच आहे. संभाजीच्या कारकीर्दीत मराठ्यांच्या राज्याचा बराच भाग कोंकणांत घडल्यामुळें लढाईचें बहुतेक ओझें आंगऱ्यांवर होतें. संभाजीच्या वधानें जो आघात मराठशाहीवर कोसळला, त्यामुळें आंगऱ्यांची तारीफ भळेहाट झाली. त्यांच्या ताब्यांतील बहुतेक प्रदेश व किल्ले मोगलांनीं जिंकले. शेवटीं तह होऊन मराठे सरदार व मोगल यांनीं तिकडचा वगैरे निमेनीम वांटून घेतला. तेव्हां माणकोजी सूर्यवंशी, सुभानजी खराटे व अड्राजी पडवळ अबकारडास गेले आणि भिवजी गुजर व कान्होजी आंगरे हे कुलाबा व खांदेरी येथेंच राहिले. त्यांत गुजर हा मुख्य असून कान्होजी त्याच्या हाताखालीं होता. तथापि सीदी व आंगरे यांचा तंटा चालूच होता. पुढें राजाराम जिंजीकडे जाऊन मोगलांस शह देत असतां, कान्होजीनेंही समुद्रकिनाऱ्यावर आपली सत्ता वाढवून मोगलांस हांकून देण्याचा क्रम चालविला. कोंकणचा सुभा व आरमाराचा अधिकार संभाजीनें भिवजी ऊर्फ सिधोजी गुजर याजकडे दिला होता. त्याच्या हाताखालीं कान्होजी आंगरे होता. ' शहाणे, शूर, मर्द जाणोन राजारामानें आंगरे यास सुवर्णदुर्गी ठेविलें. त्यांनीं तेथें राहून बहुत खबरदारीनें सर्व जंजिरे व प्रांत राखिला; कांहा किल्ले व ठाणीं पातशाहींत गेलीं तीं जवामर्दीनें घेतलीं. झाडींतून हिंडणें, स्वाऱ्या करणें, खराब केलेले माडलेल जागे नीट करून स्वारी शिकारा करणें, असे बहुत केलें, त्याजवरून महाराज

( राजाराम ) नंदीहून आल्यावर, त्यांनीं सर्फराजी करून कान्होजीस 'सरखेल' हा किताब दिला.' सारांश, मराठशाहीवरील भयंकर आघातांत कान्होजी आंगऱ्यानें पश्चिम किनाऱ्यावरील मराठ्यांच्या सत्तेचें उत्तम प्रकारें रक्षण केलें.' सर्व राष्ट्रांच्या गलबतांवर तो हल्ले करी. त्रावणकोरपासून मुंबईपावेतों एकंदर किनाऱ्यावर कान्होजीची छाप बसली नाहीं असें एकही ठिकाण नव्हतें. किनाऱ्यावरचे किल्ले त्यानें मराठ्यांच्या ताब्यांत ठेविले. सुवर्णदुर्ग व विजयदुर्ग येथें आरमारसंबंधीं साहित्याचीं कोठारें असून कुलाबा हें आरमाराचें मुख्य ठाणें होतें.

'आंगरे घराण्याचा संपादक कान्होजी हा अंगानें स्थूल, वर्णानें काळा व बांध्यानें मजबूद होता. त्याचा चेहेरा उग्र व डोळे पाणीदार होते. त्याचे हुकूम कडक असून ते मोडणारास जबरदस्त शिक्षा होत असे. परंतु हाताखालच्या लोकांशीं तो उदारबुद्धीनें, ममतेनें व बरोबरीच्या नात्यानें वागे.'[२]

स. १६९० च्या सुमारास तुकोजी मरण पावल्यावर त्याचा मुलगा कान्होजी काम पाहूं लागला. सन १६९७-९८ च्या सुमारास भिवजी गुजर व कान्होजी आंगरे यांचा आपसांत कांहीं तंटा लागला; व आंगऱ्यानें गुजर यास अटकेंत ठेविलें. पुढें गुजर लवकरच वारला व आंगरे हा मराठ्यांच्या आरमाराचा अधिपति झाला. तेव्हांपासून त्याचा प्रतिकार करण्याकरितां इंग्रज, फिरंगी व मुसलमान हे त्रिवर्ग एकत्र जमून आंगऱ्याशीं युद्ध करूं लागले. त्यांत इंग्रजांनीं हा झगडा पुष्कळ दिवस चालू ठेविला. मुसलमानांनीं मात्र थोड्याच दिवसांत आंगऱ्याशीं तह करून युद्धांतून आपलें अंग काढून [illegible]. शाहू आल्यावर आंगऱ्यानें ताराबाईचे तर्फेनें पेशव्याचा कल्याण प्रांत [illegible] करून, राजमाची, लोहगड वगैरे घांटमाथ्यावरचे किल्ले त्यानें [illegible] त्याच्या बंदोबस्ताकरितां शाहूनें पेशवे बहिरोपंत पिंगळे यास स[illegible] फौज देऊन पाठविलें, बहिरोपंताबरोबर खंडो बल्लाळचा भाऊ मिळो[illegible] आंगऱ्यानें त्यांचा पराभव करून [illegible] लोहगडावर [illegible] वर्तमान ऐकून शाहूला मोठी काळजी पडली. पुढील वर्षी व[illegible] मोहिमेहून

१ पहा Port Trust Souvenir, [illegible] Bombay.
२ Dou[illegible] Bombay.

परत आल्याबरोबर त्यास, शाहूनें पेशवाईपद व बरीच मोठी फौज देऊन आंगऱ्यावर पाठविलें. त्या वेळीं कान्होजी लोहगडावर असावा. लोहगडाखालीं लोनावळ्याजवळचें वेलवण (हं. ओलवण) येथें कान्होजी आंगरे लोहगडावरून येऊन प्रथम बाळाजीस भेटला, आणि पुढें कुलाब्यास गेल्यावर तेथें तह होऊन लोहगड पेशव्यास मिळाला.

' बहिरोपंतास धरून नेलें. राज्याचा बंदोबस्त झाला पाहिजे. पिंगळे नाकर्ते. ते समयीं परशुरामपंतास, पेशवाई तुम्ही करून राज्याचा बंदोबस्त करणें, आंगरे यांणी घेतले त्याचें पारिपत्य करून, किल्ले घेणें, म्हणून आज्ञा केली. त्यास परशुरामपंत यांणी विचार केला कीं बाळाजी विश्वनाथ यांजकडे फौजेचें बळण आहे; त्यांस पेशवाईची वस्त्रें द्यावीं; ते बंदोबस्त करतील. तेव्हां खंडो बल्लाळ यांसही महाराजांनी विचार पुसून बाळाजीपंत नानास आज्ञा केली. त्यांही मान्य केलें. ते समयीं वस्त्रें व शिक्केकटार प्रधानपदाची देऊन रवाना केलें. त्यांनीं तीन चार हजार फौज जमा करून दरमजल लोहगडाखालीं आले. नानाचा व आंगरे यांचा कागदोपत्रीं घरोबा होता. आंगरे यांस पत्र लिहून पाठविलें, व दरमजल कुलाब्यास गेले. सरखेल पुढें सामोरे येऊन भेटीचा समारंभ झाला. उपरांत खलबतास बसोन त्यांस सांगितलें, कीं ' तुमचा आमचा भाऊपणा. पेशवाई तुमच्या घरांत. आयते किल्ले देत असाल तरी तसेंच सांगावें. ' शिक्के कटार व वस्त्रें त्यांस दाखविलीं व त्यांस विचार सांगितला, कीं सरखेलीचें पद ताराबाई करून आहेच; इकडूनही करून देववितों. महाराजांचे चाकर होऊन कुरा संपादून घ्यावी. त्याजवरून त्यांनीं मान्य करून राजमाची मात्र ठेवून, लोहगड व घनगड व तुंगतिकोना या किल्ल्यांच्या चिठ्या देऊन किल्ले देवविले. जंजिरेकर हबशांचा व आंगरे यांचा कलह लागला होता तो तह करून दिला. बहिरोपंतास सोडवून समागमें घेऊन आले. महाराजांचे लोक किल्ल्यावर चढविले. साताऱ्यास जाऊन महाराजांचें दर्शन घेतलें. कान्होजी आंगरे यास सरखेलीचें पद करून वस्त्रें व शिक्के कटार पाठविली.'[1] आंगऱ्यानें तह लिहून दिला त्याचा सारांशः—शाहू राजाच्या पायांशीं पूर्वी अंतर न जालें, यापुढेंही करणार नाहीं.

[1] म. रा. पे. ४ पृ. ३५.

पेशव्यांनीं थोरातांशीं अवाक्रिया करूं नये. भाकर दिली आहे, ते त्यांनीं खावी. सनदी पत्रांखेरीज कोठें त्यांनीं उपसर्ग न करावा. वरघाटचे किल्ले आंगऱ्यानें घेतले असतील ते स्वाधीन करावे. तळघाटचे किल्ले पेशव्यांनीं घेतले असतील ते आंगऱ्यांस द्यावे. प्रतिवर्षी दसऱ्यापासून मार्गशीर्षपर्यंत कोंकणची मसलत पेशव्यांनीं करावी, हबशी फिरंगी मारून गर्देस मिळवावे. एकमेकांचे चाकर इसम असतील ते एकमेकांनी ठेवावे, परंतु पुढें न ठेवावे. रायगड आंगऱ्यांनीं घेतला तर छत्रपतींकडे द्यावा. लोहगड, तुंग, तिकोना, कोरगड, घनगड सामानसहित पेशव्यांकडे द्यावे. राजमाची वगैरे कित्येक आंगऱ्याकडे द्यावे. याशिवाय महालांच्या वांटणीची यादी आहे. ता. २८–२–१७१४.[1]

बाळाजी विश्वनाथानें कान्होजी आंगऱ्याशी हा जो तह केला, त्यावरून पुढें कान्होजीचा व शाहूचा चांगलाच प्रेमभाव जडला. त्या उभयतांची भेट प्रथम एकदां जानेवारी १७१५त झाल्याचा उल्लेख आहे. पुनः त्यांची भेट इ. स. १७१८त जेजुरीस मोठ्या समारंभानें झाली. 'महाराजांनीं आंगऱ्याचा सन्मान केला. बादली चादर घातली. आंगऱ्यांनीं नजर केली. बंदरी जिन्नस उत्तम पदार्थ बहुत आणिले, ते सर्व व खजिना महाराजांस नजर केला. जेजुरीस शिमगी पौर्णिमा झाली. प्रतिपदेस कूच होऊन [illegible]ाले, तेव्हां आंगरे यांनीं पांच रंगांचा गुलाल व रंगांत सामान बहुत आणि[illegible] दरकूच हत्तींवर रंग व गुलाल भरून पांच चार कोस मजल करावी. तेथ[illegible] नगाऱ्याव्यावर ( गाड्यावर घातलेला ताफा ) नाच व रंग व गुलाल खेळ[illegible] मुक्कामापर्यंत चालावें. ऐसें करीत पंचमीस सातारा येऊन पावले. जेजुरी[illegible] सातान्यापर्यंत रस्ता गुलालांनीं भरला. बहुत सफाईची [illegible] होऊन महाराजांस डेऱ्यास नेऊन पंचमीस समारंभ करून वस्त्रें जवाहीर [illegible] घोडे ऐसें देऊन, अष्टप्रधान, सरदार दरखदार सुद्धां वस्त्रें देऊन मेजवानी [illegible] व महाराजांनीं बहुमान दिला तो घेऊन आंगरे [illegible] महिन्यांत आणखी एक भेट झाल्याचा उल्लेख सं[illegible]

1 तह व करारमदार [illegible] ा. च. [illegible] रो. १२४ व १२.

बाळाजी विश्वनाथाचा तह आंगऱ्यास प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष फायदेशीर झाला. प्रत्यक्ष त्यास स्वतंत्र मुलूख तोडून मिळाला, त्याशिवाय बाहेरच्या भानगडींतून त्याची मुक्तता होऊन स्वस्थता प्राप्त झाल्यामुळें कोंकणांत आपली सत्ता मजबूत करण्यास त्यास सवड मिळाली. कान्होजी शूर व हुशार होता. पुढील पंधरा वर्षांत त्यानें आपली शक्ति पुष्कळच वाढविली. सन १७१५ त ' वसईपासून सावंतवाडीपर्यंत पूर्ण स्वतंत्र किंवा अंशतःपरतंत्र असे अधिकारी येणेंप्रमाणें होते. ( १ ) वसई, ठाणें व चेऊल या ठिकाणीं पोर्तुगीझ लोक; ( २ ) मुंबईस इंग्रज; (३) जंजिऱ्यास हबशी; ( ४ ) अलीबागेस आंगरे; ( ५ ) सावंतवाडीस सावंत; ( ६ ) मालवण पासून पन्हाळ्यापर्यंतच्या प्रदेशांत कोल्हापूरकर; व ( ७ ) गोव्यास पोर्तुगीझ. आंगऱ्याच्या व्यतिरिक्त स्वतंत्र असे पांच सत्ताधारी ह्या वेळीं कोंकणांतील निरनिराळ्या भागांत असल्यामुळें शाहूच्या वतीनें आंगऱ्यास वेळोवेळी ह्या पांच लोकांशीं युद्धप्रसंग पडत.[1] ' ह्या युद्धप्रसंगांत आंगऱ्याला आपलें लक्ष स्वसत्ता बळकट करण्याकडे लावतां आलें, हा बाळाजी विश्वनाथाच्या तहाचा परिणाम होय. आरबी समुद्राच्या सबंध किनाऱ्यावर आपला ताबा असावा अशी आंगऱ्यांची इच्छा असल्यामुळें, लवकरच त्यांचा झगडा इंग्रजांशीं सुरू झाला. कारण इंग्रजही दर्यावर्दी कामांत ह्या वेळेस पुढें सरसावूं लागल्यामुळें आंगऱ्यांचे प्रतिस्पर्धी बनले. कान्होजीची मोठी कामगिरी म्हणजे त्यानें इंग्रजांशीं चालविलेला हा अपूर्व झगडा होय. इंग्रजांच्या हकीकतींत आंगऱ्यांस त्यांनी चांचे म्हणून संबोधून, त्यांनीं त्यांजवर दांत ओठ खाऊन पाखडलेली आग वाचली म्हणजे आंगऱ्यांच्या कामगिरीची कल्पना होते.[2]

याचा एक मासला येथें देतों. ' दर्यावर लूट करणाऱ्या या सरदाराची हांव विजयदुर्ग हस्तगत करूनच थांबली नाही. पोर्तुगीज व इतर व्यापाऱ्यांस घालवून देऊन पश्चिम किनाऱ्यावर बंदरें व किल्ले बांधून तो एक स्वतंत्र राजाच बनला. एकदां सुंदर आरबी घोड्यांनी भरलेलें जहाज सहज गळ्या त्याच्या हस्त-

१ राजवाडे खं. २. २ पहा. Victor Surridge's India, chapters 4 & 5, Angria the Pirate, and How the British fought the Pirates.

गत झालें, तेणेंकरून नवीन घोडेस्वारांची फौज त्यानें तयार केली. हिंदु, मुसलमान, डच, पोर्तुगीझ, फ्रेंच इत्यादि अठरापगड लोक रक्तानें डागळलेल्या या चोराच्या निशाणाला मान देत. अर्थात्, असे लोक ह्मणजे निष्ठुर व बेपर्वा असावयाचे; त्यांस बऱ्यावाइटाची चाड थोडीच असणार !' एकंदरीत मराठी राज्याच्या तर्फेनें आंग्रे हा पश्चिम किनाऱ्याची रखवाली करीत असतां, त्याजकडून पाश्चात्यांच्या संचाराला मनमुराद अडथळा होई, ह्मणून हे लोक त्याच्या नांवानें असे खडे फोडीत. विजयदुर्गचा घेरिया किल्ला आपण केव्हां हस्तगत करूं असें इंग्रजांस होऊन गेलें होतें.

तारीख २६ डिसेंबर स. १७१५ रोजीं इंग्रजांचा गव्हर्नर बून हा मुंबई बंदरांत येऊन दाखल झाला. 'पश्चिम किनाऱ्यावर आमच्या अनिरुद्ध संचारास अडथळा करील त्याची मी खोडकीच जिरवणार,' असा या नवीन गव्हर्नरानें आपला निश्चय लगेच प्रगट केला. दोन वर्षांचे आंत नऊ उत्कृष्ट लढाऊ जहाजें त्यानें मुंबईच्या बंदरांत नवीन तयार केलीं. त्यांचीं नांवेंच वाचलीं असतां, पाश्चात्यांच्या कठोर स्वभावाची साक्ष पटते. Britannia ब्रिटानिया, Victory विजय, Defiance मेज्जाव, Revenge सूड, Fame कीर्ति, Hunter चाबूक, Hawk ससाणा, Eagle गरुड, Princess Amelia राजकन्या आमिलिया, अशीं नांवें होतीं. या सर्वांवर मिळून १४८ तोफा व साडेबाराशें लढाऊ खलाशी होते. याशिवाय जमिनीवरून लढण्यासाठीं अडीच हजार युरोपियन व दीड हजार एतद्देशीय एवढी फौज मुद्दाम विजयदुर्ग वगैरे आंग्र्यांचे किल्ले पाडाव करण्यासाठीं तयार करण्यांत आली.

ता. १७ एप्रिल स. १७१७ रोजीं हें जंगी आरमार विजयदुर्ग किल्ल्यावर आलें. तेथें किल्ला हस्तगत करण्याचा त्यानें कसून प्रयत्न केला. परंतु कान्होजी आंग्र्याचे मारापुढें नामोहरम होऊन मुठींत नाक घेऊन आरमारास मुंबईस परत जावें लागलें. इंग्रजांचे दोनशें लोक मेले व तीनशें जखमी झाले. पण अशा अपजयानें गव्हर्नर बून खचून जाणारा नव्हता. आणखी तीन नवीन जहाजें बांधून पुन: दीड वर्षानें त्यानें आरमार प्रथम खांदेरीवर पाठविलें. पण तेथेंही चांगला मार खाऊन आरमार परत मुंबईस आलें. वरील दोन प्रसंगांनी

आंगऱ्याचा जोर ज्यास्तच वाढला हें सांगणें नको. या दोन पराभवांची बातमी इंग्लंडास जाऊन तेथील अधिकाऱ्यांस ज्यास्तच चेव आला. त्यांनीं राजाची मनधरणी करून मुंबईस ज्यास्त मदत पाठविली. अॅडमिरल मॅथ्यूसच्या हाता-खालीं हें आरमार सेप्टेंबर १७२१ त मुंबईस आलें. पोर्तुगीझ लोकांचीही या प्रसंगीं त्यांनीं मदत मिळविली. जय्यत तयारी करून त्यांनीं या वेळीं अली-बागच्या कुलाबा किल्ल्यावर निकरानें हल्ला केला.परंतु पूर्वीप्रमाणेंच त्यांस ह्या प्रसं-गींही हार खावी लागली. कान्होजी आंगरे जिवंत असेपर्यंत या पाश्चात्यांचा शिरकाव पश्चिम किनाऱ्यावर शीलां नाहीं. त्याच्या पदरीं ' मानाजी मोहिते, राणोजी गोळे, खंडोजी नाळकर, रुमाजीराव खराडे, कृष्णाजी माड, हसनखान जमादार इत्यादि मातबर सरदारांनीं युद्धप्रसंग आणि श्रमसाहस करून कोंकणांत धर्म राखिला, याबद्दल शाहू व पेशवा नानासाहेब यांनी त्यांस पालखी व इनाम गांव देऊन श्रमहार केला'. कान्होजीनंतर संभाजी आंगऱ्यानेंही कांहीं वर्षे चांगला टिकाव धरिला.

आंगऱ्याच्या वरील तहानें दुसरीं अनेक प्रकरणें उपस्थित झालीं. पश्चिम किनाऱ्यावर जे जे कोणी आंगऱ्यांस उपद्रव देत होते त्यांचा बंदोबस्त करून आंगऱ्यांस पूर्ण पाठबळ देणें हें पेशव्यानें मराठशाहीचें कर्तव्य म्हणून या वेळीं अंगीकारिलें. किंबहुना याच अटीवर आंगरे आपला पृथक्पणा सोडून मराठी राज्याचा घटकावयव बनला. मराठे सरदारांचा फुटीचा स्वभाव वेळोवेळीं व्यक्त होत होता. नुकताच चंद्रसेन जाधव फुटून मोगलांस मिळाला होता, पुढें कांहीं वर्षांनीं त्रिंबकराव दाभाडे सेनापति यानेंही तोच पंथ पाहिला. आंगऱ्यानें तसा पंथ स्वीकारूं नये, मराठे सरदारांस स्वसंचारास पाहिजे तेवढें क्षेत्र तोडून देऊन, सर्वांनीं राज्याच्या एकंदर हितास जागत जावें, हें कारभाराचें तत्त्व, ही मराठमंडळाची संघटना, जीस पुढें ' मराठा कॉन्फेडरसी ' असें नांव मिळालें, तिचा आरंभ शाहू व बाळाजी विश्वनाथ यांनीं या वेळीं केला.बाळाजीस पेशवाई देतांना हेंच पेशव्याचें मुख्य कर्तव्य ठरविण्यांत आलें. या कर्तव्याच्या बजाव-णींत मराठशाहीची जशी वृद्धि झाली, तशीच नवीन जबाबदारीही उपस्थित

१ भा. इ. १८३५ ले. ३६.

झाली. आंगऱ्याचा समावेश मराठमंडळांत झाल्याबरोबर त्याचे शत्रु ते मराठ्यांचे शत्रु बनले. त्यांत इंग्रजांशीं आंगऱ्याचा झगडा झाला त्याचें वर्णन वर दिलेंच आहे. दुसरें 'दोन शत्रु हबशी व फिरंगी. हे दोघे मारून गर्देस मिळवावे' असें तहांत कलम होतें. त्यास अनुसरून पुढें या दोघांशीं शाहूचे उर्फ मराठमंडळाचे युद्धप्रसंग उद्भवले. हबशाशीं मोठा झगडा स. १७३३त व पुढें, आणि फिरंगी म्हणजे पोर्तुगीझांशीं स. १७३७–३९ पावेतों झाला. इंग्रजांनीं मात्र खुबीनें वागून हबशी अगर फिरंगी यांजप्रमाणें प्रत्यक्ष पेशव्यास दुखविण्याचें धाडस फार दिवस केलें नाहीं. आंगरे आपणास निष्कारण जाच करितो, त्याचा स्वहितासाठीं आपण बंदोबस्त करितों, बाकी पेशव्यांशीं अगर शाहूशीं आपला विरोध नाहीं, ही गोष्ट पत्रव्यवहारानें किंवा वकिलांचे मार्फत इंग्रज अधिकारी मुद्दाम पेशव्यांस वारंवार कळविण्याची खबरदारी घेत असत. त्यांच्या या थापांचे जाळ्यांत नानासाहेब पेशवा चांगलाच सांपडला आणि त्यानें इंग्रजांचे मदतीनें आंगऱ्याचा नाश केला. रघुनाथरावाचा पक्ष सन १७७४त इंग्रजांनीं उघड स्वीकारिला, तों पावेतों ते मुख्य मराठमंडळाच्या वाटेस मुद्दाम असे गेले नाहींत. क्लाइव्हनें आपल्या कुचाळ[illegible] अनुसरून एकदां स. १७५५त विजयदुर्ग प्रकरणाचे वेळेस व पु[illegible] जानेवारींत, कोल्हापुरकरांचा मालवण किल्ला काबीज करून [illegible] चिमटे घेऊन आपली शक्ति अजमावून पाहिली. परंतु त्यांत मरा[illegible] ठ्यांचीं आपली ताकद नाहीं असें वाटून च इंग्रजांनीं आपला हात [illegible] परंतु मनांतली खुमखुम सदैव कायम होती. स. १७७४त रघुनाथरावाचा [illegible] घेऊन त्यांनीं मराठ्यांशीं उघड वैरभाव धारण केला, परंतु त्यांतही म्हणण्यासारखें त्यांना यश आलें नाहीं. इतरांच्या मानानें इंग्रज मोठे धोरणी [illegible] टाकून अदमास पाहवयाचा आणि प्रसंगानुरूप वागून आपला [illegible] असा त्यांचा प्रघात दिसून येतो. आंगऱ्यांवर मात्र त्यांनीं [illegible] डोळा कायमचाच ठेविला होता. इंग्रजांशीं लढण्यांत आंगऱ्यांस [illegible] साह्य केलें नाहीं, म्हणूनच आंगऱ्यांचें व पेशव्यांचें पुढें एवढें [illegible] स. १७१४ च्या तहास अनुसरून इंग्रजांपासून आंगऱ्याचा ब[illegible] त्यांचें कर्तव्य होतें. तें न बजावतां उलट आंग-

त्याची मजा पाहात पेशवे अलिप्त राहिले. सारांश, आंगऱ्याचा वरील तह मराठी राजकारणाच्या दृष्टीनें अत्यंत महत्वाचा असून अभ्यासकांनीं तो समग्र वाचला पाहिजे.

इंग्रजांप्रमाणेंच मराठे व सीदी यांचा तंटा सार्वकालीन आहे. औरंगजेबाच्या स्वारींत सीदीनें कोंकणाच्या बाजूनें पुष्कळच हात मारिला. औरंगजेब मृत्यु पावतांच त्यानें पूर्वी जे किल्ले काबीज केले होते, त्यांजवरील किल्लेदार भराभर किल्ले सोडून निघून जाऊं लागले, ते किल्ले सीदी हस्तगत करूं पाहत होता. विशाळगडचा किल्ला औरंगजेबानें काबीज करून तेथें उदितसिंग नांवाचा किल्लेदार नेमिला. औरंगजेब मृत्यु पावतांच उदितसिंग किल्ला सीदीचे स्वाधीन करून निघून जाणार हें पाहून कृष्णाजी भास्करानें उदितसिंगाशीं राजकारण करून किल्ला प्रतिनिधीचे हवालीं केला. (ता. १२-४-१७०७); आणि अशा रीतीनें किल्ला ताराबाईचे कबजांत आला.[१] स. १७०८-९-१० साली हबशानें मराठ्यांचे मुलखावर स्वाऱ्या केल्याचे उल्लेख आहेत.[२] मुठेखोऱ्यावर हबशानें स्वारी केल्यामुळें रयत उठून गेली होती.[३] स. १७१४ त आंगऱ्याचें व हबशाचें युद्ध चाललें असतां करारप्रमाणें बाळाजी हा आंगऱ्याचे मदतीस गेला; आणि कारस्थानानें हबशाशीं तह करून युद्ध मिटविलें. ( ३० जानेवारी १७१५ ).[४] ह्या तहांत गोरेगांव, गोबेळ, निजामपुर, नागोठणें, अष्टमी, पाली, आश्रे व अंतोणें हे महाल सीदीच्या ताब्यांत होते, त्यांचा निंमा वसूल शाहूच्या कमावीसदारांनीं घ्यावा असें ठरलें. हें प्रकरण एवढ्यानें तात्पुरतें मिटलें तरी पुनः पुढें मोठी स्वारी हबशावर करावी लागली, त्याची हकीकत बाजीरावाचे वेळेस येईल.

**८. दमाजी थोराताचें पारिपत्य** ( स. १७१६-१८ ).—शाहू येण्यापूर्वी मोगल व मराठे या दोन पक्षांचाच झगडा महाराष्ट्रांत चालू होता. शाहूच्या आगमनापासून मराठ्यांचे दोन पक्ष झाले, तेव्हां त्या तिघांच्या दरम्यान अनेक बंडखोरांचें कांहीं वर्षें चांगलें फावलें. मोगलांचा व शाहूचा तह होईपर्यंत लोकांस पाहिजे तशी पुंडाई करितां येत असे. मोगलांचें नांव घ्यावें,

---

१. इ. ऐ. सरदे. घ. ले. १२-१६. २ खं. १६-४०. ३ ऐ. टि. २-२४. ४ खं. २ पृ. २४.

ताराबाईचें किंवा संभाजीचें घ्यावें, आणि शाहूच्या मुलखावर ताव मारून, स्वतःचा लाग साधावा, यापलीकडे या पुंडांस कर्तव्य नव्हतें. अशा मंडळी-पैकीं उदाजी चव्हाण व दमाजी थोरात हे दोन इसम शाहूस विशेष त्रास देत होते. दमाजी यास रुस्तुमखान किताब होता, तो बहुधा त्यास औरंगजेबाकडून मिळाला असावा. पुढें रामचंद्रपंतानें त्यास सुपें व पाटस हे दोन परगणे जहा-गीर देऊन पुण्याच्या पूर्वेकडील बंदोबस्तासाठीं नेमिलें. त्या वेळीं जिंजीचा वेढा चालू होता. पाटस तर्फेंत हिंगणगांव येथें गढी बांधून दमाजी थोरातानें केक वर्षें ताराबाईचे तर्फेनें मर्दुमकी गाजविली. पुढें शाहू आल्यावर त्याजबरोबर हा थोरात प्रसंग पाहून शिवाजीच्या व संभाजीच्या तर्फेनें झगडूं लागला. चंद्रसेनाचा फितवा होऊन शाहूचा पाडाव होतो असा देखावा दिसतांच, शाहूच्या विरोधकांस जोर चढला. बाळाजी विश्वनाथास पेशवाई मिळाल्यावर पुणें प्रां-ताच्या अगदीं मध्यभागीं या थोरातांचा पुंडावा दुःसह झालेला पाहून शाहूनें त्याजवर स्वारी पाठविली. 'बाळाजी विश्वनाथ कुटुंबसह हिंगणगांवास आले. फौज पाहून थोरातानें तहाचें बोलणें लावून बेलभंडाराचें इमान देऊन विश्वा-सानें गढींत आणून कैद केलें. इमानाची ओळख देतां थोरातानें उत्तर केलें, बेल म्हणजे झाडपाला, व भंडार आम्ही नित्य पदार्थांत खातों. खंडणी भरल्या-शिवाय सुटत नाहीं असा निग्रह पाहून स्त्री राधाबाई व पुत्र बाजीराव व चि-माजी ओलीस ठेवून, पुरंदरे, पिलाजी जाधव व आपण परत येऊन महाराजांस मजकूर कळविला. महाराजांनीं करारप्रमाणें दंड भरून मंडळी सोडवून आणिली'[1].

( ५·८·१७१६ ). बाळाजीनें आंगऱ्याशीं ता. ८·२·१७१४ रोजीं तह[2] ठर-विला, त्याचें पहिलेंच कलम 'थोरातांशीं अवक्रिया करूं नये,' असें आहे. हा थोरात दमाजीच असावा, आणि त्याची व आंगऱ्याची कारस्थानें बोलणीकडे संगनमतानें चाललीं असावीं. शाहूनें बाळाजीस थोरातांचे कबजांतून सोडवून आणिल्यांबरोबर, त्यास पेशवाई देऊन लगेच आंगऱ्यावर पाठविलें असें. पर-स्पर थोरातावरील पहिला उपक्रम स. १७१०तच झाला असें होईल.

---

१ खं. २ पृ. १२; का. सं. श. व भा. व. रा. पु. २. २ तह व करार-मदार पृ. १९७.

थोरातांचें पारिपत्य न झाल्यामुळें तो पुढें जास्तच उपद्रव देऊं लागला. तेव्हां त्याजवर स्वारी करण्याचें काम शाहूनें सचिवास सांगितलें. सचिव नारोशंकर लहान बारा वर्षांचा असून त्याची आई येसूबाई दक्षतेनें कारभार करीत असे. सचिवाचे ताब्यांतील सिंहगड, पुरंदर या किल्ल्यांचे नजीकच हिंगणगांवास दमाजीचें ठाणें असल्यानें त्याचा बंदोबस्त करणें सचिवाचें काम होतें. मुलगा लहान व आपण बायको माणूस म्हणून, घराण्याच्या कर्तबगारीस उणेपणा न यावा या हेतूनें, येसूबाईनें आपला कारभारी रांझेकर याच्या मदतीनें थोरातास नरम करण्याचें काम अंगावर घेतलें. सचिवाची फौज हिंगणगांवावर येणार असें पाहून दामाजीनें स्वारी पाठवून रोहिडा उर्फ विचित्रगडाखालीं नारोशंकर राहत होता त्यास दगा करून धरून नेलें ( २९-३-१७१७ शा. रो. १४४ ). सचिवाचे प्रदेशाची वहिवाट करण्यास शाहूनें दत्ताजी शिवदेव याची नेमणूक केली, आणि नारोशंकरास सोडविण्याच्या विचारास शाहू लागला. शंकराजी नारायण मेल्यापासून या घराण्यास शाहूनें आत्मिक समजून त्यांचें चालविलें आणि आतां अल्पवयी मुलास पकडून नेल्यानें त्याच्या मातुःश्रीचें दुःख पाहून शाहूस दुहेरी पेंच पडला, कीं एकदम मोठी फौज थोरातावर पाठवावी तर, तो सचिवाचे जिवास दगा करील; न पाठवावी तर तोच प्रबळ होऊन बसतो. तेव्हां पुनः कांहीं काळ बोलाचालींत काढून पिलाजी जाधवाचे मार्फत भला मोठा दंड भरून शाहूनें प्रथम सचिवास सोडवून आणलें. तरी एक वर्षाहून जास्त सचिव थोरातांचे कैदेंत होता. त्यास सोडवून आणिल्यावर मग शाहूस थोरातावर मोठी स्वारी करितां आली. स्वतः फौज घेऊन शाहू जेजुरीपावेतों चालून गेला. तरी सामोपचारानें थोरातास वळवून आपल्या कामास घ्यावा अशी अखेर पावेतों शाहूची इच्छा असल्यामुळें, थोरातास अभय वचन देऊन भेटीस बोलाविलें. त्या प्रसंगींही त्यानें उद्दामपणाच दाखविला. विश्वासभंग करूं नये एवढ्याच कारणानें शाहूनें त्यास परत जाऊं दिलें, नाहीं तर तेथेंच त्यास पकडतां आलें असतें. पुढें स. १७१८ च्या फेब्रुवारींत शाहूचा सय्यदांशीं तह झाला, तेथेंकडून तोफखाना वगैरे लष्करी मदत मोगलांकडची आणून मोठ्या तयारीनें

शाहूनें बाळाजीस हिंगणगांवावर पाठविलें, ' पंतप्रधान, पिलाजी जाधव व मोगल भाऊ ऐसे हिंगणगावावरी येऊन मोर्चे लाविले आहेत, असें २८-५-१७१८ चे विधान आहे.'[1] ह्मणजे त्यापुढें लवकरच थोरतास पकडून बाळाजीनें पुरंदरावर कैदेंत ठेविलें. हिंगणगांवची गढी पाडवून मुळानदींत टाकिली. पांढरीवर गाढवाचा नांगर फिरविला.[2] सचिव सुटून आला याबद्दल संशय नाहीं, कारण ६.१०.१७१८ रोजीं त्याचा मुकाम साताऱ्यास आहे.[3] दमाजी थोरातास पुरंदरावर कैदेंत ठेविलें. त्यास सोडण्याविषयीं महालांतून आग्रह पडल्यावरून राजश्रीचे आज्ञेनें सोडून दिला. ( स. १७१९ ). परंतु पुनः त्यानें बंड केलें. त्यावर स्वारी करून धरून लुटलें. परळीचे किल्ल्यावर ठेविला. तेथेंच कैदेंत मृत्यु पावला ( १७२८ )[4]. थोरातासारख्या लहानशा इसमास रगडण्यास सुद्धां स्वतःचें लष्करी सामर्थ्य पुरें न होऊन त्यासाठीं मोगलांची मदत घ्यावी लागली, यावरून त्या वेळीं शाहूची शक्ति किती अल्प होती याची कल्पना होते. तो कसाबसा टिकाव धरून राहत होता इतकेंच. मोगलांची कृपा होती ह्मणूनच त्याचा निभाव लागला, आणि याचसाठीं त्यानें सय्यदांशीं तह वगैरे केले यांत शंका नाहीं. पण नुसत्या तहांनीं सुद्धां काम भागलें नसतें. बाजीरावानें पुढें लष्करी सामर्थ्य वाढविलें, ह्मणूनच शाहूचा निभाव व मराठी राज्याचा लौकिक झाला.

थोरातास काढल्यावर त्या बाजूच्या प्रांताची व्यवस्था शाहूनें सचिवाकडून बाळाजीकडे दिली. कारण पुण्याच्या पूर्वेकडची ही सरहद्द चांगल्या बंदोबस्तांत ठेवणें अगत्याचें होतें. त्यासाठीं सचिवाचीं ठिकाणें सासवड व पुरंदर बाळाजीनें शाहूच्या हुकुमानें आपल्या ताब्यांत घेतलीं; आणि पुढे त्यानें हळू हळू पुण्यास कायमचें वास्तव्य केलें. पुण्याचे संरक्षणास पुरंदर व सिंहगड हे दोन किल्ले फार उपयोगाचे असून, पहिला या वेळीं, व दुसरा सिंहगड पुढें बाळाजीच्या नातवानें शाहूचे पश्चात् सांगोल्याचे व्यवस्थेंत सचिवाकडून काढून

१. ब्र. च. १८३. २ इ.वृ.१८३५धडफळे यादी; का. सं. प. या. ४९२.
३. वतनपत्रें व निवाडे पृ. ७४. ४ भा. व. श. पृ. ४, ७ व इतर.

आपल्या कबजांत घेतला. सचिवानें हा सौदा खुशीनें केला नाहीं हें सांगणेंनकोच.

थोरातानें शाहूशीं जो एवढा झगडा केला त्यांत त्यास चंद्रसेनाचें पाठबळ चांगलें होतें. ' रा. चंद्रसेन जाधव थोराताची पाठ राखीत, त्याचे बंदोबस्ता-साठीं पिलाजी जाधवानें वाडीस कोट बांधिला, परंतु त्याच कोटाचा उपयोग करून थोरातानें रा. बाळाजीपंतास धरिलें. तीच वाडी पुरंदरास मोर्चा जाहला व मुलूख[1] हैराण झाला. आम्ही सांगत होतों तें न ऐकिलें, ' असें शाहू लिहितो.

**उदाजी चव्हाण.**—दमाजी थोरातप्रमाणेंच उदाजी चव्हाण हा दुसरा एक शूर गृहस्थ ताराबाईचे तर्फेनें शाहूला त्रास देण्यांत अग्रगण्य होता. हें घराणें डिग्रजकर चव्हाण म्हणून सांगलीचे हद्दींत हल्लीं नांदत आहे. राणोजी चव्हाण म्हणून यांचा मूळ पुरुष मालोजी घोरपड्याजवळ होता. राणोजी लढाईंत पडल्यावर त्याचा मुलगा विठोजी यास मालोजीनेंच वाढविलें. मालो-जीच्या मृत्युनंतर विठोजी चव्हाण व संताजी घोरपडे यांनीं बादशहाच्या तंबूवर छापा घालून सोन्याचे कळस काबीज करून आणिले तो प्रकार मागें सांगितलाच आहे.[2] त्या वेळीं हिंमतबहादर हा किताब विठोजीस मिळाला. तेव्हांपासून विठोजी रामचंद्रपंताचे हाताखालीं असे. सन १६९६ तारीख २५ मे रोजीं कर्नाटकांत युद्ध चालू असतां महानगर उर्फ बंग-लोर येथें विठोजी मारला गेला.[3] नंतर त्याचा पुत्र उदाजी यास हिंमतबहा-दूरपदाचीं वस्त्रें मिळालीं. उदाजीही पूर्वजांसारखाच पराक्रमी असून, या वेळीं ताराबाईचे पक्षांत जाऊन शिरोळ, रायबाग, विजापुर एवढ्या टापूंत दंगा करीत होता. सांप्रत तो बत्तीसशिराळ्यास गढी करून राहिला होता. त्याचा दंगा फार वर्षें अधूनमधून चालूच होता. उदाजी चव्हाण व दमाजी थोरात या उभय-तांनीं सातारा प्रांतापर्यंत स्वारी करावी, चव्हाणचौथाई म्हणून घ्यावी, गांव लुटावे, मारावे, असा क्रम चालविला होता. चंद्रसेन जाधवानें त्यांस उत्तेजन देऊन संभाजीच्या तर्फेनें शाहूस पुष्कळच हैराण केलें; आणि शाहूनेंही त्याजवर

---

१. खं. २ पृ. ६६. २ म. रि. पृ. ६२७. ३ प्रा. म. स. पृ. १६.

लहान मोठ्या [illegible] केल्या. साठ वर्षे या पुरुषानें अनेक उलाढाली करून तीनही [illegible] अर्धे पुरे केलें. त्याचा स्वाभाविक मनाचा ओढा संभाजीकडे अस[illegible] त्याचें साह्य आरंभीं पुष्कळ झालें. बाजीरावानें त्यास थोडेंबहु[illegible] होतें. शाहूवर त्यानें एकदां मारेकरी सुद्धां घातले होते. पुढें तो [illegible] जेव्हां शाहूनें स. १७३७त प्रतिनिधीस पाठवून त्याचें आणखी व [illegible] आर्जव केलें. पुढें नानासाहेब पेशव्यानें त्याची समजूत करून परत [illegible] आणि मिरज येथें सरंजाम दिला. उदाजी चव्हाण एका लढाईंतच ता. १२ [illegible] १७६२ रोजीं मरण पावला. ऐ. ले. सं. पृ. १७९.

---

## प्रकरण तिसरें.

### मोगल रियासतीवर मराठ्यांची चढाई.

---

१ मोगल रियासतीवर मराठ्यांची चढाई.
२ बादशाही दरबारांतले पक्ष.
३ दाऊदखान पन्नीचा कारभार ( स. १७१०–१२ ).
४ निजामुल्मुल्कचा कारभार, पूर्वपीठिका ( स. १७१५ ).
५ निजामाचे दक्षिणेंतील व्यूह.
६ सय्यद बंधूंचा कारभार, पूर्वपीठिका.
७ रजपूतांच्या स्नेहाचा बाळाजीस फायदा.
८ हुसेनसय्यदाचा दक्षिणेंतील कारभार, चौथाईचा तह.
९ मराठ्यांचें दिल्लीस प्रयाण ( नोव्हें. १७१८–जुलई १७१९ ).
१० दिल्लींतील राज्यक्रान्ति व सनदांची प्राप्ति ( मार्च १७१९ ).
११ मातुश्री येसूबाईचा सन्माननीय शेवट,

**१. मोगल रियासतीवर मराठ्यांची चढाई.**—शिवछत्रपतीच्या मृत्यूपासून औरंगजेबाच्या अखेरीपर्यंत मराठ्यांनीं बादशहाशीं जो प्रचंड झगडा केला तो केवळ बचावाचे स्वरूपाचा होता. या बचावानें मराठी राज्याचें संरक्षण मात्र झालें; परंतु स्वराज्यास कायमपणा येण्यास मुसल्मा

बचावानें काम भागत नाहीं; विरोधकांवर चढाई करून जाण्याची ताकद राज्यास दाखवावी लागते. खुद्द शिवाजीनें ही व चढाईची पद्धत स्वीकारली होती, आणि शाहूची स्थिरस्थावर झाल्यावर त्या पद्धतीचा पुनरवलंब करणें हेंच मराठमंडळाचें आतां ओघास आलेलें कर्तव्य होतें. निजामाच्या द्वारा मोगलांचें प्रचंड दडपण मराठ्यांच्या छातीवर असून, खरें म्हटलें तर पांचपन्नास मैलांपलीकडे शाहूची सत्ता पोंचत नव्हती. स. १७०७ पासून १७१३ पावेतों या बाबतींत असलेला प्रकार मुकाट्यानें सहन करण्यापलीकडे शाहूस त्याच्या प्रतीकाराचा उपाय योजणें शक्य नव्हतें. चंद्रसेन मोगलांस मिळाल्यानें या प्रकरणाची निकड लागली. यापुढील उद्योगाचा उपक्रम बाळाजीनें केला आणि त्यायोगें जी मराठशाहीच्या कारभारास त्यानें नवीन दिशा लाविली, त्यांतच पेशव्य निदर्शनास आलें. बाळाजीला पेशवाई मिळाल्यानें हा नवीन उद्योग हातीं घेण्यास तो मोकळा झाला. या विषयास आतां आरंभ करतांना प्रथम मोगल दरबार व त्यांचा दक्षिणचा कारभार यांचें तत्कालीन स्वरूप तपशीलवार समजणें अवश्य आहे. त्यांत अनेक पक्षांचा व व्यक्तींचा संबंध येत असून त्यांच्या अनेक भानगडींचें व्यवस्थित स्पष्टीकरण झाल्याशिवाय एकंदर व्यवहारांची गुंतागुंत सुटणार नाहीं[१].

२ बादशाहा दरबारांतले पक्ष.—मोगल, इराणी व तुराणी असे पक्ष बादशाही दरबारांत असून, त्या पक्षांच्या रचनेवर राज्यकारभाराचें धोरण पुष्कळ अंशीं अवलंबून असे. मुसलमानांनीं हिंदुस्थान देश जिंकल्यावर येथील संपत्तीच्या व सुखसाधनांच्या लालसेनें पश्चिम व वायव्य दिशांकडून बाहेरच्या मुसलमानांचा प्रवाह या देशांत सारखा येत होता. मोगल बादशाहीचा संपादक बाबर येथें आल्यावर ऑक्सस नदीच्या पलीकडील त्याच्या जन्मभूमींतील लोकांस मोगल बादशाहीवर आपला हक्कच आहे असें वाटून, तेव्हांपासून तिकडच्या बाजूचे लोक येथें विशेष येऊं लागले. देशांतील लष्करी बंदोबस्ताची मुख्य भिस्त बादशहा या बाहेरच्या स्वजातीयांवरच

१ या प्रकरणास अर्व्हिनच्या 'उत्तरकालीन मोगल' भाग १ व २ या पुस्तकांचा आधार आहे. अर्व्हिननें सर्व मित्या नवीन पद्धतीच्या स्वीकारल्यामुळें, घोटाळा होऊं नये म्हणून त्यांत १० दिवस कमी धरून पुढील मित्या दाखल केल्या आहेत.

ठेवीत असत. औरंगजेब बादशहा दक्षिणेंत येऊन लढूं लागल्यावर त्यानें मुद्दाम बाहेरचे लोक एकसारखे लष्करांत आणविण्याचा क्रम सुरू केला. ऑक्सस नदीच्या उत्तरेकडील प्रांतास तुराण हें नांव असून तिकडच्यांस तुराणी व दक्षिणेकडील प्रदेशास इराण हें नांव असून त्या बाजूच्यांस इराणी म्हणण्याचा प्रघात पडला. तुराणी हे बहुधा सुनीपंथाचे असून, इराणांत शियापंथाचें प्राबल्य असल्यामुळें, इराणी लोक शिया असत. मोगल बादशाहीत तुराणी लोकांचाच भरणा विशेष असे. तथापि कांहीं इराणी घराणींही तेथें प्रसिद्धीस आलीं. इराणांत शिराज हें नामांकित शहर असून, कवी, हकीम व विद्वान् लोक बहुधा शिराजहून हिंदुस्थानांत येत. शिया व सुनी या धर्मभेदांमुळें इराणी व तुराणी या दोन पक्षांमध्यें दरबारांत मोठा विरोध असे; मात्र हिंदु लोकांशीं प्रसंग पडला कीं ते दोघे एक होत.

सिंधु नदीच्या पश्चिमेकडील अफगाण प्रदेशांतून जे लोक येत त्यांस अफगाण म्हणत. त्यांसच पठाण अशीही संज्ञा होती. हिंदुस्थानास जवळ असल्यामुळें यांचाच भरणा बादशाही फौजेत विशेष असे. उत्तर हिंदुस्थानांत मोठमोठीं गांवें या पठाणांनीं वसविलेलीं आहेत. बरेली गांव अलीमहंमदखानानें व फरुखाबाद महंमदखान बंगसानें वसविलें. अफगाण लोक शूर असत, पण राज्यकारभारांत त्यांचा फारसा प्रवेश नव्हता. त्यांस बुद्धि व विद्वत्ता बेताचीच असून, पैशाचा लोभ अनिवार असल्यामुळें, ते एक धनी सोडून वाटेल तेव्हां दुसऱ्याकडे जात. शहाजहानाच्या वेळेस अफगाणांचें प्रस्थ अगदींच मोडलें, तरी औरंगजेबाच्या दक्षिणेंतील युद्धांत पुनः त्यांचा उपयोग जोरानें वाढला. रोहिले पठाण हे अफगाणच होते.

यांशिवाय आरब, हबशी, रूमी, फिरंगी वगैरे कित्येक परकी लोक बादशाहींत होते. युरोपीय लोकांस सामान्यतः फिरंगी म्हणत; आणि कान्स्तांतिनोपलकडील तुर्क लोकांस रूमी अशी संज्ञा होती. शिवाय हिंदुस्थानांत कायमचे येऊन राहिलेल्या लोकांची जी संतति उत्पन्न होई त्यांस हिंदुस्थानी असें नांव होतें. बारांचे सय्यद हिंदुस्थानी म्हणविले जात. रजपूत, जाठ वगैरे लोकांचाही हिंदुस्थानी म्हणूनच उल्लेख केला जात असे. खालच्या कारकुनी पेशाच्या सर्व नोकऱ्या हिंदूंसच मिळत. खत्री, बनिया, कायस्थ वगैरे अनेक हिंदु लोक

नोकरींत असत. काश्मीरचे मुसलमानही नोकरींत प्रवीण होते. हिंदुस्थानी लोकांत पुनः दोन भाग असत, पश्चिमेकडचा तो पंजाबी, बंगाल बहार वगैरे पूर्वेकडचा तो पूर्बिया. असे अनेक पक्ष व प्रकार बादशाहींत असून फर्रुखसेयरच्या वेळेस तर ज्याच्यावर बादशहाची मर्जी, त्याचें प्रस्थ वाढून, बाकीचे वर सांगितलेले भेद तात्पुरते नष्ट होत.

राजा सभाचंद खत्री म्हणून एक हुशार हिंदु गृहस्थ झुल्फिकारखानापाशीं होता; आणि हा खान वजीर झाल्यावर सभाचंदाच्या तंत्रानें चाले. पुढें सय्यदांच्या मदतीनें फर्रुखसेयर गादीवर आला, तेव्हां झुल्फिकारखान, त्याचा बाप आसदखान व सभाचंद या सर्वांचा शिरच्छेद करण्यांत आला.

बादशाहींतील घडामोडींत शाहूचें लक्ष नेहमींच असे, आणि बादशाही पाठिंब्यामुळेंच त्याचा मराठी राज्यांत निभाव लागला. मराठशाहींतील दुफळी कशी मोडावी हाच त्याजपुढें मुख्य प्रश्न असून, ही दुफळी मोडण्यासाठीं त्यास बादशाही कारस्थानांत पडावें लागलें. औरंगजेबाचा पुत्र बहादुरशहा ता. १७ फेब्रुवारी सन १७१२ रोजीं लाहोर येथें मरण पावला. पुढें बहादुरशहाच्या मुलांत लढाया होऊन वडील मुलगा जहांदरशहा झुल्फिकारखानाचे साह्यानें गादीवर बसला. एक वर्षाच्या आंत फर्रुखसेयरनें सय्यद बंधूंच्या मदतीनें जहांदरशहास ठार मारून ता. ११ जानेवारी १७१३ रोजीं बादशाही तख्त मिळविलें. फर्रुखसेयरची ही कारकीर्द ता. १८ फेब्रुवारी सन १७१९ रोजीं संपली. याच कारकीर्दीतील कारस्थानें व घडामोडी मराठ्यांच्या संबंधानें महत्त्वाच्या आहेत. दक्षिणेंत बादशाही मुलुखाचे बऱ्हाणपुर ( खानदेश ), वऱ्हाड, हैदराबाद, बेदर, विजापुर व कर्नाटक असे सहा सुभे असून, त्या सर्वांवर मुख्य सुभेदार औरंगाबाद येथे राहत असे. शिवाय दिवाण नांवाचा एक मुलकी व हिशेबी कामदार सुभेदाराच्या मदतीस असे. शाहूच्या आगमनापासून येथें खालील मुख्य सुभेदार झाले:—१ दाऊदखान पन्नी,–स. १७०८–१७१३ जानेवारी;

२ निजामुल्मुल्क्,–फेब्रुवारी १७१३ पासून एप्रिल १७१५;

३ सय्यद हुसेनअली,–मे १७१५ पासून नोव्हेंबर १७१८;

४ आलमूअली,–डिसेंबर १७१८ ते ऑगस्ट १७२०;

५ निजामुल्मुल्क्–( पुनः ) ऑगस्ट १७२०—जानेवारी १७२२.

**३ दाऊदखान पन्नीचा कारभार** (सन १७०८–१७१२).–औरंगजेब बादशहाच्या वेळेपासून दक्षिणच्या सहा सुभ्यांस विशेष महत्त्व आलें. पुढें पुढें तर दिल्लींतील कारभाऱ्यांचें पटेनासें झालें, म्हणजे दक्षिणेंत येऊन स्वतंत्र कारभार करण्याची हाव त्यांस उत्पन्न होत असे. झुल्फिकारखानास दक्षिणची सुभेदारी पाहिजे होती; परंतु बहादुरशहानें त्यास आपल्याबरोबर दिल्लीस नेल्यामुळें, दक्षिणच्या सुभेदारीवर दाऊदखान पन्नी यास झुल्फिकारखानाचा दुय्यम म्हणून बादशहानें नेमिलें. ही व्यवस्था फर्रुखसेयर गादीवर येईपर्यंत म्हणजे सन १७१३ जानेवारीपर्यंत चालली. दाऊदखान हिंदूंचा बराच पक्षपाती होता; आणि मराठे सरदारांची त्यास चांगली ओळख होती. औरंगजेबाच्या मरणसमयीं मराठ्यांनीं शिवाजीच्या वेळचें स्वराज्य म्हणून जेवढें होतें तेवढें बहुतेक सोडवून कबजांत घेतलें होतें. व्यंकोजीचा दासीपुत्र रायभानजी भोसले बादशाही फौजेंत सहा हजारी सरदार होता, त्याच्या वशिल्यानें शाहूची सुटका झाली तेव्हां शाहू आपला 'आत्मिक' अशा भावनेनें हें स्वराज्य त्यास देण्यांत येऊन, शिवाय मोगलांच्या सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखी वसूल करण्याचा हक्कही त्यास देण्यांत येणार होता; आणि त्याचे बदल्यांत शाहूनें फौज घेऊन बादशहास मदत करावी असें ठरलें होतें. परंतु ताराबाईच्या खटपटीमुळें वरील हक्कांच्या सनदा शाहूस मिळाल्या नाहींत; आणि ताराबाईशीं लढून आपला हक्क स्थापन करावा असा मुन्यिमखान वजिरामार्फत शाहूस जबाब मिळाला. पुढें वजीर मुन्यिमखान स. १७११ त मरण पावला, आणि मराठे सरदारांचा उपद्रव मोगलांचे मुलखास होऊं लागला. प्रथमच मार्च १७११त वाईचें ठाणें शाहूनें हस्तगत केलें. पुढें दाऊदखानानें, सहा सुभ्यांवर चौथाई वसूल आपण होऊन तुम्हांस देतों असा करार लिहून दिला. मात्र ही चौथाई त्यांनीं परभारें वसूल करूं नये, दाऊदखानानें वसूल करून द्यावी, असा ठराव होता. परंतु लवकरच ही व्यवस्था बदलली[१].

**४. निजामुलमुल्कचा कारभार** (स. १७१३–१५), त्याचा कौटुंबिक वृत्तान्त.––मराठ्यांच्या इतिहासांत निजामाचें नांव चिरस्थायी असल्यामुळें त्याचा पूर्ववृत्तान्त प्रथम सांगितला पाहिजे.

१ अर्विन, मनूची वगैरेंच्या आधारानें. खं.८.५६; खं. ३.४७.

निजामुल्मुल्कचा बाप, आजा व पणजा हे मोठे पराक्रमी पुरुष होते. एकसारखे पुष्कळ पिढ्यांपर्यंत पराक्रमी पुरुष निपजल्याचीं जीं थोडीं घराणीं इतिहासांत आढळतात, त्यांपैकीं हें एक प्रमुख आहे. औरंगजेब दक्षिणेंत असतां हिंदुस्थानच्या बाहेरून अनेक पराक्रमी मुसलमानांचा तांडा सारखा त्याजकडे येत होता. त्याच्या तालमेंत जीं माणसें तयार झालीं तीं पुढें पन्नास वर्षेंपावेतों पुरलीं. राज्यकर्त्यांस आपल्या जातीचीं विश्वासाचीं माणसें राज्यांत ठेवावीं लागतात, हा प्रकार हल्लींच्या इतकाच त्या वेळीं मोगल बादशहांस व पुढें पेशव्यांसही स्वीकारावा लागला. बुद्धिमत्ता, शौर्य, राज्यचातुर्य, दीर्घायुष्य इत्यादि गुण आनुवंशिक प्रघातानें ह्या निजामाचे वंशांतील पुरुषांत दिसून येतात. निजामाचा आजा ख्वाजा आबीद हा बुखाऱ्याहून मक्केस जाण्याकरितां हिंदुस्थानांत आला. कारण मक्केस जाण्याची सोय मोगल बादशहांनीं सुरतेहून ठेविली होती, त्यामुळें पुष्कळसे बाहेरचे मुसलमान हिंदुस्थानांत येत. मनाजोगा रोजगार मिळाला तर येथेंच वास्तव्य करून रहात. ख्वाजा आबीद मक्केहून परत आला तेव्हां राजपुत्र औरंगजेब बापाचें राज्य घेण्याकरितां दक्षिणेंतून दिल्लीकडे चालून जात होता. त्या वेळीं औरंगजेबानें आबीद यास आपल्या नोकरींत घेतलें. पुढें औरंगजेबास राज्य मिळाल्यावर आबीद यानें अजमीर, मुलतान वगैरे ठिकाणीं मोठ्या दरजाचीं कामें केलीं. ख्वाजा आबीद यास किलीचखान असा किताब बादशहानें दिला. तो तारीख ३० जानेवारी १६८७ रोजीं गोवळकोंड्याचे वेढ्यांत गोळी लागून मरण पावला. त्यास पांच मुलगे होते, त्यांपैकीं तीन पराक्रमी निघाले. सर्वांत वडील मीरशहाबुद्दीन ऊर्फ गाजीउद्दीन फिरूजजंग हा विशेष प्रसिद्ध होतो.

मीरशहाबुद्दीनचा जन्म समरकंद येथें स. १६४९–५०त झाला. उदेपुरच्या राण्याशीं लढत असतां, औरंगजेबाची एक नाजूक कामगिरी स्वतःचा जीव धोक्यांत घालून त्यानें बजावल्यामुळें बादशहानें त्यास मोठ्या पदवीस चढविलें, आणि ता. २ जानेवारी स. १६८४ रोजी गाजीउद्दीन हा किताब दिला. ( मनूची ). पुढें हैदराबादचा किल्ला त्यानेंच काबीज केला. औरंगजेबानें आपला वडील मुलगा शहाआलम व त्याचा मुलगा यांस कांहीं काळ कैद केलें होतें, तें कामही बादशहानें याच सरदाराकडून करविलें. स. १७०३-४ साला मराठ्यांनीं माळव्यांत स्वारी केली असतां शहाबुद्दीननें त्यांचा पाठलाग केला. स. १७०७त

बादशहाचे मरणसमयीं तो वऱ्हाडच्या सुभ्यावर होता. बहादुरशहाची मर्जी या तुराणी मंडळीवर चांगलीशी नसल्यामुळे, त्यानें शहाबुद्दीन यास दक्षिणेंतून काढून गुजराथच्या सुभ्यावर पाठविलें, तेथेंच तो ता. ८ डिसेंबर स. १७१० रोजीं मरण पावला, त्या वेळीं त्याचें वय साठ वर्षांचें होतें. त्याजवळ लाखों रुपयांची संपत्ति होती ती त्याच्या मृत्यूनंतर जप्त करण्यांत आली. त्या वेळच्या तुराणी सरदारांत शहाबुद्दीनची गणना प्रामुख्यानें आहे.तो सुस्वभावी, रुआबदार व शूर असून राज्यकारभारांत त्याची बुद्धि दांडगी होती. शहाजहानचा प्रसिद्ध वजीर सादुल्लाखान याची मुलगी शहाबुद्दीन यास दिलेली असून तिच्याच पोटीं कमरुद्दीनखान ऊर्फ निजामुल्मुल्क याचा जन्म ता. १५ ऑगस्ट १६७१त झाला. अर्थात् ता. २१ मे १७४८ त मरणसमयीं त्याचें वय ७७ वर्षांचें होतें. १०४ वर्षांचें त्याचें वय असल्याचा प्रवाद ग्रँट डफनें प्रचलित केला तो खोटा आहे.

## निजामुल्मुल्कची वंशावळ

आलमशेख, समर्कंदचा

| | |
|---|---|
| ख्वाजा आबीद. | मीर बहुद्दीन. |
| मीर शहाबुद्दीन, गाजीउद्दीन फिरूजजंग. | महंमद अमीनखान वजीर. |
| चीन किलीचखान, निजामुल्मुल्क. ज. ११–८–१६७१, मृ. २१–५–१७४८ | कमरुद्दीनखान. ( वजीर १७३९–४८ ) |

शहाबुद्दीनचा मुलगा तेरा वर्षांचा असतां त्यास १०० घोडेस्वारांच्या तुकडीचें काम औरंगजेबानें दिलें. स. १६९० त त्यास चीन किलीचखान हा किताब मिळाला. बादशहाच्या मरणसमयीं तो विजापुरचा अंमलदार होता. बहादुरशहाचें तुराणी कुटुंबावर प्रेम नसल्यामुळें आणि झुल्फिकारखानाचा व या कुटुंबाचा खासगी द्वेष असल्यामुळें, हा निजाम व त्याचा चुलता अमीनखान यांची बादशहानें मुरादाबाद व अयोध्या इकडे बदली केली. परंतु वजीर मुन्यिमखानानें त्यास ज्यास्त महत्त्वाचें काम दिलें. पुढें कांहीं दिवस

नोकरी सोडून तो घरीं बसला. बापाच्या मृत्युनंतर तो पुनः दिल्ली दरबारीं गेला, तेथें त्यास गाजीउद्दीन व फिरूजजंग हे किताब मिळाले. जहांदर बादशहाच्या व झुल्फिकारखानाच्या मृत्यूनंतर त्यास दक्षिणच्या सहा सुभ्यांचा अधिकार व खानखानान, निजामुल्मुल्क बहादूर, हे किताब मिळाले ( १७१३ फेब्रुवारी ). त्या वेळीं बादशहानें सहा सुभ्यांवर खालील अंमलदार नेमून त्या सर्वांवर औरंगाबाद येथें निजामाची नेमणूक केली.

| | |
|---|---|
| बऱ्हाणपुर—शुकुल्लाखान; | कर्नाटक—सादुल्लाखान; |
| वऱ्हाड—ऐवजखान; | बेदर—अमीनखान; |
| विजापुर—मनसूरखान; | हैदराबाद—यूसुफखान. |

बऱ्हाणपुरास दाऊदखान पन्नी होता त्याची बदली गुजराथच्या सुभ्यावर करण्यांत आली. निजामाच्या मदतीस मुलकी कामावर ‘ दिवाण ’ ह्मणून हैदर-कुलीखान याची नेमणूक झाली.

५. **निजामाचे दक्षिणेंतील व्यूह.**—फार दिवस दक्षिणेंत राहिल्यामुळें इकडची भाषा, रिवाज, पूर्व इतिहास व प्रस्तुतचीं कारस्थानें निजामास चांगलीं माहीत होतीं. औरंगजेबाच्या राजनीतीचें त्यास बाळकडूच होतें; आणि दिल्लींतील धामधुमीचा फायदा घेऊन दक्षिणेंत स्वतंत्र पंथ काढण्याचा त्याचा विचार होता; त्याच्या दुर्दैवानें या प्रसंगीं दक्षिणचा कारभार त्याजकडे दोन वर्षांपेक्षां जास्त राहिला नाहीं. नेमणूक झाल्याबरोबर त्यानें इकडे येऊन औरंगाबादेस ठाणें दिलें. मराठ्यांस चौथाईचा वसूल करूं द्यावयाचा नाहीं असा प्रथमपासूनच निश्चय करून त्याप्रमाणें त्यानें पुढील तजवीज चालविली. जुलै स. १७१३ मध्यें त्यानें औरंगा-बादनजीक मराठी फौजेचा एक दोनदां चांगला समाचार घेतला.

चौथाईस विरोध करण्याकरितां प्रथमपासूनच निजाम कोल्हापुरकर संभाजीच्या पक्षास सामील झाला, तरी शाहूशीं सलोखा करून त्यास आपणाकडे वळविण्याचे प्रयत्न त्यानें करून पाहिले. शाहूच्या मनांत बादशाहीसंबंधानें पूज्यभाव असून त्यांचा ताबेदार ह्मणवून घेण्यांत त्यास वाईट न वाटतां उलट एक प्रकारचें भूषण वाटे. चंद्रसेन जाधव शाहूवर रुसून निघून गेला, त्यास निजामानें आश्रय दिला; आणि फौजेच्या खर्चाकरितां बेदरच्या पूर्वेस भालकी येथें बरीच मोठी जहागीर त्यानें चंद्रसेनास दिली. चंद्रसेनाबरोबरच सर्जेराव घाटगे हा एक

नामांकित सरदार शाहूस सोडून गेला, त्याचाही निजामानें परामर्ष घेऊन, संभाजीकडून त्यास कागल येथें जहागीर देवविली, तीच हल्लींची कागलची जहागीर होय औरंगजबाच्या मृत्युसमयीं पुणें प्रांत मोगलांच्या ताब्यांत होता. या प्रांताचें मुख्य ठाणें बारामतीस असून त्याजवर मोगलांचे तर्फे हणमंतराव निंबाळकर स. १६८ पासून १६९३ पावेतों ठाणेदार होता. त्यानंतर दहा वर्षे यासीन खान व पुढें रंभाजी निंबाळकर ठाणेदार झाले. रंभाजीस त्यांनीं तेथें जहागीरच दिली ती स. १७०९ पासून १७१६ पर्यंत चालली. खं २० पृ. ७२.)

हाच रंभाजी पुढें रावरंभा निंबाळकर म्हणून निजामशाहींत प्रसिद्धीस आला. रंभाजीनें आपला हस्तक बाजीकदम यास मुद्दाम पुण्यास ठेवून दिलें. 'स. १६२९ च्या वैशाखमासीं [ मे १७०७ ] बाजीकदम फौजदार व गुंडाबा नाईक सेखदार हे नवाब आसफजाकडील सरदार रंभाजी निंबाळकर याजकडून आले. त्यांनीं पुण्यांत अंमल बसवून ठाणें घेतलें. आठ वर्षे अंमल पुण्यांत होता, निजाम-जरी स. १७० त सुभेदार नव्हता, तरी इकडेच तो सुभेदाराच्या हाताखालीं होता. हा रंभाजी हैबतराव निंबाळकर सरलष्कर याचा मुलगा, असें विधान[1] आहे तें खरें दिसत नाहीं. तो शिवछत्रपतीचा जांवई महादाजी याचा नातू[2] असून मोगलांस जाऊन मिळाला होता. स. १७१३ पासून दोन वर्षेपावेतों निजाम, चंद्रसेन, रंभाजी निंबाळकर, व संभाजी वगैरेनीं शाहूचा उच्छेद काढण्याची पुनः शिकस्त केली. पुण्यांतील मोगलांचा अंमल उठवून देणें हें बाळाजीचें उद्दिष्ट; आणि तें साधूं न देणें हा या मंडळीचा उद्योग. 'शहाजी निंबाळकर वगैरेनीं एकत्र होऊन जमाव केला आहे. वाई देशीं येऊन धामधूम करणार. तरी तुम्ही जमावानिशीं येणें,'[3] अशी आज्ञा शाहूनें ५-११-७१४ रोजीं केली. लष्करच्या सरदारांस जमावानिशीं हुजूर बोलाविलें, ( २०–५–१७१४ ).[4] आंगरे व थोरात यांचीं प्रकरणें याच कारस्थानामुळें उद्भवलेलीं असून, आंगऱ्यांकडून लोहगड किल्ला घेऊन पश्चिम बाजूने पुण्याचा बंदोबस्त मुद्दाम व त्वरेनें बाळाजीनें केला. लोहगडची सबनिशी भानु रामाजी महादेवास व मावळची मुज्मी हरि महादेवास देऊन आपल्या भरंवशाचे हे दोन इसम बाळाजीनें पुण्याच्या पश्चिम भागीं ठेवून दिले. पुढें सचिवाकडून पुरंदर किल्ला घेतला, त्याचेंही प्रयोजन पुण्याचे बंदोबस्ताकरि-

---

१. खं. २ पृ. २६. २. इ. सं. वर्ष ८. ३ शा रो. २०७. ४ शा. रो १.

त्यांच होय. १७१४-१५ सालीं रामचंद्रपंत अमात्य संभाजीचा जम बसविण्याची खटपट जोरानें करीत असावा अशी कल्पना खं. ८·७५ करून होते. स. १७१५ ता.१ एप्रिल रोजीं निजामाचे मार्फत रामचंद्रपंत आपलें सोनवळें गांवचें इनाम मोठ्या खटपटीनें मिळवीत होता. बाळाजी मोहिमेवर असतां स. १७१४-१५ सालीं शाहूनें खालील पत्र त्यास लिहिलेलें उपलब्ध आहे.[१]

'रा. रा. बाळाजी पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे. अलीकडे तुमचें विनंतिपत्र येत नाहीं. सांप्रत तुम्ही कोठें आहां, काय मनसुबा करितां तें कळलें नाहीं. या प्रांतीं करवीरकरांनीं निजामुल्मुल्क याचें सहाय करून घेऊन दंगा करण्याचा विचार केला हें वर्तमान विस्तारें तुम्हांस कळावें याजकरितां पत्रें लिहिलीं. सादर झालींच असतील. नबाबाचा अदूरपणाचा प्रकार व करवीरकरांची कोते अंदेशी हे दोन अर्थ एकत्र झाले आहेत. याचा परिणाम कळलाच आहे. तथापि तुम्ही दूर देशीं असतां मनसुबा प्राप्त झाला याची तोड तुम्हांस कळेल त्या रीतीनें करालच. तुम्हांसारिखे अतुल पराक्रमी सेवक असतां, स्वामींनीं या मनसुब्याचा उद्योग वागवावा असा प्रकार नाहीं. देशीं फौजा आहेत, त्या जमा करविल्या आहेत, तुम्हीं तिकडील चार कामें सामान्य असतील तीं ठेवून सत्वर.'

शाहूनें सातारा प्रांतीं राहून फौजा जमविण्याच्या आज्ञा १७१४त काढिलेल्या वर दिल्या आहेत. बाळाजी पुण्याचे उत्तरभागीं असावा, आणि वरील पत्र या वेळचें म्हणजे स. १७१४ तलें असावें असें अनुमान होतें.

शाहूच्या सुदैवानें स. १७१५ च्या एप्रिलांत निजामाची बदली होऊन तो रागारागानें ताबडतोब निघून उत्तरेंत गेला; आणि सय्यद हुसेनची दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक होऊन तो ४ एप्रिल रोजीं दिल्लीहून निघाला. अगोदरपासूनच सय्यदाबरोबर अनुसंधान बांधून बाळाजीनें वरील व्यूहाचा उपक्रम आरंभिला. तिकडे सय्यद हुसेन याजविरुद्ध दाऊदखान पन्नीस बादशहानें उठविल्यामुळें, स्वसंरक्षणासाठींच सय्यदास शाहूशीं शत्रुभाव ठेवण्याची इच्छा नव्हती. समान अडचणींत असल्यामुळें बाळाजी व सय्यद यांचा सलोखा एकमेकांशीं अनायासें जडली. या खटपटीच्या वेळाशीं शंकराजी मल्हार वगैरे मंडळी असावी. शिवाय निजामाचा उद्योग उखडून टाकणें हेंच सय्यदाच्या कारभाराचें रहस्य होतें.

१ रा. यशवंत राजाराम गुप्ते यांजकडून असेंच अपूर्ण मिळालें.

हुसेन सय्यदाचें लक्ष कोल्हापुरच्या संभाजीपेक्षां शाहूचे ठिकाणीं जास्त लागल्यामुळें, इतउत्तर, पुनः स १७२३त निजाम दक्षिणेंत येईपावेतों, संभाजीस शाहूविरुद्ध हालचाल करण्याची सोय राहिली नाहीं. या बदललेल्या परिस्थितीचा परिणाम लगेच दिसून आला. नोव्हेंबर १७१५त 'बाळाजी विश्वनाथाकडील व्यंकोजी दमेढेरे फौजेनिशीं येऊन रंभाजी निंबाळकराचे ठाणेदार पुण्यांत होते ते उठवून दिले पंतप्रधानाचें ठाणें बसलें,[1] मोगलांचा अंमलदार बाजी कदम यानें पेशव्याचा पक्ष धरला.[2] पुण्यांत कांहीं दिवस दुतर्फा अंमल राहिला. स. १७१७ त रंभाजी निंबाळकराचा अंमल पुण्यांत होता.[3] शाहूचा व सय्यदांचा तह नक्की झाल्यावर मग पुणें प्रांत सर्वस्वीं स्वराज्यांत आला[4] ( स.१७१८ ). म्हणजे दहावर्षांच्या खटाटोपानें सातारा व पुणें या दरम्यानच्या अल्प प्रदेशाबाहेर शाहूचा अंमल नव्हता हें लक्षांत ठेवणें जरूर आहे. बाळाजीचीं सर्व कारस्थानें व व्यूह त्याचे दोघे मुलगे जवळ राहून पाहत होते, तोच अनुभव पुढें त्यांस मार्गदर्शी झाला. सय्यदांचें सख्य शाहूलाही हवें होतें. आपली मातुश्री वगैरे सोडवून आणावयाची असल्यामुळें मोगल सुभेदाराशीं अगर बादशाही दरबाराशीं तुटून वागणें त्यास शक्य नव्हतें. म्हणून निजामाची ब्याद परत जातांच शाहूच्या राजकारणास निराळें वळण ओघानेंच लागलें. प्रथम या सय्यदांची पूर्व पीठिका येथेंच सांगणें अवश्य आहे.

६ **सय्यदबंधु, पूर्वपीठिका व कारभार,** ( स. १७१२–१८ ).—यांचें मूळ ठिकाण मेसापोटेमियांत वासित हें होय. तेथून एक पुरुष हिंदुस्थानांत येऊन सरहिंदच्या नजीक राहिला. पुढें त्यांचीं चार कुटुंबें झालीं, पैकीं एक कुटुंब गंगायमुनांचे दुआबांत मीरत व सहारणपुर यांचे दरम्यान वस्ती करून राहिलें. कोणी ह्मणतात 'बारा' नांवाचे गांवावरून या कुटुंबास बारा सय्यद ह्मणूं लागले. कोणी सांगतात त्यांचे आरंभीं बारा गांव होते, त्यावरून त्यांचें टापणनांव 'बारा' असें पडलें अकबराचे फौजेंत कित्येक बारा सय्यद लष्करी नोकरीवर होते. त्यांचे स्वभावविशेष प्रसिद्ध असून, त्यामुळें हल्लीं त्यांचे वंशज कर्जांत बुडालेले आहेत.

---

१ ध. या. २ खं.१ पृ.२६. ३ वतनप व. नि. पृ.५. ४ इ. ऐ. गिजरे १०२.

औरंगजेबाचे पदरीं सय्यद अब्दुल्लाखान ऊर्फ सैयदमिया नांवाचा एक हुशार सरदार असून तो कांहीं दिवस विजापुर व पुढें अजमीर या प्रांतांचा सुभेदार होता. या अब्दुल्लाखानास पुष्कळ मुलें होते, पैकीं हसनअली व हुसेन अली हे दोन पुढें विशेष प्रसिद्धीस आले, तेच इतिहासांत सय्यद बंधु या नांवानें ओळखले जातात. स. १७१२त पहिल्याचें वय सुमारें ४६ व दुसऱ्याचें ४० होतें. पहिला अब्दुल्लाखान कुत्बुल्मुल्क् या नांवानें प्रसिद्ध आहे. तो १६९७–९८ त खानदेश, बागलाण, औरंगाबाद इत्यादि ठिकाणीं फौजदार होता. धाकटा भाऊ हुसेन अली हा ज्यास्त अक्कलवान व निश्चयी असून तो अजमीर, आग्रा, इत्यादि ठिकाणीं निरनिराळ्या कामांवर होता. पुढें जाजवच्या लढाईत त्यांना चांगला पराक्रम केला, पण तेथें त्यांचा तिसरा भाऊ नुरुद्दीन अली मारला गेला. अब्दुल्लाखानास बादशहानें कुत्बुल्मुल्क असा किताब व वजिरी देऊन, हुसेनअलीस अमीरुल-उमराव असा किताब व मीरबक्षी म्हणजे सेनापति केलें. अब्दुल्ला बहुतेक राजधानींतच असे. हुसेन अली तीन वर्षें दक्षिणेंत होता. वजिरांचें व त्यांचें बनलें नाहीं म्हणून बहादुरशहाचे वेळेस ते फारसे पुढें आले नाहींत. तथापि शहाजादा अजीमुश्शानची त्यांजवर मेहेरबानी असल्यामुळें हुसेन अलीस स १७०८ त बहार प्रांताची, व अब्दुल्ला यास स. १७११ त अलाहबादची सुभेदारी मिळाली. या ठिकाणा असतांच त्यांना फर्रुखसेयरचा पक्ष उचलिला आणि जहांदरशहाचा पाडाव करून फर्रुखसेयर यास तख्त मिळवून दिलें. या राज्यक्रांतीची हकीकत चित्तवेधक आहे, परंतु तिचें येथें प्रयोजन नाहीं.

फर्रुखसेयर हलक्या कानांचा असून एक निश्चय करून त्याप्रमाणें कधीं वागला नाहीं, यामुळें त्याचा नाश झाला. सय्यदांचे विरुद्ध त्याजकडे लोकांनीं गाऱ्हाणीं केलीं, त्यावरून तो त्यांस एकसारखा दुखवीत गेला. आपल्या बलाबलाचा विचार त्यानें केला नाहीं. उलट पक्षीं सय्यद बंधु मोठ्या सावधगिरीनें व एकमेकांच्या विचारानें वागत होते. फर्रुखसेयरनें जानेवारी १७१३ त दिल्लींत प्रवेश केल्याबरोबर नवीन नेमणुका करण्यासंबंधानें प्रथमच उभयतांत तंटा उत्पन्न झाला. तसेंच सय्यदांस पुष्कळशी संपत्ति मिळाली, त्याबद्दल बादशहास वैषम्य वाटूं लागलें. बादशहा शिकारीचें निमित्त करून वारंवार बाहेर जाई

आणि तिकडे सय्यदांच्या नाशाचा कांहीं तरी गुप्त बेत करी, असा हा प्रकार सारखा सहा सात वर्षे चालला होता.

फर्रुखसेयर गादीवर आला, तेव्हां रजपूत राजे विशेष बळावले होते. मारवाडच्या अजितसिंहानें स्वातंत्र्य धारण करून अजमीरचा बादशाही सुभा सुद्धां हस्तगत केला होता. तेव्हां त्याचा पाडाव करण्यासाठीं बादशहानें हुसेन सय्यदास त्याजवर रवाना केलें, आणि आंतून अजितसिंगास पत्र लिहिलें कीं, 'तुम्हीं हुसेन सय्यदास मारून टाकावें, म्हणजे त्यांची संपत्ति आम्ही तुम्हांस देऊं.' ही स्वारी नोव्हेंबर १७१३ पासून जुलई १७१४ पावेतों झाली. हुसेन अली अजमिरावरून मेडत्यास गेला. अजितसिंग मागें हटत चालला. सय्यदाशीं लढून त्याचा पाडाव करणें शक्य नाहीं असें पाहून, अजितसिंगानें त्याजबरोबर तह केला, आणि बादशहास आपली मुलगी दिली तो प्रकार अन्यत्र सांगितलाच आहे.

इकडे बादशहानें अजितसिंगास लिहिलेलीं पत्रें सय्यदांचे हातीं लागून त्यांचें व बादशहाचें खूबच वांकडें आलें; आणि बादशहा आपला नाश करण्यास टपला आहे अशी त्यांची खात्री झाली. मीरजुम्ला, खान डौरान, महंमद अमीनखान ही सर्व मंडळी सय्यदांचे विरुद्ध होतीं; आणि ते बादशहाशीं सय्यदांचे विरुद्ध नानाप्रकारचे गुप्त बेत करीत होते. सय्यद दरबारास सुद्धां जाईनातसे झाले. पुढें पुष्कळांच्या मध्यस्थीनें उभय पक्षीं आणा शपथा होऊन सय्यदांची व बादशहाची तात्पुरती गोडी झाली. नंतर हुसेन सय्यदास बादशहानें दक्षिणच्या सुभ्यावर नेमिलें. ही नेमणूक झालेली ऐकून निजामुल्मुल्क तेथचा कारभार सोडून ता. १३ जून १७१५ रोजीं दिल्लीस दाखल झाला. रस्त्यांत हुसेन अली व निजाम एकमेकांच्या जवळून गेले, पण त्यांनीं एकमेकांची गांठ सुद्धां घेतली नाहीं. यांत त्यांनीं बादशाही रिवाजही मोडिला. दक्षिणचा कारभार हातचा गेल्यामुळें निजाम अतिशय चिडून गेला होता. तत्राप तो मोठा धूर्त असल्यामुळें एकदम सय्यदांच्या विरुद्ध चाललेल्या कारस्थानांत उघड सामील झाला नाहीं. एप्रिल १७१७त त्याची नेमणूक मुरादाबादेस झाली. मुरादाबादचा सुभा हलका गणला जात असे, म्हणून तो निजामास आवडला नाहीं.

हळू हळू सय्यदांच्या पाडावाचे अनेक प्रयत्न बादशहानें केले. त्यानें स. १७१६ च्या मार्चांत सवाई जयसिंगास माळव्याचे सुभ्यावरून आपल्या

मदतीस बोलाविलें; पण जयसिंगानें बादशहास मनापासून साह्य केलें नाहीं. पुढें त्याची रवानगी जाठांवर झाली. बादशहानें मोठ्या भरंवशानें स. १७१८त आपला सासरा अजितसिंग यास आपल्या मदतीस बोलाविलें. परंतु अजितसिंग उलट सय्यदांसच सामील झाला. नंतर बादशहानें निजामास आपल्याजवळ आणिलें; तोही सय्यदांचे विरुद्ध वागेना, म्हणून त्यानें त्याची नोकरी काढून घेतली. अशा रीतीनें बादशहाचा पक्ष दिवसेंदिवस अगदींच दुर्बल झाला. पुढें प्रकरण चिरडीस गेल्यानें दिल्लीस धडगत नाहीं असें पाहून अब्दुल्लानें आपल्या बंधूस दक्षिणच्या कामावरून सेप्टेंबर स.१७१८त परत दिल्लीस बोलाविलें. दक्षिणचा सर्व बंदोबस्त आपल्या मर्जीमाफक करून हुसेनअली, हवा मानवत नाहीं असें निमित्त करून, नोव्हेंबर १७१८ त परत निघाला, तो १७१९ च्या फेब्रुवारींत दिल्लीस पोंचला.

मराठ्यांच्या इतिहाससंबंधानें विचार करितां, सय्यद हुसेनचा तीन वर्षांचा दक्षिणेंतील कारभार अत्यंत महत्त्वाचा आहे. शंकराजी मल्हार व बाळाजी विश्वनाथ या दोन पुरुषांनीं सय्यदांशीं नवीन राजकारणाचा उपक्रम करून मराठशाहीचें धोरण बदलिलें. परंतु मराठे व मुसलमान या दोघांबरोबर तिसऱ्या एका पक्षाचा म्हणजे रजपूत राजांचा या विषयांत निकट संबंध येत असल्यामुळें पुढील कारस्थानें समजण्यासाठीं रजपुतांची थोडी हकीकत येथेंच दिली पाहिजे.

**७. रजपुतांच्या स्नेहाचा बाळाजीस झालेला फायदा**[1].—महाराष्ट्रांतून बाहेर पडून नर्मदेच्या पलीकडे मराठ्यांनीं प्रवेश केल्याबरोबर त्यांचा संबंध रजपूत राजांशीं आला. रजपूत राजांस औरंगजेबानें अत्यंत दुखविलें होतें. दक्षिणेंत औरंगजेबाचा मराठ्यांनीं जो उच्छेद केला, त्याजबद्दल रजपुतांस आनंद होऊन मराठ्यांनीं सय्यदांचे द्वारें दिल्लींत प्रवेश केला तेव्हां, त्याजबद्दल सामान्यतः रजपूत राजांना मोठी सहानुभूति वाटत होती. बादशाहीच्या या पडत्या काळांत रजपूत राजेही आपलीं राज्यें वाढवीत होते. चौथाई सरदेशमुखीचे हक्क मराठ्यांस मिळाल्याबद्दल रजपुतांस वैषम्य वाटलें नाहीं. अकबराच्या वेळेप्रमाणें या वेळीं रजपुतांचें बादशहास साह्य असतें तर दिल्लींत मराठ्यांचा रिघाव झाला नसता. रजपुतान्यांत मुख्य राज्यें तीन, उदेपुर, जयपुर व जोधपुर. प्रस्तुत

१ आधार—टॉड व अर्व्हिन.

उदेपुरास राणा अमरसिंह (स. १७००-१६) व राणा संग्रामसिंह (१७१६-३४) हे दोन मोठे हुशार राज्यकर्ते झाले. मात्र त्यांचें लक्ष स्वतःची राज्यवृद्धि करण्याकडे नसून, मुसलमानांशीं विरोध करून आपल्या घराण्याचें पावित्र्य व सन्मान कायम राखण्याकडे विशेष होतें. मारवाडांत जोध र येथें जशवंतसिंहाचा पराक्रमी मुलगा अजितसिंह (१६७८-१७३१), व त्याचा सवाईबेटा अभयसिंह (१७३१-१७५०) हे मोठे चळवळ्ये असून, दिल्लीच्या कारस्थानांत विशेष लक्ष ठेवून स्वतःचा फायदा करण्यांत निमग्न असत. जयपुरचा राजा सवाई जयसिंह (१६९९-१७४३) हा विद्याभिलाषी असून, धाडसानें पुढें न पडतां, अंतस्थ खटपटी करणारा होता. टॉड त्याजविषयीं आदरानें लिहीत नाहीं. शिवाय दुसरे लहान लहान राजे बादशाही फौजेंत असत. बुंदीचा बुधसिंह, कोट्याचा रामसिंह व दतियाचा दलपत बुंदेला हे औरंगजेबाच्या फौजेंत दक्षिणेंत लढत होते. पैकीं दलपत बुंदेल्यानें लिहिलेला त्या वेळचा इतिहास प्रसिद्ध आहे. औरंगजेबाचे दोघे मुलगे राज्यासाठीं आपसांत लढले, तेव्हां बुंदीचा बुधसिंह, उदेपुरचा अमरसिंह व जोधपुरचा अजितसिंह यांनी वडील पुत्र बहादुरशहा याचा, आणि रामसिंह व दलपत बुंदेला यांनीं अजिमशहाचा, असे पक्ष घेतले होते. जाजवच्या लढाईंत रामसिंग व दलपत बुंदेला मारले गेले. बहादुरशहानें बुधसिंगास 'रावराजा' असा किताब देऊन मोठ्या योग्यतेस चढविलें. तो पुढील कारकिर्दींत सुद्धां दिल्लीसच राहत असे. जयसिंगाची बहीण बुधसिंगास दिलेली असून, जयसिंगाचें व त्याचें वांकडें होतें.

स. १७०८त बहादुरशहानें कामबक्षावर दक्षिणेंत स्वारी केली तेव्हां जयसिंह व अजितसिंह यांस त्यानें आपल्या बरोबर घेतलें असतां, बादशहा नर्मदा पार होतांच, दोघेही मागच्या पाया मागें फिरले ते उदेपुरास येऊन तेथें अमरसिंहाचे मसलतीनें त्रिवर्गांनीं बादशहाचे विरुद्ध एक नवीन करार केला, (स. १७०९-१०). औरंगजेबाच्या दुष्ट राजनीतीचा हा परिणाम होय. आपल्या मुली मुसलमानांस द्यावयाच्या नाहींत, आणि इतःपर बादशहास कोणत्याही प्रकारें मदत अगर त्याची नोकरी करावयाची नाही, असा या कराराचा आशय होता. हा करार पार पाडण्यासाठीं बादशहाशीं झगडावें लागल्यास मराठ्यांची मदत आपणास मिळावी अशी रजपुतांनीं आशा ठेविली. सय्यदांचे

कारकीर्दीत रजपूतमराठ्यांचें ऐक्य असल्याचें हें एक कारण आहे. रोगापेक्षां उपायच रजपुतांस जास्त अपायकारक झाला, अशी यासंबंधीं टॉडची टीका आहे. वरील उपक्रमानें उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांचा संचार सुलभ झाला. (मु.रि.पृ.८२४).

वरील करार म्हणजे बादशहाचा उघड अपमान होय. अकबराच्या वेळेपासून रजपुतांच्या मुली बादशहाच्या घराण्यांत येत असून ते राजे बादशहाच्या पदरीं नोकरी करीत. हा प्रघात रजपुतांनीं उघडपणें सोडल्याबद्दल त्यांची खोड मोडण्याचा विचार सय्यदांनीं ठरविला. हुसेन सय्यदानें अजितसिंगावर स्वारी केली, (नोव्हेंबर १७१३–जुलै १७१४). रजपुतांनीं प्रथम सय्यदांचा पराभव केला. या प्रसंगीं त्रिवर्ग रजपुत राजे सांबर सरोवराचे कांठीं जमून तीच त्यांनीं तीन राज्यांची सरहद्द ठरविली; आणि त्या सरोवरांतील मिठाचें उत्पन्न तिघांनीं सारखें वांटून घेण्याचा व पूर्वीचे करार बिनचूक पाळण्याचा पुनः निश्चय केला- त्यानंतर त्रिवर्ग राजे पृथक् होतांच, सय्यद हुसेननें अजितसिंगास एकटाच गांठिलें आणि त्याचा पाडाव करून त्यास शरण येण्यास भाग पाडिलें. अजितसिंगाचा नाइलाज असो, अथवा आपमतलबास्तव असो, त्यानें आपली मुलगी बादशहास देण्याची आणि मुलगा व आपण दोघांनीं बादशहास शरण जाऊन त्याची नोकरी करण्याची कबुली लिहून दिली. याप्रमाणें रजपुतांचा कट सय्यदांनीं फिसकटविला; आणि अजितसिंगाचा मुलगा अभयसिंग यास बादशहाच्या तैनातीस आणिलें, ( जुलै १७१४ ). मुलगी इंद्रकुमारी मागून समारंभानें यावयाची होती. पुढें ता. २३ सेप्टेंबर सन १७१५ रोजीं मोठ्या समारंभानें ती दिल्लीस पोंचली. नंतर चार दिवसांनीं तिला मुसलमानी दीक्षा देण्यांत येऊन बादशहाशीं तिचें लग्न सय्यद हुसेनच्याच वाड्यांत मोठ्या थाटानें झालें. लग्नाची एकंदर व्यवस्था वजीर सय्यद अब्दुल्ला यानें ठेविली होती. दोन महिनेपावेतों दिल्लींत हा लग्नसोहळा अपूर्व झाला. लग्नापूर्वी महिनाभर बादशहा मूळव्याधीनें आजारी होता, त्यास ईस्ट इं. कं. चा वकील सर्जन हॅमिल्टन यानें शस्त्रप्रयोग करून बरें केलें, त्याजबद्दल बादशहानें कंपनीस हिंदुस्थानांत जकातीची माफी व कांहीं प्रदेश कायमचा लिहून दिला. तोच इंग्रजी राज्याचा येथें आरंभ होय. ( ब्रि. रि. पृ. ५१३ ).

याप्रमाणें अजितसिंगास वठणीस आणल्यावर, बहादुरशहानें माफ केला होता तो, जिझिया कर या सय्यदांनीं रजपुतांवर पुनः लागू केला. इनायतुल्ला

नांवाचा एक वृद्ध इसम औरंगजेबाचे तालमेंत वसुलाच्या कामांत तयार झालेला दिल्लीस होता, त्यास सय्यदांनीं मुद्दाम या जिझियाच्या वसुलीकरितां पुनः दिवाण नेमिलें. अजितसिंग व अभयसिंग यांनीं आलेल्या संधीचा फायदा घेऊन आपलें राज्य वाढविण्याचा उद्योग केला. अजीतची नेमणूक गुजराथच्या सुभ्यावर झाली, तेव्हां सन १७१६ त बापलेकांनीं तिकडे जाऊन बराच नवीन प्रदेश हस्तगत केला. हे बापलेक मोठे कपटी व स्वार्थी होते. त्यांनीं स्वतः फायद्याकरितांच बादशहास मुलगी दिली कीं, खरोखरच तसें करणें त्यांस भाग पडलें, ह्याचा निर्णय होत नाहीं. एवढें खरें कीं, वर सांगितलेला करार मोडण्यास तेच कारण झालें आणि ह्यामुळेच पुढें राजपुतान्यांत अंतर्वैमनस्यें उत्पन्न होऊन तेथें पुढें मराठ्यांचा प्रवेश झाला. जयपुरचा राजा सवाई जयसिंग याची व पेशवा बाळाजीची मैत्री शंकराजी मल्हारानें जुळवून दिली, ती जयसिंगाच्या मृत्युपर्यंत कायम होती. रजपूत व मराठे दोघेही बादशाहींतील कमकुवतपणाचा फायदा घेऊन आपला मतलब साधूं लागले.

८. हुसेन सय्यदाच्या दक्षिणेंतील कारभार, मराठ्यांशीं चौथाईचा तह, (एप्रिल १७१५–नोव्हेंबर १७१८).—दक्षिणच्या सुभ्यावर नेमणूक होऊन, हुसेन सय्यद ता. ५ एप्रिल १७१५ रोजीं दिल्ली सोडून निघाला. परंतु त्यास कारभार न देतां मारून टाकावें, असा बादशहानें दाऊदखान पन्नीस आगाऊच हुकुम पाठविला होता. हुसेन अली नर्मदेवर आला, तेव्हां त्यास बातमी लागली कीं दाऊदखान पन्नी हा बऱ्हाणपुर येथें आपणावर चालून आला आहे. दाऊदखानस त्यानें परत जाण्याचा हुकूम पाठविला; परंतु तो दाऊदनें मानला नाहीं त्या वेळीं शाहूचा सेनापति नेमाजी शिंदे मोठ्या फौजेनिशीं बऱ्हाणपुरास येऊन, वरील दोघां मोगल सरदारांचा पुढें काय प्रकार होतो त्याजवर नजर देऊन बसला होता. बऱ्हाणपुर नजीक लालबागच्या मैदानांत दाऊदखान व हुसेनअली यांची ता २६ ऑगस्ट १७१५ रोजीं लढाई होऊन दाऊदखान मारला गेला. पुढें तीन वर्षेपावेतों हुसेन अलीनें दक्षिणचा कारभार केला.

हुसेन अलीचा पाडाव करण्याविषयीं मराठ्यांसही अंतस्थ रीतीनें बादशहानें चेतविलें होतें. त्यावरून त्यांनीं मोगलांचे मुलखांवर हल्ले सुरू केले. खंडेराव दाभाडे

यानें खानदेश व गुजराथ प्रांतावर स्वाऱ्या करून, त्या दोन प्रांतांमधला दळणवळणाचा रस्ता आपल्या कबजांत घेतला. तेव्हां हुसेन अलीनें झुल्फिकारबेग नांवाच्या सरदारास खंडेरावावर पाठविलें. खंडेरावानें युक्तीनें मोगलांची पांगापांग करून डोंगरी प्रदेशांत झुल्फिकारबेगासुद्धां त्याची फौज कापून काढिली. तेव्हां हुसेन अलीनें आपला दिवाण मुहकमसिंग व चंद्रसेन जाधव यांस दाभाड्यावर रवाना केलें. त्या वेळीं दाभाड्याचे मदतीस दावलजी सोमवंशी होता. अहमदनगरनजीक उभय पक्षांची निकराची लढाई होऊन जयापजयाचा निकाल लागला नाहीं.[१] दाभाडे व सुलतानजी निंबाळकर यांनीं पुढें मोगलांचा पूर्ण पराभव केला, शके १६३९ वैशाख वद्य ९ ( ता. २४–४–१७१७ ). थोड्याच दिवसांपूर्वी ११-१-१७१७ रोजीं शाहूनें मानसिंग मोरे याजकडून सेनापतिपद काढून तें खंडेरावास दिलें. त्यापूर्वी दाभाड्याला सेनाखासखेलीचा हुद्दा होता, तो आतां काढून घेण्यांत आला.[२] या पुढें दाभाड्यानें गुजरात व काठेवाडकडे मराठ्यांचा अंमल बसवावा असा हुकूम त्यास शाहूनें दिला. ' दरमाहा हुजूर खर्चास ऐवज देत जावा, फौज बाळगावी, थोरले महाराज धान्य व नक्त श्रावणमासीं धर्मादाय देत असत, तो सेनापति यांनीं आपल्या तालुक्यापैकीं, दोन चार लाख रुपये खर्चून, कोटिलिंगें ब्राह्मणांकडून करवीत जावीं, ' असा या वेळीं सेनापतीस हुकूम देण्यांत आला. यावरून पुढें श्रावणमासची ब्राह्मणांची दक्षिणा सेनापतीच्या मार्फत होऊं लागली.

दाऊदखान मेल्यावर सय्यदांचे अनिष्टाविषयीं बादशहा गुप्तपणें मराठ्यांस लिहीत असे. त्याचा परिणाम वरील युद्धप्रसंग होत. पुढें मराठे प्रबळ होऊं लागले. दाऊदखानाशीं झालेल्या ठरावानें मराठ्यांस चौथाई मिळाली असतां, हल्लीं ते मोगलांच्या सहा सुभ्यांतून सरदेशमुखीही आपली वतनबाब समजून वसूल करूं लागले. बादशहाचा अविश्वास व मराठ्यांचा उपद्रव यांमुळें हुसेन सय्यदानें त्यांजबरोबर सख्य जोडून त्यांची मैत्री संपादण्याचा विचार चालविला. मराठ्यांवर मेहेरबानी करावी असें सय्यद हुसेन अलीचे मनांत मुळींच नव्हतें. मराठ्यांच्या बंदोबस्तासाठीं त्यानें फौजही मोठी जमविली. परंतु बादशहानेंच सय्यदां-

१ खं. २ पृ. २८; शा. रो. ३७३; इ. वृ. १८३७ ले. ११०; पे. द. पृ. १६.
२. शा. रो. १५६; पे. द. पृ. ३४९.

विरुद्ध सारखीं कारस्थानें चालविल्यामुळें हुसेनचा इलाज चालेना; आणि पुढें जेव्हां स्वतःच्याच अंगावर बाजू येण्याचा जोर दिसूं लागला, तेव्हां मराठ्यांशीं गोडी करून बादशहास शह देण्याचा विचार हुसेन अलीनें केला. शेखजादा अन्वरखान म्हणून बऱ्हाणपुरचा अधिकारी हुसेन अलीचा दोस्त होता, त्यानें मराठ्यांशीं स्नेह करण्याची आणि या कामीं शंकराजी मल्हाराची मध्यस्थी स्वीकारण्याची सल्ला हुसेन अलीस दिली. हा शंकराजी मल्हार पूर्वी राजारामाचे वेळेस सचिव होता, परंतु पुढें तें काम सोडून तो काशीस गेला,[1] आणि तेथून दिल्लीस जाऊन मराठ्यांच्या तर्फेनें अनेक कारस्थानें करूं लागला. खाफीखान लिहितो, शंकराजी मल्हारास बादशहानें मुद्दाम हुसेन अलीबरोबर कारभारी म्हणून दक्षिणेंत पाठविलें. त्यानें बाळाजी विश्वनाथ व चिमणाजी दामोदर यांचे मार्फत शाहूशीं वाटाघाट चालविली. तह ठरविण्याकरितां शंकराजी मल्हार सातान्यास आला. तेथें शाहूनें त्याची बरदास्त फार चांगली ठेविली. तहाच्या वाटाघाटीचें वर्णन शाहूचे चरित्रांत दिलेलें हृदयंगम आहे,[2] बरेच दिवस खल होऊन शेवटीं हुसेन अलीच्या मार्फत शाहू व बादशहा यांचा तह मुक्रर झाला तो असाः--१ शिवाजीच्या वेळचें स्वराज्य, तमाम गडकोट सुद्धां शाहूचे हवालीं करावें;[२] अलीकडे मराठे सरदारांनीं जिंकलेले प्रदेश म्हणजे खानदेश, गोंडवण वऱ्हाड, हैदराबाद, कर्नाटक या भागांतले, यादींत नमूद केल्याप्रमाणें मोगलांनीं सोडून देऊन ते मराठ्यांच्या स्वराज्यांत सामील व्हावे; [ ३ ] मोगलांच्या दक्षिणेंतील मुलखांवर चौथाई व सरदेशमुखीचे हक्क मराठ्यांनीं वसूल करावे. या चौथाईचे बदल्यांत आपली पंधरा हजार फौज मराठ्यांनीं बादशहाचे मदतीस ठेवावी आणि सरदेशमुखीचे बदल्यांत मोगलांचे मुलखांत मराठ्यांनीं चोऱ्या वगैरेचा बंदोबस्त करावा; [ ४ ] कोल्हापुरच्या संभाजीस शाहूनें उपद्रव करूं नये; [ ५ ] मराठ्यांनीं दरसाल बादशहास दहा लाख रुपये खंडणी द्यावी, [६] आणि शाहूची मातुश्री, कुटुंब, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग वगैरे दिल्लीस बादशहाचे कबजांत आहेत, त्यांस सोडून स्वदेशीं पावते करावें. असा या तहांतील कलमांचा मुख्य मतलब होता.[3]

---

१ म. रि. पू. पृ. ६७१. २ पृ. ३८, ३९ ३ तह व करारमदार पृ. १–९; खं. ८ ले. ७८ मध्यें तपशील पहावा व पत्रव्यवहार ले. ७७, ७८, ८०; भा. व. प. या. १–४०; खं. २ पृ. ३१; शा. च. पृ. ३८.

थोड्या बहुत फरकानें हा तह सन १७१८त हुसेन अलीनें मंजूर केला; मात्र त्याजबद्दलचें बादशहाचें फर्मान पुढें यावयाचें होतें. शाहूनें हा तह लगेच अमलांत आणण्यास सुरवात केली, आणि 'स्वामींचें स्वराज्य देखील ठाणीं पातशहांनीं स्वामींस बहाल केलें आहे, त्याच्या सनदा अमीरुलुमराव हुसेन अलीखान यांणीं दिल्या आहेत, ऐशियास मोगलाई तर्फेचा ऐवज मोगलांकडे अगर दुसरियाकडे न देणें, नक्त जमेच्या आकारापैकीं निमे ऐवज मोगलांकडील हुजूर वसूल देणें,' असे शाहूचे हुकूम ऑगस्ट १ स. १७१८ चे आहेत. ( खं. ३. ९९–१०० ).

या तहानें व त्याच्या वाटाघाटीनें महाराष्ट्रांत शाहूचें वजन वाढून त्याचा जम बसला. त्याचें कर्तृत्व लोकांस दिसूं लागलें, तसा त्याचा वचक बसत चालला. अष्टप्रधान व सरदार त्याचे हुकूम बिनतक्रार बजावून बाहेर संचार करूं लागले. राज्यकारभाराची व्यवस्था होण्याबरोबर मुलखांत शांतता व आबादानी होऊं लागली. ' हुजूर बोलाविलें असतां एक क्षणाचा विलंब व उजूर न करितां येऊन पावावें. सुभ्याचा व पदाची घालमेल झाली आणि सनद गेली, म्हणजे तसेंच त्या क्षणीं काम त्याचे हवालीं करून हुजूर निघून यावें, कांहीं अवज्ञा करूं नये. सर्व निष्ठेनें चालूं लागले. ' ( शा. च. ३६. )

मराठ-मंडळाचें लक्ष घरगुती भांडणांतून काढून बाहेरच्या उद्योगांत लावण्याचा बाळाजी विश्वनाथाचा मतलब सिद्धीस गेला, आणि मराठ्यांच्या उद्योगास नवीन क्षेत्र प्राप्त झालें. तहाचा मतलब पाहिला असतां, हिंदुस्थान देश जिंकितांना वेल्स्ली वगैरे इंग्रज मुत्सद्यांनीं पुढें सुरू केलेली तैनाती फौजेची पद्धत, ह्या वेळीं मराठ्यांनींच सुरू केली असें ह्मणतां येईल. बादशहाच्या तैनातीस आपली फौज देणें म्हणजे त्याच्या संरक्षणाची हमी आपल्याकडे घेतल्यासारखें होतें. मात्र शाहूनें बादशहास खंडणी कबूल केली, याचा अर्थ उघड स्वातंत्र्य धारण करण्याची छाती शाहूची नव्हती हें वर सांगितलेंच आहे. त्या चौथाई व सरदेशमुखीचे हक्क म्हणजे हल्लीं चीन वगैरे परावलंबी राष्ट्रांना कर्ज देतांना युरोपीय राष्ट्रें कस्टम्स म्हणजे जकातीचें उत्पन्न तारण लावून घेतात, तशा प्रकारचे असून, त्यांच्या योगानें मराठ्यांना सर्व हिंदुस्थानभर संचार करण्याची मोकळीक झाली, इतकेंच नव्हे तर पुढील इंग्रज मुत्सद्यांप्रमाणें, तें

त्यांचें कर्तव्यच झालें. स्वहित संभाळण्यासाठीं आजूबाजूच्या सत्ताधीशांसंबंधानें इंग्रजांस हिंदुस्थानांत चढावाची राज्यपद्धति ( Vigorous policy ) स्वीकारावी लागली तोच बहुतेक प्रकार मराठ्यांचाही झाला. अर्थात् ह्या तहानें मराठशाहीच्या कारभारास निराळें वळण लागलें. नवीन जबाबदारी व नवीं कर्तव्यें उत्पन्न झालीं. पूर्वींची व्यवस्था बदलली. नवीन मनु सुरू झाला मराठशाहीचें हें रूपांतर बाळाजी पेशव्यानें उपस्थित केलें, आणि पुढील पुरुषांनीं त्याच्या परिपोषाचा उद्योग केला. याचे परिणाम काय झाले तें पुढें पाहतां येईल. मात्र या पद्धतीचा उगम कसा झाला एवढेंच येथें ध्यानांत ठेवावयाचें आहे.

या वेळीं समस्त सरदार व सरकारकून शंकराजी मल्हार मुद्दां सातान्यास जमा झाले असून,[१] तहाच्या वाटाघाटीची एकंदर हकीकत वारंवार शाहूस कळविण्यांत येत होती, आणि शाहूकडून त्यासंबंधानें लगोलग जबाबही जात होते हें खालील पत्रावरून निदर्शनास येतें. तहांतील प्राप्तीपेक्षां मातुश्रीसंबंधानें शाहू किती आतुर होता याचाही त्यांत उल्लेख आहे. अशा क्वचित् उपलब्ध होणाऱ्या पत्रांवरून सामान्यतः सर्व सरदार आपल्या उद्योगाची कच्ची हकीकत वारंवार शाहूस कळवून त्याच्या हुकुमाप्रमाणें वर्तत होते, आणि शाहूही चहूंकडे चाललेल्या प्रचंड उद्योगाचा व्याप मोठ्या हौसेनें सहन करीत होता, असें दिसून येतें.

" स्वस्तिश्री राज्याभिषेक शके ४४ हेमलंबीनाम संवत्सरे ( २४ फेब्रुवारी १७१८ ) फाल्गुन शु. ५ इंदुवासरे, क्षत्रियकुलावतंस श्री राजा शाहू छत्रपतिस्वामी यांणी रा. रा. यादवराव मुनशी यांस आज्ञा केली ऐसिजे. तुम्हीं माघ बहुल १३ चें विनंतिपत्र पाठविलें तें फाल्गुन शुद्ध ४ स प्रविष्ट होऊन वर्तमान विदित जालें. सरदेशमुखीचा परवाना पहिले आला होता तो गलत करून हल्लीं नवा परवाना सिद्ध करविला, त्याची नक्कल काजीचे मोहरेनिसी पाठविली असे, व पहिले पेशकसी मोकरर झाली होती त्याचप्रमाणें जोर बजोरे रदबदल करून स्वामीस कळण्यास पाठविली आहे. यावरून सेवकाचे चाकरीचा मजुरा होईल, म्हणोन कित्येक प्रकारें लिहिलें. ऐशास जो पूर्वीं रा. प्रधानपंतीं निर्वाह केला होता, त्या संबंधें दुसरी बोली असेलेली याकरितां तुम्हीं सेवकलोक व तुम्हांस

१ व. प. नि. पृ. ७४, ता. ६.१०.१७१८.

जें लिहिणें तें लिहावें लागलें. येथील आज्ञेवरून तेथें तुम्हांस रदबदलेस जोर पोहोंचला, आणि पहिलेच मोकरर बेरजेवरी काम होऊन आलें. तथापि तुमच्या शहाणपणास अगर कष्ट मेहनतीस स्वामींनीं शब्द लाविला ऐसा अर्थ नाहीं. हे प्रसंगीं तुम्ही श्रम साहस केलेती तदनुरूप तुमचें ऊर्जित करणें आवश्यकच आहे. तुम्हीं आपले मनांत कदापि विपर्यास न मानणें. ऐेही स्वामिकार्यावरी एकनिष्ठपणें राहोन स्वराज्याची सनद सत्वरच तयार करून घेणें. रा. शंकराजी पंताच्या व तुमच्या लिहिल्यावरून चौथाई व सरदेशमुखी परवाना व स्वराज्याची सनद ऐसे तीनही मतलब तों विल्हे लागले. राहिलें मातुश्री येसूबाईसाहेब व चिरंजीव रा. मदनसिंग यांचें आगमन ( दिल्लीहून ) जालें आणि स्वामींची व त्यांची भेटी जाली, म्हणजे नबाबाच्या वचनाप्रमाणें रा. शंकराजी पंत दरम्यान पडिले आणि तुम्ही कष्ट मेहेनत केली त्याची सार्थकता होऊन अवघेच मतलब सिद्धीस पावले. तर मातुश्रींचेविशीं व चिरंजीवांचेविशीं प्रतिक्षणीं स्मरण देऊन त्यांचें अविलंबें आगमन होय ते गोष्टी करणें. विस्तारें राजश्री शंकराजीपंत यांचे पत्रीं लिहिलें आहे त्यावरून कळेल. थैल्या जिलबी (?) सुमारें २५ देखील दोरण्या व लाख वजन पक्की एक शेर ऐसें जरूर जाणोन सत्वर पाठविणें. जाणिजे. बहुत काय लिहिणें." [1] यांत उल्लेख केलेला यादवराव मुनशी हा शाहूनें सय्यदांकडे बोलणें करण्यास पाठविलेला आपला वकील यादवराव बाजी प्रभु पारसनीस होय. यादोराव वकील असा याचा उल्लेख तहांत आहे.[2]

**९. मराठ्यांचें दिल्लीस प्रयाण,** (नोव्हेंबर १७ ८–जुलई १७१९).– कराराप्रमाणें मराठ्यांची फौज खंडेराव दाभाडे याच्या हाताखालीं औरंगाबादेस येऊन उतरली. हुसेन अलीनें या तहाची खबर बादशहास देऊन, त्याजकडून कबुलीचें फर्मान मागितलें. आपल्या रियासतींत अशा प्रबल शत्रूंस आणणें बादशहास व त्याचे सल्लागारांस मुळींच रुचलें नाहीं म्हणून त्यानें तो नाकबूल केला. शिवाय हुसेनअलीचा नकशा उतरविण्याकरितां बादशहानें दक्षिण प्रांतांत पुष्कळ इसम नेमिले, परंतु त्यांस हुसेनअलीनें जुमानिलें नाहीं. बादशहाचें व सय्यदांचें वितुष्ट उत्तरोत्तर वाढत चाललें. बादशहानें निजामुल्मुल्कला मुरादाबादच्या सुभ्यावरून काढून आपल्याजवळ बोलाविलें. सरबुलंदखानाकडे

1 हें पत्र रा. य. रा. गुप्ते यानीं मेहेरबानीनें दिलें. २ त. क. पृ. ८, शा.च पृ. ३१.

पाटणाचा सुभा होता, त्यास व अजितसिंगास गुजराथेंतून त्यानें आपल्याजवळ बोलावून घेतलें. या सरदारांच्या फौजा दिल्लींत आल्या, तेव्हां सय्यद अब्दुल्लानेंही आपली फौज वाढविली. प्रसंग लवकरच हातघाईवर येणार असा सुमार दिसूं लागला. म्हणून अबदुल्लानें भाऊ हुसेन यास तावडतोब दिल्लीस बोलाविलें. वरील तहास अनुसरून हुसेनअलीनें मराठयांची फौज आपल्या मदतीस आणविली. दिल्लीस जाण्याचें हें कारस्थान शाहू व बाळाजी यांनीं अंगावर घेतलें. दिल्लीस फौजा पाठविण्याची सारी खटपट खंडो बल्लाळ यानें केली असाही उल्लेख आहे. खंडेराव दाभाडे, उदाजी पवार व कान्होजी भोसले यांस फौजांबरोबर जाण्याची आज्ञा शाहूनें केली. कान्होजी स्वतः गेला नाहीं. त्यानें आपले बंधु संताजी व राणूजी भोसले यांस पाठविलें. बाळाजीनें आपला पुत्र बाजीराव व बाळाजी महादेव भानु फडणीस यांस बरोबर घेतलें. फौजेच्या खर्चाबद्दल नर्मदा नदी उतरल्यापासून परत येईपावेतों दररोज एक ठरीव रकम देण्याचा व बादशहाकडून तहाच्या कबुलीचें फर्मान देवविण्याचा हुसेनअलीचा करार होता.

अर्विन लिहितो. 'हुसेन सय्यदानें बादशहावर शह बसविण्यासाठीं एक विलक्षण युक्ति योजिली. औरंगजेबाचा मुलगा अकबर संभाजीकडे येऊन पुढें इराणांत पळून गेला, त्यास मुइनुद्दीन नांवाचा मुलगा असून तो शाहूच्या हस्तगत झालेला आहे; आणि आपली मातुःश्री व बंधु दिल्लीस कैदेंत आहेत त्यांची सुटका केल्यास आम्ही मुइनुद्दीन यास तुमचे हवालीं करतों, असें शाहूचें 'बोलणें आपल्याकडे आलेलें आहे, अशी हकीकत हुसेनअलीनें बादशहास कळविली. बादशहास ती गोष्ट मान्य होऊन त्यानें मुइनुद्दीनास तावडतोब दिल्लीस पाठवावें, आणि आपण शाहूची मंडळी सोडतों असें कबूल केलें. हा सगळाच प्रकार बनावट होता. मुइनुद्दीन नांवाचा राजपुत्र म्हणून कोणीच नव्हता. परंतु हुसेनअलीनें औरंगाबादेजवळ आपल्या मुक्कामाशेजारीं तंबू वगैरे मारून एक भव्य उतारा तयार केला, आणि राजपुत्र आला असें दाखविण्याकरितां मिरवणूक काढून एक इसम तसा तयार करून ठेविलेला तेथें आणिला. पुढें रोजचे रोज हुसेनअलीनें या राजपुत्रास जाऊन भेटण्याचे वगैरे बाह्योपचार यथास्थित केले. अशा रीतीनें दिल्लीपावेतों या राजपुत्राचें सोंग नेण्यांत आलें. बाहुधा हा प्रकार शंकराजी मल्हारच्या युक्तीनें शाहूची मंडळी सोडविण्यासाठीं उपयोजिला असावा.

' सय्यद हुसेननें दक्षिणेंतून निघण्यापूर्वी ठिकठिकाणीं आपल्या तर्फेचे कामगार नेमिले. आलमअली नांवाचा त्याचा पुतण्या होता त्यास दत्तक घेऊन आपला मुख्य प्रतिनिधि म्हणून औरंगाबादेस ठेवून, सैफुदीन अली नांवाचा त्याचा आणखी एक भाऊ होता, त्यास खानदेशचा कारभार दिला. शंकराजी मल्हारवर हुसेनचा मोठा भरंवसा होता, त्यास आलमअलीजवळ ठेवून त्याच्या सल्यानें चालण्याविषयीं त्यानें आलम अलीस ताकीद दिली. मराठ्यांशीं पूर्ण सख्य राखण्याची हुसेनची इच्छा असून, त्यांच्याच मदतीवर त्याची मोठी भिस्त होती. अशी सर्व तयारी करून स. १७१८ च्या नोव्हेंबरांत हुसेन अली औरंगाबाद सोडून निघाला. त्याजबरोबर अकरा बारा हजार मराठ्यांची फौज असून बाळाजी विश्वनाथ, खंडेराव दाभाडे, संताजी भोसले वगैरे सरदार होते. दररोज दर शिपायास एक रुपया ( कोर्णी म्हणतात आठ आणेप्रमाणें ) रोजमुरा ठरला होता. मराठे लष्कराचा व सरदारांचा मानमरातब चांगला ठेवण्यांत आला. दिल्लींत कांहीं तरी मोठी गडबड उडाली आहे, अशा अफवा औरंगाबादेस सर्वतोमुखीं चालू होत्या. हुसेनअलीनें १४ डिसेंबर रोजीं बऱ्हाणपुर सोडिलें, आणि २६ डिसेंबर रोजीं उज्जेन सोडलें. रस्त्यांत सवाई जयसिंह व मुहकमसिंग[1] बुंदेला हे त्यास येऊन मिळाले.

१ टीप.—मुहकमसिंगाचें नांव बखरींतून वगैरे आढळतें. हा बुंदेला सरदार या प्रसंगीं सय्यदांचा साह्यकर्ता असून औरंगजेबाचे वेळेपासून बादशाही फौजेंत नोकर होता. ' जाजवच्या लढाईत रामसिंग बांडे यांनीं तलवार चालविली त्यांत कित्येक लोक मेले व जखमी झाले. ते समया मुहकमसिंग यांनीं बांड्यावर वार केलें, तेणेंकरून शीर उडालें, धड राहिलें तें कबंध कांहीं वेळ नाचूं लागलें. लोकांस आश्चर्य जालें. सय्यद हुसेनचा खून झाला तेव्हां मुहकमसिंग त्याजवळ होता. सय्यदांचे पश्चात् तो वजीर अमीनखानास शरण गेल्यावर त्यानें त्यास सहा हजारी मनसब दिली; आणि निजामाकडे मदतीस दक्षिणेंत पाठविलें. तेव्हां मुहकमसिंग व चंद्रसेन यांनीं शाहूच्या प्रदेशावर चाल केली असतां शाहूनें सरलष्करास त्यांजवर पाठवून त्यांचा पराभव केला [ भारतवर्षांतील गोविंद खंडोकृत शा. म. ब. पृ. ४२; खं. २ पृ. ३५ ].

'अशा तयारीनें हुसेनअली येतोसा पाहून बादशहाचें धाबें दणाणलें. वरचेवर भरंवशाचे सरदार पाठवून, हुसेन अलीची समजूत घालून त्यानें परत जावें म्हणून बादशहानें नाना उपाय केले. माळव्यांत असतांनाच मराठ्यांच्या सर्व मागण्या बादशहानें कबूल केल्या. तेव्हां हुसेनचीही इच्छा परत यावें अशीच होती. परंतु शाहूचीं बायकामुलें हस्तगत झाल्याशिवाय मराठे मागें फिरतना. त्यावरून हुसेनअलीनें दिल्लीसच जाण्याचा विचार कायम केला. हें पाहून बादशहानें वजीर अबदुल्लाची नानाप्रकारें समजूत केली. अजितसिंगाचें व वजिराचें सख्य होतें, म्हणून खान डौरान यास गुजराथच्या सुभ्यावरून काढून तो कारभार व ' राजराजेश्वर ' किताब बादशहानें अजितसिंगास दिला; तसेंच जयसिंगास ' राजाधिराज ' व राजेंद्र ' हे किताब देऊन खुष केलें.

सन १७१८त मराठ्यांनीं माळवा प्रांतांत ठाणे दिले, त्यांस काढून लावण्याकरितां बादशहानें निजामुल्मुल्कचा चुलता महंमद अमीनखान याची त्या प्रांतावर नेमणूक केली. हुसेनअली येत आहे असें ऐकतांच अमीनखान, हुकमाशिवाय, माळव्याचा कारभार सोडून,एकदम दिल्लीस आला,(जानेवारी १७१९). त्यामुळें बादशहाची महंमद अमीनखानावर मोठी इतराजी झाली. हाच सरदार पुढें सय्यदांचे पाडावांत मुख्य असून कांहीं दिवस वजिरीवर होता.

शेवटीं सन१७१९च्या फेब्रुवारींत हुसेनअली दिल्लीस पोंचला. त्याच संधीस निजमाचें साह्य बादशहास पूर्णपणें न मिळाल्यामुळें त्यास त्यानें बहारच्या सुभ्यावर पाटणा येथें पाठविलें. हुसेनअलीची समजूत कशी पाडावी हें बादशहास समजेना. दोघे बंधु आपापल्या परी बंदोबस्तानें पुढे काय प्रकार होतो तें पहात पृथक स्थळीं छावण्या देऊन दिल्लीच्या जवळ राहिले. हुसेनअलीजवळ तीस हजार फौज होती. बादशहा व शहर सर्व चपापून गेलें होतें. सर्व मोठमोठे इसम निरनिराळे बेत व वाटाघाटी करूं लागले. बादशहास पदच्युत करून त्याचे जागीं दुसरा इसम नेमण्याची तयारी सय्यदांनीं चालविली जयसिंगानें बादशहास सल्ला दिली, का, एकदम जाऊन सय्यदांवर हल्ला करावा. परंतु बादशहास इतकें धाडस नव्हतें; उलट वजीर अबदुल्लाचे सांगण्यावरून जयसिंगास आपले राज्यांत निघून जाण्याचा हुकूम बादशहानें स्वहस्तानें लिहून पाठविला. ता. २२ फेब्रुवारी रोजीं जयसिंग दिल्लीतून निघून गेला.

१०. **दिल्लींतील राज्यक्रान्ति व सय्यदांची प्राप्ति** (मार्च १७१९).– ता. २३ फेब्रुवारी १७१९ रोजीं बादशहाची व सय्यदांची भेट सरकारवाड्यांत झाली. अजितसिंग जवळ होता. सय्यदांची सर्व फौज बरोबर वाड्याबाहेर होती. बादशहानें विचारिलें, मूइनुद्दीनखानास तुह्मी कैद करून आणलें आहे ह्मणून कळविलें तो कोठें आहे ? हुसेननें उत्तर दिलें, ' शाहूची मंडळी सोडून द्या म्हणजे त्यास आणतों.' त्या प्रमाणें बंधु नांवाचा एक गृहस्थ, तीस वर्षें कैदेंत असलेला, बाहेर आणून मराठ्यांचे स्वाधीन करण्यांत आला. हा बंधु मदनसिंग असावा. दुसरे दिवशीं मूइनुद्दीन यास आणण्याचें ठरलें सहा तास वादविवाद होऊन सर्वांची गोडी झाली असा लोकांचा त्या वेळीं अंदाज झाला. पण एकंदर वातावरण क्षुब्ध होतें. शिकारीच्या निमित्तानें बाहेर पडून हुसेनअलीचा खून करावा असा बादशहाचा बेत चालला होता. पण ही बातमी हुसेनास होतीच. तारीख २७ रोजीं सकाळींच सय्यद अब्दुल्ला मुहकमसिंगास लाहोर गेटावर फौजबंद ठेवून आपण राजवाड्यांत गेला. इकडे हुसेनअलीनें आपली तीस चाळीस हजार फौज शहरांत आणून ठिकठिकाणीं नाकेबंदी केली,आणि मराठी फौज राजवाड्याचे बाहेर ठेवून आपणही राजवाड्यांत गेला. वजीर अब्दुल्ला व अजितसिंग रात्रभर वाड्यांत राहिले. बादशहाची व त्यांची पुष्कळ बोलाचाली व शिवीगाळ झाली. बादशहाचा राग अनावर झाला. सय्यदांनीं वाडा ताब्यांत घेऊन शहराची नाकेबंदी केली. ता. २८ फेब्रुवारी स. १७१९ रोजीं सकाळीं दिल्लींत भयंकर देखावा दिसूं लागला. जिकडे तिकडे सय्यदांच्या फौजा दौडत होत्या. महंमद अमीनखान कांहीं लष्करी लोकांसह वाड्यांत जात असतां रस्त्यांत मराठ्यांची गर्दी होती, त्या गर्दीतून अमीनखानाचे लोक एकमेकांस लोटीत जाऊं लागले, तेव्हां त्यांची व मराठ्यांची मारामारी सुरू झाली. या मारामारींत मराठे पळून जात असतां त्यांचे लोक दोन हजारपर्यंत कापले गेले.[१]

इकडे सय्यदांना बादशहास कैद करून रफीउद्दराजत यास बादशाही तख्तावर बसविलें. त्यानंतर दोन महिन्यांनीं फर्रुखसियरचा खून करण्यांत आला. या कामांत अजितसिंगाचें सय्यदांस साह्य असल्यामुळें त्याची लोकांत मोठी नाचक्की

१ टीप–या पळापळीचें व भित्रेपणाचें रसभरित वर्णन काफीखान वगैरेनीं दिलें आहे, तें खरें नाहीं असें वरवर पाहणारालाही दिसून येतें.

झाली. रस्त्यानें अजितसिंग व त्याचे लोक जाऊं लागले म्हणजे नाना तऱ्हेच्या शिव्या देऊन लोक त्यांची उघड निंदा करीत असत. बुधसिंगानें मात्र बादशहास झाली तेवढी मदत केली. त्यांत त्याचा चुलता जैतसिंग व त्याचे दुसरे पुष्कळ साथीदार मारले गेले. कोटयाचा भीमसिंग सय्यदांस सामील होता, त्यानें बुधसिंगाचा पाडाव केला. तेव्हां बुधसिंगानें दिल्लींतून पळून जाऊन आपला बचाव केला. सय्यदांचें प्राबल्य झाल्यावर जयसिंग वगैरे प्रमुख राजे बादशाहींतून आपलें अंग काढून आपापल्या राज्यांत निघून गेले. वास्तविक त्यांचें मन बादशहाशीं अनुरक्त नव्हतेंच.

लगेच माळव्याच्या सुभेगिरीवर निजामाची नेमणूक झाली. पूर्वी झालेले करार पुरे करून मराठे सरदारांस व फौजेस सय्यदांनीं दक्षिणेंत पाठविलें. मदनसिंग व बाया मंडळी कैदेंत होती, ती बाळाजी विश्वनाथाचे स्वाधीन करण्यांत आली. चौथाईचा करार ता. ३ मार्च १७१९ रोजी व सरदेशमुखीचा करार ता. १५ मार्च १७१९ रोजीं पुरा झाला. हे दोन करार व स्वराज्याचा करार असे तीन मराठ्यांचे हवालीं झाले. ता.२० मार्च १७१९ रोजीं बाळाजी विश्वनाथ दिल्ली सोडून निघाला. अशी ही आर्व्हिनची हकीकत आहे. बाळाजी पुढें जून मासांत औरंगाबादेस व जुलईत साताऱ्यास पोंचला. येसूबाई अगोदरच थोडे दिवस पुढें आली असावी. ( खं. १५. २९८. )

दिल्लीच्या दंगलीचें वर्णन टॉडच्या राजस्थानांत दिलेलें मजेदार आहे. स. १७१८ त अब्दुल्ला वजिराचें व बादशहाचें अगदींच फाटलें, तेव्हां बादशहानें अजितसिंगास गुजराथच्या कारभारावरून लगबगीनें दिल्लीस बोलाविलें. सर्वत्र भयाचीं चिन्हें दिसूं लागलीं. कांहीं तरी भयंकर प्रकार होणार, असा रंग दिसूं लागला. सय्यद हुसेनअली मराठ्यांची फौज घेऊन दिल्लीस पोंचला. त्या वेळीं त्याचा चेहेरा अक्राळविक्राळ दिसत होता. राजवाड्याजवळ त्याची नौबत वाजली तो आवाज भावी संकटाचा सूचक होता. हुसेनअलीबरोबर असंख्य घोडेस्वार होते. त्यांच्या पायांच्या धुळीनें सर्व शहर व्यापून गेलें. हे मराठ्यांचे स्वार होत. दिल्लीच्या उत्तरभागीं या फौजेचा तळ होता. पुढें अब्दुल्ला, अजितसिंग व हुसेन यांच्या गांठी पडल्या. बादशहानें भीत भीतच त्यांचें अभिनंदन केलें. त्याचे मोगल साथीदार आपापल्या घरांत लपून बसले. जयसिंगाची स्थिति तेल

संपलेल्या दिव्यासारखी झाली. अजितसिंगाच्या छावणींत बसून सय्यदांना आपले बेत ठरविले. ते तडीस नेण्यास अजितसिंग घोड्यावर बसून पुढें झाला. आपले राठोड साथीदार बरोबर घेऊन तो ठिकठिकाणीं पहारे बसवीत राजवड्यांत गेला. प्रलयकालच्या अग्नीसारखा अजितसिंग चमकत होता. त्यानें सर्व खजिना लुटला. बादशहाच्या संरक्षणास कोणीही धावून आलें नाहीं. जयसिंग अगोदरच आपलें अंग काढून बाजूस राहिला, पुढें फर्रुखसेयरचा खून होऊन चार दोन महिने रक्तपात झाल्यावर सय्यदांना महंमदशहाची तख्तावर स्थापना केली. फर्रुखसेयरबरोबरच जयसिंहाची सर्व हिंमत नाहींशी झाली. जयसिंगाचा सूड घ्यावा अशी सय्यदांची इच्छा होती. परंतु अजितसिंगानें जयसिंगावर शस्त्र धरण्याचें नाकारिलें. उलट त्यानें च जयसिंगाचा बचाव केला.नवीन बादशहानें आजितसिंगास गुजराथची सुभेदारी दिली. तें काम स्वीकारून जयसिंग व बुधसिंग ( बुंदीचा ) यांसह अजितसिंग निघून आपल्या राज्यांत गेला. मागें वर्ष सहा महिन्यांत दिल्लीस सय्यदांचा पाडाव झाला अजितसिंगाचाही सूड घ्यावा असें नवीन बादशहानें मनांत आणिलें. तें ऐकून अजितसिंगानें पुनः तरवार हाता घेऊन अजमीर वगैरे मोगलांचीं ठाणीं व गुजराथपैकीं बराच भाग काबीज केला. त्याचा मुलगा अभयसिंग आपल्या नांवाचें सार्थक करून बापाचें मोठ्या तत्परतेनें साह्य करीत होता. दोघांनीं मिळून बादशहाचा प्रदेश उद्ध्वस्त करून थेट दिल्ली आग्रापावेतों चाल केली: तेव्हां बादशहानें जयसिंगास मध्यस्थीस घालून अजितसिंग व अभयसिंग यांची समजूत केली. यानंतर कांहीं वर्षांनीं अजितसिंग मुलाच्या हस्तें मारिला गेला. अजितसिंग मोठा बाणेदार असून त्याचा बाप यशवंतसिंग यास औरंगजेब बादशहानें जें दुष्टपणानें वागविलें त्याचा भरपूर सूड त्यानें बादशाहीवर घेतला. जयसिंगास जसा आग्रा प्रांताचा लोभ होता, तसा अजितसिंग व अभयसिंग यांस गुजराथचा लोभ होता. यामुळेंच अभयसिंगाचें व गायकवाडांचें पुढें वांकडें येऊन त्यानें पिलाजी गायकवाडाचा खून करविला.

सय्यदांनीं फर्रुखसेयरवर जुलूस चालविला, त्यांत जयसिंगानें बादशहाचा पक्ष घेऊन,सय्यदांस मदत केली नाहीं, सबब त्यांनीं त्यास दिल्लींतून काढून दिलें,त्या वेळचें एक पत्र जयसिंगानें उदेपुरचा चतुर प्रधान बिहारीदास यास लिहिलेलें फाल्गुन सं. १७७५, माहे मार्च १७१९ चें टॉडनें दिलें आहे तें असें:—

' अमीरुल्–उमराव हुसेन अलीखान येऊन दाखल झाले आहेत. त्यांच्या मार्फत बाळाजी पंडित यांजबरोबर करार ठरले आहेत. आमच्याशीं हुसेन अली मोठी दोस्ती दाखवितात. त्यांनीं आह्मांस दिल्लींतून निघून जाण्याची सूचना केली. किसनसिंग व जीवलाल यांनींही तीच सल्ला दिली. त्यावरून मी बादशहाकडे अर्जी करून निघून जाण्याचा हुकूम मागितला.त्याप्रमाणें आह्मांस हुकूम मिळतांच फाल्गुन शुद्ध ९ रोजीं आह्मी छावणी उठवून निघालों. रावराजे बुधसिंग बुंदीकर यांसही त्यावेळीं आह्मीं आपले बरोबर बोलाविलें. परंतु त्यांस हें पसंत न पडतां, ते सय्यद अब्दुल्लाचे फौजेस जाऊन मिळाले. अजितसिंग व ते एकत्र झाले. कोटाचे भीमसिंगाची फौज येऊन त्याची यांची लढाई झाली, तींत जैतसिंग हाडा मारले जाऊन बुधसिंग पळून गेले. आह्मी त्यांच्या मदतीस फौज पाठविली. बादशाहाची सर्व जिंदगी सय्यदांचे हस्तगत झाली आहे. सय्यदांना तुह्मी ओळखतांच. आह्मी आतां आपले राजधानीस जात आहों. राणासाहेबांस पुष्कळ गोष्टी कळवावयाच्या आहेत. सबब आपण अंबर येथें येऊन भेटावें. कळावें. ( टॉड भाग १ पृ. ३२३. )

वरील हकीकती वाचून त्या वेळच्या भयंकर धडामोडींची कल्पना होते. वाचकांची समजूत स्पष्ट व खुलासेवार पडावी म्हणून या हकीकती तपशीलवार दिल्या आहेत. मराठे, मोगल व रजपूत या तिघांचा यांत संबंध कसा येतो हें ह्या तपशिलावरून कळून येईल.

दिल्लीच्या वरील प्रसंगांत निजामुल्मुल्कनें मराठ्यांशीं सलोखा ठेवून पेशव्यास ' भाईचारा [१] म्हणजे मेजवानी दिली. दिल्लीस विशेष मर्दुमकी गाजविण्याचा प्रसंग मराठ्यांस आला नाहीं. फक्त शहरच्या रस्त्यांत अमीनखानाशीं मराठ्यांची मारामारी झाली तींत १५०० मराठे कापले गेले, त्यांत संताजी भोसले व बाळाजीपंत भानु हे दोघे प्रमुख गृहस्थ मृत्यु पावले. त्यांची भरपाई व फौजेचा खर्च सय्यदांपासून बाळाजीनें चुकावून घेतला.मातुःश्रीसह बाळाजी ता.४ जुलई स. १७१९ रोजीं सातार्‍यास दाखल झाला.

' महाराजांच्या भेटी झाल्या, मुलें माणसें भेटविलीं. मातुश्रींची भेट झाली यावरून बहुत संतोषी होऊन कृतार्थ झाले. सय्यदांकडून पन्नास हजार रुपये दररोज पावत होते, त्याजपैकीं निमे फौजेस खर्च करून, बाकी खजीना बाळगून

साताऱ्यास महाराजांचे दर्शनास गेले'.[1] दिल्लीस्वारींतून आल्यानंतर बाळाजी. पंतांनीं ऐशीं लक्ष वराई [ ? ] व तीस लाख रुपये जामदारखान्यांत भरले व फौजेचे देण्याचा बोभाट महाराजांकडे तिळभर ठेविला नाहीं. वरकड सरदारांस कामगिरी सांगितली म्हणजे त्यांचे लोकांचा गवगवा सरकारांत पडून मनस्वी देणें लागत होतें. बाळाजीपंताचे कारभारापासून कोणास पैसा देणें पडूं नये असा तह झाला.[2] येणेप्रमाणें दिल्लीवरची ही पहिली स्वारी सफळ झाली. स्वराज्य व चौथाई, सरदेशमुखीच्या बादशाही सनदा मिळाल्यानें मराठमंडळास आनंद झाला. शाहूस कृतार्थ वाटलें. या स्वारीत पैशाचीही प्राप्ति झाली. खर्च भागून बराचसा खजिना साताऱ्यास आला. सर्व सरदारांस व लोकांस बादशहाकडून वस्त्रें पोषाक वगैरे मिळाले. संताजी भोंसले पडला, त्याचा भाऊ राणोजी यास 'सवाई संताजीराव' असा किताब बादशहानें दिला. शाहूनें बाळाजी वगैरे मंडळीस सामोरे जाऊन बहुत सन्मान केला. त्यांनीं नजरा केल्या. ज्यांनीं कामें केलीं त्यांस बक्षिसें इनामें दिलीं. पांच महालांचें सरदेशमुखी वतन प्रधानपंतास महाराजांनीं करून दिलें. सेनापति यांसही वतन इनाम गांव दिल्हे. भानूच्या कुटुंबास इनामें दिलीं. बाळाजी महादेव भानूचाच नातू पुढे प्रसिद्धीस आलेला नाना फडणीस होय.

बाळाजीपंत भानु चौथाईच्या सनदा घेऊन पेशव्याचे पालखींत बसून जात असतां दिल्लींतील लोकांच्या हस्तें मारला गेला, ही आख्यायिका खरी नाहीं. मात्र मराठे सनदा घेऊन जातात हा प्रकार दिल्लींतील लोकांस आवडला नाहीं ही गोष्ट खरी. बाळाजी महादेवाच्या मृत्यूचा उल्लेख शाहूनें ऑगस्ट स. १७१९ च्या खालील आज्ञापत्रांत केला आहे. 'राजश्री बाळाजी महादेव भानु बाळाजी पंडित प्रधान यांजबरोबर मजमूनिसबतीनें फडणिसी लिहिण्याचें प्रयोजन होतें, सबब पंडित प्रधान फौजेसहवर्तमान दिल्लीस गेले, तेव्हां बाळाजी महादेव स्वारीस होते. दिल्लीचे मुक्कामीं युद्धप्रसंग झाला ते समयीं बाळाजी महादेव मृत्यु पावले. याजकरितां रामाजी महादेव व जनार्दन बल्लाळ यांचें चालवणें स्वामीस आवश्यक जाणोन, स्वामी उभयतांवरी कृपाळु होऊन मौजे बांकसई गांव इनाम दिला असे. ( २.८.१७१९ ) दिल्लीहून मंडळी परत आल्याबरोबर लगेच ही सनद देण्यांत आली आहे.

---

१ खं. ४—पे. ब. २ भा. व. शा. म. ब. पृ. ५३.

बाळाजीच्या या स्वारीनें मराठ्यांचा दृष्टिक्षेप नेहमींच्या राहणींतही पुष्कळच वाढला. दक्षिणच्या मानानें उत्तरेंतील समृद्ध राहणीची व बादशाही वैभवाची ओळख प्रथमच मराठ्यांस होऊन, त्याची पुनरावृत्ति पुढें वारंवार होऊं लागल्यामुळें उत्तरेंतील रिवाज, राहणी व ऐषआराम यांचा फैलाव महाराष्ट्रांत होऊं लागला. भोजनाचे पदार्थ, कपडालत्ता, भाषा, रिवाज इत्यादि बाबतींत महाराष्ट्रांतील जीवन हळूहळू समृद्ध व बादशाही थाटाचें होऊं लागलें. ही गोष्ट त्या वेळचे कागदपत्र वाचून मनांत येते.

**११. मातुःश्री येसूबाईचा सन्माननीय शेवट**—येसूबाईचा शेवट मोठा गोड झाला, आणि दक्षिणेंत येऊन दहा पांच वर्षांवर आपल्या भाग्यशाली पुत्राजवळ राहून नंतर ती निजधामास गेली. दिल्लीहून ती दक्षिणेंत मुळीं आलीच नाहीं, असाही समज आहे तो खरा नाहीं. या संबंधानें येसूबाईच्या उत्तरकालीन चरित्राची थोडी परिस्फुटता करणें अवश्य आहे.

स. १६९० त येसूबाईला बादशहानें कैद करून आपले जवळ ठेविलें, तेव्हां त्या संकटांत तिनें मोठ्या चतुराईचें वर्तन ठेवून स. १७०७ पर्यंत शिताफीनें दिवस काढिले. शाहूची बायको अंबिकाबाई ही शाहूची सुटका होण्यापूर्वीच वारली. पुढें त्याची आई येसूबाई, व बायको सावित्रीबाई, संभाजीचा दासीपुत्र मदनसिंग,आणि दुसऱ्या दोघी स्त्रिया दुर्गाबाई,व जानकीबाई बहुधा मदनसिंगाच्या बायका,आणि कांहीं नोकर,इतकी मंडळी दिल्लीस गेली. त्यांस बाळाजीनें सोडवून दक्षिणेंत आणिलें. येसूबाई दक्षिणेंत आली कीं नाहीं याजबद्दल संशय वाटण्याचें कारण नाहीं. संभाजी आपल्या पत्रांत शाहूस लिहितो, ' मातुश्री आऊसाहेब आली, तें वर्तमान अवगत झालें. ' या शिवाय अशाच अनेक उल्लेख आहेत. दुसऱ्या एका पत्रांत[१] संभाजी लिहितो, 'दैवगतीनें मा सावित्रीबाईस परलोकवास झाला, म्हणोन वर्तमान अवगत होऊन परम श्रम प्राप्त झाले. ' म्हणजे ही

१ शिवछत्रपतीची सून, संभाजीची बायको व शाहूची मातुःश्री येसूबाई इजवर एक घाणेरडा आरोप एका मुसलमान किल्लेदारानें आणिल्याची हकीकत मॉडर्न रिव्ह्यूच्या जुलई १९१६च्या अंकांत प्रसिद्ध झाली, त्याचें निरसन प्रस्तुत लेखकानें ' नवयुग ' मासिकाच्या मे १९१७ च्या अंकांत केलें आहे.

सावित्रीबाई शाहूची बायको, रुस्तुमराव जाधवाची कन्या, ही सुद्धां येसूबाईबरोबरच दक्षिणेंत येऊन पुढें लवकरच वारली. येसूबाई मरण पावली तेव्हां खालील पत्र संभाजीनें शाहूस लिहिलें. शाहू व संभाजी यांचा सन १७३१ सालीं तह होऊन प्रेमभाव जडला, त्यानंतरचें हें पत्र बहुधा असावें.[१]

श्रीमत् सकलतीर्थस्वरूप राजश्रिया विराजमान राजश्री शाहूराजे दाजी वडिलांचे सेवेसीं, अपत्य संभाजीराजे दंडवत विनंति उपरी. वडिलीं आशीर्वादपत्र पाठविलें तें प्रविष्ट जालें. मातुःश्री येसूबाई साहेब यांसी वेथा होऊन कैलासवास जाला ह्मणोन लिहिलें, त्यावरून ममताविषयें चित्तास परम खेद प्राप्त जाला. हा अयत्नी मार्ग ऐसाच आहे. वडील सर्वज्ञ आहे. विवेकेंकरून चित्ताचें सांतवन होय तें केलें पाहिजे. विशेष लिहावें तरी वडील सुज्ञ आहेत.'

संभाजी व येसूबाई यांचें लग्न स. १६६९ च्या सुमारास झालें, त्या वेळीं तिचें वय दहा वर्षांचें होतें असें धरल्यास, मरणसमयीं तिचें वय सत्तरांहून जास्त असलें पाहिजे. सन १६९० त रायगड किल्ला पडल्यावर ती झुल्फिकारखानाचे हातीं कैदेंत सांपडली, तेव्हां तिचें वय सुमारें ३० वर्षांचें असून तिच्याजवळ तिचा दहा वर्षांचा मुलगा शाहू व सुमारें तितक्याच वयाचा मदनसिंग आणि वडीलपैकीं शिवछत्रपतींची बायको सकवारबाई वगैरे मंडळी होती. येसूबाईचें माहेरचें नांव जिऊबाई होतें. [ खं. ३. पृ. १५४ ].

येसूबाईची मान्यता मोठी होती. शाहू व संभाजी वगैरे तिला मोठ्या सन्मानानें वागवीत. संभाजीचा आदर तर वरील पत्रांत व्यक्त झालाच आहे. नानाप्रकारचीं संकटें भोगून शेवटीं सुखाचे दिवस शाहूस लाभले याचें श्रेय तो येसूबाईस देई. एकंदरींत शिवाजी व जिजाबाई यांप्रमाणेंच शाहू व येसूबाई यांजबद्दल मराठमंडळास मोठा पूज्यभाव वाटे. येसूबाई व ताराबाई या जावा, परंतु त्यांच्या स्वभावांतील व कर्तबगारींतील अंतर लक्षांत ठेविल्यास ऐतिहासिक दृष्टीनें त्यांचीं चरित्रें मननीय वाटतील. तारीख २५–१–१७२० रोजीं

१ हें व खालील पत्रें रा. य. रा. गुप्ते यांच्या श्रमानें उपलब्ध झालीं. वि ज्ञा. वि. नोव्हेंबर १९२१. २ खं. १५. ३०१, महाराष्ट्र साहित्य, मार्च १९२३ आणि नवयुग १९१७ मे यांत वरील सर्व संदर्भ आहेत.

येसूबाईनें, रघुनाथभट सवलीकर वास्तव्य कऱ्हाड पृथ्वीप्रदक्षिणा करून आले, सबब त्यास ३० होनांचें वर्षासनपत्र करून दिलें, तें प्रकाशित आहे.[१] साताऱ्यास आल्यावर शाहूनें सकवारबाई व सगुणाबाई या दोन राण्यांशीं लग्नें केलीं, तीं वयास ४० वें वर्ष लागण्यापूर्वी व सावित्रीबाई जिवंत असतां केला असला पाहिजेत.[२]

## प्रकरण चवथें.

### बाळाजी विश्वनाथाचा राज्यकारभार.

१ स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी. २ उत्पन्नाची वांटणी.
३ या व्यवस्थेचे दोष. ४ सरंजामी पद्धतीचा उगम.
५ मराठशाहीच्या फैलावाचें बीज. ६ मूळच्या उद्देशाचा विपर्यास.
७ या पद्धतीची त्या वेळीं आवश्यकता. ८ संभाजीचें आज्ञापत्र.

१०. **स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी.**—या तीन बाबतींच्या तीन सनदा बादशहाकडून बाळाजी पेशव्यास मिळाल्या, त्यांचा मतलब स्पष्ट करून सांगितला पाहिजे मराठशाहीची रचना व विस्तार वरील तीन बाबतींवर अवलंबून आहे. या बाबतीच्या सनदा सन १७१९ सालच्या महंमदशहाच्या नांवानें लिहिलेल्या असून त्या सातारच्या महाराजांचे दप्तरांत ग्रँट डफनें पाहिलेल्या होत्या. स्वराज्याच्या सनदेंत प्रांतांचा उल्लेख आहे ते हेः—१ पुणें, २ बारामती, ३ इंदापुर, ४ वाई, ५ मावळें, ६ सातारा, ७ कसराबाद (कऱ्हाड ?) ८ खटाव, ९ माण, १० फलटण, ११ मलकापुर, १२ तारळा, १३ पन्हाळा, १४ आजरें, १५ जुन्नर, आणि १६ कोल्हापुर, कोपल, गदग, हल्याळ वगैरे तुंगभद्रेच्या उत्तरेकडील परगणे व शिवाजीनें जिंकलेले सर्व किल्ले आणि कोंकण यांचाही निर्देश स्वराज्यांत केलेला आहे. किल्ले वगैरे सर्व धरून एकंदर महाल ३५ ची याद असून, प्रत्येक महालापुढें त्यांतील तर्फा दाखविलेल्या आहेत. कोंकणांत

१ पे. द. पृ. २५७. २ वि. ज्ञा. वि. ऑक्टोबर १९२३ मागें पृ. २६ पहा.

खालील तर्फांचा उल्लेख आहेः[१] रामनगर, गणदेवी सुद्धां, जव्हार, चौल, भीमगड, भिवंडी, कल्याण, राजपुरी, दाभोळ, जावळी, राजापुर, फोंडा, अकोला व कुडाळ.

शहाजीच्या पूर्ववयांत पुणें व सुपें मिळून जी एक लहानशी जहागीर होती, ती शिवाजीनें सन १६४६ त स्वतंत्र संस्थानाच्या पदवीस आणिली. विजापुरच्या आदिलशाहींतून स्वतंत्र झालेलें हें मावळांतील चिमुकलें संस्थान वाढत वाढत सन १६७४ त सह्याद्रीच्या पूर्वेस व पश्चिमेस बागलाणपासून फोंड्यापर्यंत वीस तीस मैलांच्या अंतरानें पसरलें. ह्या प्रसाराला ' स्वराज्य ' अशी संज्ञा मिळाली. शाहूच्या आगमनापर्यंत ह्या स्वराज्याच्या भानगडी कसकशा होत गेल्या, त्यांचें निवेदन मागें ठिकठिकाणीं आलेंच आहे. औरंगजेबानें ह्या स्वराज्याला आपली संमति कधींच दिली नाहीं. तो ह्या स्वराज्यांतील मुलखाची गणना आपल्या औरंगाबादच्या सुभ्यांत करी. त्यानंतर वरील तहानें जें स्वराज्य सन १७१९ त शाहूच्या पदरांत पडलें, त्यांत समावेश झालेल्या प्रांतांचा निर्देश वर केला आहे. ह्या स्वराज्याचा विस्तार एकसारखा सलंग नव्हता: पश्चिमेस समुद्रकिनाऱ्यापासून पूर्वेस भीमा आणि नीरा ह्या नद्यांपर्यंत तें पोंचलें होतें. दक्षिणेस गदग, बेलारी, कोपल, हल्याळ वगैरे कित्येक तुटक परगणे शिवाजीच्या वेळेपासूनच स्वराज्यांत होते. तंजावर व जिंजी ह्या प्रांतांना जोडून घेण्यासाठीं शिवाजीनें हे मधले मधले भाग मुद्दाम कबजांत ठेविले होते. खानदेश स्वराज्यांत नव्हता. त्याच्याबदलीं पुंढरपुरच्या बाजूस कांहीं मुलूख वरील तहानें शाहूच्या ताब्यांत आला. ह्या स्वराज्याला लागूनच मोगलांचे सहा सुभे होते, त्यांचीं नांवें मागें सांगितलींच आहेत. तंजावर त्रिचनापल्लीसुद्धां ह्या सहा सुभ्यांवर चौथाई व सरदेशमुखी मराठ्यांनी घ्यावी, असा हा नवीन ठराव झाला. यासंबंधाचें उत्पन्न व खर्च यांची एकबेरजी पाहण्यालायक आहे.[२]

पैकीं सरदेशमुखी हें मूळचें वतन होतें. मावळे देशमुखांस देशमुखी वतनें होतीं, तशाच प्रकारचें हें सरदेशमुखी वतन होय. ठरीव टापूंतील जमीनमहसूल गोळा करून सरकारांत भरणें व त्या टापूचा बंदोबस्त ठेवणें हें काम सरदेशमुखांचें होतें. 'तह लिहून दिल्हा ऐसा कीं यजमान खिदमतीच्या लाजिम्याविशीं कायावाचामनें सादर राहून, रयतीस आबादी विशेष होय व सरकारची दौलत व गुन्हेगारांचें

१ पहा खंड ८ पृ. १०३; तह व करार पृ. ५, ६. २ पे. द. पृ. १२८.

पारपत्य घडे तें करितील; व पंधरा हजार फौज सुभेदाराच्या समागमें चाकरीस ठेवून रयतीस आपल्याकडोन राजी राखतील; व उजाड गांवांची लावणी तीन सालांत करोन, ऐसा बंदोबस्त करितील जे दुष्टांचा उपद्रव होणार नाहीं. कदाचित् कोणाचे घरीं चोरी जाली किंवा कोणाचा माल चोरीस गेला, तरी चोरास शिक्षा व ज्याचा माल त्यास देतील. कदाचित् चोरास शिक्षा करोन चोरीचें ठिकाण न लगे, तरी चोरीचे मालाची निशा आपण करितील. शिवाय चवथ व सरदेशमुखींत अधिक लोभ धरणार नाहींत. अगर जाहीर जाल्यास जे रुपये जादा तलबी करोन घेतील, ते सरकार–आलींत दाखल करितील. ऐसा तह असे.' हे करारांतील शब्द लक्षांत ठेवण्याजोगे आहेत (तह व क. पृ. २३).

भोसल्यांचीं सरदेशमुखी वतनें प्रथम ठिकठिकाणा असून शाहू तर सर्व राज्याचा सरदेशमुख आपण असें समजे; आणि आपल्या तर्फेनें तो इतरांच्या नेमणुका करी. सरकारच्या साऱ्यापैकीं शेंकडा दहा टक्के देशमुखांनीं घेण्याची पूर्वीची वहिवाट होती. आरंभापासूनच ठिकठिकाणचीं भोसल्यांचीं सरदेशमुखी वतनें साधेल त्या रीतीनें मिळविण्याचा शिवाजीचा उद्योग होता[१]. शहाजहान व औरंगजेब यांची व शिवाजीची त्यासंबंधानें बोलाचाली झाली परंतु त्यांनीं शिवाजीचे सरदेशमुखीचे हक्क उघडपणें कबूल केले नाहींत. पुरंदरच्या तहांत चौथाईचा किंवा सरदेशमुखीचा उल्लेख नाहीं, असें प्रो. सरकार ह्मणतात. सन १६६८ त शिवाजीनें ह्या दोनही बाबतींबद्दल आदिलशाहींतून तीन लक्ष व कुतबशाहींतून पांच लक्ष रक्कम दरसाल घेण्याचा करार केला; आणि १६७१त मोगलांच्या मुलखांतून हे हक्क शिवाजी राजरोस वसूल करूं लागला[२]. त्यानंतर पोर्तुगीज लोकांकडून, बेदनूर व सोंधे येथील राजांकडून आणि पुढें कर्नाटकांतून हे हक्क शिवाजीनें सालोसाल वसूल केले ( खंड ८-१४ व 'Mod. Rev. July 1916 ).

आरंभीं शिवाजी सरदेशमुखीचा वसूल फक्त वतन ह्मणून करी. परंतु पुढें जसजसा शिवाजीचा उद्योग वाढत चालला, तसतसे दुसऱ्या राज्यांचे संबंध जडत चालले. अशीं राज्यें एकदम जिंकून स्वराज्यांत येण्याजोगीं नव्हतीं. कोणीही जेता परराज्यें जिंकितो तीं एकदम जिंकीत नाहीं, क्रमाक्रमानें तीं

१ खं. ८·४. २ पहा शिवाजीचीं पत्रें म. रि. पू. पृ. ३४४.

कबजांत आणितो. अशा राज्यांवर शिवाजीनें चौथाईचा कर बसविण्याची नवीन युक्ति काढिली. एकंदर वसुलाचा चतुर्थांश त्या राज्यांनीं शिवाजीला द्यावा, आणि त्याचे बदल्यांत शिवाजीनें फौज ठेवून परशत्रूंपासून त्यांचें संरक्षण करावें, असा ह्या चौथाईचा अर्थ होता. सन १७१९त बादशाहानें आपल्या दक्षिणेंतील सहा सुभ्यांवर चौथाई वसुलाचा हक्क शाहूस दिला; ह्मणजे शाहूनें फौज ठेवून त्या सुभ्यांचें संरक्षण करावें, असा ह्या कराराचा अर्थ होतो. तैनाती फौजेची वेलस्लीनें सुरू केलेली पद्धत अशाच स्वरूपाची पण ज्यास्त स्पष्ट व व्यापक होती. ज्या राज्यांच्या संरक्षणाची हमी इंग्रजांनीं घेतली त्यांची ती हमी त्यांनीं पूर्णपणें पार पाडिली. मराठ्यांच्या हातून मात्र ही हमी पुरी पडली नाहीं, हें बाजीरावाच्या वगैरे स्वाऱ्यांवरून पुढें निदर्शनास येईल; आणि ही हमी पार पाडण्याकरितांच मराठे सरदारांस निरनिराळ्या ठिकाणीं स्वाऱ्या करण्याचा प्रसंग वारंवार येऊं लागला.

मराठ्यांचे त्रासापासून आपला बचाव करण्याच्या उद्देशानें दाऊदखान पन्नीनें प्रथम त्यांस चौथाई देण्याचा करार केला. हा निजामुल्मुल्कनें पाळिला नाहीं. तो पुढें हुसेन सय्यदानें कबूल करून मराठ्यांची मदत घेतली; आणि स. १७१९ त बादशहानें तो मंजूर केला. दिल्लीस मिळालेलें चौथाईचें फर्मान ३-३-१७१९ चें व सरदेशमुखीचें १४-३-१७१९ चें आहे. त्यानंतर सहा दिवसांनीं २०-३-१७१९ रोजीं बाळाजी दिल्लीहून परत निघाला. शाहूनें पंधरा हजार फौज मोगल सुभेदार सांगतील तेथें त्यांच्या मदतीस द्यावी, आणि दरसाल बादशहास दहा लाख रुपये खंडणीचे पाठवावे असा करार होता. मोगलांच्या सहा सुभ्यांचें उत्पन्न त्या वेळीं सालाचें अठरा कोट रुपये ठरलेलें होतें. या वसुलावर शेंकडा दहा सरदेशमुखीबद्दल, व शेंकडा २५ चौथाईबद्दल, मिळून दरसाळची रक्कम शेंकडा ३५ प्रमाणें मराठ्यांस मिळावयाची होती. हे आंकडे कागदावरच होते. प्रत्यक्ष वसूल होतांना मोठी मारामार पडे.

वरील हक्कांच्या बादशाही सनदा मिळाल्यानें आपण शिवाजीचे हेतु तडीस नेले असें मराठमंडळास वाटलें. पण उभय पक्षीं हा केवळ फसवाफसवीचाच एक प्रकार होता. बादशहानें चौथाई कबूल करणें ह्मणजे मराठ्यांच्या संरक्षणाखालीं जाणें, असा अर्थ होता. उलट पक्षीं बादशहास मराठ्यांना खंडणी देणें ह्मणजे

‘ आपण सार्वभौम व आह्मी ताबेदार ’ असा बादशहाचा समज मराठ्यांनीं कायम ठेविला. इंग्रजांना ज्याप्रमाणें तैनाती फौजेच्या पद्धतीनें हळूहळू सर्व देश आक्रमण करितां आला, तसाच चौथाईच्या सबबीवर मराठ्यांसही सर्व देशभर संचार करण्याची सबब सांपडली. मात्र जो करार व जबाबदारी आपण स्वीकारिली ती पूर्णपणें तडीस नेण्याची तजवीज ठेवणें मराठमंडळाचें कर्तव्य होतें. शाहूनें ही जबाबदारी परिस्थितीशीं झगडण्याकरितां अंगीकारिली, आणि मराठमंडळास नवीन कर्तव्य दाखवून दिलें. धोरण चांगलें मुत्सद्देगिरीचें होतें, परंतु त्यास लागणारें पैशाचें, फौजेचें व एकीचें बळ मराठमंडळास नसल्यामुळें स्वीकारिलेली जबाबदारी त्यांचे हातून अखेर पार पडली नाहीं हें पुढें उत्तरोत्तर दिसून येईलच.

**२. एकंदर उत्पन्नाची वांटणी.**—बादशहाकडून वरील हक्कांच्या सनदा घेऊन आल्यावर त्या उत्पन्नाची वांटणी ठरविण्याचें काम बाळाजीवर आलें, आणि तें त्यानें तत्कालीन परिस्थितीच्या मानानें कसें विल्हेस लाविलें हें सांगितलें पाहिजे. या व्यवस्थेचें स्वरूप पेशव्यांच्या बखरींत काव्येतिहाससंग्रहकारांनीं थोडक्यांत दाखविलें असून ग्रँट डफनेंही त्याची स्पष्टता व चर्चा बरीच केली आहे. या संबंधानेंही पक्षभेदामुळें भिन्न मतें रूढ असून वादविवादांत पडल्यापासून फलनिष्पत्ति होण्यासारखी नाहीं. व्यवस्थेंतील मुख्य मुद्दे सांगितले म्हणजे पुरे.

सरदेशमुखी ही भोसले घराण्याची खासगत वतनी बाब असल्यानें, वसुलावर दहा टक्केप्रमाणें या बाबतीचें होणारें सर्व उत्पन्न गादीचे मालकास द्यावयाचें, त्यावर दुसऱ्या कोणाचा हक्क नाहीं, असें ठरविण्यांत आलें. स्वराज्यांतील वसूल व मोगली सुभ्यांवरील चौथाईचा वसूल मिळून जें एकंदर उत्पन्न येईल तोच सर्व मराठी राज्याचा वसूल होय. या वसुलापैकीं एकचतुर्थांश ‘राजबाबती’ ह्मणून राजाचे खर्चास द्यावयाचा. वसुलाचे बाकीचे तीनचतुर्थांश म्हणजे शेंकडा पंचाहत्तर, ‘मोकासा’ या नांवानें इतर खर्चाकरितां ठेवावयाचे. या मोकाशांतून ‘ साहोत्रा ’ व ‘ नाडगौडा ’ असे दोन विभाग राजानें आपल्या मर्जीप्रमाणें वाटेल त्यास देण्यासाठीं ठेवलेले होते. साहोत्रा म्हणजे एकंदर वसुलावर शेंकडा सहा, आणि नाडगौडा म्हणजे त्या वसुलाचे शेंकडा तीन. याप्रमाणें ज्या दोन बाबती ठरल्या त्यांपैकीं ‘ साहोत्रा ’ चा वसूल शाहूनें सचिवास दिला, आणि

तो त्यानेंच स्वतः सर्व प्रांतांतून वसूल करून घ्यावा असें ठरविलें. 'नाडगौडा'-ची बाबत शाहू निरनिराळ्या वेळीं मर्जीनुरूप पाहिजे त्यास देत असे. या दोन बाबतींचे शेंकडा नऊ हिस्से व पहिले राजबाबतीचे २५ हिस्से मिळून ३४ वजा केले ह्मणजे एकंदर वसुलाचे शेंकडा ६६ प्रमाणें निव्वळ मोकासा शिल्लक राहतो. हा सर्व भाग निरनिराळ्या सरदारांस जहागिरीदाखल वांटून देण्यांत यावा असें ठरलें. मुलूखगिरीसाठीं निरनिराळे प्रदेश निरनिराळ्या सरदारांस वांटून देण्यांत आले. राजाची मुख्य फौज पेशवे व सेनापति यांच्या हातांत असून, जेथें जरूर पडेल तेथें ताबडतोब जाऊन देशाचा बंदोबस्त करावा अशी त्यांस शाहूची आज्ञा होती. शिवाय खानदेश व बालेघांटचा कांहीं भाग यांत पेशव्यानें वावर करावा, सेनापतीनें बागलाण व गुजराथ प्रांतांतील वसूल करावा, सेनासाहेब सुभा कान्होजी भोसले यानें वऱ्हाड पाइनघाटचा प्रदेश व गोंडवणच्या पूर्वेकडील भाग यांत वहिवाट करावी, सरलष्कर यानें गंगथडी व औरंगाबादच्या बाजूस उद्योग करावा, फत्तेसिंग भोसल्यानें कर्नाटकचे बाजूस राहवें, प्रतिनिधीनें नीरेपासून वारणेपर्यंतचा प्रदेश व हैदराबाद बेदरकडील मुलूख सांभाळावा, चिटणीस व आंग्रे यांनीं कोंकणांत काम करावें, आणि पंतसचिवानें आपली पहिली जहागीर संभाळून इतरत्र ' साहोत्रा ' चा वसूल करावा, अशी सरदारांच्या उद्योगाची सामान्य वांटणी शाहूनें करून दिली. एकानें दुसऱ्याच्या प्रांतांत जाऊं नये, अशी त्याच वेळीं ताकीद दिलेली होती. ज्या त्या बाजूची चौथाई वसूल करणें हेंच या मुलूखगिरीचें मुख्य प्रयोजन होतें. अर्थात् प्रत्येक सरदारानें आपल्या मुलुखगिरीचा हिशेब सरकारांत रुजू करावयाचा, असा ठराव होता. जहागिरींतील वसूल जरी ज्याचा त्यानें उगवावयाचा होता, तरी वरील व्यवस्थेनें बहुतेक सरदारांस राजबाबती, नाडगौडा, साहोत्रा वगैरे संबंधानें एकमेकांच्या मुलखांत उत्पन्नाच्या बाबी मिळाल्यामुळें, त्यांचे व्यवहार पृथकपणें तुटले नाहींत. त्यांना आपल्या उद्योगासाठीं फौजा बाळगाव्या लागत. मुलुखगिरी करावी, पैसा वसूल करून आणावा, तेव्हां फौजेचा व आपला खर्च भागणार असा प्रकार झाला. ह्मणजे अगोदर खर्च करावा लागून त्याचें उत्पन्न मागाहून यावयाचें होतें. जहागीरदारांस देऊन टाकलेलें शेंकडा ६६ चें उत्पन्न, सरकारच्या खजिन्यांत जमा न होतां परभारें

सरदारांनीं वसूल करावयाचें असून, त्यांतून त्यांना आपले खर्च भागवावयाचे होते. सरदेशमुखीचें उत्पन्न मात्र त्यांस राजाकडे पाठवावें लागे. तें वसूल करण्यासाठीं नायब किंवा अजहृत सरदेशमुख, ह्मणजे आपल्या तर्फेनें काम करणारे, शाहूनें ठिकठिकाणीं नेमून दिले. परंतु वसुलाच्या व्यवस्थेंत एकच निश्चित प्रकार कायमचा असा कधींच नव्हता. व्यक्ति, परिस्थिति वगैरे बदलत गेल्या, त्यामानानें निरनिराळ्या पेशव्यांनीं व कारभाऱ्यांनीं त्या त्या वेळच्या जरुरीप्रमाणें भिन्न व्यवस्था ठरवून दिली; आणि अमका फेरफार अमक्या वेळीं अमुक कारणानें झाला, अशी निश्चित माहिती आज मिळत नसल्यामुळें, सामान्य गोळाबेरीज तेवढीच आज आपणापुढें उपलब्ध होते. उदाहरणार्थ, कित्येक सरदारांकडून दरसाल एक ठरीव रक्कम सरकार-पोत्यास जमा व्हावी असे ठराव होते. फत्तेसिंग भोसल्यानें कर्नाटकांतून सात लाख, रघूजी भोसल्यानें वऱ्हाडांतून दहा लाख, आंग्र्यानें कोंकणांतून दोन तीन लाख, असे सालोसाल पाठविण्याचा रिवाज होता. सारांश, मुख्य सरकारास थोडीबहुत रक्कम देऊन आपण आपला कारभार पूर्ण स्वतंत्रतेनें वाटेल तसा करावा अशी पद्धत पडली; आणि सरदार शिरजोर होऊन सत्ता दुर्बल होतांच बेबंदशाही व अव्यवस्था माजली. प्रदेश संपूर्णपणें जिंकून तेथील व्यवस्था लागण्याचे पूर्वींच, नुसती लढाईंतील फत्ते ऐकिल्याबरोबर मुलखाची वांटणी व उत्पन्नाची वासलात लावण्याची वहिवाट पडली. त्यामुळें मुलुखगिरीच्या लालुचीनें पुष्कळसे [illegible] बाब असामी बाहेर पडूं लागले, परंतु त्यांच्या स्वैर वर्तनास आळा न राहून [illegible] काढण्याकडे त्यांची प्रवृत्ति झाली.

वसुलाची ही पद्धत मूळ बाळाजी विश्वनाथानें स्थापन केली. तिच्यांत थोडाबहुत फेरफार पुढें नानासाहेब पेशव्यानें केला. थोरला माधवराव व नाना फडणीस यांनींही जरूर ते फेरबदल केले. तरी तिचा मूळ पाया या पहिल्या पेशव्याच्या हातचा आहे. स. १७१९त दिल्लीहून आल्यावर त्यानें ही नवीन व्यवस्था ठरविली. 'अष्टप्रधान व सरदार यांस जातीचीं वतनें, दरखदार कारखानदार सुद्धां करून देऊन, त्यांस सरंजाम लावून, इनामगांव करून देऊन, बाकी फौजेच्या खर्चास नेमणूक व हुजूरखर्चाकडे नेमणुका केल्या. जास्ती खर्च लागल्यास हुजूरची आज्ञा घेऊन होईल तसें करावें.' चिटणीस, फडणीस व पोतनीस हे

कामगार प्रत्येक सरदारापाशीं व सुभेदारापाशीं असत. महाराजांपाशीं व अष्टप्रधानाजवळही हे कामगार असत, त्यांस दरखदार अशी संज्ञा होती. चिटणिसानें सर्व पत्रव्यवहार करावयाचा, फडणिसानें सर्व देण्याघेण्याचा हिशेब व झाडा ठेवावयाचा, आणि पोतनिसानें खजिना सांभाळून देवघेव करावयाची, अशी कामाची वांटणी होती. हे दरखदार पुरविण्याची पद्धतही ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. राजाच्या चिटणिसानें, फडणिसानें व पोतनिसानें पेशव्यांजवळचे व अष्टप्रधानांकडचे ते ते दरखदार नेमावे, पेशव्यांकडील चिटणिसानें शिंदे, होळकर वगैरे आपल्या सरदारांकडचे चिटणीस नेमावे, असा त्या वेळचा शिरस्ता होता. म्हणजे राज्यांतील एकूण एक चिटणीस पर्यायानें छत्रपतीजवळच्या चिटणिसानें तयार करून नेमावयाचे असें असल्यामुळें, त्या त्या कसबांत निपुण माणसें तयार झालीं. उलट पक्षीं त्यांत भाग घेण्यास इतरांस सारखी संधि न मिळाल्यामुळें, राज्यकारभारांत स्वार्थ दृष्टि बळावली. तथापि ज्यानें त्यानें आपलें कसब व धंदा आपल्याच हातांत ठेवणें असा तो मनु होता.

राज्याच्या उत्पन्नाची व खर्चाची वरप्रमाणें वांटणी केल्यावर पेशवे, प्रतिनिधि वगैरे अष्टप्रधान, व भोसले, आंगरे वगैरे सरदार, यांजकडून हुजूरकडील कारखान्यांचा दरमहाचा खर्च परभारें चालावा अशी ताकीद होती. उदाहरणार्थ, सचिवाकडे हत्तीखाना, प्रतिनिधीकडे कोठी, पंतप्रधानाकडे इमारत, अशा रीतीनें प्रत्येक कारखान्याचे खर्च ज्यानें त्यानें आपल्या आपल्या वांटणीप्रमाणें भागवावे असा ठराव होता. त्या सर्व मंडळींकडून खर्चासाठीं वराता येत त्यांची जमा पोतनिसाकडे सरकारी पोत्यास म्हणजे खजिन्यास होई; परंतु या कारखान्यांचा खर्च, वेळचे वेळीं, ज्या त्या सरदाराकडून येतो किंवा नाहीं, याबद्दलचा हिशेब ठेवून अडचण वाटल्यास जरुरीप्रमाणें हुजूरचे कानावर घालून बंदोबस्त करण्यासाठीं राजाज्ञा म्हणून नवीन कामगार शाहूनें नेमिला, आणि त्या कामावर दत्ताजी शिवदेव सोमण याची नेमणूक केली. दत्ताजी शिवदेव राजाज्ञा स. १७३१ त मरण पावला. राजाज्ञा हें पद पूर्वीच राजारामाचे वेळेस निघालें असाही उल्लेख आहे.

मराठ्यांची आपल्या मूळ वतनावर भारी आसक्ति असल्यामुळें, मुलुखगिरी करीत ते कोणत्याही दूरच्या प्रदेशांत गेले, तरी दक्षिणेंतील आपल्या पहिल्या वतनाची, देशमुखीची, किंवा पाटिलकीची त्यांस अत्यंत आस्था असे. शिंदे, होळकर,

गायकवाडांचीं अशीं वतनें अद्यापि दक्षिणेंत आहेत. शिवाय नवीन जिंकलेल्या मुलखांत सुद्धां सर्व सरदारांचा मुलूख तरी प्रत्येकाचा एकाच ठिकाणीं स्वतंत्र वांटलेला असे असें नाहीं. मुलूख जिंकितांना ज्यांनीं साह्य केलें असेल, त्यांस त्याची वांटणी मिळे. एकट्या शिंद्यांचा मुलूख ब्र्हाणपुर गुजराथपासून गंगायमुनांच्या दुआबापर्यंत ठिकठिकाणीं पसरलेला होता. याच कारणास्तव हल्लींच्या अनेक संस्थानांचे प्रदेश तुटक व दूर दूर तुटलेले आहेत. तसेंच आरंभीं कित्येक सरदार अग्रगण्य असलेले नाहींसे होऊन मागाहून नवीन सरदार पुढें आले आणि जुने मागें पडले. दाभाडे व पिलाजी जाधव मागें पडले. पटवर्धन, रास्ते वगैरे सरदार उत्तर पेशवाईंत पुढें आले. मुलुखगिरीचें काम विशेषतः बाजीराव व बाळाजी बाजीराव यांच्या अमादानींत झालें; आणि त्यानंतर जशी जेथें स्थिति होती, तशी ती हळूहळू स्थिरावत गेली.

बाळाजी विश्वनाथानें ठरविलेल्या पद्धतीचें सामान्य स्वरूप वर सांगितलें, त्यावरून ती पद्धत त्यानें सर्व काळाकरितां कायमची ठरविली असें दिसत नाहीं. त्यानें केवळ उपक्रम करून दिला; आणखी दहा पांच वर्षे तो जगता तर समग्र राज्यकारभाराची व्यवस्थित घटना कदाचित् त्यानें ठरवून दिली असती. तो कांहींसा एकाएकींच मरण पावला आणि त्याची पद्धत अर्धवट राहिली. ती कायम स्वरूपांत पुरी करण्याचें काम दुसऱ्या कोणी केलें नाहीं. प्रसंगानुसार जरूर ते फेरफार होत गेले. निश्चित घटना ठरली नाहीं म्हणून मराठी राज्य-कारभार बराचसा यदृच्छेनें वाढत गेला.

**३. या व्यवस्थेंतील दोष.**—उत्पन्नाचा पैसा प्रथम सर्व मुख्य तिजोरींत येऊन पडला पाहिजे, अशी तजवीज या सरंजामी कारभारांत राहिली नाहीं हें तिचें मुख्य वैगुण्य आहे. या पद्धतीनें ठिकठिकाणीं मराठ्यांच्या जहागिरी उत्पन्न झाल्या, म्हणजे पर्यायानें त्यांचीं लहान लहान स्वतंत्र राज्यें बनलीं. शाहूच्या निर्वाहापुरतें थोडेंसें राज्य ठेवून बाकीच्याची विभागणी निरनिराळ्या सरदारांत करण्यांत आली. प्रत्यक्ष पेशव्यांकडे सोळा महाल, दोन किल्ले, आणि पंचवीस लाखांचा सरंजाम होता.[1] या शिवाय त्यांचा वार्षिक तनखा तेरा हजार होन आणि सासवड, जळगांव वगैरे ठिकाणीं इनामें होतीं. यावरून इतर सरदारांच्या

१ शा. रो. पृ. ४२, ४६, ४७.

सरंजामाची कल्पना होईल. शिवाजी आपल्या अष्टप्रधानांस रोख तनखा देत असे आणि कामाची वांटणी त्यांजमध्यें स्पष्टपणें केलेली होती. पेशव्याच्या वरील व्यवस्थेंत कामाची वांटणी दिसत नसून, अष्टप्रधान जरी हयात होते तरी ते नामशेष होत चालले होते; आणि बरींचशीं कामें एकएका कर्तृत्ववान् व्यक्तीच्या हातीं संकलित होत होतीं. अष्टप्रधानांचे नक्त तनखे शाहूच्या अखेरीपर्यंत चालले, पुढें मात्र ते चालल्याचें आढळत नाहीं. सारांश, अष्टप्रधानांची राज्यपद्धति शिवाजीच्या मृत्यूनंतर बहुतेक बंद पडून इतउत्तर ती कायमची खुंटली असें म्हणावें लागतें.

जहागिरींच्या पद्धतींत दुसरें एक व्यंग नेहमींच कायम होतें. मोहिमा कोणा व कोठें करावयाच्या याचा हुकूम स्वतः शाहू सोडीत असे. तो हुकूम अंमलांत आणण्याचें काम पेशवे वगैरे सरदारांचें असे; आणि प्रत्यक्ष फौजा लहान मोठ्या जहागीरदारांच्या हातांत असत. ही कामाची वांटणी गैरसोयीची असल्यामुळें कोणतीही मोहीम सुरक्षित तडीस जात नसे. मोहिमांवर गेलेले सरदार कंठशोष करून पैसा व फौजा मागत, त्या त्यांस वेळेवर मिळत नसत. रोकड तनखे देण्याऐवजीं मुलूखगिरीची पद्धत ठरविल्यानें हे दोष उत्पन्न झाले. लष्करची अव्यवस्था(Defective Military Organization)हें नेहमींच मराठी राज्यांतलें मोठें व्यंग असून, त्यामुळें राज्याचें नुकसान कसें झालें हें पुढें व्यक्त होईल. अलीकडेस प्रसिद्ध झालेले बरेचसे कागद ह्या अव्यवस्थेच्या हाकाटीनेंच भरलेले आहेत.

जहागिरीची पद्धति बंद करणें बहुतेक अशक्य होतें असें विचारांतीं वाटतें; परंतु त्या कायम ठेवावयाच्या तर त्यांचें स्वरूप निश्चित केलें पाहिजे होतें. जहागीरदारांचा छत्रपतीशीं संबंध काय, त्यांजवर हुकुमत कोणीं कशी चालवावयाची, व त्यांजकडून नोकरी कशी घ्यावयाची, इत्यादि प्रकार ठरविण्यास बाळाजी जगला नाहीं. पद्धतींचे दोष त्याच्या नजरेंत प्रत्यक्ष येईपावेतों तो जगला असता तर ते त्यानें कदाचित् सुधारले असते. नवीन पद्धत बांधतांनाच जहागीरदारांचीं निर्बंधनें ठरलीं पाहिजे होतीं. युरोपांत मध्यकालीं फ्यूडल् लॉर्ड्स होते त्यांच्याच सारखे हे नवीन स्वतंत्र जहागीरदार एव्हांपासून निर्माण झाले. युरोपांतल्या लॉर्डांनीं जी बेबंदशाही उडवून दिली, तसाच कांहींसा प्रकार इकडेही थोडाबहुत घडून आला.

सर्व सरकारी नोकरांस रोख पगार देणें आणि त्यांच्या नोकऱ्या केव्हांही पिढीजाद न चालविणें हा शिवाजीचा नियम होता. शिवाजीचे कामगार वरचेवर बदलत; परंतु पिढीजाद नोकऱ्या चालविण्याचा प्रघात पेशवाईच्या वेळेपासून सर्रास चालू झाला. शाहूच्या अष्टप्रधानांची नांवनिशी पाहिल्यास, सचिव नारोशंकर अल्पवयी, अमात्य अंबूराव हणमंते, पंडितराव मुद्गलभट उपाध्ये, न्यायाधीश होनाजी अनंत, सुमंत महादाजी गदाधर व मंत्री नारोराम, हे सहा इसम शाहूच्या उपयोगी पडलेले ह्मणून केवळ वतनांचा उपभोग घेण्याकरितां नेमिलेलेच होते. न्यायाधीश व सुमंत आपलीं कामें बरीं करीत होते. अमात्याचें काम तर बाळाजीच पहात होता दाभाडे व प्रतिनिधि वजनदार होते, ह्मणून बाळाजीचा दाब त्यांजवर बसला नाहीं; बाकी त्यांचीं बरीचशीं कामें बाळाजी व त्याचे हस्तक बजावीत होते. ते उत्पन्नें खात व त्यांचीं कामें दुसरा करी, अशी पद्धत रुळत गेली. त्यांच्या ठिकाणीं लायक इसम नेमले असते तर, या प्रधानांचा एकमेकांवर दाब बसला असता. यांत शाहूची व बाळाजीची जबाबदारी किती याचा निश्चय करणें शक्य नाहीं. कित्येक प्रधानांस पुढें पुढें कामगिरीच सांगण्यांत आली नाहीं. नारोशंकर सचिव बराच कर्तृत्ववान् होता, पण त्यास कोणी काम देईना. शाहूला अशा मंडळींची कींव येऊन तो त्यांस मुद्दाम कांही तरी काम सांगे, पण पेशव्यांस तें बहुधा पसंत नसे. एवंच अष्टप्रधान, जहागीरदार वगैरे सर्व पिढीजाद बनले; इतकेंच नाहीं तर राज्यांतले लहान मोठे सर्व नोकर, कारकून शिपाईसुद्धां, पिढीजाद नेमण्याचा प्रघात पडला. यामुळें नोकर सुधारण्याचा मुख्य मार्ग अजीबात बंद झाला; आणि उलट पक्षीं नोकरी बिघडत चालली. अष्टप्रधानांपैकीं आरंभीं कमाई करणारे पुरुष लायक व हुशार होते, परंतु पुढें त्या कुटुंबाचा ऱ्हास होत गेला. कोणत्याही घराण्याचा पिढीजाद वृत्तांत पाहिला तर वरील परिणामांची सत्यता कळून येईल. राज्यांत सर्व व्यवहार उत्तरोत्तर सुधारत व वृद्धिंगत होत जाण्याची सोय असली, तरच राज्य वृद्धि पावतें. हा प्रकार पेशवाईंत उलट झाल्यानें सुधारणेची वाढ खुंटली; त्याबरोबर राजा व प्रजा दोघेही हळूहळू स्वातंत्र्योपभोगास नालायक झाले.

जहागीरदार नवीन न करण्याकडेच बाळाजीची प्रवृत्ति असून, तीन लाखांहून ज्यास्त उत्पन्नाचे जहागीरदार त्याच्या वेळेस नव्हते. शिवाय बाळाजीनें

प्रथम शिरजोर सरदारांशीं लढून त्यांजवर आपला शह बसविला, आणि पाठी-मागून त्यांस संतुष्ट ठेवण्याकरितां जहागिरी दिल्या. याच कारणानें स्वतंत्र होणाऱ्या दाभाड्याशीं पुढें बाजीरावासही लढावें लागलें, तरी एकंदरींत ही पद्धति नाहींशी करण्याचा बाजीरावानें जोराचा प्रयत्न केलेला दिसत नाहीं. पिलाजी जाधव, रघूजी भोसले, उदाजी पवार, व थोड्या बहुत अंशानें आंग्रे हे बाजीरावाचे वेळेस डोईजड झाले. शिंदे होळकरांनींही त्यांचा कित्ता पुढें कांहीं अंशीं उचलिला. डोईजड होणाऱ्यावर प्रथम शह बसवायचा, आणि मग त्याची समजूत करावयाची, हें तत्त्व इंग्रजांनींही पुढें सांभाळिलें, तें मराठशाहींत पाळलें गेलें नाहीं. एकदां सरदार प्रबळ झाल्यावर मग ते सरकार देण्याचा पैसा पाठ-विण्यास नानाप्रकारच्या बयादा सांगूं लागले. ( १ ) पायमल्ली म्हणजे फौजेच्या जाण्यायेण्यानें शेतें तुडविलीं जाणें, ( २ ) दुष्काळ, ( ३ ) युद्धपरंपरा, इत्यादि कारणें सांगून ते दिवाण-देणें पाठवीनातसे झाले; आणि मध्यवर्ती कारभार लंगडा पडूं लागला. शाहूच्या अखेरीपर्यंत हा प्रकार त्याच्या वैयक्तिक इभ्रतीवर कसा-बसा चालला, पण त्याच्या मृत्यूनंतर हे दोष उत्तरोत्तर राज्यास घातक झाले. एकंदरींत लष्कराची व वसुलाची अशा दोन्ही पद्धति मराठशाहींत लंगड्या होत्या, हें मुख्यतः ध्यानांत ठेवण्याजोगें असून, त्याची स्पष्टता पुढें होत जाईल.

४. **सरंजामी पद्धतीचा उगम.**[१]—वतनांसंबंधानें मराठ्यांची आसक्ति सुप्रसिद्ध असून, त्यावरच त्यांचें राजकारण पुष्कळसें अवलंबून असे. सबब त्यांचा उगम व परिपोष यांचें विवेचन करणें जरूर आहे. वतन हा शब्द आरबी असून त्याचा अर्थ स्वतःचें राहण्याचें ठिकाण असा आहे. सरकारची कामगिरी बजावणारास रोख पैशानें मोबदला देणें हा मार्ग राज्याचे दृष्टीनें श्रेयस्कर व सोयीचा असतो, परंतु त्याबद्दल जमिनी तोडून दिल्यानें सरकारचें नुकसान होतें, वतनदार लोक बंडें करितात, आणि अर्जक पुरुष पराक्रमी असला तरी पुढें नालायक इसमांस वतनें चालू राहिल्यानें, सरकार चाकरीस व्यत्यय येतो, असे या पद्धतीचे अनेक तोटे आहेत. देवस्थानांस किंवा सरकारचें अभीष्ट

१ जेधे श.; स. प. पृ. १७७ व २५५; खं. ८. १०, ११, १७; खं. १५. २८१, २८३, २८४, २८६, ३४१, ३४२, ३४५, ३४६, ३४८, ३४९ ३५९, ३६५; खं. १६. २८; खं. १७. २०, २१.

चिंतन करणारास रोख रकमा पोंचविणें हा पहिला मार्ग, परंतु अडचणीच्या प्रसंगीं अशीं वेतनें वक्तशीर पोचूं शकेनात आणि देवपूजेचें काम बंद पडूं नये, म्हणून त्या ऐवजीं जमिनी तोडून देण्याचा प्रघात पडला. हा प्रघात देवस्थानांपुरता मोगल बादशाहींत उत्तर हिंदुस्थानांतही होता. परंतु सरकारची नोकरी करणारांस, फौज ठेवून सरकारास मदत करणारांस, अगर अन्यतऱ्हेनें स्वतःचा जीव वगैरे धोक्यांत घालून सेवा करणारांस जमिनी तोडून देण्याचा प्रघात नर्मदेच्या उत्तरेस फारसा नाहीं; हा प्रकार बहुधा दक्षिणेंत आहे, म्हणून वतन या शब्दास इकडे विशिष्ट अर्थ आला आहे. दक्षिणेंत अनेक प्रकारचीं वतनें प्रचलित आहेत. वतनी कारभारासंबंधीं शिवाजीची व्यवस्था खं. ८·१७ यांत उपलब्ध आहे. गांवचा कारभार करणारा तो पाटील व त्याचें लेखन करणारा कुळकर्णी, हे तरी एक प्रकारचे वतनदारच होत. वऱ्हाडांत यांचेच पर्याय शब्द पटवारी व पांडे, आणि कानडी प्रदेशांत गौड व कुळकर्णी होत. कित्येक गांवांचा गट करून त्याजवर देखरेख ठेवणारा तो देशमुख, त्यास मदत करणारा देशकुळकर्णी, व देशपांडे आणि कानडातील नाडगौंडा, यांचा अर्थ एकच असे. हे शब्द प्रांतभेदानें व कालभेदानें अस्तित्वांत राहिले. मुकासा म्हणून एक बाब होती, ती चालविणारा तो मोकाशी; देसाई म्हणजे देशस्वामी अथवा देशमुख, आणि त्यांजवर सरदेसाई अथवा सरदेशमुख, अशी वतनदारांची परंपरा होती. दक्षिणदेशची सर्व सरदेशमुखी भोसले छत्रपति आपली समजत. बादशहाचे कैदेंतून येतांना शाहूनें प्रथम आपली सरदेशमुखी तिकडूनच बहाल करून घेतली होती, त्याच्या सनदा पुढें दिल्लीहून आल्या. तसेंच सरंजाम म्हणजे तरतूद किंवा साहित्याची बेगमी; सरकारांतून कोणास कांहीं मानमरातब दिला, म्हणजे तो चालविण्याच्या खर्चासाठीं जें वेतन अगर जमीन द्यावयाची त्यास सरंजाम म्हणत. या शद्बाचा शिवाजीचा अर्थ खं.८.१९च्या 'सरंजामी' कागदांत व्यक्त आहे. परंतु पुढें फौजेच्या बेगमीस मुलूख तोडून देण्याचा प्रघात चालू झाला, त्यासच सरंजाम हा शद्ब विशिष्टार्थानें लावण्यांत येऊं लागला. कालभेदानें कांहीं वतनांचा संकोच झाला व कांहींचा विस्तार झाला. सारांश, राज्यांत विशिष्ट कामें करण्यासाठीं जे हक्क किंवा उत्पन्नें वंशपरंपरेनें देण्यांत आलीं, त्यांस वतन ही सामान्य संज्ञा प्राप्त झाली.

मोगल बादशाहात जमिनीचीं वतनें वंशपरंपरा देण्याचा प्रघात नव्हता,

हें वर सांगितलेंच आहे. मांडलिक राजे आपल्या फौजा घेऊन बादशहांची चाकरी करीत, परंतु त्यांचें स्वरूप सरंजामी पद्धतीचें नव्हतें. बादशाही सुभेदारांस सरंजाम नव्हते. सरंजामी वतनांचा अंमल बहुधा नर्मदेच्या दक्षिणेस महाराष्ट्रांतच जारी होता. इकडील डोंगराळ व दुर्गम प्रदेशांत वसाहती करणारांस महाप्रयास पडले. जंगलें तोडून, श्वापदें वगैरे मारून, मुलखाची लावणी संचणी करण्यासाठीं व चोरीमारीचा बंदोबस्त ठेवून सुरळित कारभार चालण्यासाठीं, बहामनी सुलतानांनीं किंवा तत्पूर्वींच्या राजांनीं, लोकांस जमिनीचीं वतनें देण्याचा प्रघात सुरू केला. त्या काळास असें करणें अपरिहार्य होतें. लोकांवरच बंदोबस्ताचा भार टाकण्यांत आला. जेधे, शिर्के, जगदाळे, सुर्वे, मोरे, महाडिक, भोसले, वगैरे अनेक लहान मोठे मराठे सरदार निजामशाही व आदिलशाही राज्यांत थोड्या बहुत फौजा बाळगून किल्यांच्या वगैरे आश्रयानें मुलखांत बंदोबस्त ठेवून, आपापल्या वतनांत नांदूं लागले होते. पुढें या आपल्या वतनांवर आपले हक्क सांगतांना या मागील हकीकतींचा उल्लेख त्यांचे वंशज आपल्या तक्रारींत सदैव करितात. शिवाजीनें स्वराज्याचा उद्योग सुरू केला, तेव्हां मुसलमानी अंमलांतले हे वतनदार त्यास कसे आडवे आले आणि त्यांचा बंदोबस्त त्यानें कसा केला, हें महशूर आहेच. आपणास सामील न होणाऱ्या लोकांस बंडखोर ठरवून त्यांचीं वतनें शिवाजीनें काढून घेतलीं, आणि किल्ल्यांचा बंदोबस्त स्वतःचे हातांत घेऊन राज्याचा पाया घातला. शक्य तितका वतनें व इनामें लोकांचीं काढून घेऊन त्यांस त्यानें नक्त नेमणुका ठरवून दिल्या. यांस बटाईचा तह अशी कागदोपत्रीं संज्ञा आहे. दिल्लीहून सुटून आल्यावर त्यानें जीं दोन वर्षें राज्यकारभारांत घालविलीं, त्या वेळीं हे बटाईचे तह त्यानें केले; व ते धार्मिक इनामांसही त्यानें लाविले. शिवाजीच्या कडक शिस्तीखालीं हे वतनदार कांहीं काळ त्यास शरण आले, तरी वतनांवरील त्यांची नैसर्गिक आसक्ति नष्ट झाली नव्हती. शिवाजी सुद्धां सर्वच वतनदारांस नाहींसे करूं शकला नाहीं, आणि असे प्रकार एकदम बंद होणें शक्यही नसतें. त्याचे पश्चात् औरंगजेबानें महाराष्ट्रावर स्वारी केली, तेव्हां संभाजीची त्रेधा उडून वतनदार लोकांचें पुनः फावलें. परंतु त्यानेंही वतनदारांस कसें जेरबंदांत धरलें तें खालील ता. ५-१०-१६८५ च्या लेखांत व्यक्त होतें. ' आधीं तुम्हींच हरामखोरी केली कीं वतनदार होऊन

इमानें इतबारें वर्तावें ते गोष्ट न करितां, स्वामींचे अन्न बहुत दिवस भक्षिलेंत त्याचें सार्थक केलेंत, कीं स्वामींच्या पायांशा दुर्बुद्धि धरून दोन दिवसांचे मोगल त्यांकडे जाऊन राहिलेस. तुमचा भाऊ गनीमाकडे गेला, तो तुह्मांस बरें पाहाना ऐसें होतें, तरी तुह्मीं स्वामींसंनिध हुजूर यावें होतें. ह्मणजे तुमचें इतबारपण व एकानिष्ठता कळों येती, तें केलें नाहीं. याउपरीहा तुम्हांस गनिमाकडेच राहणें असेल, तर सुखें रहाणें, तुमचा हिसाब तो काय आहे ! ये क्षणीं स्वामी आज्ञा करितात तरी गनिमादेखील तुह्मांस कापून काढवीतच आहेत, हें बरें समजणें. दुसरी कीं तेथें राहणेंच नाहीं, एकनिष्ठेनें स्वामींच्या पायांजवळी वर्तावें ऐसें असलें तर तुह्मी परभारें मुद्दे सांगोन गडकिल्यांकडे राबते काय म्हणून करितां ? हे गोष्ट स्वामीस मानत नाहीं. जो राबता करणें तो स्वामीकडेच करून लिहून पाठवावें. स्वामी तुमचा मुद्दा मनास आणून जे आज्ञा करावयाची ते करितील. आज्ञापत्र सादर होईल, तेणेंप्रमाणें वर्तणूक करणें.' यावरून वतनदारांच्या खटपटी आणि संभाजी व त्यांचे कारभारी यांची दक्षता व्यक्त होते. पुढे संभाजीनें जध्यांचे इसाफतीचे ×गांव व इनाम पूर्वीप्रमाणेंच चालविले जातील, दर्शन होतांच सरंजामी होईल, सर्फराजी करून बहुत चालवूं,' असें वचन देऊन त्यांची समजूत केली. तथापि सरकारकामीं जीव खर्च केल्याबद्दलही संभाजी लोकांस जमिनी इनाम न देतां रोख पारितोषिक देत असे. येसाजी कंक यानें फिरंग्यांशीं लढतानां बहुत कस्त केली व त्याचा पुत्र स्वामिकार्यावर मयत जाला, त्याबद्दल ता २३-६-१६८५ रोजा दोन हजार होन संभाजीनें बक्षीस दिले यावरून जमिनीचें वतन देण्याकडे त्याचा कल नव्हता असें ह्मणतां येतें.

संभाजीचे पश्चात् परिस्थिति बदलली. औरंगजेब बादशहानें सर्व राज्य उद्ध्वस्त केलें, राजाराम पळून जिंजीस गेला, तिकडेही त्यास वेढा पडून तमाम मुलूख मराठे व मोगल या दोघांच्या तडाख्याखालीं बेचिराख झाला. मोगल नवीन वतनें देऊन मराठे वतनदारांस फितवूं लागले. तेव्हां लोकांची धांदल उडाली. ' पहिले निजामशाही व आदिलशाही यांचे कारकीर्दीस वतनें चालत होतीं तेणेंप्रमाणें चालवावयाची आज्ञा करून अभयपत्र द्यावें,' अशा मागण्या वतनदारांनीं जिंजीस जाऊन राजारामाकडे केल्या. तेव्हां ' ते प्रांताच्या कार्यभागास

× इसाफत ह्मणजे संपूर्ण इनाम, ज्यांत सरकारचा अंश मुळींच नाहीं.

रामचंद्र पंडित अमात्य व शंकराजीपंत सचिव ठेविले आहेत ते वतनांचा निर्वाह करून सनदा देतील त्या स्वामींच्याच समजून स्वामी चालवितील. स्वामिकार्य करून आपला मुजरा करून घेणें, अभय असे.' म्हणजे तुमच्या वतनांस भय नाहीं असें राजारामानें जाहीर केलें. 'हे मराठे लोक या प्रांतीचे वतनदार होत. यांणीं वतनावरी राहोन स्वामिसेवा एकनिष्ठपणें केली व पुढेंही करीत आहेत, यास्तव यांजवरी चंदीचे मुक्कामी स्वामी कृपाळू होऊन भूमि इनाम दिल्ही. यांणीं देशास येऊन वतनाची लावणी संचणी करून स्वामिकार्य केलें. राज्यांत एकनिष्ठपणें सेवा केली. हे मोख्तसर जमीदार व कामाचे व पातशाही जमीदार आहेत. हें महाराष्ट्र राज्य आहे. तुह्मी या राज्याची पोटतिडिक धरतां, तरी राज्यकारणाचा चालना करून जमाव करून सावध राहून स्वामिकार्य दृष्टीस पडलें तें मनास आणून लिहून पाठविणें. तुमची सरंजामी चालवूं. स्वामीच्या पायांशीं एकनिष्ठा धरून स्वामिकार्य करणें. औरंगजेबानें मराठे लोक मुसलमान केले, तमाम लोक बाटले तरी हिमती धरणें. आपले वतनाचा हक्क लाजिमा इनाम व इसाफती कारकीर्द आदिलशाही पावेतों, त्यावर थोरले साहेबांचे कारकिर्दीस बटाईचा तह झाला त्यामुळें गांव दिवाणांत पावून हक्काची मोईन (म्हटाराकड नेमणूक) दिवाणांतून करून दिली, तेणेंकरून आपली हैराणगी झाली. अन्नवस्त्राची विपत्ति झाली. पुढें लोकांनीं गनीमाशीं सामील होऊन फिसाती केल्या. आपण वतनदार लोक, एकनिष्ठ सेवा करून देश गनीमापासून सोडविला, पुढेंही जमाव करून घेतच आहों, म्हणून विदित केलें, त्यावरून तुमचे हक्क व इनाम इसाफतीचे गांव तुम्हांस देवविले आहेत. ताम्राची फिसात झाली त्या प्रसंगीं आपण एकनिष्ठपणें राहून सेवा केली आहे. विलायती कूल खराब पडली होती, त्याची लावणी संचणी केली, फार मर्दुम्या करून राज्य मिळविलें, स्वामीकरितां खराब जाले व मारले गेले. हल्लीं जो कोणी वतनदार एकनिष्ठा धरून स्वामिकार्य करून देईल, त्यास इसाफती व वतनभाग चालला असेल तेणेंप्रमाणें मजरा असे. त्या प्रांते आलियावरी तुमची हि सरंजामी चालवूं. सालगुदस्त किल्ले रायगड मोगलांस कबज झाला, मुलखांत मोगलाईचा अंमल चालला, हल्लीं श्रीकृपेनें राज्याचा मामला थाटत चालला, ऐशास बाजे वतनदार हुजूर येऊन अर्ज केला, कीं आह्मीं साहे-

बांशीं एकनिष्ठ आहों. पूर्वी कैलासवासी स्वामीचे वेळेस आपलीं वतनें अमानत करून हक्काची मोईन ( रोकड नेमणूक ) करून देत असत. सांप्रत गनीमाचे धामधुमेमुळें व दुकाळामुळें रयत गेली, मेली, जुजबी राहिली त्यास खावयासी व रहावयासी नाहीं. तरी आमचीं वतनें आमचे हवालीं केला पाहिजेत. ह्मणून अर्ज केला, तो मनास आणू समस्त वतनदारांचा वतनें त्यांचे हवालीं केलीं असत ( ता. ५–१०–१६९८ ). असा मजकूर त्या सनदांत आहे. ' लोकांचे सरजाम ठरवून दिले असतील त्याप्रमाणें चालवूं 'असेही राजारामाचे उल्लेख आहेत. कित्येक कागदांत पंचसहस्रीचा उल्लेख असून दंडकप्रमाणें घोड्यास रातीब व स्वारास रोजमुरा देऊन स्वामी चालवितील, असे उल्लेख आहेत. ' मावळांचा मामला सुरळीत होऊन आबादानी व्हावी,तुह्मां लोकांचा गोमटीं करावा म्हणून महादाजी शामराज यास सुभा नेमून पाठविले आहेत. कदीम सेवेचे लोक आहेत त्यांचे कुल जमान महादाजी शामराज यांजवळ पाठविणें. त्याखेरीज तुह्मीं नवा जमाव करूच सुभेदाराजवळ राहणें. गनीम कूल मारून काढणें. तुमचे हक्क हुजुरूनही चालवूं, ' अशी राजारामाचा वचनें आहेत.

यावरून उघड आहे कीं सरंजामी पद्धतीचें मूळ स्वरूप प्राचीनपासून रूढ झालेलें शिवाजीनें जरी थोडें बहुत मर्यादित केलें, तरी विभिन्न परिस्थितींत तें पुनः जोरानें उद्भवलें. सरकारपाशीं पैसा नाहीं. राज्याचा वसूल बंद पडलेला, आणि शत्रूशीं झगडण्यास फौजा तर पाहिजेत ह्मणून बिनखर्चानें कामगिरी चालेल असा उपाय राजारामास अपरिहार्यतेमुळे स्वीकारावा लागला. ता. १-१०-१६९६ च्या सनदेंत खालील मजकूर आहे ' फलटण महाल पूर्वी आदिलशहाचे कारकीर्दीस आपले बाप यांस दरोबस्त इनाम दिला होता. शंभर स्वार चाकरीस यावे ऐसा निर्वाह होता, तेणेंप्रमाणें इनाम देवावा. शंभर स्वार चाकरीस देऊं ह्मणून विदित केलें, त्यास शंभर स्वार चाकरीस यावे ऐसा निश्चय करून परगणा इनाम दिल्हा असे. दरसाल चाकरी करून पुत्रपौत्रादि वंशपरंपरेनें अनुभवून सुखरूप असणें. ' अशाच मासल्याच्या आणखी पुष्कळांच्या सनदा त्या वेळीं झाल्या असल्या पाहिजेत. राज्यावरचें अरिष्ट टाळण्यासाठीं या पद्धतीचा अंगीकार त्या वेळीं करावा लागला. वतनदारांस कसें वागवावें या संबधानें सक्तीची राजनीति शिकविणारा खुद्द रामचंद्रपंत

असाल्य आपला मुज्मूचा हुद्दा व त्याचें इनाम वंशपरंपरेनें चालवावें अशी मागणी करतो.× ' स्वामींच्या राज्यानिमित्य श्रम साहस करून राज्याभिवृद्धि केली, या करितां स्वमींना मुज्मूचा हुद्दा जीर्णोद्धार करून आपणांस सांगितला. परंतु हुद्दा म्हणजे भारगीर वस्तु आहे, ( म्हणजे उत्पन्नाशिवाय त्याचा भार सहन होण्याजोगा नाहा. ) सबब इनामती व वतनें अजराम-हामत वंशपरंपरेनें चालेत ऐशी आज्ञा केली पाहिजे, त्यावरून स्मामींनी मेहरबान होऊन कदीम वतनें व नूतन इनामती देऊन पत्रें करून दिल्हीं.[१]'

' पाटणकर हें वतनदार लोक, यांस सेवा सेना-पंचसहस्री सांगितली आहे. हें राज्य मराठे, देवाब्राम्हणांचें, पाटणकरांनीं जमाव केला, गनिमाच्या फौजा मारून दळ मेहनत खस्त झाले. कर्ज घेऊन आपला हिस्सा जमावाचे भरीस घालून राज्य रक्षावयाची महर्ता केली. त्यावरून कृपाळू होऊन इनाम देहाय १२ दिल्हे.' कठीण प्रसंगीं सरकारास कर्ज दिल्याबद्दलही पुढें इनामें देण्यांत आलेला आहेत[२].

' धामधुमीचे प्रसंगें स्वामिसेवा एकनिष्ठपणें केली ' असें वतनदार राजारामास वरचेवर बजावतात. या सेवेचा अर्थ असा कीं, १ मोगलांस सामील न होतां, २ मुलखाची लावणी संचणी करितों, ३ स्वराज्यांत वसूल देतों, ४ फौज ठेवून चोऱ्या वगैरेचा बंदोबस्त करितों, ५ आणि सरकारासाठीं लढाया मारतों, अशा प्रकारची पंचविध सेवा केल्याबद्दल हे वतनाचें बक्षीस मागतात. आपलें मागणें कबूल न केल्यास ते मोगलांस मिळण्याचा धाक घालीत. मोगल तर त्यांच्या बोलेल त्या मागण्या कबूल करीत. याशिवाय दुसरा वतनदारांचा वर्ग म्हणजे मूळच्या आदिलशाहींतला. आदिलशाही जिंकल्यावर त्यांतले वतनदार मोगलांनीच ताब्यांत आले त्यांस फोडून आपल्या बाजूस आणणें जरूर होतें. आणखी एक तिसरा वर्ग नवीनच वतनें संपादूं इच्छिणाऱ्यांचा होता.[३] असलेलीं वतनें पुढें चालवूं व नवीन देऊं, अशीं लेखी वचनें हे मागूं लागले. तेव्हां त्यांस कायम आश्वासनें देणें चालकांस भाग पडलें. शत्रुपक्षांत फूट पाडण्यासाठीं बाहेरच्यांस ज्या सवलती देणें भाग पडलें, त्या आपल्या लोकांसही

×पृ. २३ प्रकरण ३ . १ टीप स. प. पृ. १८७. या प्रकरणांतील ले. २३, २६, २७, ३ . . , ३२, ३५, ३८, ३९, ४३, ४४, ४५, ५२, ५३, वगैरे सनदा अशा मासल्याच्या आहेत. २ स. प. २०२. ३ खं. १५ पृ. ६३.

देणें अपरिहार्य झालें. कारण, न द्यावें तर हे म्हणणार कीं, आम्हीच काय असें पाप केलें कीं आमचीं वतनें या नवीन वतनदारांप्रमाणें कायम चालूं नयेत. सारांश, आरंभीं हे वतनदार आर्थिक कारणांनीं उत्पन्न झाले आणि पुढें राज्यावर संकट आलें त्या धामधुमींत ते बद्धमूल बनले. राजाराम जिंजीहून परत आला तेव्हां स्वतःचें राज्य असें बिलकूल शिल्लक राहिलें नव्हतें, ह्मणून वतनांच्या लालुचीवर लोकांस हाताशीं धरून त्यास उद्योग करावा लागला. वाटेल तशा सनदा दिल्या हें गैर झालें, याची जाणीव राजारामास व त्याचे मुत्सद्दी यांस असून, चंजीहून परत आल्यावर कोन्हेर पंडित न्यायाधीश नेमून जुन्या वतनांचा तपास केला. तोंवर नूतन एकंदर कोणाकडे न चालविणें: कै. स्वामींच्या वेळेप्रमाणें बिलाकुसूर चालविणें असा हुकूम केला. ता. (१६-३-१६९९, खं. ३-१४४.)

राजारामाचे पश्चात् थोडीबहुत स्वस्थता झाल्यावर चंदीहून दिलेल्या वतनांचा विचार मनास आणितां राज्याचा बंदोबस्त न होतां सनदा दाखल झाल्या, ते समयीं ताराबाई साहेब, व सर्व राजमंडळ मिळोन या संबंधानें नवीन निर्णय केला, ( खं. ८-५२ ), आणि कित्येक सनदा रद्द केल्या. तरी वर सांगितलेलीं तत्त्वें बहुतेक कायम राहिलीं, आणि अनेक अमदानींत दृढ झालेली पद्धत सर्वस्वी रद्द झाली नाहीं. ताराबाईनें सात वर्षे कशीबशी निभावणी केल्यावर शाहूचें आगमन देशीं झालें. त्याचीही हलाखी आर्थिक दृष्ट्या होतीच. ताराबाईशीं झगडण्याकरितां व लोकांस आपल्या बाजूस वळविण्यासाठीं त्याला सरंजामी पद्धतीचा अंगीकार विशेष जोरानें करावा लागला. धनाजी जाधव, आंगरे, निंबाळकर, दाभाडे, अक्कलकोट व नागपुर येथील भोसले वगैरेंना मोठ मोठे सरंजाम त्यानें आरंभींच तोडून दिले. महाडिकास शाहूची आज्ञा ता.७-१०-१७०७ ची आहे. पुढें ता. २०.९.१७०९ रोजीं शंकराजी महाडिक यास शाहूनें कुल अखत्यार देऊन कर्नाटकांत मुलखगिरीवर पाठविलें, आणि तिकडील पाळेगारांचे सरंजामाविषयीं आज्ञा केल्या. 'सर्वांस जमावानिशीं येण्यास सांगून स्वामी सर्फराजी करून चालवितील,' असे त्यानें हुकूम दिले. याच महाडिकास कोल्हापुरच्या संभाजीनेंही पुढें आपल्याकडे ओढण्यासाठीं फौजेचे बेगमीस सरंजाम करून दिल्हा. 'या सरंजामांतील फौज तुह्मांस सामील होईल, त्यांचा सरंजाम त्यांस चालविणें. फौजेस देऊन जमाव करणें. फौजमवाफिक सरंजाम करून देणें. (इ. सं. प्रा. म. स. पृ. १२-१८).

यावरून हें उघड आहे कीं शिंदे, होळकर, गायकवाड, पवार वगैरे सरदार पुढें सरंजामी झाले, ते पूर्वीं चाललेल्या रिवाजानेंच झाले. सेनासाहेब–सुभा, सरलष्कर, सेनापति, सरखेल, प्रतिनिधि, सचिव ह्यांचे सरंजाम प्रथम चालू झाले त्या वेळीं बाळाजी विश्वनाथाचे साह्यानें अगर अनुमतीनें ते झाले असें म्हणतां येत नाहीं. असलेले प्रकार जमेस धरून पुढें बाळाजीनें कारभाराची व्यवस्था शक्य तितकी बसविली. बाजीरावाच्या पहिल्या दहा पांच वर्षांत शाहूचा विश्वास त्याजवर फारसा नव्हता, ह्मणून बाजीरावावरही या पद्धतीची जबाबदारी टाकतां येत नाहीं.सरंजामी पद्धतीचे जे काय गुणदोष असतील ते पूर्व प्रघात व निरनिराळ्या वेळचीं परिस्थिति यांमुळें प्रथम उपस्थित झाले, आणि शाहूनें त्यांचा परिपोष केला. त्याबद्दल एकाच इसमास जबाबदार धरतां येत नाहीं. बाकी अशा पद्धतीनें लोकांस मोठें उत्तेजन मिळालें, म्हणूनच मराठी राज्याचा विस्तार देशभर झपाट्यानें होऊन, दळणवळणाचीं साधनें नसतांही दूरदूरच्या प्रांतांत हे सरदार आपलें कायमचें वास्तव्य करून टिकाव धरूं शकले, आणि शेंपन्नास वर्षे राज्याचा बचाव झाला, ही गोष्ट उघड आहे. सरंजामी पद्धतीमुळेंच मराठाशाहीचा नाश झाला असें म्हणतां येत नाहीं.

लष्करी सरंजाम देण्याचा प्रघात चालू झाला तेव्हां सामान्यतः खालील अटी प्रचारांत आल्या. उत्तर पेशवाईत थोरले माधवराव व नानाफडणीस यांचे कारभारांत सरंजामाचे नियम व्यवस्थित ठरलेले पाहण्यास सांपडतात, त्यांत आरमार, किल्ले वगैरेंचाही खुलासा दिसून येतोः—[1]

१ सरदारांनीं आपापल्या मुलखांत मुलकी व लष्करी अंमल चालवावा.

२ छत्रपति व त्याचे मुख्य प्रधान यांच्याशीं इमानानें वर्तीन हुकमाशिवाय कोणत्याही सरदारानें परराष्ट्रांशीं लढाई किंवा तह करूं नये.

३ ठरविलेला आकार सरकारांत भरावा. ४ चांगले लोक फौजेंत बाळगून सरकारांत हजिरी गणती बिनबोभाट देत जावी.

४ जहागिरीच्या उत्पन्नाचे हिशेब सालोसाल रुजू करून सरकारचे दरकदार तपासतील त्यांस ते तपासूं द्यावे.

१ थोरले माधवरावाची रोजनिशी भाग१ ले. ३४१, ३६९, ३८१, ३८७.

५ लोकांचीं, देवस्थानांचा इनामें वगैरे असतील तीं शिरस्तेप्रमाणें चालवावीं.
या अटी सरदारांनीं पत्करल्या. जहागिरी मिळाल्याबद्दल सर्वांस मोठा आनंद झाला, व जवळच्या मोगलांचा प्रांत काबीज करून आपली जहागीर वाढविण्याची जो तो सरदार खटपट करूं लागला. तात्पुरती एकी राहण्याचें एक कारण, प्रत्येक मराठा सरदाराचें महाराष्ट्रांत छत्रपतीच्या हद्दींत वतन किंवा इनाम असे, आणि अशा परंपरागत आलेल्या वतनावर त्या सरदारांची विशेष आसक्ति असल्यामुळें वतनाच्या काळजीनें ते छत्रपतीशीं नम्रतेनें वागत.

मराठी राज्याची घटना, चौथाई सरदेशमुखीच्या हक्कांच्या द्वारें झालेला राज्याचा फैलाव, आणि एकंदर राज्यव्यवस्थेचे गुणदोष यांच्या संबंधानें नानाप्रकारें विवेचन वेळोवेळीं निरनिराळ्या व्यक्तींनीं केलें आहे. त्या विवेचनांत लक्षांत ठेवण्याजोगे मुद्दे काय आहेत, त्यांचा उल्लेख येथवर केला आहे. खरें ह्मटलें तर त्या वेळा राज्यकर्त्यांचे डोळ्यांपुढें जे उद्देश व योजना होत्या त्या सर्व आपल्यास आज उपलब्ध नाहींत.

५. **मराठशाहीच्या विस्ताराचें धोरण.**—स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखी हे हक्क हळूहळू कसे फैलावत गेले हें पाहण्यासारखें आहे. सय्यदांपासून बाळाजी विश्वनाथानें मिळविलेल्या सनदांनीं, स. १६७४ त शिवाजीच्या वेळेस जेवढें मराठ्यांचें राज्य होतें, तेवढें सहुलतीनें स्वराज्य ह्मणून शाहूकडे कायम आलें. सय्यदांचा पाडाव झाल्यावर स. १७१९ त पूर्वीच्या सनदांची पुनरावृत्ति बाजीरावानें महंमदशहाकडून करून घेतली. पुढें या तीनही सनदांप्रमाणे अंमल करण्यास निजामानें हरकत केली, तेव्हां सन १७२५–२८ पर्यंत एक व स. १७३०–३१ त दुसरी अशा दोन मोहिमा करून शाहूनें निजामास व कोल्हापुरच्या राजास जाग्यावर बसविलें. तेणेंकरून निजामाचा मराठी राज्यांत दुफळी पाडण्याचा डाव बंद पडला, आणि मराठ्यांचे तीनही हक्क दक्षिणेंतील मुसलमानांच्या सही शिक्क्यानिशीं कायम झाले ( स. १७३२ ). या वर्षापुढें निजाम मराठ्यांचे झगडे झाले ते निराळ्या स्वरूपाचे, म्हणजे बाह्य प्रांतांसाठीं होते. प्रथम वारंवार स्वाऱ्या करून एकदम प्रांतांतून सालोसाल चौथाईचे वगैरे हक्क वसूल करावयाचे, आणि असा क्रम कांहीं वर्षे चालल्यावर मग त्या प्रांताबद्दल त्या हक्काच्या सनदा बादशहाकडून मागावयाच्या, हा मराठशाहीच्या बाह्य उद्यो-

गाचा क्रम होता. दक्षिणचे सहा मुसलमानी सुभे पदरांत पडल्यावर, बाजीरावानें तोच क्रम गुजराथ व माळवा या प्रांतांत चालविला, आणि हे दोन कबजांत आल्यावर पुढील पेशव्यानें हिंदुस्थानच्या बहुतेक इतर प्रांतांस, म्हणजे उत्तरेस पंजाब, पूर्वेस बंगाल, व दक्षिणेस म्हैसूर कर्नाटक, ह्या भागांसही आपल्या कक्षेंत आणिलें. पहिल्या तीन पेशव्यांचें हे उद्योगसातत्य स्मरणीय आहे. गुजराथ, माळवा व उत्तर हिंदुस्थान या नवीन प्रांतांत मराठ्यांचा हा क्रम बहुतेक सिद्धीस गेला. तेव्हां बादशहानें त्यांचा अटकाव करण्याकरितां पुनः निजामाची मदत मागितली, ह्मणून स. १७३७–३८ त बाजीरावाचा व निजामाचा झगडा झाला. त्यांत निजामाचा पाडाव होऊन शाहूच्या मृत्युपूर्वी गुजराथ, काठेवाड, निमच, माळवा, बुंदेलखंड, आग्रा, दिल्ली, दुआब, अयोध्या, गोंडवण, संबळपुर, ओरीसा, बंगाल इत्यादि मोगल बादशाहीच्या प्रांतांवर मराठ्यांनीं आपले हक्क लागू केले: आणि शाहूचे पश्चात कर्नाटक व पंजाब या दोन प्रांतांवरही पेशव्यांनीं मराठ्यांचा राज्य वसवून हातीं घेतलेल्या उद्योगाची तड बहुतेक सर्व हिंदुस्थानभर पोंचविली.

६. गनिमी काव्याचा चौथाई व सरदेशमुखीच्या हक्कांचा कुठला प्रसार तो सरु केलेल्या तैनाती फौजेशीं केला आहे. राष्ट्र वाढवणें जरूर लागलें म्हणजे त्यास विशिष्ट धोरण धारण करावें लागतें. लोकांवर आपला दरारा बसवून आपणास आजूबाजूचीं राष्ट्रें मान देतील अशी तजवीज ठेवावी लागते. यास इंग्रजींत 'Vigorous policy' ह्मणजे 'जोरानें आपला पसारा सर्वत्र बसविणें' असें नांव आहे. केवळ स्वसंरक्षणाची सिद्धता करून वाढणें राष्ट्रास भागत नाहीं: बचाव सोडून चढावाचें धोरण स्वीकारावें तेव्हांच त्याचा निभाव लागतो. जो प्रकार व्यक्तीचा तोच कांहीं अंशीं राष्ट्राचाही आहे. प्रतिनिधि व बाजीराव यांचे भांडणाचा मूळ मुद्दा या तत्त्वाविषयीं होता: आणि शाहूनें बाजीरावाचें प्रतिपादन स्वीकारून तदनुसार आपल्या सरदारांस निरनिराळ्या ठिकाणीं चौथाई सरदेशमुखीचे हक्क वसूल करण्याची आज्ञा देऊन त्यांस संचारक्षेत्र विभागून दिलें. हे हक्क तलवारीच्या जोरावर मिळवावयाचे व तलवारीच्या जोरावरच राखावयाचे, असा जरी सिद्धान्त होता, तरी सरदारांच्या या कृत्यास निवळ देश जिंकण्याचें किंवा परापहाराचें स्वरूप येऊं नये म्हणून, ते हक्क वसूल करण्याची लेखी परवानगी सनदांनीं बादशहाकडून खटपटीनें मिळवावयाची, असा क्रम चालला. दक्षिणच्या सहा

सुभ्यांसंबंधानें हे हक्क बाळाजी विश्वनाथानें पैदा केल्यावर त्यांचा विस्तार बाजीरावानें माळव्यांत, दाभाड्यानें गुजराथेंत, व भोसल्यानें वऱ्हाडांत केला. रजपुतांना, दिल्ली, दुआब, आग्रा, अयोध्या, बंगाल या प्रांतांतही मराठ्यांनीं आपला उद्योग सुरू केला. मराठी राज्याची शक्ति व दौर्बल्य हे दोनही प्रकार या उद्योगांत व्यक्त होते. कोल्हापुर व तंजावर येथील राजांनीं अशी बाह्य संचाराची जोराची पद्धति स्वीकारिली नाहीं. ह्मणून उत्तरोत्तर तीं राज्यें संपुष्टांत येऊन नामशेष झालीं.[1] उलट पक्षीं शाहूच्या आरंभीं जें ' स्वराज्य ' ह्मणून होतें तें त्याच्या कारकीर्दीच्या अखेरीस सर्व दिशांकडे वृद्धि पावलें; परंतु तत्वतः हा परिणाम केवळ तरवारीच्या जोरावर देश जिंकून झाला नाहीं. सर्व सरदारांना एकमेकांची मदत पाहिजे होती आणि ती मिळण्याची सोय त्या पद्धतींत नव्हती. शिवाय मोगल बादशाहीवर शस्त्र चालवून तें राज्य बुडवावें अशी शाहूची भावनाही नव्हती. ज्या बादशाहींत आपण वाढलों, तिला आपण साह्य करावें, तिचा आपण होऊन नाश करूं नये असें शाहू वारंवार ह्मणे. ' आगमंतात् रांजरजवाडे वगैरे यांचे तट झाले आहेत. कोणी आपणाहून जबरदस्त असा दौलतदार जवळ नाहीं. एक श्री ( शाहूमहाराज ) दिल्लीस पाय लावील, तर वाडलांचा ( शिवाजी संभाजींचा ) हेतु शेवटास न्यावा असा मनोदय होता, परंतु आमचे मातुश्रींना (बेगमेनीं ) संगोपन करून त्यांजला ( बादशहाला ) मोहांत घालून, मातृपक्षीय करून, त्याचे हातून आह्मांस ठिकाणीं बसविलें, तेव्हां मातृस्थानीं विरोध करणें कामाचें नाहीं असें मनांत येऊन, त्यांची ( बादशहाची ) स्वस्थता राखून संपूर्ण सत्ता वागवावी हा इरादा मनांतील, त्या समयीं आमचे मातुलांस शहाजाद्यांस दुर्बुद्धि होऊन आपसांत कलह करूं लागले. त्यांचा पक्ष धरून विचार करावा तरी, मागें दिल्लींत राहिले त्यांना ( मातुश्री व वकिलांनीं ) समजूत करून ( आमचें ) संस्थान सांभाळिलें; आतां उलट मसलत करणें नीट नाहीं, आणि आमचाही समय आला, त्यापेक्षां हें राज्य तुम्हीं रायास देऊन एकविचारें चालवा. एकमेकांस परस्परें अंतर देऊं नका. ' असे विचार शाहूनें अंतकालीं प्रगट केलेले आहेत.[2] अर्थात् यावरून मराठमंडळाचें उद्दिष्ट कार्य शाहूच्या मनांत कशा प्रकारचें होतें हें दिसून येतें. अशा रीतीनें तीस चाळीस वर्षें शाहूनें मराठशाहीचा

१ See Ranade P. 236 व 237. २ भारतवर्ष-शा.म.ची बखर पृ. ८१-८२.

कारभार केला खरा, परंतु त्याजकडून मराठमंडळांतील घटकावयवांस एकीच्या व स्वार्थाच्या बंधनांनीं त्यास एकत्र बांधतां आलें नाहीं.

६. **मूळच्या उद्देशाचा विपर्यास.**—जोरानें चढावाचें युद्ध चालविल्याशिवाय राज्याचा बचाव होत नाहीं, आपली सत्ता आजूबाजूस सर्वांनीं मानली पाहिजे हा जो राजनीतीचा सामान्य सिद्धान्त आहे, तो शाहूस चांगला माहीत होता, आणि त्याच सिद्धान्तानुसार त्यास आपल्या शक्तीचा प्रभाव निरनिराळ्या प्रांतांत दाखवितां आला. राजनीतीचा हा सिद्धान्त प्रतिनिधि वगैरे कित्येक मुत्सद्यांस उमगला नाहीं, म्हणूनच पेशवे व प्रतिनिधि असे दोन विरुद्धपक्ष दरबारांत सदैव होते. या विरोधाचा फायदा कित्येक आपमतलबी लोकांनीं घेतला; परंतु कित्येक सरदार स्वतंत्रतेनें वागूं लागले म्हणजे त्या सर्वांस एका सत्तेखालीं आणणें जरूर पडतें. औरंगजेबाच्या वेळेपासूनच अनेक मराठे सरदार राजरोसपणें शत्रुपक्षास जाऊन मिळत. राजाराम व त्याचा मुलगा शिवाजी यांच्या कारकीर्दींत कितीतरी मराठे सरदार मोगलांचे पक्षास होते. पुढें तोच प्रकार निजामानें उचलिला. बाळापुर व पालखेड येथील लढायांत मराठे मराठ्यांच्या विरुद्ध लढले. डभईचा संग्राम तर बोलून चालूनच आपसांतला होता. यावरून आपली सरंजामी पद्धत राज्यास अपायकारक असून ती मोडली पाहिजे, बंडखोर सरदारांस नामोहरम करून त्यांस करड्या हुकमतींत वागविलें पाहिजे, इत्यादि प्रकार बाजीरावास कळले असावे. नानासाहेबानेंही तसा प्रयत्न केला. परंतु सरदारांची ही स्वतंत्रतेची व फुटीची भावना मराठशाहींतून कधींच नाहींशी झाली नाहीं. नवीन जिंकिलेल्या मुलखांत हे सरदार आपणच केवळ स्वतंत्र संचार करूं लागले असें नाहीं, तर ते आपल्या टापूंत स्वतःच्या हस्तकांस स्वतंत्र इनामें देऊं लागले. इनामें देण्याचा अधिकार कोणीं वापरावयाचा याजबद्दल कांहींच निर्बंध नव्हता. या प्रघातास आळा घालण्याचें काम पुढें थोडेंबहुत नानाफडणिसानें मनावर घेतलें, परंतु त्याचा विशेष परिणाम झाला नाहीं. प्रसिद्ध झालेल्या कागदपत्रांत खालील प्रकारचीं वाक्यें आढळतात. 'तुह्मीं......चे मुक्कामीं येऊन विनंति केली कीं, आपले वडील परंपरागत सेवा करीत आले, पुढेंही सेवा करावी हाच नियत कायावाङ्मनसा सेवकाचा आहे, दुसरा अर्थ नाहीं. आह्मी कुटुंबवत्सल, योगक्षेम चालला पाहिजे, स्वामी कृपाळू आहेत, ऐशास, अमुक अमुक

गांवचें वतन तुह्मांस वंशपरंपरेनें इनाम करून दिलें आहे, यास आमचे वंशांपैकीं कोणी दखल करील त्यास शपथ असे.' याचा अर्थ असा कीं, राजारामाचे वेळेस पराक्रम करून राष्ट्रसेवा केल्याबद्दल जीं इनामें मिळूं लागलीं, तीं पुढें केवळ कुटुंबवत्सलतेमुळें, योगक्षेम चालण्यासाठीं, वाडवडिलांचे नांवावर लोकांस मिळूं लागलीं. ही जी पराक्रमाशिवाय बक्षीस उपटण्याची चटक राष्ट्रांत शिरली, तिच्या योगानें अवनति प्राप्त होऊन राष्ट्राचा व राज्याचा ऱ्हास झाला. 'गो–ब्राह्मण-प्रतिपालन' या मोहक नांवाखालीं ब्राह्मणांनीं एक पै पासून लाखों रुपयांच्या वतनापर्यंत केवळ तपोनिष्ठेबद्दल व राज्याचें अभीष्ट चिंतण्याबद्दल भिक्षेच्या नांवाखालीं इनामें उपटण्याचा सपाटा चालविला. पूर्वीचा दाखला व परंपरा यांवर भिस्त येऊन पडली, गुणानें बक्षीस मिळविण्याची भावना [illegible] पराक्रम करणारा व न करणारा दोघेही सारखेच गणण्यांत येऊं लागले. [illegible] अधःपात होय.

**७. सरंजामी पद्धतीची त्या वेळीं आवश्यकता.**—जहागिरीच्या संबंधानें एक विशिष्ट मुद्दा कै. रा. ब. जोशी यांनीं माझ्या नजरेस आणिला होता, त्याचा येथें उल्लेख करणें जरूर आहे. [illegible]च्या हल्लींच्या स्थितीवरून आपण तत्कालीन स्थितीचा अंदाज करितों. त्या वेळच्या स्थितिभेदाचे कित्येक महत्त्वाचे प्रकार आपण ध्यानांत ठेवीत नाहीं. अलीकडच्या पांचपन्नास वर्षांत दळणवळणाचीं साधनें सरकारास चांगलीं उपलब्ध झाल्यानें एखाद्या मध्यवर्ती राजधानींतून दूरदूरच्या कोनाकोपऱ्यांपावेतों सरहद्दीचा बंदोबस्त योग्य रीतीनें होऊं शकतो. तशीं साधनें नसल्यास दूरच्या सरहद्दीच्या बंदोबस्तासाठीं कांहीं तरी विशिष्ट तजवीज सरकारास करावी लागते. या कामीं किल्ल्यांची योजना शिवाजीनें केली, परंतु राज्यविस्तार झाला म्हणजे ही किल्ल्यांची योजनाही पुरी पडत नाहीं. किल्लेदार फितूर होऊन शत्रूस सामील झाल्याचीं उदाहरणें पाहिजे तितकीं आहेत. अशा स्थितींत दूरदूरच्या प्रांतांत जहागिरी देऊन आपल्या [illegible]-वशाचे अनेक स्वतंत्र व जबाबदार सरदार पेशव्यांस मुद्दाम बनवावे लागले. स्वतःच्या बचावासाठीं व निर्वाहासाठीं या जहागीरदारांस जिवावर उदार होऊन शत्रूंशीं लढावें लागे, आणि सभोंवार शत्रु प्रबळ असल्यामुळें, आपल्या सरकारांशीं नम्रता ठेवून, त्याजकडून आपणास वेळेवर मदत येईल अशी तजवीज ठेवावी लागे. बुंदेलखंड, माळवा वगैरे दूरचे प्रांत पेशव्यांना जिंकिले, तेव्हां तेथें

शिंदे, होळकर, बुंदेले वगैरे शूर सरदारांस कायमचें वास्तव्य करून पेशव्यांनीं ठेविलें नसतें, तर त्या अंदाधुंदीच्या काळांत सातारा राजधानींतून तेथील प्रदेशाचा बंदोबस्त राहूं शकला नसता. अक्कलकोटास फत्तेसिंग भोसल्याची स्थापना झाल्यानें निजामाच्या छातीवर दडपण बसलें, आणि मुरारराव घोरपड्यानें गुत्तीस राहून पन्नास वर्षे कर्नाटकास शह दिला. गुजराथेंत गायकवाडांची व वऱ्हाडांत भोसल्यांची स्थापना याच हेतूनें झाली. पुढें दक्षिण महाराष्ट्रांत पेशव्यांनी पटवर्धनांची स्थापना केली तिचें कारण हेंच. अशा जहागिरी निमाण करितांना होतां होई तों आपल्या हुकमतींत वागतील असेच इसम प्रथम नेमण्यांत येत असत: पण पुढें अनेक कारणांनीं ते बंडें करीत तो प्रकार वेगळा.

रा. ब जोशी यांचे मतें जहागीरदारांच्या पद्धतींत आणखी एक मुद्दा आहे. एकछत्री राज्य कोणत्याही कारणानें मोडलें तरी त्यांत असलेले बरेचसे जहागीरदार अवशिष्ट राहतात. मराठ्यांचें राज्य नाहींसें झालें, परंतु त्या वेळचे अनेक जहागीरदार आज इंग्रजी राज्याखालीं संस्थानांच्या रूपानें नांदत आहेत. परंतु मोगल बादशाहींत जहागीरदार नसल्यामुळें, तें राज्य नाहींसें झाल्यावर त्याचे अवशेष कोठेंच राहिला नाहीं. आज सुद्धां हिंदुस्थानांत एकंदर पांचशें संस्थानांपैकी मुसलमानी संस्थानें अवघीं पांचच आहेत. इराण देश मुसलमानांनीं अल्प काळांत जिंकिला. बंगाल प्रांत इंग्रजांच्या हातांत जाण्यास पांच वर्षें पुरलीं: परंतु महाराष्ट्र देश जिंकण्याचा प्रयोग इंग्रजांना पन्नास वर्षे चालवावा लागला या मुद्यांचा विचार जहागिरींच्या पद्धतींत झाला पाहिजे.

स. १०६६त नार्मंडीच्या वुल्यमनें इंग्लंड देश जिंकिला त्या वेळची परिस्थिति प्रस्तुत विषयासंबंधानें ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. आपल्या अनुयायांस इंग्लंडच्या जमिनी त्यानें वांटून दिल्या: आणि आपल्या सरंवशाचे फ्यूडल् लॉर्डस् म्हणजे जहागीरदार त्यानें निर्माण केले. परंतु हेच जहागीरदार पुढें प्रबळ होऊन राज्यकर्त्यास विरोध करूं लागले तेव्हां त्यांस जिंकून ताळ्यावर आणण्याचें काम किती अवघड झालें ही गोष्ट इंग्लंडचे इतिहासांत मशहूर आहे. तेव्हां सर्व राज्यांत दळणवळणाचे मार्ग बिनतोड शाबूद राखणें, किंवा आपल्या सरंवशाचे स्वतंत्र सरदार ठिकठिकाणीं ठेवून देणें, हे दोनच मार्ग राज्यकर्त्यांचे आटोक्यांत असतात. अकबरानें आपल्या राज्यांतील रस्ते व सरकारी टपाल यांची व लष्कराची सोय चांगली ठेविली होती. त्यामुळें जहागिरी दिल्याशिवाय

त्याला राज्याचा बंदोबस्त ठेवतां आला. परंतु त्याला सुद्धां दक्षिणेंतील डोंगराळ व अवघड मुलखांत या बाबतींत यश आलें नाहीं. प्रत्यक्ष रायगड व सातारा ह्या दोन राजधान्यांमध्यें सोयीचा रस्ता मुळींच नव्हता. राज्याला थोडी स्थिरस्थावरता प्राप्त झाली, म्हणजे दळणवळणाचे मार्ग तयार करितां येतात. पेशव्यांना अशी संधिच आली नाहीं. शाहूची व्यवस्था लावण्यांत महाराष्ट्रा-बाहेर संचार करण्याची आवश्यकता मराठमंडळास उत्पन्न झाली; आणि तीं भाग-वितांना त्यांना मोठमोठे नवीन जहागीरदार ठिकठिकाणीं निर्माण करावे लागले. बडोदें, धार, देवास, इंदूर, उज्जेन, ग्वालेर, सागर, झांशी वगैरे दूरच्या ठिकाणीं मराठ्यांच्या टोलेजंग राजधान्या व हजारों कुटुंबांच्या वसाहती तयार होण्याचें प्रयोजन वरप्रमाणें आहे.

८. **संभाजीचें आज्ञापत्र**.--शिवाजीच्या राज्यपद्धतीचीं धोरणें काय होतीं, आणि तीं पुढें कशीं सुटत गेलीं याची योग्य कल्पना मनांत येण्यासाठीं संभाजीचें आज्ञापत्र म्हणून जो लेख प्रसिद्ध झालेला आहे तो अवश्य वाचला पाहिजे. या लेखांत रामचंद्रपंत अमात्यानें शिवाजीचा अनुभव पूर्णपणें ओतला आहे. हें आज्ञापत्र शके १६३८ म्हणजे इ. स. १७१६ सालीं रामचंद्रपंत अमात्य हुकमतपन्हा यानें लिहिलें. प्रधान कसे नेमावे, फौजेची, किल्ल्यांची, आरमाराची वगैरे व्यवस्था कशी ठेवावी, इत्यादि गोष्टी यांत सांगितलेल्या आहेत. सावका-रांच्या प्रकारणांत पाश्चात्यांविषयीं केलेला खालील उल्लेख लक्षांत ठेवण्यासारखा आहे. ‘फिरंगी, इंग्रज, वलंदेज डिंगमारादि टोपीकर हेही लोक साहुकारी करितात, परंतु ते वरकड साहुकारांसारखे नव्हत. त्यांचे प्रत्येक खावंद राज्यच करीत आहेत. त्यांचे हुकुमानें हे लोक साहुकारीस येतात. टोपीकरांस या प्रांतीस प्रवेश करावा, राज्य वाढवावें स्वमतें प्रतिष्ठावीं, हा पूर्णाभिमान, हे हट्टी जात, हातास आलें स्थळ मेल्यानें सोडावयाचे नव्हत. त्यांस जागा कधींही देऊं नये. आरमार, तोफा, दारूगोळा हेंच यांचें बळ. आरमार पाठीशीं देऊन त्यांचे बळें त्या बंदरीं नूतन किल्लाच निर्माण करणार त्यांस जागा देऊं नये, शहराचा उपद्रव चुकवून नेमून देऊन वखारा घालाव्या. इमारतीचें घर बांधूं देऊं नये.’ कोणासही इनाम अगर कायमची जमीन देऊं नये, असें यांत प्रतिपादन केलें आहे त्याचा उपयोग या वेळच्या विवेचनांत चांगला होईल. मराठशाहीच्या घटनेंत अमात्याचा हा लेख बहुमोल समजला जातो.

# प्रकरण पांचवें.

## बाळाजीचा मृत्यु व योग्यता.

### एप्रिल स. १७२०.

१. कऱ्हाड कोल्हापुरवरील मोहीम ( सेप्टेंबर १७१८–मार्च १७२० ).
२. बाळाजीचा मृत्यु व परिवार ( २-४-१७२० ).
३. बाळाजी विश्वनाथाची योग्यता.

**१ कऱ्हाड–कोल्हापुरची मोहीम**,(१७१८ सेप्टें०–१७२०मार्च ).—मोगलांच्या हातून स्वराज्य सोडविण्यासाठीं शाहू व त्याचे प्रधान यांचे प्रयत्न जितके कारस्थानानें तितकेच फौजेच्या जोरानेंही चालू होते. सय्यदांचे मार्फत तहाची वाटाघाट वर्ष दोन वर्षे चालू असतां, साताऱ्याच्या चहूंबाजूंचे मोगलांचे हस्तक शाहूचा उच्छेद करीत असून त्यांतच कोल्हापुरकर संभाजी आपला लाग साधून घेत होता. हा उच्छेद इतका तीव्र होता कीं सय्यदांचे मार्फत चाललेले करार सिद्धीस गेले नसते, तर शाहूचा बहुधा उठावच झाला असता. स. १७१७त थोराताचा बंडावा चालू असतां, दक्षिणेंत कऱ्हाड येथें मोगल अंमलदार पडदुल्लाखान निकरानें मोगलांची बाजू संभाळीत होता. स. १७१८ त तह झाल्यावरही वरिष्ठांचे हुकमास धाब्यावर बसवून, तो निघून जाईना. वारणा नदीच्या दोनही बाजूंस थोरात नांवाच्या दुसऱ्या एका घराण्याच्या पाटिलक्या असून, पांच असामी थोरात बंधु दोन छत्रपतींच्या भांडणांत आपला लाग वाटेल तसा साधून घेत होते. स. १७१८ चा पावसाळा संपत येतांच शाहूनें बाळाजीस घेऊन कऱ्हाडवर स्वारी केली, आणि कऱ्हाड व इसलामपूर काबीज करून पडदुल्लाखानास घालवून दिलें. त्याच वेळीं शिदोजी थोराताकडून येळावीचें ठाणेंही शाहूनें हस्तगत केलें. शाहू परत येतांच थोरात बंधूंनीं संभाजीची मदत घेऊन पुनः वडगांव, शिराळें, आष्टें वगैरे ठाण्यांवर शह बसविला. बाळाजी इसलामपुरास होता, त्यानें पुनः शाहूस निकडीनें लिहून फौजेचें साह्य मागितलें. शाहूनें तावडतोब फत्तेसिंग भोसले व श्रीनिवासराव प्रतिनिधि यांस बाळाजींचे मदतीस पाठविलें. त्या वेळीं वडगांव येथें शाहू व संभाजी यांच्या फौजांचा निकराचा सामना होऊन, संभाजीची दाणादाण झाली;

आणि कित्येक सरदार, ताराबाई व राजसबाई वगैरे शाहूच्या हस्तगत होऊन लूटही पुष्कळ मिळाली.[१] पुढें तिकडील बंदोबस्त करून शाहूच्या फौजा परत आल्या, आणि लगेच स. १७१८ च्या नोव्हेंबरांत बाळाजी दिल्लीस गेला, तो पुढील जुलईत परत आला. तोंपर्यंत पुनः संभाजीच्या संबंधानें 'येरे माझ्या मागल्या' अशी स्थिति आली. मात्र बाळाजी यशस्वी होऊन आल्यामुळें शाहूची परिस्थिति एकदम बदलली. बादशाहीचा पाठिंबा त्यास मिळतांच विरोधकांची तोंडें बंद झाली. या गोष्टीचा फायदा घेण्यास बाळाजीनेंही कसर केली नाहीं. पुणें प्रांतांतील मोगलांचा अंमल यानंतर कायमचा उठला. रामचंद्र महादेव चासकराकडून त्यानें स. १७१९ च्या सप्टेंबरांत कल्याण भिवंडीचा प्रांत हस्तगत केला; जानोजी ढमे यानें पुण्याच्या उत्तरेचें पावळचें ठाणें काबीज केलें. 'निसां अशरमध्यें श्री. प्रधानस्वामी यांनीं वडगांवावर मुक्काम केला असतां स्वामी सातारवासी यांची फौज येऊन युद्धप्रसंग झाले.' हा प्रकार जून १७१९ च्या पूर्वीचा आहे. तेंच काम पुरें करण्यासाठीं नोव्हेंबरांत बाळाजी फौज घेऊन दक्षिणेस संभाजीवर गेला. त्यानें आष्ट्याचें व येळावीचें ठाणें थोरातकडून घेऊन यशवंतराव थोरातचा पाठलाग चालविला. थोरात पन्हाळ्याकडे जात असतां बाळाजीच्या फौजेची व त्याची लढाई होऊन थोरात मारला गेला. लगेच बाळाजीनें लगट करून कोल्हापुरास वेढा घातला. हें प्रकरण चार पांच महिने चाललें. ता. २०-३-१७२० रोजीं उरूणबहे[२] येथें बाळाजी व संभाजी यांची लढाई झाल्याचा उल्लेख आहे. यानंतर संभाजीची थोडीबहुत समजूत करून साताऱ्यास महाराजांस भेटून बाळाजी सासवडास गेला आणि तेथें ता. २ एप्रिल रोजीं मरण पावला. मृत्यूचें कारण नमूद नाहीं. परंतु दोन तीन वर्षे जी सारखी दगदग व काळजी चालू होती ती त्याच्या वृद्धावस्थेंत दुःसह होऊन त्यास एकाएकींच मृत्यु आलेला दिसतो.

२. **बाळाजीचा मृत्यु व परिवार** (२-४-१७२०).— १७२०च्या मार्च महिन्यांत कोल्हापुरच्या मोहिमेवरून परत आल्यावर बाळाजी विश्वनाथ साताऱ्यावरून सासवडास गेला आणि तेथेंच चैत्र शु. ३ शके १६४२ शनिवार ता. २-४-१७२० रोजीं मृत्यु पावला. त्याची अंत्यक्रिया सासवडास झाली.

---

१ खं. ३. ४५३, व ५६६. २ कृष्णातीरीं इसलामपुरचे उत्तरेस. पहा खं. ६.५७.

त्या वेळीं पुण्यास वास्तव्य नव्हतें. बाळाजीस प्रचारांत बाळाजीपंत नाना असें म्हणत. त्यास दोन मुलगे व दोन मुली असल्याचा उल्लेख आहे. वडील बाजीराव पेशवाईचीं वस्त्रें घेते समयीं वीस बावीस वर्षांचा व चिमणाजी आपा दहाबारांचा होता,[1] यावरून बाजीरावाचा जन्म स. १६९८ चा असून, त्यास मृत्यु तरुणपणींच आला, यावरून हा जन्मकाळ साधार ठरतो. बाजीरावाचे पाठीवर मुलगी भिऊबाई, तिचे नंतर चिमाजी व सर्वांत धाकटी अनुबाई असा क्रम दिसतो. या चारही अपत्यांचे विवाहसंबंध जुळवितांना बाळाजीनें द्रव्यवान्, बुद्धिमान्, व शाहूचे मर्जीतलीं सावकारी घराणीं मुद्दाम पसंत केलीं. बाजीरावाची बायको काशीबाई महादाजी कृष्ण जोशी शाहूचा सावकार याची मुलगी. 'बाळाजीनें महादाजीपंतास म्हटलें जे, तुमची कन्या बाजीरावास करीन. बहुत कर्जदार जाले, तेव्हां कन्या दिली.' त्याच वेळीं बाळाजीनें वडील मुलगी भिऊबाई दुसरा सावकार बाबूजी नाईक बारामतीकर जोशी याचा भाऊ आबाजी यास देण्याचे ठरवून, दोनही लग्नें बहुधा एकदमच सन १७१०-११ चे सुमारें, पेशवाई मिळण्याचे अगोदर केलीं. त्या वेळीं बाजीराव बारा वर्षांचा व भिऊबाई आठ नऊ वर्षांची असावी. ती ता. ७-६-१७४७ रोजीं वारली. चिमाजी आपाचें लग्न स. १७१६ त त्रिंबकराव पेठ्याचे बहिणीशीं झालें. नांव रखमाबाई. इचा मुलगा सदाशिवराव भाऊ. त्याचा मामा त्रिंबकराव पेठे. या लग्नासाठीं बाळाजीनें ब्रह्मेंद्रस्वामींचे पांच सातशें रुपये कर्ज काढून त्यास बाजीरावाचा हवाला म्हणजे जामीनगत लिहून दिली होती. शेवटचें लग्न अनूबाईचें, बहुधा स. १७१९ त बाळाजी कोल्हापुराकडे असतांच, तिकडील घोरपड्यांचे पदरचा व्यंकटराव जोशी घोरपडे इचलकरंजीकरांचा पूर्वज याच्याशीं झालें. ती ता. ३०-१२-१७८३ रोजीं वारली. तिच्या लग्नानंतर लौकरच बाळाजी मृत्यु पावला. यावरून वाटतें कीं बाळाजी अखेरपर्यंत पैशाचे अडचणींत असून आप्तस्वकीय व स्नेही सोबती यांचें बुद्धिसामर्थ्य व द्रव्यसाह्य मिळवून निभावणूक करीत होता. स. १७१९-२० त झालेलें लग्न बाजीरावाचें नव्हे इतका उशीरां लग्नें तेव्हां होत नसत, व मुलीही मोठ्या मिळत नसत, हें निर्विवाद आहे.[2]

---

१ का. सं. प.या.पृ. ५३२; पं. सं. वृ. पृ. १; ब्र.च.ले. १९ व १३४; भा. व. श. पृ. ४; खं. ३. २९ ( ता. ७-८-१७१९) २ वि. ज्ञा वि. नोव्हें. १९२४.

# बाळाजीच्या पूर्ववंशाची यादी.




* परशराम असें नांव रुमाल २ पृ. ६९ यांत व पुरंदरे नोंधींत आहे. ×नारायण बायको गोदावरी—इचलकरंजी कागद, ले. १०१. इ. वृ. १८३७, पृ. ९१ व सं. वृ. १८३७ पृ. ८ वरील लेख पाहवे. +सध्यां कोंकणांत तळें येथें.

बाळाजींची बायको राधाबाई ही नेवऱ्याच्या बर्वे घराण्यांतली असून हुशार म्हणून नांवाजलेली होती. तिला लिहितां वाचतां चांगलें येत असे. पेशव्यांचे नासिकचे तीर्थोपाध्ये हिंगणे यांच्या चोपडींत राधाबाईचे हस्तलेख सांपडले आहेत. पुष्कळदां ही बाई राज्यकारस्थानें करी. अनेक कौटुंबिक व सामाजिक बाबतींत ती स्वतःच्या मुखत्यारीनें वागत असे. घरांत सुनांवर, मुलांबाळांवर व कुटुंबावर तिची जरब विशेष असून, तिला सर्व लोक भिऊन वागत. पुण्यांत गोविंद हरि पटवर्धन यांचे घरीं असलेली एक बटिक महारीण निघाली, त्यासंबंधानें ब्राह्मण मंडळींत गोंधळ उडाला,आणि पटवर्धनांवर वाळींत पडून मुलांबाळांस व मंडळांस मोठी अडचण उत्पन्न झाली. पेशवे नानासाहेब साताऱ्यास होता. अशा प्रसंगीं राधाबाईनें पुढाकार घेऊन ब्राह्मणांस जमवून त्यांजकडून पटवर्धनांचे मंडळीस प्रायश्चित्त देवविलें. या प्रकरणांत साताऱ्यास पंडितरावांना ढवळाढवळ करून शाहूचें मन बिघडवूं नये अशी तजवीज राधाबाईनें केली.[1] शके १६७३ श्रावण शु॥ ४ ( स. १७५१ ) रोजीं पुण्यांत नानासाहेब पेशव्यानें रुपये घालून राधाबाईची तुला केली. ही बाई १९·४·१७५३रोजीं वारली. चिमाजीची बायको रखमाबाई प्रसूत होऊन मुलगा झाला तो सदाशिवराव. तो २५ दिवसांचा असतांच रखमाबाई ३१·८·१७३० रोजीं वारली.

**३. बाळाजी विश्वनाथाची योग्यता.**—' महाराजांची सेवा निष्ठेनें करून, मर्द व शहाणे राज्यांत मनुष्य नाना, ऐसा लौकिक वाढवून, महाराजांची कृपा संपादून प्रधानपद मिळविलें; जीवाभ्यश्रम करून शत्रू पराभवातें पाववून महाराजांच्या राज्याचा बंदोबस्त केला. ' हा अभिप्राय थोडक्यांत निखालस यथातथ्य आहे. ( खं. ४, पे. ब. )

बाळाजीनें (१) शाहूस कठिण प्रसंगीं मदत केली,(२) महाराष्ट्रीयांस नवीन उद्योगाचें पराक्रमक्षेत्र दाखवून दिलें, ( ३ ) हिंदुपदपातशाहीचा पाया घातला, (४) आणि वसुलाची व्यवस्था ठरविली. शिवाजीच्या वेळचीं धोरणें, कारस्थानें व उमेदी पुनः मराठमंडळाच्या दृष्टीपुढें बाळाजीनें या वेळेपासून खेळविल्या. औरंगजेबाची दक्षिणेंतील सबंध कारकीर्द त्यानें पाहिली होती. राष्ट्राची दैना कशी होत आहे, व तें दैन्य दूर करण्यास काय केलें पाहिजे, याची बाळाजीनें

१ ऐ. स्फु. ले. भा. २ ले. ३ राधाबाईचें नानासाहेबास पत्र, ७ जुलई १७४६.

आपल्या मनाशीं विचक्षणा केली. तो केवळ कारकून नसून बऱ्याच योग्यतेचा मुत्सद्दी होता. शाहूची बाजू सावरून धरण्यांत बाळाजीनें विशेष करामत व हिंमत दाखविली. पेशव्यांच्या हातून अनेक चुका झाल्या असतील, परंतु बाळाजीस शाहूनें पेशवेपद दिलें, त्यास त्या वेळच्या मंडळीच्या मानानें, तो सर्वथैव लायक होता; आणि तें पद त्यानें श्लाघ्य वर्तनानें संपादन केलें. शाहूचा पक्ष उचलून धरिला हीच बाळाजीची मोठी कामगिरी होय. शाहूला बादशाहीचा पाठिंबा होता. बादशहाच्या पदरीं तो वाढल्यामुळें त्याच्या मनांत बादशाहीविषयीं पूज्यबुद्धि होती. मुसलमानांवर उघडपणें शस्त्र धरून, त्यांचें राज्य बुडवून, त्या ठिकाणीं आपलें स्वतंत्र राज्य स्थापावयाचें हा बाणा शिवाजीचा होता, त्यास अनुसरूनच मराठमंडळ शाहूच्या आगमनापर्यंत वर्तत होतें. हें धोरण शाहूनें बदलिलें. आपण बादशहाचे अंकित म्हणून राहवें, बादशहानें आपलें चालवावें, आणि जरूर पडेल त्याप्रमाणें आपण बादशाहीस मदत द्यावी, अशी शाहूची ह भावना होती. मराठशाहीच्या धोरणांत या वेळीं मोठा फरक पडला, तो या भावनेनें होय. ताराबाईशीं भांडतांना, शाहूस बादशहाच्या कृपाछत्राचा उपयोग चांगलाच झाला. बादशहाचा पाठिंबा नसता तर शाहूला इकडे थारा मिळाला नसता. शिवाजीचें राज्यधोरण पुढें चालविण्यास बाळाजीला मुख्य अडचण ही आली. शाहूस न दुखवितां बाळाजीस राज्याचा कार्यभाग साधावयाचा होता. तीस वर्षांच्या तीव्र झगड्यांत मराठ्यांची शिपाईगिरी चांगली तयार झाली होती. वऱ्हाडपासून कर्नाटकपावेतोंच्या प्रदेशांत हजारों लहान मोठे मराठे सरदार फौजा बाळगून मराठशाहीच्या नांवानें वावरत होते. व्यक्तिशः ते स्वतंत्र होते, आणि त्यांस मध्यवर्ती धोरण जें पूर्वी होतें, तें राजारामाच्या मृत्यूनंतर हळूहळू सुटत जाऊन, शाहूच्या आगमनानें तर तें सर्वस्वीं नाहींसें झालें. ताराबाई व शाहू यांच्या भांडणांत या मराठे सरदारांचें चांगलेंच फावलें आणि ते स्वेच्छाचारी बनले. त्या सर्वांवर दाब ठेवून त्यास एका कार्यसंकल्पांत काम करण्यास लावणें हाच उपाय होता. युद्धशिक्षण मिळालेल्या मराठे शिपायास कांहीं तरी योग्य कामगिरी एकदम देण्याची आवश्यकता होती. निराळाच कांहीं तरी कार्यभाग उत्पन्न करून, त्या कामीं या शिपाईलोकांचा उपयोग केला नाहीं तर ते आपसांत झगडून नाश पावतील, आणि तेणेंकरून अल्पावकाशें मराठ-

शाहीचा अंत होईल, असा परिणाम टाळण्यासाठीं मोगल बादशाहींत गडबड उडाल्याबरोबर शंकराजी मल्हारमार्फत सय्यद बंधूंशीं संगनमत करून, शाहूनें बाळाजीच्या विचारानें ही नवीन कामगिरी मोठ्या उल्हासानें अंगावर घेतली. मराठशाहींतील दुफळी मोडण्याचा हा एक उत्कृष्ट उपाय होता; आणि तो बाळाजीनें तडीस नेला. सय्यदांकडून शंकराजी मल्हार बोलणें करण्यास सातान्यास आला, तेव्हांच या कामगिरीचा तेथें खल झाला. बाळाजीच्या मृत्यूनें या धोरणांत फरक पडला नाहीं. बाजीरावानें तें पुढें चालविलें.

अष्टप्रधानसंस्थेचा लोप होऊं देणें आणि जहागिरी देण्याचा वाढलेला प्रघात बंद न करणें, या दोन बाबतींत या पेशव्याच्या कारभारावर दोष येऊं शकतो. आंग्र्याचा बंदोबस्त होऊन शाहूची स्थिरस्थावर होईपर्यंत लोकांस कोणताही सवलती देणें मुत्सद्यांस भाग पडलें असलें, तरी एकदां शाहूचा जम बसल्याबरोबर जहागिरी मोडण्याचा प्रयत्न पेशव्यानें केलेला दिसत नाहीं. जुनी घडी मोडतांना नवीन घडी चांगली बसविली पाहिजे होती. जहागिरी एकदम मोडणें शक्य झालें नसतें तरी, तसा कल ठेविला असता तर, शिवाजीची शिस्त पुनः हळूहळू निर्माण करितां आली असती. या बाबतींत पेशव्यांनींच आरंभीं अनिष्ट उदाहरण घालून दिलें. पुणें व आजूबाजूचा टापू ही जशी काय आपली एक जहागीरच अशा बुद्धीनें, इतर सरदारांच्या अनुकरणानें, त्यांनीं तेथें आपलाही बंदोबस्त चालविला. स्वतंत्र जहागिरींत कोट वगैरे बांधून बंदोबस्त करण्याचा उद्योग प्रत्यक्ष शाहूसही पसंत नव्हता. पेशव्यांनीं पुण्यास कोट बांधण्यास सुरुवात केली ती गोष्ट शाहूनें मना केली. पिलाजी जाधवानें, शाहूचें न ऐकतां, चंद्रसेनाच्या पाठबळानें जाधवांचे वाडीस कोट बांधला, तो बंडखोर थोरातांचे मात्र कसा उपयोगी पडला, याचें वर्णन खुद्द शाहूनेंच एका पत्रांत केलें आहे.[१] यावरून जहागीरदारांस नरम करण्याचा उपक्रम पेशव्यांनीं केला असता तर त्यास शाहूनें हरकत घेतली नसती असें ह्मणतां येतें. स्वतः केवळ चाकर, लागेल तेवढा तनखा घेऊन काम करणारे, अशी शिवाजीची पद्धत पेशव्यांनीं स्वीकारिली असती, तर दहा पांच वर्षांत नवीन व्यवस्था जमली असती. या संबंधांत जी सवलत त्यांनीं स्वतःकरितां घेतली, तीच इतरांनींही

१ खं. २ पृ. ६६.

घेतली. जुने जहागीरदार पेशव्यांच्या अंकित राहत ना, ह्मणून त्यांस आपल्या भरंवशाचे नवे सरदार निर्माण करावे लागले. त्यामुळें मराठमंडळांत नेहमींच असंतोष माजून अखेरपर्यंत दुफळी कायम राहिली. जहागीरदारीच्या पद्धतीमुळें मुख्य तिजोरींत पैसा येईनासा झाला; आणि पेशवे सदैव कर्जबाजारी राहिले. जहागीरदारांस वठणीस आणण्यांतच पेशव्यांच्या शक्तीचा व्यय होऊं लागला. इकडे जहागीरदारांचीही तीच स्थिति झाली. प्रथम मुलूखगिरीसाठीं त्यांस कर्ज काढावें लागे. स्वारी होऊन जय मिळाल्याची वार्ता आल्याबरोबर प्रांताच्या वसुलासंबंधानें सरकारचे फडणीस सरदारांकडे घेणें काढीत, परंतु इकडे सरदारांच्या हातांत वसूल पडण्यास मोठी मारामार पडे. एकदम पुष्कळ ठिकाणीं असे उद्योग चालू ठेविल्यामुळें, सरदारांस लागणारी फौजेची वगैरे मदत पेशव्यांकडून वेळेवर होत नसे. जहागिरी दिलेले प्रदेश सर्व जिंकलेले नसून जिंकावयाचे असत, आणि तेथील वस्तुस्थिति मुख्य सरकारास कळत नसल्यामुळें, नाना प्रकारचे गैरसमज उत्पन्न होत. वस्तुस्थिति कळण्याकरितां पेशव्यांनीं आपले वकील ठिकठिकाणीं ठेवून दिले, त्याजमुळें ज्यास्तच घोटाळे उडूं लागले. वसुलाच्या व हिशेबाच्या तक्रारी नेहमीं कायम राहून, इकडे मुलूखगिरी करणारे सरदार व तिकडे सरकारचा कारभार पाहणारे पेशवे व त्यांचे हस्तक, दोघेही सदा कावलेले असत. सर्व असामी कर्जापायीं नाडलेले असून, मुलूखगिरींवर गेलेले सरदार हिशेब देत नसत; आणि हिशेब दिलाच तर ते उलट कर्ज मोठें दाखवीत; आणि कर्ज फिटल्याशिवाय हस्तगत झालेले महाल सोडून देण्यास ते तयार नसत. मराठशाहींतील ही अंदाधुंदी नेहमींच चालू होती.

पैसा हीच कोणत्याही राज्याची सर्वांत मोठी शक्ति. ती शक्ति सांभाळण्यासाठीं उपाय योजणें हें राज्यचालकांचें पहिलें कर्तव्य असतें. आपल्या खर्चास बाळाजीनें पाहिजे तेवढा तनखा नगदी घ्यावयाचा होता. पुरंदर किल्ला सचिवाकडून काढून स्वतःकडे न घेतां, तो त्यानें शाहूच्या हवालीं करावयाचा होता. म्हणजे स्वतंत्र जहागिरीचें स्वरूप त्यास आलें नसतें. हें उदाहरण बाळाजीनें स्वतःच घालून दिलें नसतें तर, प्रथम लहान लहान जहागिरी कबजांत आणून, सरकारची म्हणून नवीन फौज तयार केल्यावर तिच्या साह्यानें स्वातंत्र्येच्छु सरदारांस कबजांत आणण्यास पुढें अडचण पडली नसती. सारांश, पेशवाई मिळाल्यानंतर

बाळाजीच्या हातांत अधिकार होता; संधि होती; राज्यव्यवस्था ठरवावयाची होती; शिवाजीचा नमुना डोळ्यांसमोर होता. असें असतां त्यानें घातलेली पद्धत यशस्वी झाली नाहीं. तथापि हा प्रश्न केवळ पुढील परिणामावरून तपासणें योग्य होणार नाहीं. त्या वेळीं शक्य काय होतें हेंच पाहिलें पाहिजे. त्यासाठींच बाळाजीच्या व्यवस्थेचे साधकबाधक मुद्दे जे वारंवार दाखविले जातात,ते तात्पर्यानें वर नमूद केले आहेत. प्रत्येकाला आपापल्या भावनेनुसार त्याचें बरें वाईट सार काढतां येईल.

अव्यवस्था हा एकट्या बाळाजीचाच दोष नसून, तें एक मराठ्यांचें राष्ट्रीय वैगुण्यच आहे, असें ह्मणावें लागतें.निरनिराळ्या कामांत व्यक्तिशः पराक्रम गाजविणारे इसम मराठशाहींत कांहीं थोडे निपजले नाहींत. पण राष्ट्रीय स्वभावच असा कीं, आम्हीं बहुशः व्यक्तीच्या नफानुकसानीकडे प्रथम लक्ष देतों, एकंदर राज्याचे कल्याणाचा विचार सहसा मनांत आणीत नाहीं. आपण सर्व एका राज्यचक्राचे घटकावयव आहों आणि एका अवयवापेक्षां एकंदर राज्यचक्र व्यवस्थित ठेवण्याकडे प्रथम लक्ष दिलें पाहिजे, असा विचार करण्याची संवय आम्हांस नाहीं. हा दोष मराठशाहीच्या कारभारांत दिसतो, आणि अद्यापिहि आम्हीं तो टाकून दिला नाहीं; इतकेंच नाहीं, तर आमच्यांत राष्ट्रीय भावना नव्हती हें सांगितलेलें सुद्धां आम्हांस रुचत नाहीं. तत्कालीन परिस्थितींत शाहूचा पक्ष वर आणण्यांत बाळाजी कितीही निष्णात असला, तरी राज्य म्हणजे काय, त्याच्या शक्तीचे उगम काय आहेत, ते शाबूद राखण्यास काय केलें पाहिजे, या गोष्टींचा नीट विचार करून राज्यकारभाराची उभारणी त्याचे हातून झाली नाहीं. अर्थात् तो मुत्सद्दी नव्हता. अनेक उलाढाली करणें, प्रसंगा न डगमगणें, धरलेला पक्ष सिद्धीस पोंचविणें, अनेक विरुद्ध पक्षांची समजूत घालणें, या बाबतींत तो निष्णात होता. ह्मणून त्याच्या या गुणांचा उपयोग शाहूस झाला, तसाच त्याच्या कुटुंबास व आप्तस्वकीयांसही झाला. नवीन होतकरू माणसें पैदा झालीं आणि त्यांस पराक्रम गाजविण्याची संधि मिळाली.बाळाजी विश्वनाथास पेशवाई मिळाल्यापासून ब्राह्मणांचा कित्येक घराणीं हळूहळू पन्नास वर्षांत उदयास आलीं. त्याच प्रमाणें शिंदे, होळकर, पवार, जाधव, गायकवाड वगैरे कित्येक मराठ्यांचीं घराणींसुद्धां पेशव्यांचेच प्रोत्साहनानें पुढें आलीं. अर्थात्

पराक्रम पुष्कळांच्या असतो, पण तो बाहेर पडण्यास संधि मिळाली पाहिजे. जेधे, जाधव, घोरपडे, गुजर, मोहिते, निंबाळकर इत्यादि मराठे घराण्यांस अव्वल मराठशाहींत प्रोत्साहन मिळालें, तसें तें पुढें बऱ्याच अंशी ब्राह्मणांस मिळूं लागलें. मराठ्यांचीं घराणीं सर्वस्वी नाहींशीं झालीं नाहींत, पण कित्येकांस ब्राह्मण सरदारांच्या हाताखालीं दुय्यम प्रतीनें राहवें लागलें. हा फेरफार केवळ यदृच्छेनें झाला. मुद्दाम जाणून करण्यांत आला, असें ह्मणतां येत नाहीं. जो कोणी राज्यकारभाराचें काम अंगावर घेतो, त्यास स्ववंशाच्या परवंशाचीच माणसें मदतीस घ्यावीं लागतात, हें वर दाखविलेंच आहे. तथापि एकंदरीत सर्व लोकांच्या हितासाठीं हें राज्य आहे, ही शिवाजीच्या वेळची भावना उत्तरोत्तर लयास गेली, आणि यांतच मराठेशाहीच्या नाशाचें बीज कायम राहिलें. कारकुनी व हिशेबी पेशाच्या कामांत बाळाजी निपुण होता. ओसाड पडलेल्या मुलखाची आबादानी करणें, लोकांच्या तक्रारी पायमल्ली होऊं न देणें, सरकारसारा दक्षतेनें वसूल करणें, या जमीन महसुलाच्या बाबतीत बाळाजी निष्णात होता; किंबहुना, हाच त्याचा मोठा गुण ह्मटला तरी चालेल. जमिनीची व वतनांची वहिवाट त्यानें प्रत्यक्ष केली होती, आणि लोकांच्या अडचणी व तक्रारी काय असतात, हें त्यास चांगलें ठाऊक होतें. 'अलीकडे धामधुमीमुळें मुलखाचा सत्यानाश जाला, रयत देशांतरास गेली. मुलखांत काळवण जालें. त्यावरून तुमचा अर्ज सातारेस आणून महामुरीवर नजर देऊन, सातसाली इस्तावा कौल लिहिला असे. तरी तुम्ही रयतेचा दीलदिलासा करून मुलूख महामूर करणें. आणि लागले देयेस सातसाली तनखा उगवणें बाबती देखील. ज्यास्ती आकार लागणार नाहीं. अभय असे.' असें आज्ञापत्र ११ ऑक्टोबर १७१८ त पुणें प्रांताचे देशमुख देशपांड्यांस काढिलेलें[1] आहे. तसेंच रा. यशवंतराव गुप्त लिहितात :—

'श्रीमंत बाळाजी विश्वनाथ हे वसुलाचे कामीं फारच दक्षता ठेवीत. ते जमिनीचा धारा वसूल करण्यांत मुळींच कसूर करीत नसत. श्रीमंत व गरीब यांस एकच न्याय मिळे. छत्रपतींचे नातलगांची मुद्धां वसुलाचे बाबतींत बाळाजी भीडभाड ठेवीत नसत. बिघडून गेलेली शिस्त त्यांनीं पुनः लावून दिली. या गोष्टी सिद्ध करण्यास खालील पत्र फार उपयोगाचें आहे. कान्होजी राजे शिर्के

१ खंड २ पान ३६. २ वि. ज्ञा. वि. जून सन १९०९.

हे फार प्रबळ व पुंड झाल्यामुळें आम्हांस अत्यंत उपसर्ग लागतो व सरकारचा धारा बुडतो, अशी तक्रार बाळाजी विश्वनाथ याजकडे वडस्तें व त्याचे आसपासचे गांवीं राहणाऱ्या लोकांनीं केली होती. त्यावरून त्यांनीं खालील पहिलें पत्र कान्होजी राजांस लिहिलें. तसेंच लोकांच्या हकांची पायमल्ली होऊन कांहीं वर्षे यद्यपि बाजवीपेक्षां जास्त वसूल सरकारांत आला, तथापि घडलेला प्रमाद नजरेस आल्यास जालेला अन्याय दूर करण्याबद्दल ते जरूर ती खबरदारी घेत. 'पौडखोरें येथें तुम्हांस इनाम गांव आहेत. त्यांशिवाय दुसरे गांवी तुह्मी शेतें करितां ह्मणून विदित झालें. त्यास दुसरे गांवीं शेतें [illegible] बावती मावळशिरस्त्याप्रमाणें देणें. बोभाटा आलियास कार्यास येणार नाहीं.' पौडखोऱ्यामधील हवालदार व कारकून यांस लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे. 'देशमुख व देशपांडे यांचा [illegible] गांवगन्ना आहेत. त्यास पूर्वीपासून बावती जमा धरीत नाहीं. कांहीं जमा धरल्या आहेत. [illegible] हालीपासून बावती न धरणें. [illegible] पूर्वीपासून जमा धरीत नसेल तरी [illegible] न धरणें. तारीख [illegible] ता. ९-१०-१७१७.

बाळाजी विश्वनाथानें [illegible] कामगिरी केली [illegible] त्याबद्दल त्यानें त्यास महत्पदास चढविलें, हा प्रश्न विचार करण्यासारखा आहे; आणि त्याचें उत्तरही वर प्रसंगोपात दिलें गेलें आहे. ज्या बादशाही धोरणावर आपला जम बसवावयाचा शाहूनें निश्चय केला, तें धोरण [illegible] पार पाडण्यांत बाळाजीनें निग्रहपूर्वक शाहूस साह्य केलें, हीच त्याची विशेष कामगिरी होय. सय्यदांशीं तह ठरवून सुखें मातुश्री सोडवून आणली हा त्या कामगिरीचा दृश्य परिणाम. ह्या शिवाय दुसरें विशिष्ट कृत्य बाळाजीचें सांगतां येण्यासारखें नाहीं. त्याच्या कर्तबगारीचा उल्लेख मागें ठिकठिकाणीं आलाच आहे.

शाहूच्या उत्तरकालीन कारभारावरून पहिल्या एक दोन पेशव्यांच्या कर्तबगारीचा अंदाज आपण बांधितों, तें बरोबर नाहीं. बादशाही कैदेंतून सुटून शाहू दक्षिणेंत आला, तेव्हां आरंभीं तो सर्वथैव निराधार होता. परसोजी भोसल्यानें त्यास प्रथम मोठी मदत केली म्हणून त्याचा निभाव लागला. पुढें खंडो बल्लाळ चिटणिसानें धनाजीचें मन वळवून त्यास ताराबाईपासून अलग केलें, म्हणूनच शाहूस साताराची गादी लगोलग मिळाली. परंतु धनाजी लवकरच वारला आणि

त्याचा मुलगा चंद्रसेन पुढें उघड शाहूस सोडून मोगलांकडे गेला. अशा स्थितींत शाहूनें दमानें व मनमिळाऊपणानें वागून हळूहळू मराठमंडळावर आपली छाप बसविली. बाळाजीस ‘ सेनाकर्ते ’ पद कांहा दिवस दिलें, एवढ्यावर कल्पना चालवून आणि पेशव्यांची पुढील करामत मनांत ठेवून, शाहूस अडचणीच्या प्रसंगीं पैशाची व सेनेची मदत बाळाजीनें केली त्यामुळें शाहूचा निभाव लागला, अशा मतलबाचा जो समज झालेला आहे, तो बराचसा अवास्तव आहे. चंद्रसेनाशा बाळाजीचा झगडा झाला तेव्हां स्वतःच्या इज्जतीखातर बाळाजीस आश्रय देणें शाहूस प्राप्त झालें. नानातऱ्हेचे मतलब साघण्यांत, प्रतिपक्षांचीं मनें वळविण्यांत, वसुलाची व्यवस्था लावून सनदा पत्रें लिहिण्यांत,बाळाजीचा उपयोग शाहूस होऊन, पेशवा बहिरोपंत या कामांत सर्वस्वी नालायक ठरला. प्रतिनिधि हुशार होता. परंतु त्याजवर भरंवसा टाकणें शाहूस शक्य नव्हतें. दुसरा हुशार इसम शंकराजी नारायण मरण पावला आणि त्याचा मुलगा अल्पवयी असल्यानें, दुसरा कोणी भरंवशाचा हस्तक हुशार असा आपणाजवळ पाहिजे ह्मणून शाहूनें बाळाजीस पेशवाईपद दिलें. परंतु या वेळा शाहू यत्किंचित् दुसऱ्याचे उपदेशानें चालणारा नव्हता. पुढें सय्यदांच्या वगैरे कारस्थानांत बाळाजीचा उपयोग शाहूस घडून मातुश्रिया सोडवून आणल्यामुळें बाळाजीची चहा झाली. परंतु एवढ्यावरून सरंजामी पद्धत, पातशाही धोरण, अष्टप्रधानांच्या घालमेली वगैरे हरएक बाबतींत शाहू केवळ बाळाजीचेच तंत्रानें चालत होता असें ह्मणतां येत नाहीं. रोजानिशींतील व इतर पत्रव्यवहार वाचले म्हणजे दिसतें कीं आरंभीं शाहू आपला आपणच विचार करून वागत होता. त्याच्या उदार स्वभावामुळेंच त्याचा निभाव लागला. परंतु राज्याचें कायमचें धोरण ठरविण्याचें त्यास सामर्थ्य नव्हतें, आणि बरींचशीं प्रकरणें यदृच्छेनें प्रसंग पडेल तशा तो निभावी. बाळाजी विश्वनाथाचा कारभार यशस्वी झाला, तेव्हां कार्यकर्ते सेवक ह्मणून शाहूनें त्या कुटुंबास हाताशीं धरलें. बाळाजीच्या एकनिष्ठ सेवेचा मोबदला ह्मणून बाजीरावास त्यानें पेशवाई दिली.

यावरून उत्तरकालीन मराठशाहीचीं धोरणें बाळाजीनें ठरवून दिलीं असें मानण्यास आधार नाहीं. अखेरपर्यंत पोंच ठेवून दूरदृष्टीनें आगाऊ एखाद्या कारभाराची व्यवस्था ठरविण्याचा सामान्यतः मराठ्यांचा स्वभाव नाहीं. जेव्हां

जसा प्रसंग येईल तसें त्या वेळच्या साधनांनीं त्यास तोंड द्यावयाचें. इंग्रज राज्यकर्त्यांचें पुढचें धोरण शेंकडों वर्षे आगाऊ दिसतें, तसा प्रकार मराठ्यांचा नव्हता, हें ध्यानांत ठेवून त्या वेळच्या घडामोडींचें निरीक्षण केलें पाहिजे.

# प्रकरण सहावें.

## बाजीराव व मोगल दरबार.

### सन १७२०.

---

१. बाजीरावाची पेशवाईवर नेमणूक ( १७–४–१७ ).
२. बाजीरावाची हिंदुपदपातशाहीची भावना.
३. सय्यदांच्या कारभाराची अखेर ( मार्च १७१९–नोव्हें० १७२० ).
४. खांडव्याची लढाई ( १९–६–१७२० ).
५. बाळापुरची लढाई ( १०–८–१७२० ).
६. सय्यदांचा हिंदूंकडे ओढा.

१. **बाजीरावाची पेशवाईवर नेमणूक**, (ता. १७ एप्रिल १७२०).—बाजीरावाचा जन्म बहुधा स. १६९८त झाला असावा. नक्की मिति उपलब्ध नाहीं. लहानपणासून बापाबरोबर शाहूच्या आरंभाच्या मोहिमांत तो हजर असून बापाचीं कारस्थानें त्यानें लक्षवर्पूक अवलोकन केलीं होतीं. घोड्यावर बसणें, तिरंदाजी, कसरत वगैरे तत्कालीन शिक्षण त्याला मिळालें असून, घोड्यांचा नाद त्यास विशेष होता. घोड्यावरून लांबलांब मजला मारून उन्हातान्हाची वगैरे त्यास चांगली संवय झाली होती. लेखन, वाचन व हिशेब हें त्या वेळचें सामान्य शिक्षण बापाच्या व इतर कामगारांच्या सहवासांत त्याचें झालेलें होतें, परंतु लिहिण्याचा किंवा हिशेबाचा त्यास विशेष नाद असावा असें उपलब्ध माहितीवरून दिसत नाहीं. नानासाहेबास व त्यापुढच्या पुरुषांस संस्कृत येत असे; पण बाजीरावास तें येत होतें असें दिसत नाही. कारकुनी व लष्करी या दोनही पेशांचीं कामें निरनिराळ्या मंडळींच्या सहवासांत त्यास चांगलीं माहीत झालीं होतीं. जगाच्या प्रत्यक्ष व्यवहारांत व आणीबाणीच्या प्रसंगांत त्याचे लहान-

पणचे दिवस गेले ! एकंदर आयुष्यांत त्यास विश्रांति अगर आराम बहुधा कधींच मिळाला नाहीं. लहानपणीं संकटावस्था सहन करण्याचे प्रसंग जगांतील अनेक थोर व्यक्तींच्या अनुभवास आलेले दिसतात, तसाच प्रकार बाजीरावाचे संबंधानेंही होता. बाळाजी विश्वनाथास थोरातानें पकडिलें, तेव्हां बाजीरावही पकडला गेला; पुरंदऱ्यांनीं दंड भरून त्यांची सुटका केली. बाळाजी विश्वनाथाबरोबर तो दिल्लीस गेला होता. तेथून साताऱ्यास परत आल्यावर बाळाजीनें त्यास खानदेशांत सय्यदांचे मदतीस असलेल्या फौजेबरोबर ठेवून दिलें. बाळाजी विश्वनाथ कारभारांत शिरल्यापासून बाजीरावाची हुशारी शाहूच्या नजरेंत चांगलीच आली होती. बाळाजी मरण पावल्यावर पंधराच दिवसांनीं चैत्र वद्य सप्तमी गुरुवार शके १६४२* ह्मणजे तारीख १७ एप्रिल १७२० रोजीं बाजीरावास शाहू छत्रपतीकडून पेशवाईचीं वस्त्रें कऱ्हाडनजीक मसूर मुक्कामीं मिळालीं. त्या समयीं शाहूनें चिमणाजी बल्लाळ यास 'पंडित' असा किताब व दमाजी थोराताकडील सरंजाम सरकारांत घेतला होता तो व सरदारी दिली; आणि पुरंदरे यास मुतालकीचीं वस्त्रें करून दिलीं.[१] शाहूच्या मनांत बाजीरावास पेशवाई द्यावयाची नव्हती, आणि त्या संबंधानें पुष्कळ खटपट होऊन बाजीरावास वस्त्रें मिळण्यास कांहीं महिने अवकाश लागला, वगैरे ज्या हकीकती प्रचलित आहेत त्यांस आधार नाहीं. कारण बापाची उत्तरक्रिया संपतांच बाजीरावास पेशवाईचें पद प्राप्त झालें; आणि तो लगेच दिल्लीकडील कामगिरी पुरी करण्याकरितां खानदेशांत निघून गेला.

'वडील दिवंगत झाले, ते समयीं बाजीराव वीस वर्षांच्या वयांत होते. चिमणाजी आपा दहा बारा वर्षांचे होते. कारभारी अंबाजीपंत पुरंदरे दिवाण होते. शिवाय ब्राह्मणमंडळामध्यें बाजी भीवराव व कृष्णाजी महादेव जोशी चासकर, ( बाजीरावाची स्त्री काशीबाई इचे बंधु ). चिमणाजी आपाचे सासरे विसाजी कृष्ण पेठे ( त्रिंबकराव मामाचे वडील), मल्हार दादाजी बर्वे द्रव्यवान् मामलेदार व बाजीरावाचे मातुळ, बाबूरावजी नाईक बारामतीकर शिपाई व सावकार, व्यंकटराव नारो घोरपडे बाळाजी विश्वनाथाचे जांवई, हे गृहस्थ प्रमुख होते. मराठे मंडळांत पिलाजी जाधवराव, राणोजी शिंदे, मल्हारजी होळकर, इत्यादि मोठमोठे माणूस दौलतींत होते.' बाजीराव साताऱ्यास जाऊन

---

* पे. द. पृ. १२७. १ शा. म. च; खं. ४ पे. व.

महाराजांस भेटले. नंतर वस्त्रांचें बोलणें लागलें. ते काळा बाजीराव साहेब बहुत उद्दाम प्रकृतीचे, अवघा वेळ शिपाइगिरींत मग्न, राज्यभार चालवावयास सबुरी असावी ती भाव नव्हता. यामुळें या पदाचे उपयोगी नाहींत, अशी राजश्री यांस बहुतांनीं मसलत दिली. सर्वांचें ऐकून घेऊन सर्वांस एक उत्तर दिलें की, बाळाजी विश्वनाथ यांनीं या राज्यांत जीवादारभ्य श्रमसाहस करून पुढें सुख भोगिलें नाहीं. याजकरितां यांस वस्त्रें पुढें देतों. यांचे दैवी असल्यास श्रीशंभु कृपा करील; उपयोगी नाहीं असें दिसल्यास पुढें विचार होईल. अशी श्रीदेवाची प्रार्थना करून महाराजांनीं बाजीराव साहेबांसी वस्त्रें दिलीं. कांहीं दिवस हुजूर राहिले.' यावरून बाजीरावास वस्त्रें मिळूं नयेत, अशी कांहीं मंडळीची खटपट होती, पण तीस न जुमानतां व उशीरही न करतां शाहूनें, बाजीराव कर्तबगार निघेल अशा भावनेनें, त्यास एकदम पेशवाईचीं वस्त्रें दिलीं. जोराचें काम करण्यास तारुण्याची अपेक्षा असते, आणि काम करितांनाच अनुभव येत जातो. सबब बाजीरावास पेशवाईवर कायम करण्यांत शाहूनें जी धूर्तता व गुणग्राहकता दाखविली, त्यामुळेंच मराठी राज्याचा भाग्योदय झाला यांत संशय नाहीं.

'नंतर स्वारी तेथून निघून सासवडास येऊन आपले दौलतीत किल्लेकोट महाल यांचा बंदोबस्त व फौजेचा जमाव करून औरंगाबाद प्रांता गेले. तेथे नबाबास भेटून खानदेशांत जाऊन बागलाणांत खंडण्या घेऊन यश घेऊन आले. दुसऱ्यानें अशीरगडपर्यंत जाऊन आशिरी हल्ल्यानें घेतली. ती स्वारी जय घेऊन आले. फिरोन स्वारी हिंदुस्थानांत जयनगरास जाऊन जयसिंगाची भेट घेतली; किल्लेकोट हस्तगत केले.' ( का. सं. प. या. पृ. ५३२. )

साताऱ्यास महाराजांजवळ पुरंदरे मुतालिक असत, त्यांचे जोडीस पेशव्यांचा कोणी बरा पुरुष राहत असे. हा प्रघात पेशव्यांनीं बहुधा नेहमींच कायम ठेविला होता. पेशवाई मिळाल्यावर बाजीराव स्वारीस जाऊं लागला, तेव्हां चिमाजी-आप्पा साताऱ्यास राही, आणि पुढें हे दोघेही स्वारींत जाऊं लागले, तेव्हां बाजीरावाचा मुलगा बाळाजी शाहूजवळ असे. शाहूच्या मृत्यूनंतर पुण्यासच सर्व कारभार चालूं लागला, तेव्हां हा प्रघात मोडला; परंतु शाहू स्वतः साताऱ्यास राज्यकारभार पाहत असतां, सर्व कारस्थानांचें संधान राखून आपलें वजन शाहूजवळ कायम ठेवण्याकरितां, पेशव्यांस स्वतःच्या भरंवशाचा घरचा

कोणी पुरुष शाहूजवळ ठेवणें जरूर होतें. अंबाजीपंत पुरंदरे व त्याचा मुलगा महादोबा हे शाहूजवळ राहून पेशव्यांचें अगत्य ठेवीत असत. शिवाय पेशव्यांचें साह्य करणारे चिटणीस होते. चिटणिसांचें व पेशव्यांचें एकमत असे; आणि बहुतेक राज्यकारणांत ते नेहमीं एकमेकांचा पाठपुरावा करीत. निदान शाहू-छत्रपतीच्या कारकीर्दीसंबंधानें पाहतां, राज्यकारभारांतील मुख्य पुरुष पेशवा व चिटणीस हे दोघेच होते, असें समजण्यास हरकत नाहीं. बाळाजी विश्वनाथाचे पश्चात् खंडोबल्लाळानें, मरणापूर्वीं चार महिने पावेतों, कामगिऱ्या व मोहिमा केल्याचेही उल्लेख आहेत, परंतु त्यांचा तपशील आढळत नाही. बाजीरावाच्या वेळेस खंडेरावाचे मुलगे, प्रथम जिवाजी व पुढें गोविंदराव हे प्रमुखपणानें वाव-रत होते. खंडोबल्लाळ वृद्ध होऊन आश्विन शु॥ ५ शके १६४८, ता. २१ सेप्टें-बर स. १७२६ रोजीं वारला,[1] त्या वेळीं त्याचें वय साठपांसष्टांचे वर असावें. एवढी राष्ट्रसेवा करणाऱ्या पुरुषाची अखेरीस दैन्यावस्था कायम राहिल्याबद्दल खेद वाटल्याशिवाय राहत नाहीं. 'संसार वाढला, प्राप्ति नाहीं, तसेच दिवस कंठीत होते. आपला वृद्धापकाळ. वतनपत्रें आंगऱ्यांजवळून सोडविण्यास कुला-ब्यास गेले. वर्षभर राहून मोठ्या खुशामतीनें आंगऱ्यांचीं वतनपत्रें घेऊन साता-ऱ्यास आले.पण कबूल केल्याप्रमाणें वतनाचा अंमल आंगऱ्यांनीं चालविला नाहीं. दहा हजार रुपये देणें झालें. त्याच दिवसांत आयुष्य सरलें. काळ झाला. कोणाचे मिंधे झाले नाहींत, किंवा स्वार्थ पाहिला नाहीं, म्हणून दैन्य राहिलें. [ इ. सं. ऐ. स्फ़ु. ले. ७·१: शा. रो. १६; खं. ६·४५५].

बाजीराव उद्दाम प्रकृतीचा होता असा उल्लेख वर आहे. शाहूचा व त्याचा खटका पुष्कळदां उडत असे. किंबहुना बाजीरावासंबंधानें शाहू नेहमींच साशंक असे; परंतु चिमणाजी आप्पा व विशेषतः नानासाहेब यांनीं मोठ्या सावधपणानें वागून शाहूचें मन प्रसन्न ठेविलें होतें. शाहूजवळ असणाऱ्या प्रत्येक इसमाची परीक्षा करून त्याच्या हालचालींवर नजर ठेवणें, घडामोडीची व कारस्थानांची बातमी राखणें, आणि त्यासंबंधानें योग्य इशारा बाहेर बाजीरावास देणें, हें काम साताऱ्यास राहणारे पेशव्यांचे अनेक हस्तक करीत असत. शिवाय ब्रह्मेन्द्रस्वामी-सारखी कित्येक मंडळी शाहूजवळ पेशव्यांचें अनुसंधान ठेवीत.

फत्तेसिंग भोसले व प्रतिनिधि यांजवरच आरंभीं शाहूचा विश्वास विशेष होता. यांनीं लवकरच बाजीरावाशीं विरोध आरंभिला. कोणताही महत्त्वाचा प्रश्न आला की बाजीरावाची मसलत फेटाळून लावावी आणि शाहूस आपल्या बाजूस वळवावें असा क्रम त्यांनीं आरंभिला. पुढेंपुढें या दोघांस रघूजी भोसले हा आणखी तिसरा इसम सामील झाला. सरळ वाद करून भागलें नाहीं तर ही मंडळी मुद्दाम आडरानांत शिरत. ते शाहूस भीति घालीत, कीं ही कोंकणस्थ मंडळी सर्व कारभार हातीं घेऊन अधिकार दाबून बसतील. बाजीराव दूरप्रांतीं मोहिमेवर असला आणि त्याच्या पराक्रमाची वार्ता साताऱ्यास आली कीं या मंडळीचे पोटांत धस्स होई, आणि आनंदाऐवजीं शाहूस ते भीति घालीत. असा हा जाच कैक वर्षे बाजीरावास होत होता.त्यांतून कसें मुक्त व्हावें हें त्यास कळेना. अंगच्या पराक्रमानेंच त्याचा निभाव लागला. तशांत शाहू बादशहाशीं वैर किंवा युद्ध चालविण्यास इच्छित नव्हता, त्यामुळेंही बाजीरावाच्या पराक्रमानें घडावें तेवढें कार्य घडलें नाहीं. फत्तेसिंग, रघूजी, प्रतिनिधि व दाभाडे यांशीं बाजीराव फार सावधगिरीनें वागे. फत्तेसिंगास त्यानें कधीं दुखविलें नाहीं: रघूजीस स्वतंत्र सोडिलें; प्रतिनिधीचें नेभळेपण सिद्ध केलें आणि दाभाड्यावर समोर आघात करण्यास कमी केलें नाहीं. असें धोरण बाजीरावानें ठेविलें. प्रतिनिधीच्या पराक्रमासंबंधानें शाहूचा भ्रम पुढें लवकरच नाहींसा झाला; आणि राज्यासंबंधीं महत्त्वाची उलाढाल बाजीरावाचे सम्मतीवांचून करावयाची नाहीं असा सन १७२८ पासून पुढें शाहूनें निश्चय केलेला दिसतो. असा जम बसल्यावर बाजीराव व चिमाजी दोघेही बाहेर स्वाऱ्या करूं लागले.

**२. बाजीरावाची हिंदुपदपातशाहीची भावना.**—बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून सर्व हिंदुस्थान पादाक्रान्त करण्याचा मराठमंडळाचा उद्देश थोडा बहुत व्यक्त होऊं लागतो. दिल्लीस जातांना शाहूनें बाळाजीस ज्या उद्योगांची याद करून दिली, त्यांत तरी हेंच बीज असून, त्यांतील अपुरे भाग पुरे करून ते पुढें वाढवावयाचे होते. गोष्टी मनांत जितक्या लवकर बनतात, तितक्या त्वरेनें त्या सिद्धीस जात नाहींत. बाजीरावानें पुढें नेटानें उद्योग चालवून हिंदुपदपातशाहीचा वर सांगितलेला उद्देश तडीस नेण्याची बरीच सिद्धता केली. लवकरच मराठ्यांच्या हातीं हिंदुस्थानची पातशाही जाणार

असा समज हळूहळू फैलावत चालला. हा समज खर्ड्याचे लढाईपावेतों मराठे सरदारांच्या व मुत्सद्यांच्या दृष्टीपुढें खेळतांना दिसतो. मराठमंडळाचा हा उद्देश राजकर्त्यांच्या हुकुमांत, मराठे वकिलांच्या व मुत्सद्यांच्या लेखांत व भाषणांत आणि लढाऊ सरदारांच्या कृत्यांत सुमारें साठ सत्तर वर्षें-पावेतों व्यक्त होत होता. हिंदुपदपातशाहीच्या या कल्पनेचा उगम शिवाजी-पासून झाला. औरंगजेबाच्या मृत्युसमयीं ही कल्पना व्यावहारिक स्वरूपांत आणण्यास अनुकूल परिस्थिति निर्माण झाली. तथापि हा बनाव घडून येण्यास पुष्कळच अडचणी होत्या. कौटुंबिक कलहामुळें त्यास प्रथमच मोठें विघ्न आलें. तें विघ्न दूर होऊन शाहूची स्थिरस्थावर झाल्यावर, जेव्हां शंकराजी मल्हार सय्यदांच्या तर्फेनें बोलणें करण्यास साताऱ्यास आला, तेव्हां त्याच्या मनांतहि बादशाहीच्या बलाबलाची चांगली कल्पना असल्यामुळें, त्यानें ती गोष्ट मराठ-मंडळाच्या मनांत योग्य प्रकारें ठसवून दिली. तेव्हांपासून बाजीराव कांहीं कालानें या कल्पनेचा अवतार बनला. अनेक प्रकारच्या अडचणींनीं त्याचे हयातींत ती गोष्ट सिद्धीस गेली नाहीं. तरी त्याच्या कृत्यांत, मोहिमेंत व लढायांत, अनेक डावपेचांत व राजकीय लेखांत हा प्रमुख उद्देश उघड दिसतो. बाजीरावाच्या एकंदर हालचालींची मालिका जुळविण्यासाठीं राष्ट्रोद्देशाचें हें सूत्र दृष्टीसमोर ठेवावें लागतें. बाजीरावाच्याच स्फूर्तीनें मराठे सरदारांचा संचार हिंदुस्थानभर झाला. निजामावरच्या अथवा बाकीच्या मोहिमा यामुळें उद्भवल्या. कर्नाटकची मोहीम या उद्देशानेंच शाहूनें अंगीकारिली. ब्रह्मेन्द्रस्वामी, नारायण दीक्षित वगैरे देशभर यात्रा करून अनुभव मिळविलेल्या साधु पुरुषांच्या ठिकाणीं वरील भावना स्फुरण पावत होती. याच भावनेनें ते आपल्या शिष्यांस उत्तेजन देत होते. त्यांच्या वर्तनांत व कृतींत लहान मोठे दोष असतील, किंबहुना, त्यांचे प्रयत्नही चुकीचे असतील, परंतु हिंदुपदपातशाहीची ही वरील भावना त्यांच्या अंतःकरणांत जोरानें वावरत होती हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. जंजिऱ्याचा हबशी नाहींसा करणें, वसई काबीज करून पोर्तुगीज लोकांचा अंमल उठविणें, हीं कृत्यें गोब्राह्मण प्रतिपालनासाठीं अवतरलेल्या राष्ट्रोद्योगाचींच पृथक् अंगें होत. निरनिराळ्या प्रकरणांच्या उपलब्ध हकीकती संकलित केल्या म्हणजे हा मथितार्थ निष्पन्न होतो.

वऱ्हाड, माळवा, बुंदेलखंड, दिल्ली वगैरे उत्तरेकडील प्रांतांत मराठ्यांनीं लवकरच कायमचें वास्तव्य केलें. सवाई जयसिंगाशीं संगनमत करून दिल्लीकडील अडचणींचें निरसन करण्याची प्रवृत्ति वरील हेतूनेंच उत्पन्न झाली. आनंदराव सुमंत, बाबूराव मल्हार बर्वे, कृपाराम, हिंगणे वगैरे अनेक वकील बाजीरावाकडून मिळालेल्या स्फूर्तीनें आपापलीं कारस्थानें रचीत होते. भोसले, होळकर, शिंदे, पवार, गायकवाड, खेर, कोल्हटकर, बर्वे, जोशी, पुरंदरे, घोरपडे, बिवलकर वगैरे अनेक लहान थोर मंडळी हा राष्ट्रोद्योग सिद्धीस नेण्यासाठीं खपत होती. त्यांचीं नांवें व त्यांचे उद्योग आज आपणांस पूर्णपणें उपलब्ध नाहींत. तरी वकिलांचे व मुत्सद्यांचे कांहीं कागदपत्र बाहेर आले आहेत त्यांत मराठमंडळाची वरील भावना चांगली व्यक्त झालेली आहे. राष्ट्रोद्देशाची ही स्फूर्ति वकिलांस व सरदारांस बाजीरावाकडूनच प्रथम मिळाली असें ह्मणण्यास हरकत नाहीं. पुष्कळांनीं बाजीरावाच्याच उद्योगाचें अनुकरण पुढें केलें. या संबंधानें तडकाफडकीचा आवेश बाजीरावाच्या व त्याच्या अनुरोधानें इतरांच्या ठिकाणीं उत्पन्न झालेला दिसतो. बाजीरावाच्या वीस वर्षांच्या उद्योगानें मराठमंडळाचा हा उद्देश फारसा तडीस गेला नाहीं याबद्दल जणूं काय त्वेष येऊनच पुढें त्याचा मुलगा नानासाहेब व पुतण्या सदाशिवराव ज्यास्त जोरानें प्रयत्न करूं लागले. प्रयाग, काशी, बंगाल इत्यादि दूरदूरच्या प्रदेशांत वरील संचारानें नानासाहेबास ओढून नेलें. प्रयत्नांत वीसच्या वर्षे चालली; तथापि यशःसिद्धि नाहीं, ह्मणून त्वरेनें सोक्षमोक्ष करण्यासाठीं सदाशिवराव पानपतच्या संग्रामावर घुसला. यानंतर इंग्रजांशीं प्रसंग पडून मराठ्यांचा हा डाव फसला, ही गोष्ट निराळी. परंतु महादजी शिंदे व नानाफडणीस यांच्या अगदीं अखेरीपर्यंत हा उद्देश मराठमंडळाच्या दृष्टीसमोर होता.

राष्ट्राचा फैलाव होऊन राज्य वाढत गेलें आणि निरनिराळीं महत्त्वाचीं कामें उपस्थित झालीं ह्मणजे तीं करण्यास माणसेंही तयार होत जातात. हा प्रकार पेशवाईच्या वेळेस उत्कृष्ट निदर्शनास येतो. बाळाजी विश्वनाथानें दिल्लीकडील कारस्थान हातीं घेतल्यापासून मराठी राज्याचा व्याप वाढत गेला; आणि शिंदे, होळकर, पवार, गायकवाड वगैरे लढाऊ सरदार राज्यवृद्धीचा उद्योग करूं लागतांच निरनिराळ्या दरबारांत राजकारणें उत्पन्न झालीं, तीं भागविण्या-

साठीं निरनिराळे इसम प्रथम नेमले गेले; आणि कामाच्या अनुभवानें त्यांची कर्तबगारी वाढून परराष्ट्र–व्यवहांत निष्णात असे अनेक गृहस्थ तयार झाले. तींच कामें त्यांजकडे वंशपरंपरा चालल्यानें अशीं अनेक घराणीं राज्यकारभारांत पुढें आलीं, आणि ठिकठिकाणीं लहान मोठीं वतनें संपादून त्यांनीं आपलें वास्तव्य केलें, व वैभव वाढविलें. अशा रीतीनें स्वराज्यांत राष्ट्राचा व्याप वाढत गेल्याबरोबर पुष्कळांचें दैन्य दूर होऊन लोकांस पराक्रम गाजविण्यास अवकाश मिळत गेला. इंग्रजी अंमदानींत राज्यांत ज्याप्रमाणें क्लाइव्ह–हेस्टिंग्ज् सारखीं माणसें, आरंभीं अप्रसिद्ध असतांही संधि मिळतांच पराक्रम गाजवूं लागलीं, तसाच प्रकार बाजीरावाचे वेळीं कित्येक परराष्ट्रीय कुटुंबांचा झाला. बाजीरावाचे पुढील उद्योग समजण्यासाठीं प्रथम दिल्लीदरबारच्या भानगडी समजून घेतल्या पाहिजेत.

३. **सय्यदांच्या कारभाराचा अखेर**, (मार्च १७१९—नोव्हें० २०) फर्रुखसियरच्या मृत्यूनंतर दिल्लीच्या दरबारांत पुष्कळ धामधूम चालली. सय्यदांनीं स. १७१९ च्या फेब्रुवारींत तख्तावर बसविलेला शहाजादा रफीउद्दराजत क्षयरोगानें जून महिन्यांत मरण पावला, व त्यांना त्याचा वडील भाऊ रफीउद्दौला याची बादशाहीवर स्थापना केली. अजितसिंगाची मुलगी फर्रुखसियरची राणी दिल्लींत होती, तिला सय्यदांनीं अजितसिंगाचे स्वाधीन केलें. तिची संपत्ति एक कोटीहून अधिक होती ती सर्व त्यांनीं तिला दिली. अजितसिंगानें तिला स्वदेशीं नेऊन प्रायश्चित्त देववून परत हिंदुधर्मांत घेतलें. नवीन बादशहा आजारी पडून ता. १७ सेप्टेंबर रोजी मरण पावला, आणि बहादुरशहाचा पुत्र खुजिस्ता–अख्तार याचा मुलगा रोशन+अख्तार याची महंमदशहा नांवानें तख्तावर स्थापना झाली, ( ता.२८ सप्टेंबर १७१९ ). या वेळा रजपूत राजांना खुष करणें सय्यदांस जरूर वाटल्यावरून त्यांना अजितसिंगास अजमीर व गुजरात या सुभ्यांवर नेमिलें. सवाई जयसिंगासही पुष्कळ नवीन मुलखाची प्राप्ति झाली.

निजामुल्मुल्क व सय्यद यांचें कधींच पटलें नाहीं. निजाम मोठा महत्त्वाकांक्षी असून सय्यदांचे कारभारांत त्यास वर डोकें काढण्यास वाव मिळाला नाही. त्याला दक्षिणचा कारभार हवा होता, तो सय्यद त्याला देईनात. बहार प्रांतावर त्याची नेमणूक झाली होती; पण तिकडे तो गेला

नाहीं. पुढें त्याची नेमणूक माळव्याचे सुभ्यावर होऊन, ता. १५ मार्च १७१९ रोजीं तो उज्जनला निघून गेला, त्या वेळा आपणास माळव्यांतून तरी पुनः बदलूं नये असें वचन त्यानें सय्यदांपासून घेतलें होतें. कोठें तरी कायमपणा असण्याची त्याच्या भावी उद्देशास जरूर होती.माळव्यांत गेल्यावर स.१७१९.चा पावसाळा संपतांच, त्यानें पुष्कळशी फौज ठेवून युद्धाची तयारी चालविली. याचें कारण हुसेन सय्यदानें त्यास विचारलें, तेव्हां निजामानें उत्तर कळविलें कीं, मराठ्यांनीं माळव्यांत ठाणें दिलें असून त्यांस हुसकून देण्यासाठीं फौजेची अत्यत जरूर आहे. परंतु ही गोष्ट हुसेन सय्यदास पटली नाहीं. त्यानें दिलावर अली नांवाच्या आपल्या सरदारास निजामाचे हलचालींवर लक्ष ठेवण्यास पाठविलें; आणि निजामास माळव्याच्या कारभारावरून काढून परत दिल्लीस बोलाविलें. स. १७१८त हुसेन दिल्लीस गेला तेव्हां त्यांन आपली बायका मंडळी औरंगाबादेसच ठेविली होती,ती परत आणण्यास आपण जात आहों असा बहाणा करण्याची दिलावर-अलीस ताकीद होती. निजामाचा चुलत भाऊ अमीनखान आंगऱ्याचे सुभ्यावर होता, त्यानेंही निजामास लिहिलें कीं, ' सय्यद आपल्या दोघांच्या नाशावर आहेत. बादशहा सुद्धां त्यांचे जाचास कंटाळला आहे, त्यांचा प्रतिकार आपण जरूर केला पाहिजे.'याबरोबरच खुद्द बादशहा व त्याची आई यांचीं पत्रें निजामास आलीं, कीं 'कसेंही करून आह्मांस या सय्यदांचे जाचांतून सोडवावें.' निजामास आपण असा मोकळा सोडला ही चूक केली असें पुढें सय्यदांस वाटलें. आलमअली औरंगाबादच्या बंदोबस्तास होता, त्यास हुसेनअलीनें चांगल्या बंदोबस्तानें राहण्यास लिहिलें. दिलावरअली व आलमअली या दोघांनीं दोहों-कडून चालून येऊन मध्यें निजामाचा संहार करण्याचा बेत त्यांनीं ठरविला. येणेंप्रमाणें सय्यदांचा व निजामाचा सामना जुंपला. या दोन पक्षांतून जो निभावेल, त्याच्या हातांत पुढील कारभार जाणार हें उघड होतें. सय्यदांच्या हातांत सत्ता व वजन होतें; परंतु धूर्तता व धोरण हे गुण त्यांच्या अंगीं नव्हते. अब्दुल्ला विलासी व थंड स्वभावाचा होता. हुसेनच्या अंगीं शौर्य व तडफ हे गुण होते; परंतु तो उतावळा व उद्दाम वृत्तीचा असल्यानें दूरवर विचार करून मनांतील भाव प्रगट न करतां धूर्ततेनें वागण्याचें कसब त्यास नव्हतें. निजामाची शक्ति कमी होती; परंतु खोल विचार, धूर्तता व प्रसंग पाहून वागण्याचें सामर्थ्य त्यास चांगलें होतें. या स्वभावानुसार पुढें परिणाम घडून आले.

निजामानें माळव्यांत आपला दरबार भरवून सर्व मंडळीचा सल्ला घेतला. सय्यदांशीं उघड विरोध करावयाचा नाहीं, हुकूम येतील ते सन्मानपूर्वक शिरसावंद्य करावयाचे, परंतु प्रसंग पडल्यास लढण्याची तयारी जय्यत ठेवावयाची, असा आपला वर्तनक्रम निजामानें सर्वांच्या विचारें ठरविला. दक्षिणेंत गेल्यास अशीरगड किल्ला तावडतोब आपल्या हस्तगत व्हावा अशी तजवीज आंतून किल्लेदारास वश करून त्यानें केली. हुकमाप्रमाणें माळव्याचा कारभार सोडून दिल्लीकडे निघून जाण्याचा बहाणा निजामानें केला. दोन तीन मुक्काम तो गेलाही. दोराहा येथें पोंचतांच निजामानें एकदम आल्या मार्गानें परत जाण्याचा हुकूम आपल्या लोकांस सोडिला. ता. ८ मे १७२० रोजी त्यानें अकबरपुरच्या उतारावर नर्मदा नदी ओलांडिली. ही बातमी दिल्लीस कळतांच हुसेनअलीच्या मनांत आपण एकदम निजामावर चालून जावें असें होतें. त्यास अब्दुल्ला व खानडौरान यांनी विरोध केला. ते म्हणाले, 'निजामाचा समाचार घेण्यास दिलावरअली व आलमअली बस आहेत. उगाच घाई करून घाबरेपणा दाखविल्यानें काम बिघडेल.' असा विचार करून सय्यदांनीं दिलावरअलीस निजामाचे पाठीवर तावडतोब जाण्याचा हुकूम सोडिला, आणि राव भीमसिंग हाडा, गजसिंग नरवारी वगैरे कित्येक सरदारांस दिलावरचे मदतीस पाठविलें. आलमअलीसही दक्षिणेंतून निजामावर चालून येण्याचा हुकूम त्यांनीं औरंगाबादेस पाठविला.

बऱ्हाणपुरच्या नजीकच अशीरगड किल्ला नर्मदेच्या दक्षिणेस सुमारें ४५ मैलांवर आहे. दक्षिणच्या प्रवेशाचें तें द्वारच म्हटलें तरी चालेल. गुप्त हेरांच्या मार्फत पैसे चारून निजामानें आपला मुलगा गाजीउद्दीन फिरूजजंग यास किल्ल्यावर पाठवून ता. २० मे १७२० रोजीं किल्ला हस्तगत केला, आणि किल्लेदार अबूतालीबखान म्हणून वृद्ध गृहस्थ होता, त्यास कैद केलें. लगेच मागून बीजागड, खरगोण मार्गानें निजामही अशीरगडावर आला, आणि तेथ आपले दोन मुलगे बंदोबस्तास ठेवून स्वतः तापीच्या उत्तर किनाऱ्यावर बऱ्हाणपुरास लालबागेंत येऊन उतरला.

या घडामोडींची बातमी येतांच आलमअलीनें अन्वरखान व रावरंभा निंबाळकर या दोन सरदारांस बऱ्हाणपुरावर पाठविलें; पण त्यांस निजामानें कडून कैद केलें. सय्यदांचा धाकटा भाऊ सैफुद्दीनअलीखान दिल्लीच्या सुभ्यावर

मुरादाबाद येथें होता, त्याची आई याच वेळीं औरंगाबादेहून मुरादाबादेस जात असतां, ब्ऱ्हाणपुरास निजामाचे हातांत सांपडली. ती निजामास आपले सर्व डागदागिने देऊन सुखरूप सोडण्याची विनवणी करूं लागली. परंतु निजामानें तिच्या संपत्तीस हात न लावितां उलट तिला बंदोबस्तानें पुढें रवाना केलें. राजकारणांत अशा धोरणाचा मोठा उपयोग होत असतो.

**४. खांडव्याची लढाई** ( १९ जून १७२० ).––आलमअली केवळ वीस वर्षांचा तरुण व उत्साही गृहस्थ होता. त्यास हुसेन अलीकडून खबर येतांच त्यानें निजामावर चालून जाण्याची तयारी चालविली; मराठे सरदारांस आपल्या मदतीस घेतलें; आणि दिलावरअली उत्तरेकडून येतांच आपण औरंगाबादेहून चालून जावयाचें असा बेत ठरविला. त्याजपाशीं एकंदर तीस हजार फौज असून त्यापैकीं पंधरा सोळा हजार मराठे होते. ता. ७ जून सन १७२० रोजीं आलमअलीनें औरंगाबादेहून कूच केलें. तिकडून दिलावर-अलीखान हंडिया येथें नर्मदा उतरून मोठ्या जोरानें निजामावर चालून आला. ता. ६ रोजीं निजामानें तापी उतरून दक्षिण कांठावर आपली छावणी दिली; आणि दिलावरअली व आलमअली यांचा मिलाफ होऊं न देतां एक एकास वेगळे गांठण्याचा बेत त्यानें ठरविला.

दिलावर अली उतावळा व मानी होता. सय्यदांनीं ढिलाईबद्दल त्यास टोंचून लिहिलें तें सहन न होऊन रागारागानेंच तो निजामावर चालून आला, आणि दारूच्या धुंदांत त्यानें चीड येण्याजोगें पत्र निजामास लिहिलें. ता. ७ जून रोजीं निजाम पुनः तापीच्या उत्तरेकडे त्याजवर चालून गेला. निजामा-बरोबर तोफखाना असून अशीरगडावर त्यानें आपला सर्व बंदोबस्त पक्का ठेवून, ब्ऱ्हाणपुरच्या उत्तरेस सोळा सतरा कोशांवर रतनपुर गांवानजीक निजामानें आपला तळ दिला. दिलावरची फौज उत्तरेकडून निजामावर चालून आली, ती, तेरापासून सतरा हजारपावेतों असून चांगली कसलेली होती. निजामाकडेही पुष्कळ अनुभवी सरदार होते. त्यांत कैद करून ठेवलेला राव रंभा निंबाळकर यासही त्यानें दिलावरचे फौजेवर पाठविलें. लढाई कोणत्या ठिकाणीं झाली त्याचा निश्चय होत नाहीं. खांडवा व हुसेनपुरच्या नजीक पांढरा डोंगर आहे तेथें ही लढाई झाली असें ग्रंथकार लिहितात, ती खांडव्याची म्हणून प्रसिद्ध आहे.

ता. १९ जून १७२० रोजीं दोनप्रहरांनंतर मोठें तुंबळ रणकंदन होऊन त्यांत दिलावरअली व त्याचे सर्व मोठमोठे सरदार मारले गेले. मागें सांगितलेले रजपूत राजे भीमसिंग व गजसिंग हेहो पडले. खांडव्याची ही लढाई म्हणजे सय्यदांच्या कारभाराचा पहिला बुडता पाय होय. लगेच इकडून आलमअलीखान ब्ऱ्हाणपुरावर चालून येत होता, त्याजला तोंड देण्यास निजामानें आपली फौज रवाना केली. आलमअलीस दिलावर पडल्याची बातमी कळतांच तो जागच्या जागीं राहिला, पुढें चालून गेला नाहीं.

दिलावरअलीचा पाडाव झाल्याची बातमी तारीख ५ जुलई रोजीं सय्यदांस दिल्लीस कळली, तेव्हां पुढें काय करावें हें त्यांस सुचेना. हुसेनचीं बायकामुलें औरंगाबादेस होतीं, तीं शत्रूच्या हातांत पडतील अशी त्यांस भीति होती. तेव्हां तूर्त निजामास चिडवूं नये आणि सलोखा दाखवून त्यास कबजांत आणावें, असा विचार सय्यदांनीं ठरवून त्यास पत्र लिहिलें, कीं ' दिलावर अलीनें आमच्या हुकुमाबाहेर वर्तन केलें; त्यास फक्त कबिले घेऊन येण्याची ताकीद होती. त्यानें बंडखोरपणा केला, त्याचें प्रायश्चित त्यास मिळालें. ' असें पत्र निजामास लिहून शिवाय बादशहाकडूनही एक लांबलचक फर्मान सय्यदांनीं निजामास लिहविलें, आणि त्याची समजूत करण्याकरितां दक्षिणच्या सुभ्यावर निजामाची नेमणूक केल्याचा हुकूम पाठविला. आलमअलीस सय्यदांनीं लिहिलें, कीं ' तूर्त तुम्हीं पडतें घ्यावें आणि निजामाशीं गोडीनें वागूव राहवें. ' असा मार्ग घाबरेपणानें सय्यदांनीं अवलंबिला, तेणेंकरून निजामाच्या पक्षास अनायासें जोर आला; आणि आलमअली बंडखोर ठरला.

सय्यदांच्या मनाची सारखी धरसोड चालू होती. त्यांस पुढें काय करावें हें समजेना. दक्षिणेंत निजामावर स्वारी करावी, तर मागें काय प्रकार होईल त्याचा नेम नाहीं, न जावें तर तिकडे निजाम बलवान होतो, अशा विवंचनेंत बराच काळ गेला. घटकेंत बादशहास बरोबर घेऊन सर्वांनीं निजामावर चालून जाण्याचा, तर घटकेंत एकट्या हुसेनअलीनेंच जाण्याचा, असे अनेक बेत झाले. निजामाचा चुलतबंधु महंमद अमीनखान याचें दिल्लींत बादशहाजवळ वजन होतें, त्याची सय्यदांस मोठी भीति पडली. येथून पुढें निजामाप्रमाणें अमीनखानानेंही मोठ्या सावधगिरीनें वागून, बाहेरून सय्यदांशीं मित्रभाव ठेवून

अंतस्थ रीतीनें त्यांचा पाडाव करण्याचा उद्योग चालविला. महंमद अमीनखान व हुसेनअली एकमेकांचा जीव घेण्यास टपले होते: पण त्यांचा बेत सिद्धीस गेला नाहीं. बाहेरून मात्र ते मित्रभाव दाखवीत.

इकडे आलमअलीनें निजामाशीं संग्राम करण्याचाच निश्चय केला. खांड-व्याची लढाई आटोपल्यावर* २७ जून रोजीं निजाम बऱ्हाणपुरास आला. तेथून त्यानें आलमअलीशीं नरमाईचें बोलणें सुरू केलें. ' तुम्ही सुभेगिरी आमच्या स्वाधीन करीत नाहीं, तर आतां आम्हांस जगून तरी काय करावयाचें आहे ? आम्ही आतां मक्केस जाऊन राहिलेलें आयुष्य ईशाचिंतनांत घालविणार!' अशी गप्प उठवून त्यानें लोकांस रजा दिल्याचे हुकूम सोडिले. हा सर्व कपट-व्यूह होता; पण आलमअलीच्या सल्लागारांनीं व विशेषतः मराठे सरदारांनीं त्यास अशी मसलत दिली, कीं 'तूर्त समोर लढण्याचा प्रसंग आणूं नये. आपण सर्वांनीं कांहीं वेळ माघार घेऊन औरंगाबादेवर किंवा त्याही अलीकडे अहं-मदनगरावर येऊन राहवें; आणि तेथून मराठ्यांच्या फौजांनीं रात्रंदिवस छापे घालून निजामास हैराण करावें. ' पण असला नामर्दपणा आपण कधीं करणार नाहीं असें बोलून, आलमअलीनें एकदम जाऊन निजामाशीं समोर सामना करण्याचा निश्चय केला. त्यांत निजामानें मुद्दाम आलमअलीचा स्वभाव ओळखून त्यास चीड येणारीं पत्रें लिहून आगींत तेल ओतलें: आणि बऱ्हाणपुरावरून आपली छावणी दक्षिणेस पूर्णेच्या कांठीं आणिली. आलमअलीचा तळही तेथून नजीकच ' तलाव हरताळा ' येथें पडला. पावसाळा जोराचा व रस्ते चिखलानें दुर्गम झालेले असल्यामुळें, दोन्ही दळें नदीच्या दोन बाजूंस कांहीं दिवस आपापल्या जागीं तटस्थ राहिलीं. पूर्णा नदीस उतार मिळेना. होड्यांचा पूल तयार केलेला पावसानें वाहून गेला. तेव्हां नदीकांठानेंच निजाम कांहीं मुक्काम वर मलकापुर पावेतों गेला. तेथून बाळापुरच्या बाजूस नदीस उतार आहे अशी बातमी कळतांच, तेथें नदी उतरण्याची तजवीज निजामानें केली. दुसऱ्या कांठावरून आलमअलीची फौजही निजामावर गोळीबार करीत वर गेली. ता. १५ पासून २० जुलई पावेतों निजामाची सर्व फौज नदी उतरून अलीकडे आली, आणि शेवगांवनजीक छावणी करून राहिली. पावसाची संतत धार चालू असल्यामुळें लोकांस दाणावैरण बिलकूल मिळेना. नागपुरकर कान्होजी भोस-

त्यानें निजामाच्या फौजेवर सर्व बाजूंनीं छापा घालून त्यास हैराण केलें. रुपयास दोन शेर आटा मिळेना, अशी स्थिति झाली. जनावरांच्या दृष्टीस गवताचें पानही पडेनासें झालें. अशा स्थितींत बाळापुरास येऊन निजामानें मुक्काम केला. तेथें त्यास धान्य वगैरे मुबलक मिळालें.

इकडे आलमअलीनें आपली तयारी फार चांगली केली. त्याच्या जवळ अनेक मोठमोठे सरदार जमा झाले. वाटेल तसा खर्च करण्यास कमी करूं नये, अशी त्यास सय्यदांचीही सूचना आली. त्याप्रमाणें त्यानें पैसा खर्च करून पुष्कळ लोक जमविले. त्यांत कांहीं लोक निजामाचे गुप्त हेर असेही होते. आलमअलीस मराठ्यांची चांगली मदत होती. संताजी शिंदे, खंडूजी दाभाडे, शंकराजी मल्हार, कान्होजी भोसले ही मंडळी शाहूच्या हुकुमानें १७।१८ हजार फौजेनिशीं आलमअलीच्या मदतीस आली होती.

**५. बाळापूरची लढाई** ( ता. १० ऑगस्ट १७२० ).—इतक्यांत निजामास दक्षिणच्या सुभ्यावर नेमल्याचें फर्मान आलें. निजामानें सामोरें जाऊन फर्मानाचा मोठा आदर केला, आणि लगेच त्याची नक्कल आलमअलीकडे पाठवून, ' तूं आतां कारभार सोडून तो आमचे हवालीं कर. तुम्हांस व सय्यदांचे बायकांमुलांस सुखरूपपणें दिल्लीस जाऊं देतों, ' असें निजामानें आलमअलीस कळविलें. वास्तविक हें फर्मान निजामाची बाहेरून समजूत करण्याकरितां धांदलीनें पाठविलेलें होतें. तथापि त्यामुळें आलमअलीच्या लोकांत घोटाळा उडाला. हा वेळ पावेतों निजाम बंडखोर समजला जात असे, परंतु आतां या फर्मानामुळें निजाम कायदेशीर सुभेदार होऊन आलमअली बंडखोर ठरला. निजामानें बादशहास व सय्यदांस प्रेमभावाचीं लांबलचक पत्रें लिहिलीं. " मराठे बळजोर झाल्यामुळें त्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं आपला हुकूम नसतां एकदम माळवा सोडून दक्षिणेंत येणें आम्हांस भाग पडलें. आमच्याकडून बादशहाची यत्किंचित् अवज्ञा होणें शक्य नाहीं. आम्हांसही आतां कामाचा कंटाळाच आला आहे. मराठ्यांचा एवढा बंदोबस्त झाला म्हणजे आम्ही निघून मक्केस जाणार ! आतांच गेलों असतों, पण आमची नेमणूक दक्षिणच्या सुभ्यावर झाल्यानें काम सोडून जाणें म्हणजे हुकमाची अवज्ञा होते. बादशहाचे हुकूम परमेश्वराच्या पेक्षांही आम्हांस ज्यास्त वंद्य आहेत. ' असें बादशहास लिहून हुसेनअलीसही

त्यानें असेंच मोठ्या गोडीचें पत्र लिहिलें. ' तुमच्या बायकांमुलांचीं मला अत्यंत काळजी आहे. मी औरंगाबादेस पोंचतांच, त्यांस लवकरच बंदोबस्तानें तुमच्याकडे रवाना करितों. ' मुत्सद्दी धोरण ह्मणजे काय, आणि सय्यदांचें चुकलें कोठें, याचा उलगडा या प्रकरणांतील सय्यदनिजामांच्या वर्तनविरोधावरून करितां येतो.

ता. ९ ऑगस्ट स. १७२७ रोजीं बाळापुराहून दोनतीन कोसांवर निजामानें लढाईच्या इराद्यानें आपली फौज व्यवस्थेनें उभी केली. तिकडून आलमअलीखान हत्तीवर बसून तोफखाना पुढें ठेवून ता. १० ऑगस्ट रोजीं चालून आला. परंतु निजामानें जोराचा हल्ला केल्यावर आमलअलीचे बरेच सरदार पडले. त्याला स्वतःला गोळी लागली, आणि त्याचा हत्ती पळून जात असतां पुनः एक बाणाची जखम लागून आलमअली पडला. निजामाच्या सरदारानें आलमअलीचें शिर कापून नेलें. शंकराजी मल्हार जखमी होऊन निजामाचे हातांत कैद झाला. आलमअलीचें सर्व सामान निजामास सांपडलें; आणि त्याचे पुष्कळसे सरदारही फौजेसह निजामास जाऊन मिळाले. हैदराबादचा कारभारी मुबारीझखान व त्याचा भाऊ दिलावरखान हे सय्यदांकडचे होते; पण आलमअली मेलेला पाहून, तेही निजामास मिळाले. मराठ्यांचे एकंदर ६३४ लोक पडले, तरी त्यांनीं हिंमत करून थेट निजामाच्या मुक्कामापर्यंत चाल करून पुष्कळसा खजिना लुटून आणिला. मराठ्यांची फार मोठी फौज या वेळीं आलमअलीचे मदतीस आली होती, परंतु त्यास मागें ठेवून तो स्वतःच पुढें घाईघाईनें चालून गेला. तो मारला गेला नसता तर मराठ्यांनीं निजामाचा चांगलाच समाचार घेतला असता. ही बाळापुरची लढाई सय्यदांचे नाशाचा आरंभ होय. ( अर्व्हिन पृ. ५०. )

बाळापुरच्या लढाईची बातमी ता. २६ ऑगस्ट रोजीं सय्यदांस आग्रा येथें कळली, तेणेंकरून ते अत्यंत कष्टी झाले. निजामाचा चुलतभाऊ महंमद अमीनखान बादशहाजवळ होता, त्यास कारभारांतून काढण्याचा त्यांचा विचार चालला होता, परंतु वरील अरिष्टानें खचून जाऊन त्यांनीं त्याच्याशीं गोडी ठेविली. पण तोही कपट—वर्तन करून आंतून सय्यदांच्या नाशास प्रवृत्त झाला. बादशहा व हुसेनअलीखान यांनीं निजामाचें पारिपत्य करण्यासाठीं दक्षिणेंत जावें, आणि अब्दुलाखानानें दिल्लीस जाऊन तेथंचा बंदोबस्त ठेवावा, असा बेत

आग्रा येथें [illegible]ला. सय्यदबंधूंची ही फाटाफूटच त्यांच्या नाशास कारण झाली. अजमीरच्या रस्त्यानें रजपूत राजांची मदत मिळवीत दक्षिणेंत जाण्याचा बेत ठरवून बादशहाची स्वारी ता. १५ सेप्टेंबर रोजीं आग्र्याहून निघाली. पुढें सांगितलेला राजा रतनचंद स्वारीबरोबर होता. शिवाय महंमदअमिनखान, हैदरकुलीखान व सादतखान हे तीन प्रमुख सरदार त्याजबरोबर असून, त्यांचे हुसन सय्यदास मारून टाकण्याचे अंतस्थ बेत चालू होते ता. ८ ऑक्टोबर १७२० रोजीं जयपुरच्या पूर्वेस साठ मैलांवर 'तोडाभीम' येथें बादशहाचा मुक्काम झाला असतां हुसेनअलीचा खून झाला. त्यांत वर सांगितलेले तीन सरदार प्रमुख होते. लगेच बादशहानें दरबार भरवून बक्षिसें वांटलीं, आणि वरील तिघांस मोठमोठ्या मनसबी दिल्या. सय्यदांच्या जाचांतून सुटल्याबद्दल बादशहास व लोकांस आनंदीआनंद झाला. बादशहाची स्वारी लगेच परत दिल्लीस निघाली. रस्त्यांत महंमदखान बंगश त्यास मिळाला. हळूहळू बादशहाचा जमाव फारच मोठा झाला. निजामुल्मुल्क, राजा गिरिधर बहादुर, सवाई जयसिंग व लाहोरचा सुभा अब्दुस्समदखान या सर्वांस खुषखबरीचीं पत्रें लिहून बादशहानें मोठा धीर दिला सर्वांनीं जबाबही त्याच भासल्याचे पाठविले. बादशहाची स्वारी दिल्लीस पोंचल्यावर अब्दुल्ला सय्यदाचें व त्याचें खूपच वांकडें आलें. अब्दुल्लानें दुसरा शहाजादा तख्तावर बसवून लढाईची तयारी केली. बादशहानें महंमद अमीनखानास वजीर नेमिलें. या वेळीं हैदरकुलीखान, खानडौरान, सादतखान, महंमदखान बंगश, महंमद अमीनखानाचा मुलगा कमरुद्दीनखान व सवाई जयसिंग इत्यादि मोठमोठे सरदार बादशहाजवळ होते, त्यांचीं नांवें पुढील कारभारांत यावयाचीं आहेत. दिल्ली व मथुरा यांचे दरम्यान यमुनेच्या कांठीं हसनपुर येथें ता. १४ नोव्हेंबर स. १७२० रोजीं लढाई होऊन अब्दुल्ला सैय्यद कैद झाला, तेणेंकरून सय्यदांची कारकीर्द संपली. पुढें दोन वर्षांनीं ता. ११ ऑक्टोबर १७२२ रोजीं अब्दुल्लाचा खून झाला.

हिंदुस्थानच्या इतिहासांत व विशेषतः मराठ्यांच्या संबंधानें, सय्यदांचा दहा वर्षांचा कारभार मोठा क्रांतिकारक आहे. बादशहाच्या कमकुवतपणामुळें जरी सय्यदांना क्रूरपणाचें वर्तन ठेवावें लागलें, तरी रयतेच्या संबंधानें त्यांचा कारभार दुष्ट नव्हता. हिंदूंशीं त्यांचा प्रेमभाव पुष्कळ असून रजपूत व

मराठे त्यांस सर्वथा अनुकूळ होते. मुसलमानांचा कडवा धर्मद्वेष त्यांचे ठिकाणीं नव्हता. उलट त्यांचें वर्तन बहुतेक हिंदु धरतीचें होतें. तथापि राज्यकारभारांतलें दूरदृष्टीचें धोरण अंगीं नसल्यामुळें त्यांचा नाश झाला. निजामाच्या कावेबाज स्वभावापुढें ते हार गेले. मात्र बादशाहींत मराठ्यांचें व रजपुतांचें प्राबल्य वाढण्यास सय्यदांचा कारभारच कारण झाला. निजामासारखा दुसरा कोणी गृहस्थ बादशाहीच्या कारभारावर असता तर मराठ्यांचा उत्कर्ष इतक्या सुलभ रीतीनें झाला नसता; कदाचित् बाळाजी विश्वनाथाचा सर्वच व्यूह ढांसळला असता. यासाठीं सय्यदांची हकीकत विस्तारानें दिली आहे.

सय्यदांचा पाडाव करत्यांत महंमद अमीनखान प्रमुख असून तोच पुढें वजीर झाला. हा निजामुल्मुल्कचा चुलता होय. बापाचा खून होऊन अमीनखान पंचवीस वर्षांचा असतां स. १६८६ च्या सुमारास बुखाऱ्याहून औरंगजेबाकडे आला. बादशहानें त्यास नोकरींत घेऊन चुलतभाऊ गाजीउद्दीन याजबरोबर ठेविलें; आणि पुढें त्यास चीनबहादुर अशी पदवी दिली. निजामाइतका तो धाडसी नसून अंग बचावून वागत असे. फर्रुखसियरनें त्यास दुय्यम बक्षीची जागा दिली, तेव्हांपासून तो बादशाहींत निरनिराळ्या कामीं वावरत होता.

**६. सय्यदांचा हिंदूंकडे ओढा**—मराठ्यांचा प्रवेश दिल्लींत होऊन त्यांचीं कारस्थानें यशस्वी होण्यास तेथील अंतःस्थिति दृष्टीसमोर ठेविली पाहिजे. दिल्लींतील कित्येक हिंदी गृहस्थ मराठ्यांस अनुकूल होते. त्या वेळीं मोगल बादशाहींत सर्व मोठमोठ्या मुसलमान अधिकाऱ्यांजवळ अनेक हुशार हिंदु गृहस्थ कामास असत. चिटणिसी, हिशेबी, वकिली वगैरे कामें, खलबतें व त्यांतील खुब्या हे समजून घेण्यास परकी भाषा बोलणाऱ्या मुसलमान अधिकाऱ्यांस हिंदूंचाच उपयोग विशेष होई. सय्यदांचे कारभारांत तर हिंदूंचा पगडा विशेष होता. सबब अशा कांहीं व्यक्तींचे उल्लेख स्वतंत्रतेनें करणें जरूर आहे. दक्षिणेंतल्याप्रमाणें दिल्लीकडेसुद्धां कित्येक हिंदु कुटुंबें मुसलमान सरदारांजवळ पिढ्यानुपिढ्या कामें करून नांवाजलेलीं होतीं.

**रतनचंद.** हा वसुलाच्या व हिशेबाच्या कामांत परिपूर्णतेनें निपुण असून शिवाय दिल्लींत राहून राज्याच्या उलाढाली करणाऱ्या मंडळींत बनिया रतनचंदाचें नांव प्रमुख होतें. अबदुल्ला सय्यदाचा हा केवळ उजवा हात असून

त्याच्याच बरोबर तोही नाश पावला. दिवाण–इ–खालिसा ह्मणजे वसूल व हिशेब या कामांवर रतनचंदाची नेमणूक वजीर अब्दुल्लानें कांहीं दिवस करविली होती. सन १७१७ त या जागेवर बादशहानें औरंगजेबाच्या तालमेंत तयार झालेला इनायतुल्ला यास नेमिलें. हा इनायतुल्ला हिंदूंचा द्वेष्टा असून, सय्यदांचे वेळेस हिंदु कामगारांचें माहात्म्य बरेंच वाढलें, तें इनायतुल्लास खपलें नाहीं. रतनचंदाच्या शिफारसीनें जिझिया कर बंद झाला होता तो इनायतुल्लानें पुनः सुरू केला; आणि हिंदूंच्या जहागिरी पुष्कळ कमी केल्या. हा प्रकार रतनचंद व दुसरे अंमलदार यांस खपला नाहीं. त्यांनी वजिराकडे तक्रारी केल्या. तेणेंकरून वजिराचें व बादशहाचें ज्यास्तच वांकडें आलें. रतनचंदास नोकरीतून काढून टाकण्याचा बादशहानें हुकूम केला, तो अब्दुल्लानें मानिला नाहीं. अब्दुल्लाचे सगळे उद्योग रतनचंदामुळेंच यथास्थित चालले होते. पुढें फर्रुख्सेयर बादशहास पकडण्यास सय्यदांनीं जनानखान्यांत फौज पाठविली, तिजवर रतनचंद मुख्य होता. बादशहास त्यांनीं २८ फेब्रुवारी १७१९ रोजीं कैद करून पुढें ठार मारिलें; आणि नवीन कारकीर्द सुरू झाली, तेव्हां रतनचंद, अजितसिंग व कोट्याचा भीमसिंग यांच्या आग्रहावरून सय्यदांनीं लगेच जिझिया कर माफ केला. पुढें कांहीं काळ दोघां सय्यद बंधूंचें वांकडें आलें, तेव्हां रतनचंदानें अनेक प्रसंगीं उभयतांची समजूत घालून त्यांचें भांडण मिटविलें. राजा गिरिधर बहादुरची व सय्यदांची लढाई अलाहबादेस झाली, तेव्हां त्या दोघांचा तह घडवून आणण्याची महत्त्वाची कामगिरी रतनचंदानें उत्तम बजावून गिरिधरसारखा शूर सरदार त्यानें सय्यदांच्या बाजूस आणिला होता.

रतनचंदाचा शेवट मात्र वाईट झाला. ऑक्टोबर ता. ८ सन १७२० रोजी जयपुरच्या पूर्वेस साठ मैलांवर बादशहाचा मुक्काम असतां हुसेनसय्यदाचा खून झाला, आणि त्याची छावणी व संपत्ति सर्व लुटली गेली, त्या गर्दीत हुसेनसय्यदाचे सरदार, ज्यास जिकडे वाट फुटली तिकडे, चालते झाले. त्यांत पुष्कळांनीं रतसचंदास पळून जाण्यास सांगितलें असतां त्यानें तें मानिलें नाहीं. एकाएकीं धन्याचा खून झालेला पाहून तो अगदीं वेडा होऊन गेला. मात्र हुसेनचा खून झाल्याची बातमी त्यानें ताबडतोब अब्दुल्ला सय्यद दिल्लीस वजीर होता त्यास कळविली. राजा गिरिधरचा बाप दयाराम हा अर्मानखानाजवळ होता,

त्यास पाठवून अमीनखानानें रतनचंदास पकडून हालहाल करीत आपल्यापुढें आणिलें; आणि कांही काळ त्यास मोगल लोकांच्या पहाऱ्यांत ठेविलें. पुढें अब्दुल्ला सय्यद व बादशहा यांची लढाई चालू असतां बादशहानें रतनचंदास आपल्या समोर आणून ता. १३·११·१७२० रोजीं त्याचा शिरच्छेद करविला. मुसलमान ग्रंथकाकारांचा अभिप्राय असा आहे, कीं सय्यद स्वतः स्वभावानें चांगले होते; परंतु रतनचंदाच्या संगतीस लागून त्यांनीं अनुचित कृत्यें केलीं. तें कसेंही असो, सय्यदांचा पुष्कळसा ओढा हिंदूंकडे होता, आणि त्यांचे जवळ रतनचंदासारख्यांचें वजन होतें. रतनचंदाचे बहिणीचा नवरा केशवराय हाही एक गृहस्थ दिल्लींत मोठ्या कामावर होता. तत्कालीन कारभाराचे अंतस्थ धागे समजण्यास या हकीकती उपयोगाच्या आहेत.

# प्रकरण सातवें.

## बाजीरावाचा निजामास शह.

### स. १७२०–१७२८.

---

१. बाजीरावाच्या हालचाली व त्यांचें रहस्य.
२. निजामबाजीरावांचा पहिला रंग.
३. साखरखेर्ड्यांची लढाई, निजामाची स्थापना.
४. बाजीरावाची चढाई, प्रतिनिधींशीं वाद.
५. चित्रदुर्ग व श्रीरंगपट्टणच्या स्वाऱ्या ( स. १७२५–२७ ).
६. निजामाची चढाई व शाहूची तारांबळ ( स. १७२६–२७ ).
७. पालखेडास निजामाचा कोंडमारा ( फेब्रु. १७२८ ).
८. रघूजी भोसल्याचा उदय.

**१ बाजीरावाच्या हालचाली व त्यांचें रहस्य.**—बाजीरावानें पेशवाई मिळतांच जे उद्योग सुरू केले त्यांत त्याचा उद्देश काय होता, हें बिनचूक ताडण्यास लागणारा अस्सल पुरावा अद्यापि भरपूर उपलब्ध नाहीं.

या संबंधानें वीस वर्षांपूर्वी रा. राजवाड्यांनीं दर्शविलेला खेद अद्यापि कायम आहे. तीन शकावल्यांतील उडते उल्लेख, नानासाहेबाच्या रोजनिशीच्या दुसऱ्या भागाच्या शेवटीं दिलेले मुक्काम, शाहू छत्रपतीच्या रोजनिशींतील कित्येक टिपणें व ब्रम्हेंद्रस्वामीचा पत्रव्यवहार, यांजवरूनच बाजीरावाच्या वर्तनोद्देशाचा अंदाज बांधावा लागतो. तथापि त्याच्या अंमदानींतील एकंदर घडामोडी एका दृष्टिकेंद्रांत घेऊन सामान्य विचार केला असतां, त्यांचे पहिलीं अकरा व दुसरीं नऊ वर्षे, असे दोन मुख्य खंड पडतात. बापानें अंगीकारिलेली राज्यकार-भाराची व्यवस्था बाजीरावास तशीच जोरानें पुढें चालवावयाची होती; परंतु तसें करण्यास मुख्य अडचण त्यास शाहूच्या दरबारांतील मंडळाकडून आली. सय्यदांबरोबर झालेले चौथाईचे करार पुरे पाडण्यास निजाम नानातऱ्हेच्या हरकती आणूं लागला, आणि पुढें तो स्वतंत्र होऊनच दक्षिणेंत राहिला, तेव्हां संभाजीसारख्या शाहूच्या प्रतिस्पर्धी इसमास फोडून, अगर शाहूच्या पक्षांतील प्रतिनिधि, दाभाडे वगैरे मंडळींस नाना प्रकारचें आमिष दाखवून, त्यानें पूर्वीचाच खेळ पुनः आरंभिला. अशा परिस्थितींत तरुण व अननुभवी बाजीरावाला मोठा पेच उपस्थित झाला. त्याजवर शाहूचाही आरंभीं पूर्ण विश्वास नव्हता. इकडे निजामासही बाजीरावाच्या कर्तृत्वाचा अंदाज नसल्यामुळें आपण शाहूच्या दरबारांत पुनः दंगल उडवून देऊं असें वाटलें. ही अनिश्चित स्थिति उलथून देणें बाजीरावाचें पहिलें काम होतें. पेशवाईचा अधिकार गाजविण्याची ताकद आपल्या अंगांत आहे, बापानें करारपूर्वक ठरविलेली व्यवस्था प्रसंग पडल्यास लष्करी जोरानेंही आपण सिद्धीस नेणार, पूर्वी संभाजीशीं किंवा चंद्रसेनाशीं जसे निजामानें डाव केले, तसे तो पुनः करूं लागेल तर ते डाव खेळणाऱ्या स्वकीय मंडळींस किंवा निजामास तंबी देण्यास आपण समर्थ आहों, आड येणाऱ्यास प्रखर शासन करण्यास आपण कधीं कचरणार नाहीं, हें बाह्य जगाच्या, विशेषतः शाहूच्याही नजरेस आणून देण्याचा बाजीरावाचा पहिला मोठा उपक्रम होता. तो सिद्धीस नेण्यांत त्याचीं जवळ जवळ बारा वर्षे गेलीं. ह्या बारा वर्षांत त्यानें निजामाचा चांगलाच समाचार घेतला. त्याजबरोबर लाडीगोडी लावणाऱ्या संभाजीस कायमचें जाग्यावर बसविलें, आणि चंद्रसेनाचा पूर्वीचा खेळ नवीन सेनापति दाभाडेही खेळूं लागला तर ती गोष्ट आपण कदापि चालूं देणार नाहीं, हें त्यानें दाभा-

ज्यासही चांगलें शिकविलें. इतकें काम सिद्धीस जाण्यास स. १७३१ साल आलें. बाळाजी विश्वनाथाच्या तहांतील चौथाई सरदेशमुखीचे हक्क गुजराथ, माळवा वगैरे प्रांतांवर बसविण्याचें काम या पहिल्याअकरा वर्षांत बाजीरावाचें चालूच होतें, तथापि स्वकीय विरोधकांवर त्याचा पगडा संपूर्ण बसेपर्यंत त्याचें खरें तेज स्वैरपणें प्रगट होण्यास अवधि मिळाला नाहीं. दाभाड्याचा पाडाव झाल्यावर लोक त्याची हुकमत निमूटपणें पाळूं लागले, तेव्हां पुढील नऊ वर्षांच्या उत्तर भागांत बाजीरावानें अंगीकृत उद्योग बहुतेक सिद्ध करून दाखविला. सारांश, बाजीरावाच्या कामगिरीचे वरील दोन पल्ले नेहमीं दृष्टीपुढें ठेविले पाहिजेत. स्वकीय विरोधकांचे कावे, शाहूच्या मनाची धरसोड, व निजामाच्या खटपटी, यांच्या योगानें पहिल्या पल्यांतील बाजीरावाच्या हालचाली उपस्थित होऊन त्यांत निजाम, संभाजी व दाभाडे यांचीं प्रकरणें प्रमुख आहेत; आणि त्याची एक व्यवस्थित सांखळी बनवितां येते. परंतु बाजीरावाचें खरें धाडस व स्वैर संचार नऊ वर्षांच्या उत्तर भागांत विशेष नजरेस येतात. पहिल्या भागांत त्याची स्थिति बरीचशी हातपाय आंखडल्यासारखी होती, तशी उत्तर भागांत नव्हती.

या पहिल्या हालचाली बिनचूक ठरविण्यास शकावलींतले उल्लेख अपुरे व धरसोडीचे आहेत. नानासाहेब पेशव्याच्या रोजनिशीच्या दुसऱ्या भागाचे शेवटीं बाजीरावाचे मुक्काम तारीखवार दिले आहेत, परंतु तपासून पाहतां ते बिनचूक आहेत असें वाटत नाहीं. दोन दोन वर्षे बाजीराव केवळ पुणें व साताऱ्याचे दरम्यान लुडबुडत राहिला असेल हें शक्य नाहीं. दुसऱ्याही अनेक चुका त्यांत दिसतात. तूर्त आपल्या कामापुरती त्याच्या हालचालींची खालील यादी ठोकळ मानानें खरी धरून चालण्यास हरकत नाहीं.

स. १७२० एप्रिल १७ पेशवाईवर नेमणूक.

,, जून १९, खांडव्याची लढाई, दिलावरअलीचा पाडाव.

,, ऑगस्ट १०, बाळापुरची लढाई. बाजीराव बहुधा हजर.

,, सेप्टेंबर–नोव्हेंबर, सातारा.

,, डिसेंबर–जानेवारी १७२१, मोगलाईत सावर्डीया येथें निजामाची भेट, विजापुर जुन्नरकडे निजामावर स्वाऱ्या.

स. १७२२ फेब्रुवारी–मे, पूर्वेकडे मोगलाईवर स्वारी.

,, जुलई–सेप्टेंबर, सातारा. या सालीं अगर पुढील सालीं प्रतिनिधीशीं वाद. हा वाद निजामावर चढाइ करण्यासंबंधानें असेल तर ही चढाई स. १७२७ त सुरू झाली त्या वेळचा असेल.

,, ऑक्टोबर, सासवड, सुपें, पुणें. पुण्यास वास्तव्य करण्याचा उपक्रम. सासवडास गैरसोय होऊन कांहीं दिवस सुप्यास मुक्काम.

स. १७२३ डिसेंबर–जून, उत्तर हिंदुस्थानांत पहिली स्वारी, १·३·१७२३ रोजीं बीजागड येथें (पे. द. पृ.१८);मोगलाइ, बऱ्हाणपुर, हंडिया, माळव्यांत झाबवा, निजामाची भेट, व वाघेलखंडांत रीवा वगैरे.

,, जुलई–नोव्हेंबर, सातारा व आजूबाजूचा प्रदेश. डिसेंबरांत माळवा, उज्जेनपर्यंत जाऊन लगेच परत.

स. १७२४ जानेवारी ८, भागानगरकडे रवानगी ( शा. रो. ४ ): सारंगपुरचे लढाईत बाजीराव नसावा. एप्रिल, लांबकानीचा कोट घेतला. ( रो १९५ ). सारंगपुरची लढाई, राजा गिरिधरचा पाडाव.

,, जुलई–ऑगस्ट, दक्षिणेंत परत येऊन साताऱ्यास न जातां परभारें निजामाकडे गोदावरी पावेतों, सेप्टेंबर–ऑक्टोबर मोगलाई.

,, २ ऑक्टोबर, साखरखेड्याच्या लढाईत निजामास मदत.

,, नोव्हेंबर–मार्च १७२५ कृष्णाकांठ ( शा. रो. ११ ).

स. १७२५ एप्रिल–सेप्टेंबर, सातारा, निजामाशीं सख्य (खं. ६·२२); कान्होजी भोसल्याची समजूत ( शा. रो. १५७ ).

,, डिसेंबर–मे १७२६ चित्रदुर्गची स्वारी.

स. १७२६ मे–सप्टेंबर, सातारा.

,, नोव्हेंबर–स. १७२७ मे, श्रीरंगपट्टणची स्वारी.

स. १७२७ पावसाळा सातारा.

,, सेप्टेंबर—मार्च १७२८, निजामावर स्वारी ( शा. रो. २९ ). वऱ्हाड,तापी,रेवातीर,सोनगडवरून खानदेशांतून येऊन पालखेडवर.

स. १७२८ फेब्रुवारी २५ पालखेडची लढाई, निजामाचा पाडाव. खंडेराव दाभाड्याची माळव्यांत लूट ( रो. २१४ ). इंदापुर पाटसकडे

लढाया, ( रो. ३४ व ऐ. टि. २·३५ ) मुंगी शेवगांवचा तह ६ मार्च. पुढें वर्ष अखेर मुक्काम सातारा पुणें.

स. १७२९ जानेवारी—जुलई, वऱ्हाड, माळवा, बुंदेलखंड. मार्च एप्रिल, जैतगडचा वेढा, बंगसाचा पाडाव,–चिमाजी आपाकडून माळव्याची व्यवस्था. ऑगस्ट–डिसेंबर–सातारा, पुणें.

स. १७३० मार्च एप्रिल, संभाजीचा पाडाव, राजबंधूंची भेट, वारणेचा तह. ऑक्टोबरपासून मोहीम खानदेशकडे

स. १७३१ गुजराथची मोहीम. १ एप्रिल डभईची लढाई. पावसाळ्यांत दाभाडे बाजीरावाची समजूत. या पुढील चार वर्षांत म्हणजे १७३५ च्या नोव्हेंबर पावेतों बाजीराव उत्तरेंत गेल्याचें आढळत नाहीं. फक्त चिमाजी, होळकर व पिलाजी जाधव माळव्याकडे वावरतात.

,, ऑक्टोबर १२, तिरळ्याची लढाई दयाबहादुरचा पाडाव.

स. १७३२. कोंकण, पुणें, सातारा. नोव्हेंबरांत निजामाकडे ( रो. ५५ ).

स. १७३३ चा आरंभ. बुंदेलखंडांत चिमाजी. छत्रसालाचा मृत्यु व त्याच्या प्रदेशाची वांटणी.

,, एप्रिल–डिसेंबर, जंजिरा मोहीम. गोवळकोटची लढाई जुलई ८.

,, नोव्हेंबर, बाजीराव व पिलाजी जाधव पुण्याकडे ( ६·८९ ).

स. १७३४. जंजिरामोहीम, श्यामलाशीं युद्ध चालू, सर्व वर्षभर.

,, नोव्हेंबर ४ दाभाडे बाजीरावांचें सख्य ( रो. ११० ).

स. १७३५ ता.५ फेब्रु.कुलाबा(ब्र.१३०); नोव्हेंबर, सातारा सोडून उत्तरेकडे स्वारी.

,, कर्जानें गांजणूक.

स. १७३६ ता. ५ मार्च, मुक्काम अजमीर जवळ मनोहरपुर. पावसाळा उत्तरेंतच ( अर्व्हिन ).

,, फेब्रु. ४ ते एप्रिल ३, आंग्र्यांचे दौलतीचा विभाग, चिमाजीमार्फत ?

स. १७३७ जानेवारी–जुलई दिल्लीवरची मोठी स्वारी.

,, २ जानेवारी, नर्मदापार (ब्र. ४६, १३२), एप्रिल आगरा.

,, ५ एप्रिल, झील, तलाव (ब्र. २७, पिलाजी चरित्र ऐ. च. २·७).

,, १५ एप्रिल, शाहू पंढरपुरावर–शिकारींत मारेकरी.

स. १७३७ ३ ऑगस्ट निजामाचे मुलास माळव्याची सुभेदारी (Irvine); यावरून निजामाशीं तंटा. निजामाची भेट ( ६·१०७ ).

,, डिसेंबर निजामाशीं लढाई.

स. १७३८ जानेवारी ६ भोपाळची लढाई, सिरोंजचा तह.

,, वर्ष अखेर पुणें सातारा ( ६·९५, ९६ ), चिमाजी कोंकणांत.

स. १७३९ फेब्रुवारी, वऱ्हाडांत रघूजी भोसल्याकडून आवजी कवड्याचा पाडाव.

,, मे. ता. १३ वसईचा पाडाव.

स. १७४० नासिरजंगाचा पराभव व मुंगी पैठणचा तह फेब्रुवारी २७.

,, २८ एप्रिल बाजीरावाचा मृत्यु रावेर येथें नर्मदाकांठीं.

१. **निजाम बाजीरावांचा पहिला रंग.**—निजामानें बंडखोरी करून स. १७२० च्या मे महिन्यांत नर्मदापार होऊन दिलावरअली व आलमअली यांस वेगवेगळे गाठून जून महिन्यांत पहिल्याचा व ऑगस्ट महिन्यांत दुसऱ्याचा बाळापुर येथें फडशा उडविला, हें मागें सांगितलेंच आहे. निजाम दिल्लीहून निघण्याचे सुमारास इकडे बाजीरावास पेशवाई मिळाली; कराराअन्वयें त्यास आलम अलीच्या मदतीस तावडतोब जावें लागलें. वेळ मोठी आणीबाणीची होती. सय्यदांचा पाडाव झालेला नव्हता, आणि त्यांच्याच मार्फतीनें व मदतीनें मराठ्यांचीं सर्व कारस्थानें चाललीं होतीं. तेव्हां निजामासारखा प्रबळ शत्रु दक्षिणेंत येऊन आपल्या शेजारीं रोवला जावा हें मराठ्यांस हितावह नव्हतें. त्याचा प्रतीकार करण्यासाठीं बाजीराव तावडतोब खानदेशांत गेला. बाळापुरच्या लढाईत तो स्वतः हजर असल्याचा स्पष्ट उल्लेख आढळत नाहीं, तरी रोजनिशीवरून त्याचा मुकाम त्या वेळीं बाळापुरास दिसतो. त्या लढाईत शंकराजी मल्हार निजामाचे हातीं सांपडला, आणि पुढें तो जखमांनीं लवकरच मरण पावला. खंडेराव दाभाडे व दमाजी गायकवाड हे सरदार आलमअलीच्या मदतीस होते, त्यांचे पुष्कळ लोक लढाईत पडले. दमाजी गायकवाडाचा पराक्रम ह्या प्रसंगीं व्यक्त होऊन त्या योगानें पुढें त्याच्या घराण्याचा उदय झाला.

बाळापुरची लढाई ही मराठ्यांच्या इतिहासांत क्रांतिकारक समजली जाते. ह्या लढाईंत सय्यदांस यश येऊन निजाम पडला असता, तर पुढील इतिहासाचें स्वरूप पुष्कळसें बदललें असतें. कारण निजाम ही एक व्यक्ति या अठराव्या

शतकांत मराठ्यांचा व हिंदुस्थानचा भावी इतिहास बनवीत होती. दिलावर-अलीप्रमाणेंच आलमअलीनेंही लढण्याची घाई केली. त्याचा पक्ष सबळ असूनही युद्धनिपुण व धूर्त असा सेनानायक त्याजकडे नव्हता. पण मराठ्यांचे बाजूस अनुभवी सरदार होते. शंकराजी मल्हारानें सर्व सरदारांस उत्तेजन देऊन कारस्थानातही कांही कमी केलें नाहीं; म्हणून त्याजवर निजामाची वक्र दृष्टि होती. परंतु मराठे कसे झाले तरी ह्या प्रसंगीं मदतगार म्हणून असल्यानें, त्यांस मुखत्यारीनें आपल्या मर्जीमाफक युद्धव्यवस्था करितां आला नाहीं. बाजीराव तरुण असून युद्धकलेंत त्याचें नांव अद्यापि पुढें आलें नव्हतें. चंद्रसेन जाधव वगैरे शाहूचे प्रतिस्पर्धी ह्या लढाईंत निजामाचे बाजूनें लढले.

ता. १७ एप्रिल स. १७२० रोजीं बाजीरावास पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, त्या वेळीं दिल्लीस सय्यदांच्या कारभाराची चलती असून, बाळाजी विश्वनाथानें करार करून सनदा आणिल्या, त्यांची बजावणी करावयाची एवढाच विषय मराठमंडळापुढें प्रमुख होता; आणि त्यासाठीं मे पासून सेप्टेंबर पावेतों नगर, वऱ्हाड, खानदेश वगैरे ठिकाणीं चौथाईचे वसुलासाठीं बाजीराव निजामाचे हालचालींवर लक्ष ठेवीत फिरत राहिला. दक्षिणचा कारभार निजामाकडे असून त्यानें जरी वरकरणीं बादशाही सनदा पाळण्याचें कबूल केलें, तरी मनांतून त्याचा विचार मराठ्यांस हाणून पाडण्याचाच होता. औरंगजेबाच्या कारभारांत वाढलेला हा निजाम निरनिराळ्या युक्त्यांनीं मराठ्यांस दाबांत ठेवूं पाहत होता. तथापि या वेळीं त्याचें लक्ष प्रथम दिल्लीकडे वेधलेलें होतें. ता १० जून रोजीं पांढरच्या लढाईंत दिलावरअलीचा त्यानें पाडाव केला त्याचे आदले दिवशीं साबड्या× येथें आलमअलीची व बाजीरावाची भेट झाली होती, म्हणजे सय्यदांचा हस्तक आमलअली यासच मदत करण्याचा बाजीरावाचा हेतु असावा. पुढें १० ऑगस्ट रोजीं बाळापुरच्या लढाईंत आलमअलीचा पाडाव झाल्यावर मात्र पारडें फिरलें. ह्मणून नोव्हेंबरांत नासिक पुण्यावरून बाजीराव महाराजांचे भेटीस साताऱ्यास आला. रस्त्यांत ऑक्टोबरांत बारामतीस युद्ध झाल्याचा उल्लेख आहे.[१] सय्यदांच्या तहाप्रमाणें पुणें प्रांत मोगलांनीं सोडिला, पण बारामतीच्या अधिकाऱ्यानें तो भाग सोडिला नाहीं. ह्मणून बाजीरावानें त्याजबरोबर

×१३साबान इहिदेअशरीन,औरंगाबादे जवळ प्र.उंदरगांव,भा.श. १ पे.द.ष्ट.१७

लढून त्यास घालवून दिलें, त्याचा हा उल्लेख असावा. सातान्यास याच सुमारास म्हणजे नोव्हेंबर १७२०त शाहू महाराज किल्ल्याचे खालीं माचीवर वाडा बांधून राहूं लागले. याच वेळीं कोंकणांत आंगरे व हबशी यांचेंही युद्ध लागलें होतें. ' जंजिऱ्याचा सीदी सात यानें दक्षिण कोंकणांत बहुत धामधूम केली, त्याचे पारिपत्यास चिमणाजी बल्लाळ व विठ्ठल शिवदेव विंचूरकर जाऊन लढाई करून आले.[२] कुलाबा येथील आंगऱ्यांचें ठाणें हस्तगत करण्यासाठीं त्यास इंग्रज, पोर्तुगीझ व सीदी यांनीं वेढा घातला, त्या वेळीं त्यांजवर शाहूनें पिलाजी जाधव यास रवाना केलें. ' पिलाजीनें जातींनशीं अंगेजणी करून चालोन घेतलें; तर्फेची शर्थ करून फिरंगी व इंग्रज मारून काढिला.[३] ' बाळापुरच्या लढाईनंतर निजामानें जो डाव मराठ्यांवर चालविला, त्याचाच भाग ही सीदीची उठावणी होय.

इकडे निजामालाही मराठ्यांच्या संबंधानें आपण काय धोरण स्वीकारावें याची अडचण होती. कोल्हापुरकर संभाजी व चंद्रसेन वगैरे दोस्तांशीं त्यानें आपली मैत्री दृढ केली, आणि शाहूलाही त्यानें प्रथम कळविलें कीं दिल्लीस झालेले करार आपण पाळूं; पण पुढें सय्यदांचा पाडाव झाल्याची बातमी आली तेव्हां त्याचें मन फिरलें, आणि संभाजीचा व शाहूचा तंटा आहे तोंपर्यंत पूर्वीचे करार अमलांत आणतां येत नाहात, अशी सबब तो सांगूं लागला. या वेळीं आनंदराव सुमंत याचा मुलगा महिपतराव औरंगाबाद येथें निजामाजवळ बोलणें करून चौथाई वसूल करण्यासाठीं आपले इसम ठिकठिकाणीं नेमण्याची परवानगी मागत होता. पण ती परवानगी निजाम देईना. इकडे आलमअलीचा पाडाव झाल्याबरोबर शाहूनें दिल्लीस आपल्या वकिलामार्फत बादशहाचें अभिनंदन करून पूर्वीचे तह कायम करून घेतले. त्याबद्दलचा फर्मानें दक्षिणेंत आला: तेव्हां हक्क वसूल करण्यासाठीं गंगथडीजवळ सरलष्करचे हाताखालीं कांहीं मराठी फौज जमा होऊं लागली. हे प्रकार पाहून निजामानें सुमंतास चौथाई वसूल करण्याची परवानगी दिली. औरंगजेबाच्या वेळचें युद्ध निजामानें पाहिलें असल्यामुळें, मराठ्यांशीं पुनः लढण्याचा प्रसंग आणण्याची त्याची इच्छा नव्हती. फक्त संभाजी व शाहू यांच्या मधील वैरभाव

२ शा. रो. २ व श. ३ पे. द. पृ. १९.

होईल तितका कायम ठेवून आपला डाव साधण्याचा त्याचा विचार होता. दिल्लीच्या दरबारांत आपलें वजन शाबूद राखणें व दक्षिणेंत आपला कारभार स्वतंत्र करणें, हे निजामाचे मुख्य उद्देश होते. त्यासाठीं मराठमंडळांतील दुफळी कायम ठेवून प्रसंगीं त्यांच्या मदतीची जरूर लागल्यास त्याजबद्दल संधान ठेवणें, असा उद्योग त्यानें चालू ठेविला. अर्थात् त्याचे सांगण्यावरून सन १७२० च्या अखेरीस हुकमसिंग व चंद्रसेन जाधव यांनीं शाहूचे प्रदेशावर स्वारी केली असतां सरलष्करानें त्यांचा पराभव केला.[१] या प्रसंगीं धारराव प्रभु कळंबेकर हे शिपाईगिरी बहुत करून कामास आले; तेव्हां शाहूनें धाररावाची सरदारी कनिष्ठ बंधु आपाराव यास दिली. हा धारराव पूर्वीं चंद्रसेनाचे फौजेंत असून त्याजबरोबरच शाहूस सोडून मोगलांकडे गेला होता; व नंतर तो परत येऊन शाहूस मिळाला. स. १७२०–२१ च्या डिसेंबर व जानेवारी महिन्यांत बाजीराव जुन्नरकडे असून त्या स्थळीं करीमबेगाशीं त्यानें युद्ध केल्याचा उल्लेख आहे.[२]

निजाम आतां कोणतें धोरण स्वीकारितो, याजवरच मराठ्यांच्या पुढील हालचाली अवलंबून होत्या. त्यानें बाह्यात्कारीं शाहूशीं सख्य दाखविलें. सुमंतास पैसे चारून व प्रतिनिधीची समजूत करून, त्यांचे मार्फत शाहूचा विश्वास त्यानें संपादिला. बाजीराव स्वतंत्र कृतीचा निपजेल अशी त्या वेळीं निजामाची अटकळ नव्हती. त्यानें पेडगांव जवळ चिखलठाण येथें ता. ४-१-१७२१ रोजीं निजामाची गांठ घेतली. त्यानंतर पुढें खानदेशांतून गुजराथेंत उतरून सुरत राजपिंपळ्यावरून बाजीराव पावसाचे आरंभीं पुनः निजामाचे टेहळणीवर गोदाकांठाकडे आला. निजामही आपला जम कसा बसवावा या विचारांत होता. दिल्लीस सय्यदांचा पाडाव होऊन स. १७२० च्या नोव्हेंबरांत वजिरी अमीनखानास मिळाली. परंतु अमीनखान पुढें तीन महिन्यांनीं मरण पावला, तेव्हां बादशहानें निजामास वजिरी देण्याचें ठरवून त्यास लगोलग दिल्लीस बोलाविलें त्यामुळें निजामाचें मन द्विधा झालें. वजिरीचा नाद सोडून दक्षिणेंतच राहवें; असा त्याचा मनोदय होता, परंतु वजिरी मिळाल्यास मागें पुढें दक्षिण, माळवा व गुजराथ हे तीनही प्रांत हस्तगत करून इकडे स्वतंत्र होतां येईल असें मनांत ठरवून, तो औरंगाबाद सोडून दिल्लीकडे जाण्यास निघाला. निघण्यापूर्वीं दक्षि-

---

१ शा. च. पृ. ४२. ५ खं. २. शकावलि.

णचा कारभार त्यानें मुबारीजखान नामक सरदाराचे हवालीं केला. हा मुबारीजखान निजामाप्रमाणेंच वृद्ध व अनुभवी असून औरंगजेबाजवळ दक्षिणेंत तयार झालेला होता. हा बारा वर्षे हैदराबादच्या कारभारावर होता त्यास अमानतखान व शाहमतखान असे किताब वेळोवेळीं मिळाले असल्यामुळें कागदोपत्रांत हीं तीनही नांवें व क्वचित् कंबरजखान[1] असे उल्लेख येतात. मुबारीजखान पूर्वी सय्यदांचे पक्षाचा असून निजामाचा हेवा करी. आलमअलीवर चालून जातांना निजामानें मुबारीजखानाची मदत मागितली होती, ती न देतां तो दूर तटस्थ राहिला. परंतु आलमअली पडल्यावर त्यानें प्रसंग पाहून निजामाशीं मिटतें घेतलें. तरी ते दोघेही धूर्त एकमेकांस ओळखून होते. दिल्लीच्या भानगडींत पडण्यापेक्षां दक्षिणेंतच राहून कर्नाटकसुद्धां सर्व भाग हस्तगत करावा, यांतच आपल्या कर्तव्याचें सार्थक आहे असा आग्रह या वेळीं मुबारीजखानानें निजामास केला. या पूर्वीच कर्नाटकांत आपला अंमल बसविण्याचें काम शाहूनें चालविलें होतें. शहाजीराजांपासून जिंकलेल्या या प्रांतावर मराठ्यांचा हक्क फार जुना होता. स. १७०९ तच शाहूने आपल्या फौजा तिकडे पाठविल्या होत्या[2]. हल्लीं स. १७२० त शाहूनें प्रतिनिधीस कर्नाटकांत पाठविलें, त्यास वंकापुरची स्वारी ह्मणतात. या स्वारींत कुंदगोळ येथें अब्दुल गफूर पठाणाशीं प्रतिनिधीची मोठ्या शर्थीची लढाई झाली. तींत सुभानराव पाटणकर पडल्याबद्दल त्यास इनाम दिल्याचा उल्लेख २५-२-१७२१ चा आहे.[3] मराठ्यांच्या या चढावास आतांच आळा घालावा, नाहीं तर ते पुढें अनावर होतील असा युक्तिवाद मुबारीजखानानें केला तो निजामास पटून वऱ्हाडांत फर्दापुरच्या घांटापर्यंत गेलेला निजाम परत फिरला; आणि मुबारीजखानासह त्यानें स. १७२१ च्या पावसाळ्यांत म्हैसूरपर्यंत स्वारी केली. त्याच्या पाठलागावर बाजीरावानेंही विजापुराकडे चाल करून निजामाच्या मुलखांत उच्छेद केला. मुबारीजखानानें मात्र निजामास कर्नाटकांत मुळींच साह्य केलें नाहीं. हा खानाचा कावा यावेळा नुसता मनांत ठेवून, दिल्लीहून पुनः निकडीचीं बोलावणीं आल्यावरून तिकडे जाऊनच आपला जम चांगला बसवितां येईल असें मनाशीं ठरवून, निजाम घाईघाईनें कर्नाटका-

१ ' मुबारज 'शब्द मोडींत लिहिल्याचा अपभ्रंश कंबरज असावा.

२ प्रा. म. स. पृ. १२. ३ पे. द. पृ. १७.

तून परत आला, आणि मुबारीजखानास दक्षिणचा कारभार सोंपून आपण स. १७२१ च्या ऑक्टोबर महिन्यांत औरंगाबाद सोडून निघाला, तो पुढील वर्षारंभीं दिल्लीस पोंचला. तेथें त्यास ता. २०.२.१७२२ रोजीं वजिरीचीं वस्त्रें मिळालीं.

बादशाहींतील या घडामोडींवरून बाजीरावाच्या हालचालींचें इंगित ताडिलें पाहिजे. निजामाचे उद्देश ओळखून जबाबास जबाब देण्याची तयारी बाजीराव करीत होता. मिळालेल्या सनदांच्या जोरावर मुलूखगिरीचा उद्योग एकदम चहूंकडे फैलावण्याची त्याची हाव होती. कर्नाटकाकडे निजाम आपणास अडवितो, माळवा गुजराथकडेही तो आपणास संचार करूं देत नाहीं, हें बाजीरावाचे प्रत्ययास येत होतें. त्यांत आतां वजिरी मिळाल्यामुळें वाटेल तो डाव सिद्धीस नेण्याचें सामर्थ्य निजामास आलें. हे प्रकार ओळखून बाजीरावास पुढील कार्यक्रम ठरवावयाचा होता.

स. १७२५त मुबारीजखानास दक्षिणचा कारभार मिळतांच त्यानें मराठ्यांशी एकदम निकराचें धोरण आरंभिलें. सय्यदांनीं केलेले करार आपण पाळीत नाहीं आणि चौथाईचा वसूल देत नाहीं असें त्यानें साफ कळविलें, आणि मराठ्यांशीं शक्य तितकें लढून व चंद्रसेन वगैरेंच्या मदतीनें त्यांच्यांत फूट पाडून, त्यांस हरविण्याचा उद्योग त्यानें आरंभिला. आनंदराव सुमंत शाहूचे बाजूनें तिकडील कारस्थानें चालवीत होता. त्याजकडून मुबारीजखानाचा उद्देश वरप्रमाणें व्यक्त होतांच बाजीरावानें एकदम त्यास प्रतिजबाब देण्याचें ठरवून, माळवा व गुजराथ वगैरे ठिकाणीं आपल्या हस्तकांमार्फत एकदम उठावणी केली. आपण होऊन मुबारीजखानानें करार मोडिला हें एका अर्थी त्याचे पथ्यावरच पडलें. करार पाळून जी प्राप्ति मोगलाईतून व्हावयाची त्यापेक्षां किती तरी ज्यास्त रकमा गंगथड, खानदेश, माळवा, गुजराथ, या प्रांतांतून मराठ्यांनीं उपटल्या.

हें चढाईचें धोरण शाहूच्या दरबारांत पसंत पडलें नसावें. प्रतिनिधि व बाजीराव यांचा या धोरणासंबंधानें कडाक्याचा वाद झाल्याचें बखरींत वर्णन आहे, तो वाद बहुधा या वेळचा म्हणजे स. १७२१–२२ चा असला पाहिजे. या सालांत बाजीराव बराचसा सातारा अगर त्याचे जवळपास होता. बादशाहीवर युद्ध पुकारणें शाहूस संमत नव्हतें, आणि बाजीरावाच्या उपक्रमानें नवीन संकटें

उत्पन्न होऊन, नुकता बसत चाललेला राज्याचा जम बिघडेल, अशी भीति शाहू व त्याचे सल्लागार यांस पडून, त्यांनीं बाजीरावाचा निषेध केला. शाहू लिहितो, 'तुम्ही विनंतिपत्र पाठविलें तें प्रविष्ट जाहलें. कित्येक निष्टेचे अर्थ लिहिले, ऐशास, कितेक अर्थ समक्ष बोलावे म्हणोन तुम्हांसच हुजूर येण्याची आज्ञा करून वरचेवर पत्रें सादर जालीं असतां, अद्याप येण्याचा विचार दिसत नाहीं. यावरून काय म्हणावें ! निष्टेचें निदर्शन स्वामींस यावें म्हणोन तुम्हांस वारंवार लिहिलें व भेटीसही येण्याची आज्ञा केली असतां, आळस होऊन दिवस घालवितां. ये गोष्टीचा विचार तुम्हांजवळच असावा. तुम्हींच उद्योग केलीया अगाध नाहीं परंतु हेंगेनें घडत नाहीं. दुसरें, स्वामिसान्निध उभयपक्षींचें कल राखून चालण्यास एक चांगला योजावा म्हणोन लिहिलें,त्याचाही विचार तुम्हींच करावयाचा तोही न घडला. यामुळें कितेक राज्यभारसंबंधी कार्यें तटलीं. तुमचेही प्रत्ययास येऊन, त्याचीं उत्तरें प्रत्युत्तरें तुम्हीच करितां त्याची विस्मृति. तेव्हां तुमचे लक्षांत हे गोष्ट नाहींसें वाटतें. हे कच कष्टे वरचेवर लिहून तुम्हांस जागृत करण्याविषयीं स्वामीस आळस नाहीं. तुम्ही आज कराल, उद्यां कराल म्हणोन कालहरणही हुजुरून होत नव्हतें. प्रत्यय तुम्हांस नाहीं. असें असोन नबाबाकडीलही बोलणीं पडलीं, याजकरितां सुचविलीं. तथापि तुह्मी कळकळ धरून राज्यभार-संरक्षणार्थ सावधता करावयाची हें सदैव पत्रीं किती लिहावें ! यास्तव एक वेळ तुह्मी येऊन समजोन घेऊन करावें. हें आळस असतां घडत नाहीं, हेंच आश्चर्य करितों. असो.कांहीं दिवस एक वेळ समक्ष आल्या व्यतिरिक्त कोणतेंही कर्तव्य स्वामींस नाहीं. पुढें तुम्हांपासोन घडतच नाहीं असा निश्चय जालीया, स्वामींस विचार करणें प्राप्त येईल. तो दिवस अवघड वाटेल, मग धावा-धाव करूं लागाल, म्हणोन वारंवार सुचवितों. तुमचे वडिलांनीं निष्टा धरून चालल्या अकल्याण जालें न जालें हें तुह्मीच चित्तांत आणावें. जाणिजे.' (खं ३.१६.)

या कागदावर शक १६४४ घातलेला बरोबर असेल तर या वेळा शाहूचे दरबारांत दोन पक्ष होऊन बाजीराव शाहूस न जुमानतां परभारें स्वतंत्र उद्योग करीत होता; आणि हा लढा निजामाकडील व्यवहारांसंबंधानें होता ही गोष्ट निर्विवाद आहे. अर्थात् पुढें उल्लेख करावयाचा बाजीराव प्रतिनिधींचा वाद या सन १७२२ चा असला पाहिजे.

सय्यदांचा पाडाव झाल्यावर बादशहानें हैदरकुलीखान यास गुजराथचा सुभेदार नेमून तेथें काम करणारा मारवाडचा राजा अजितसिंग यास दूर केलें. हैदर कुलीखान बादशहाचे विशेष मर्जीतला असून वजिरी सुद्धां निजामास न देतां यासच द्यावी असा त्याचा विचार होता. परंतु अनेकांच्या भिडेस्तव निजामास वजिरी देण्यांत आली, तेव्हां हैदर कुलीखान गुजराथेंत जाऊन स. १७२२ च्या मे महिन्यांत कामावर दाखल झाला. तेथें अजितसिंगानें त्याचा जम बसूं दिला नाहीं. इकडे गुजराथ प्रांत आपल्याकडे असावा अशी तीव्र आकांक्षा निजामाची होती, तेव्हां त्या संबंधानें बादशहाचें मन वळवून निजामानें ता. २४.१०. १७२२ रोजीं हैदरकुलीस काढविलें; आणि गुजराथचा सुभा आपल्या नांवानें करून घेऊन लगेच निजाम तिकडे जाण्यासाठीं दिल्ली सोडून निघाला, तो स. १७२३ च्या जानेवारींत माळव्यांत सारंगपुर येथें आला. फेब्रुवारींत त्याचा मुक्काम धार येथें होता. इकडे हैदरकुलीचा कांहीं एक इलाज न चालतां त्यानें दिल्लीकडे पलायन केलें. त्यास पकडण्याच्या वगैरे भानगडींत निजाम पडला नाहीं. तो या वेळीं आपला पुढील जम मोठ्या धूर्ततेनें बसवीत होता. याची कडक शिस्त बादशहास न आवडून उभयतांचें कधींच बनलें नाहीं. हैदरकुली मुकाट्यानें निघून गेल्यानें गुजराथ प्रांत सहज निजामाचे हस्तगत झाला. तेथच्या कारभारावर त्यानें आपल्या तर्फेनें हमीदखान यास नेमिलें. याच संधींत बाजीराव व निजाम यांची भेट सन १७२३ त ता. १९ फेब्रुवारी पासून ४ मार्च पावेतों झाबवा नजीक झाल्याचा उल्लेख आहे. गुजराथेंत उतरण्यासाठीं निजाम झालोदपर्यंत गेला होता, तो परत माळव्यांत आला. तेथें दोन महिने मुक्काम करून माळव्याच्या सुभेगिरीवर त्यानें आपल्या तर्फेचा अजीमुल्लाखान यास नेमिलें; आणि तेथील सर्व व्यवस्था लावून निजाम परत गेला, तो २०.७.१७२३ रोजीं दिल्लीस पोंचला.

वरील भेटींत निजाम–बाजीरावाचा विशेष कांहीं निष्कर्ष ठरला असें दिसत नाहीं. दोघेही उघड वर्दळीस न येतां आपले अतंस्थ हेतु लपवीत होते. गुजराथ, दक्षिण, व माळवा हे तीनही प्रांत निजामानें हस्तगत करावे हें बाजीरावास मुळींच पटलें नाहीं. उलट गुजराथ व माळवा येथें आपला जम बसवून, तिकडून, व खालून कर्नाटकांतून, निजामास दक्षिणेंतच चेपावें, असा बाजीरावाचा

उद्देश दिसतो. या चढाओढींत निजामास जशी बादशहाची आडकाठी तशीच बाजीरावासही शाहूची होती. मुबारीजखान, निजाम वगैरेशीं स्वतःच वाटाघाटी करून बाजीराव मोठमोठीं कामें मुखत्यारीनें उलगडूं लागला हें शाहूच्या दरबारांत वावरणाऱ्या प्रतिनिधि, सुमंत वगैरे मंडळीस पसंत पडलें नाहीं. पिलाजी जाधवही शाहूचे तर्फेनें मोगलाईंत वावरत असून, त्यास निजामाकडून इनामही मिळालें होतें. यावरून विरुद्ध पक्षास त्याची मदत असावी असें अनुमान होतें. राज्याचीं कामें शाहूच्याच आज्ञेनें चाललीं पाहिजेत, बाजीराव पोरपणानें कांहीं तरी बिघाड करून घेईल, अशी भावना होती. (खं. ६·२०ता.५-५-२३.)

शा.रो. ३च्या पत्रांत 'निजामुल्मुल्क कडप्यावरी गेले,पुढें अर्काट पावेतों जाणार म्हणून वर्तमान आलें आहे. पुढें त्रिचनापल्लीशीं खवडळी करितील. तें महास्थळ, सबब तेथील बंदोबस्तास फत्तेसिंग भोसले यांनीं मुरारराव घोरपडे यास ठेविलें आहे. त्यांची कुमक करणें स्वामीस अत्यावश्यक तरी नवाबाचें आगमन झालेंच तरी टक्कर देणें.' अशी आज्ञा शाहूनें १८-९-१७२२ रोजीं कित्येक सरदारांस केली. त्रिचनापल्लीकडे उपद्रव करण्याचा हा खटाटोप शा. रो. ७३ A च्या आधारें सन १७४३ चा असावा. पत्राची तारीख चुकली आहे. मुरारराव त्या वेळीं प्रसिद्ध नव्हता व स.१७२२त निजाम दिल्लीकडे असून तो कडप्याकडे गेला असण्याचा संभवच नाहीं. ऐवजखान म्हणून दुसरा एक हुशार सरदार निजामाचा पक्षपाती या वेळीं मुबारीजखानाचे हाताखालीं होता. त्याची व बाजीरावाची भेट तारीख ५-१२-१७२२ रोजीं झाल्याचा उल्लेख आहे. म्हणजे बाजीरावाचें लक्ष या वेळा बादशाही अमलदारांच्या हालचालींवर असून, पूर्वीच्या करारांस अनुसरून राज्याचा फैलाव करण्याचा उद्योग त्यानें हातीं घेतला होता. स. १७२२ च्या जुलई ते सेप्टेंबर पावेतों बाजीरावाचा मुक्काम साताऱ्यास असून, त्यापुढें तो गंगातीरीं व औरंगाबादेकडे फिरत होता.

**३. साखरखेडर्याची लढाई, निजामशाहीची स्थापना.—** स. १७२३ चे मे महिन्यांत निजाम दिल्लीस वजिरीवर दाखल झाला, तेव्हां पासून उत्तरोत्तर त्याचें बादशहाशीं वितुष्टच वाढत गेलें. इकडे बाजीरावानें या वेळीं माळवा व गुजराथ येथें चढाई सुरू केली. सन १७२३ त गुजराथेंत चौथाईची स्वारी झाल्याचा उल्लेख आहे. मराठ्यांची ही चढाई एकदम अट-

कावली पाहिजे असें निमित्त सांगून, निजामुल्मुल्क मुलगा गाजीउद्दीन यास आपल्या तर्फे वजिरीवर ठेवून, दिल्लीहून स. १७२४ च्या आरंभीं माळव्यांत आला; आणि तेथून सर्व व्यवस्था लावीत जुलई महिन्यांत औरंगाबादेस पोंचला. अशा प्रकारें बादशहास न जुमानतां निजाम स्वतंत्रतेनें वागूं लागल्यानें सय्यदांच्या वेळचीच आणिबाणीची वेळ पुनरपि दिल्लींत उपस्थित झाली. तेव्हां बादशहानें मुबारीजखानास दक्षिणच्या सुभेगिरीवर नेमून, निजामाशीं लढून त्याचा पाडाव करण्याचा हुकूम पाठविला. ऐवजखान वगैरे मुसलमान सरदारांस व शाहूराजे, रावरंभा वगैरे मराठे मंडळीस मुबारीजखानाचें साह्य करण्याविषयीं बादशहानें फर्मानें पाठविला, आणि पैशाची व फौजेची मदतही पाठविली. नंतर दिल्ली येथें बादशहानें ता. २२-७-१७२४ रोजीं गाजीउद्दीनास दूर करून त्याचे जागीं कमरुद्दीनखानास वजीर नेमिलें. याप्रमाणें इकडे निजाम व मुबारीजखान यांचा झगडा चालू झाला.

बादशाही कारभारांतील हा अनिश्चितपणा सर्व देशास कसा भोवूं लागला याची कल्पना करितां येईल. बाजीरावास पेशवाई मिळाल्यापासून हा अनिश्चितपणा हळूहळू वाढतच गेला; आणि स. १७२३ पासून तर त्यास एक प्रकारें निकराचें स्वरूप येऊं लागलें. बाजीराव जात्या शूर व तडफदार होता, म्हणूनच अशा परिस्थितीचा फायदा त्यानें शक्य तितला करून घेतला. स. १७२३त मुबारीजखानानें महाराष्ट्रांत जोराची खळबळ उठविली. त्याचा हस्तक चंद्रसेन जाधव भेदनीति चांगल्या रीतीनें जाणत होता; शक्य तितका विरोध करून तो शाहूचा कारभार अडवीत होता. 'संताजी पांढरे यांनीं चंद्रसेनाशीं युद्ध केलें, युद्धामध्यें पांढरे पडले. सबब गनीमास नतीजा पोंचविण्यासाठीं आपापल्या फौजा घेऊन येण्याविषयीं शाहूनें आपल्या सरदारांस हुकूम पाठविले.' म्हणजे उत्तरेंत निजामास भेटून बाजीराव राजकारण झुलवीत असतां, इकडे दक्षिणेंत मुबारीजखान व शाहू यांचा वैरभाव वाढत गेला. शाहूच्या फौजा जमा झाल्या. बाजीरावही या अडचणींत ऑगस्ट १७२३ पासून मार्च १७२४ पर्यंत साताऱ्याचे बाजूसच प्रसंग येईल त्याप्रमाणें वागण्यास सिद्ध राहिला. शाहूचा कल जात्याच लढण्याचे विरुद्ध असून, तडजोडीनें कामें उरकण्याकडे होता. 'भागानगरकर मोगल फौज तोलदार व सामान पुरा आहे. त्यांशीं उतावीळ करून गांठी

न घालणें. कान्होजी भोसले यास सामील करून घेणें. बाजीराव व सर लष्कर यांसही तुह्मांकडे रवाना करीत आहों. भारी तोलदार फौज करून भागानगर प्रांतीं जाणें. ' असें जानेवारी, फेब्रुवारी मासांत शाहूनें खंडेराव दाभाडे, फत्तेसिंग भोसले व चिमणाजी दामोदर राजाज्ञा यांस कळविलें; आणि आंतून आनंदराव रघुनाथ सुमंत याजकडून ऐवजखानामार्फत तडजोड चालविली. या बाबतींत खंडेराव हुकुमाप्रमाणें वर्तत नव्हता, ह्मणून शाहूनें त्यास ठपका दिला आहे. " आनंदराव सुमंत यांस नबाब ऐवजखानाकडे नाजूक कामास पाठविले आहेत, " असें शाहू २७-३-१७२४ रोजीं व त्यानंतर लगेच ' गनीम या प्रांतें आला, त्यास नतीजा पोंचवून आपले स्थलास गेलों,' असें शाहू लिहितो. हा गनीम मुबारीजखान किंवा त्याचा कोणी हस्तक समजला पाहिजे.[१]

मुबारीजखान व शाहू यांचा हा वैरभाव चालू असतां, निजाम औरंगाबादेस येऊन पोंचला, त्याबरोबर त्याचें मुबारीजखानाशीं युद्ध जुंपलें. दोघेही जहांबाज व धूर्त होते. दोघांनींही मराठ्यांकडे मदतीची याचना केली. विचार करण्यास अवधि फारच अल्प होता. दोघांचीं बलाबलें समसमान होतीं. जय येणार कोणास याचा अंदाज बांधतां येण्याजोगा नव्हता. मात्र एकाच पक्षास जवळ केल्यास आणि त्याचा पुढें पाडाव झाल्यास विजयी पक्षाकडून आपला पुरेपूर वचपा निघेल अशी खात्री असल्यामुळ, ' तुह्मीं फौजेची सिद्धता करून तयार असणें. निजाम व शहामतखान यांनीं युद्ध आरंभिलें आहे, त्यांत तुह्मी कोणाकडेही न जाणें,' असे हुकूम २९-७-१७२४ रोजीं शाहूनें आपल्या सैनिकांस सोडिले. दोघांसही सरदारांनीं मदतीचीं वचनें भरपूर दिलीं होतीं. दोघेही आपली तयारी करून एकमेकांवर चालून आले. मे महिन्यांत निजामाचा मुक्काम बऱ्हाणपुरावर असून तेथून औरंगाबाद कबजांत घेण्याच्या इरादानें तो दक्षिणेकडे येऊं लागला. औरंगाबादेनजीक मुबारीजखानाचा हस्तक ऐवजखान बंदोबस्तास असून तो तें ठिकाण निजामाचे हातीं जाऊं देणार नाहीं अशा समजुतीनें, मुबारीजखान हैदराबादेहून निघून पश्चिम बाजूस औरंगाबादेकडे न जातां, पूर्व दिशेनेंच निजामास अडविण्यासाठीं पुढें गेला. दरम्यान निजामानें पश्चिम बाजूनें खालीं येऊन, ऐवजखानास सामील करून ता. १९ जून स. १७२४ रोजीं

---

१ शा. रो. ९ (२८-७-१७२३), ४, ६, ५ (१७-३-१७२४.) व ८.

औरंगाबादचा ताबा घेतला. स्वतः औरंगाबादेस जाणें मुबारीजखानास अशक्य नव्हतें. परंतु हें ठिकाण हातचें गेल्यामुळें त्याचा पाया बराच लंगडा झाला, आणि निजामास आपली जमवाजमव करण्यास अवधि मिळाला. ' आपसांत लढणें चांगलें नाहीं; बादशहाचे हुकूम निरर्थक आहेत. माझी नेमणूक दुसरे कोठें झाल्याबरोबर मी दक्षिण सोडून जाईन, परंतु आतांच मला तसें करतां येत नाहीं, ' इत्यादि अनेक हितवाद निजामानें मुबारीजखानास लिहून कळविले, परंतु ते त्यानें जुमानले नाहीत. त्यास आतां बराच त्वेष चढला असून एकदांचा लढाईनें सोक्षमोक्ष करून घ्यावयाचा त्यानें निश्चय केला. कान्होजी भोसल्यास कांहीं रक्कम चारून त्याची मदत घ्यावी, अशी सल्ला खानास त्याचे स्नेह्यांनीं दिली, पण ती त्यानें मानिली नाहीं. इकडे निजामानें आपली तयारी करून, मुबारीजखानास दिल्लीहून मदत येत होती ती पोंचण्यापूर्वींच त्यास गांठणें श्रेयस्कर असें ठरविलें. तसेंच बाजीराव व दुसरे मराठे सरदारांस बरोबर घेऊन ता. ३–९–१७२४ रोजीं निजामानें औरंगाबादेहून परत कुच केलें. उभयतांचीं गांठ पूर्वेस सुमारें ५० मैलांवर पूर्णेच्या काठीं साखरखेर्डा येथें पडली. या ठिकाणीं ता. ९–९–१७२४ रोजीं निकराची लढाई होऊन मुबारीजखान व त्याचे दोन मुलगे मारले गेले, व १७ हत्ती पाडाव झाले. निजामानें खानाचें शिर कापून दिल्लीस बादशहाकडे पाठविलें आणि लिहिलें, कीं " स्वामीच्या दैवयोगानें आम्हीं हा बंडवाला मारिला. "* साखरखेर्डा या गांवाचें नांव निजामानें बदलून फत्तेखेर्डा असें ठेविलें तेंच हल्लीं चालतें. हें गांव जिल्हा बुलढाणा, ता. मेहकर यांत आहे. या लढाईंत बाजीराव निजामाचें साह्य.

* श० पृ. ४९–५०. २ आर्व्हिन पृ. १४८. जाधवांचे बखरींत जगदेवाचा मुलगा राघोजीराव मारला गेला असें आहे. या राघोजीस राजाराम छत्रपतीची मुलगी अंबिकाबाई दिलेली होती. राघोजी पडल्यावर त्याची बायको, आई व मुलें यांस शाहूनें सातार्‍यास आणून सांभाळिलें. राघोजीचा मुलगा मानसिंग ऊर्फ बाबाजी हा पुष्कळ वर्षें सातार्‍यास ताराबाईजवळ असे. शाहूचे पश्चात् पेशव्यांशीं त्यानें बराच विरोध केला. ( काळेकृत वर्‍हाडचा इ. पृ. ३३१. ) शा. रो १७ येथें निळकंठराव जाधव यास निजामानें कैदेंत ठेवल्याचा उल्लेख आहे, तो निलंकठराव कोण ? राघोजीचाच मुलगा कीं काय ?

करण्यास हजर होता, परंतु शाहूच्या हुकुमानें तटस्थ राहून मराठ्यांपैकीं कोणींच लढाईंत भाग घेतलेला दिसत नाहीं. बाजीरावाचे तैनातीस निजामानें आपल्या भरंवशाचा सरदार तुरुक ताजखान यास नेमिलें होतें. मुबारीजखानाचा एक सरदार जगदेकराव जाधव या लढाईत पडल्याचा उल्लेख आहे. तसेंच अमानतखानाचे युद्धीं पेशव्याकडील बाबाखान ठार झाला त्याचे मुलास पेशव्यांनीं इनाम दिलेलें आहे. (पे. द. पृ. २०).

साखरखेडर्याची लढाई निजामाचे स्वातंत्र्याचा आरंभ होय. रणभूमीवर मेलेल्या मंडळांस मूठमाती देऊन निजाम लढाईनंतर तीन चार दिवसांनीं औरंगाबादेस आला, तेथें बाजीरावाची व त्याची भेट झाली. नंतर निजाम दक्षिणेकडे जाण्यास निघाला तो जानेवारी १७२५ त हैदराबादेस पोंचला. तिकडे त्याचा जम बसण्यास बराच काळ लागला. मुबारीजखानाचे मंडळीस व साथीदारांस अत्यंत सौम्यपणानें वागवून निजामानें आपले बाजूस वळविलें. अन्वरुद्दीनखान म्हणून एक हुशार गृहस्थ निजामाचे माहितीचा त्याच वेळीं दिल्लीहून दक्षिणेंत आला, त्यास निजामानें हैदराबादच्या कारभारावर नेमिलें; तसेंच बादशाहास समाधानीचें पत्र लिहून सगळी हकीकत कळविली. त्यावरून बादशहानें त्यास सर्व अपराध माफ करून दक्षिणच्या कारभारावर निजामाची ता. २०-६-१७२५ रोजीं कायम नेमणूक केली; आणि माळवा व गुजराथ हे प्रांत त्याजकडून काढून घेतले. एवंच १७२५ च्या अखेरीपावेतों दाक्षिणेंत कायमचें धोरण स्वीकारण्यास निजामास फुरसतच आली नाहीं. स. १७२५ च्या अखेरीस बाजीरावाचा मुक्काम नर्मदेपलीकडेस छोटा उदेपुरचे बाजूस होता.

यावरून बाजीरावाच्या पेशवेगिरीचीं पहिलीं पांच वर्षे बादशाहींतील धामधुमीमुळें कशीं अनिश्चित स्थितींत गेलीं हें लक्षांत येईल. यामुळें मराठमंडळास कोणतेंही एक धोरण कायमचें स्वीकारितां येईना. त्यांचा पहिला उपक्रम दक्षिण सोडविण्याचा असून त्यास मोगल सुभेदारांकडून अडथळा येऊं लागला, तेव्हां त्यांस पायबंद देण्याकरितां माळव्यांत उतरून बाजीरावानें मोगल सुभेदाराचा पाया तोडण्याचा उपक्रम चालविला. निजाम दक्षिणेंत कायम झाला नसता तर बाजीरावास कदाचित् ज्यास्त यश आलें असतें. निजामाचे डावपेंच बाजीरावच चांगल्या रीतीनें ओळखून होता.

बाजीरावास पेशवाई मिळाल्यापासून निजामाशीं त्याचे संबंध कसे राहिले हें दाखविण्यासाठीं आपली मजल स. १७२५ पर्यंत गेली. सय्यदांचे मार्फत बाळाजी विश्वनाथ व शंकराजी मल्हार यांनीं जी कमाई केली, ती सय्यदांच्या पाडावानंतर टिकली नाहीं. म्हणून बाजीरावास पुनः सर्व उपक्रम नवीनच करावा लागला. चंद्रसेन जाधव व संभाजी निजामास अनुकूळ असल्यामुळें शाहूची परिस्थिति बिकट होऊन, त्याचें निरसन बाजीरावाचे हातून एकदम न झाल्यामुळें शाहूचाही त्याजवर विश्वास बसला नाहीं. स. १७२७–२८ पावेतोंचा बाजीरावाच्या कारभाराचा पहिला काळ असाच घरसोडींत फुकट गेलेला दिसतो. मुत्सद्दी मंडळांत त्याचें वजन नव्हतें. वयानें व अनुभवानें श्रीनिवासराव प्रतिनिधि वरचढ मानला जात असून त्याजवरच शाहूची मर्जी ज्यास्त होती. श्रीनिवासरावाचें वय त्या वेळीं सुमारें ३५ वर्षांचें म्हणजे शाहूच्या बरोबरीचें होतें. संभाजीकडेही प्रतिनिधीचा वशिला होता, तसा बाजीरावाचा नव्हता. अशा स्थितीत शाहूच्या पक्षानें निजामाशीं व बादशहाशीं कोणतें धोरण स्वीकारावें या संबंधानें मोठा प्रश्न उपस्थित होऊन, प्रतिनिधि व बाजीराव यांचा शाहूच्या दरबारीं कडाक्याचा वाद झाल्याची आख्यायिका प्रसिद्ध आहे.

८. **बाजीरावाची चढाई, प्रतिनिधीशीं वाद.**—मराठशाहीच्या प्रधानकीचीं सूत्रें हातीं घेतल्यावर थोड्याच काळांत राज्यव्यवस्थेंतलि दोष बाजीरावाच्या नजरेस आल्याशिवाय राहिले नाहींत. बाजीरावाचे अंगीं हिंमत होती, पराक्रम होता, तारुण्याची व तडकाफडकीची उरक होती. शिवाय स्वतःच्या खात्रीचे असे कित्येक अप्रतिम मदतनीस त्यानें पैदा केले होते. ही त्याची तरुण मंडळी वीसपंचविसांचे आंतली होती. प्रत्यक्ष शाहू बाजीरावाहून सोळा वर्षांनीं मोठा होता. खंडो बल्लाळ, श्रीनिवासराव प्रतिनिधि, आनंदराव सुमंत, खंडेराव दाभाडे, फत्तेसिंग व कान्होजी भोसले, अंबूराव अमात्य, चिमणाजी दामोदर, पंताजी शिवदेव, कान्होजी आंग्रे, नारोराम मंत्री, इत्यादि दरबारांतील प्रमुख मंडळी[1] वयानें व अनुभवानें बाजीरावाहून वरचढ होती. बाजीरावास ते पोर समजत. त्यांतही बाजीरावाचा स्वभाव थोडासा उद्दाम असल्यानें आणि वर्ष दीड वर्षांत त्याच्या पराक्रमाची छाप बसत चालल्यानें त्याज-

---

१ स. १७२२ तील शाहूच्या दरबारांतील प्रमुख व्यक्ती खं.२० पृ. ५३ वर पहा.

बद्दल या पोक्त मंडळीस वैषम्य वाटूं लागलें. करामत व तारुण्य यांचें बहुधा साहचर्य असतें आणि त्याजबद्दल जुन्या मंडळीस हेवा वाटणें साहजिक असून राज्यकारभारांत तें व्यंग गणलें जातें. यामुळें आरंभीं कांहीं वर्षे बाजीरावाचे हात सर्वस्वी आंखडून गेले. त्याच्या पराक्रमाची शाहूला खात्री पटण्यासही कांहीं काळ लागला. शाहूला जागेवरून न हालतां कारभार हाकावयाचा होता. बादशहाचे जनानखान्यांत ऐन तारुण्याचे दिवस गेल्यानें शाहूचा स्वभाव कांहींसा आरामप्रिय बनला होता. तशांत त्यास बाहेर पडण्याची कोणीं सल्ला दिली असती तर ती त्यानें स्वीकारली नसती असें नाहीं. परंतु 'आह्मी सर्व सरदार असतां आपण आयास काय ह्मणून करावे! प्रत्यक्ष दिल्लीच्या बादशहाशीं लढण्याचा प्रसंग येईल तेव्हांच आपण त्याचे सामन्यास जाणें योग्य–,' अशा प्रकारचे आपापल्या स्वभावानुरूप निःसत्त्व कोटिक्रम लढवून, बाजीरावाचे वयस्क प्रतिपक्षी शाहूस बाहेर पडण्यापासून निवृत्त करीत. यामुळें बाहेरच्या ज्या प्रांतांत शाहूचे सरदार उद्योग करीत तेथील परिस्थिति, त्यांच्या अडचणी, किंबहुना तेथील भूगोलिक रचना यांची यत्किंचित् माहिती नसतां, केवळ सत्तेच्या जोरावर शाहूला जाग्यावर बसून हरएक बाबतीचे हुकूम सोडावे लागत. ते हुकूम शेंकडों कोसांवर कालांतरानें पोंचून परिस्थित्यनुरूप अनेक कारणांनीं अमलांत न आल्यास, त्यामुळें आज्ञाभंगाचा दोष सरदारांवर येई. बाजीरावाचा उद्योग तीव्र वेगानें प्रगट होतांच वर सांगितलेली कित्येक वयोवृद्ध मंडळी शाहूपाशीं साताऱ्यास बसून, नाहीं नाहीं ते कुतर्क काढून, बाजीरावाविरुद्ध शाहूचें मन कलुषित करीत. 'हा प्रसंगीं आपणांसही दगा देण्यास चुकणार नाहीं, ह्यास मोकळा सोडणें घातक आहे,' असें ते शाहूच्या मनांत भरवीत प्रतिनिधीचा तर हा डाव बराच चालू असून पुढें फत्तेसिंग व रघूजी भोसले त्यास सामील झाले. ह्या त्रिकूटाशीं बाजीरावास झगडावें लागलें आणि वीस वर्षांच्या त्याच्या कारभारांत हा झगडा संपला नाहीं.

बाजीरावाची दुसरी अडचण अशी होती, कीं राज्यभाराची, वसुलाची व फौजेची जी व्यवस्था बापानें ठरविली होती, तीच त्यास पुढें चालवावयाची होती. मोहीम ठरवावयाची व हुकूम द्यावयाचे शाहूनें, ते अमलांत आणण्यास लागणारी फौज निरानिराळ्या सरदारांच्या हातांत, आणि त्या फौजेचा खर्च परभारें बाहे-

रच्या वसुलींतून भागवावयाचा, अशी ही बहुमुखी व्यवस्था बाजीरावाला फारच जाचक झाली. पराक्रमी पुरुषाचे हात नेहमीं मोकळे असावे लागतात. क्लाइव्ह, वेलस्ली इत्यादि पुरुषांना मोकळा हात सांपडला, अगर वरिष्ठांच्या अवज्ञेनेंही त्यांनीं स्वैर कारभार केला, ह्मणूनच इंग्रजी राज्याची हिंदुस्थानांत वृद्धि झाली. मोहिमेवर असतांना ज्या अडचणी किंवा जे विशिष्ट प्रश्न उद्भवत, त्यांचा निकाल स्वतःच्या हुकमतीनें बाजीरास करतां येत नसे. कित्येक प्रसंगीं हातां· तील महत्त्वाचें काम अपुरें सोडून, वेळीं बिघडवूनही, कामगिरीचा झाडा देण्या-करितां बाजीरावास ताबडतोब साताऱ्यास यावें लागे. तेथें प्रतिपक्ष्यांनीं जाग्या-वर बसून रचिलेल्या व्यूहांचें निरसन करून शाहूची समजूत घालणें हें नेहमींच मोठें महत्त्वाचें काम होतें. स्वतः शाहू समजूतदार असून, तसाच प्रसंग आल्या-शिवाय तो बाजीरावास अडवीत नसे. परंतु पूर्वीची अष्टप्रधानमंडळाची रचनाच प्रस्तुतच्या उद्योगास नडणारी होती. कारण कामाची जबाबदारी अंगावर न घेतां नुसती आडकाठी घालण्याची शक्ति मात्र आतां प्रधानमंडळांत राहिली होती. त्याचा पूर्वीचा जोम राहिला नव्हता. वास्तविक शिवाजीच्या मृत्यूनंतर अष्टप्रधानांची ही संस्था कर्तृत्वाच्या संबंधानें बहुतेक बंद पडल्या सारखीच होती. ज्याच्या अंगीं पराक्रम तोच वरचढ होऊन सूत्रें चालवी. मात्र त्या सूत्र-चालकास आडकाठी घालण्याइतकी तिची ताकद अद्यापि कायम होती. अशा प्रकारच्या अडचणींशीं बाजीरावास तोंड द्यावें लागलें.

औरंगजेबाच्या अखेरीपर्यंत मराठ्यांचें युद्धधोरण बहुधा बचावाचें होतें. बचावासाठीं चढावाचीच जरूर आहे असें बाळाजी विश्वनाथानें ठरविलें, आणि तेंच धोरण बाजीरावानें पुढे चालविलें. किंबहुना बाजीराव अशा युद्धनीतीचा पहिला पुरस्कर्ता असून त्यांतच हिंदुपदपातशाहीचें बीज आहे. निजाम दिल्ली-कडे गुंतला असतां स. १७२२–२४ पावेतोंच्या तीन वर्षांत बाजीरावानें दक्षिणेंत चौथाई सरदेशमुखीचा अंमल सुरळीत बसवून बरीच व्यवस्था लाविली. त्याच वेळीं दक्षिणेंत मोगलांचा येण्याचा मार्ग माळव्यांतून होता, हें ध्यानांत घेऊन निजामास दक्षिणेंत येऊं देऊन आपल्याच प्रदेशांत त्याजबरोबर झगडण्यापेक्षां आपण होऊन नर्मदेपलीकडे माळव्यांत जाऊन त्यास अटकाव केल्याशिवाय, दक्षिणचा बंदोबस्त होणार नाहीं; सर्व हिंदुस्थानावर शह ठेवण्यास व हिंदुपद-

पातशाहीचा शिवाजीचा उपक्रम सिद्धीस नेण्यास, माळवा प्रांत हाच आपल्या उद्योगाचा मुख्य पाया केला पाहिजे,अशी बाजीरावाची बालंबाल खात्री होऊन, तो व चिमाजीआपा यांनी शिंदे होळकरांस माळव्यांत पाठवून अल्पावकाशांत तो प्रांत पादाक्रान्त करून, निजामाचा बादशाहीशीं असलेला पाया तोडिला. माळव्यांतूनच त्यांनीं व त्यांच्या हस्तकांनीं दिल्लीदरबारांतील व रजपुतांच्या कारस्थानांवर आपला शह बसविला. ही चढावाची युद्धकला, ज्यास इंग्रजींत uigorous offensive म्हणतात, ती स्वीकारल्यामुळेंच बाजीरावास इतिहासांत मोठें स्थान मिळालें आहे.

शत्रूच्या मुलखांत युद्ध चालवून त्यास हैराण करावयाचें, आपल्या प्रदेशांत येण्यास त्यास अवकाश द्यावयाचा नाहीं, असा बाजीरावानें निश्चय केला. परंतु त्याच्या पद्धतीस कित्येकांनीं शाहूच्या दरबारांत जबरदस्त विरोध आणिला. प्रतिनिधीशीं झालेला बाजीरावाचा वाद पुढील कर्तव्यासंबंधीं होता. स. १७२२ अगर २८ या सालच्या जुलै ते सेप्टेंबर महिन्यांच्या दरम्यान शाहूच्या दरबारांत असा कांहीं तरी कडाक्याचा वाद कित्येक दिवसपर्यंत झाला असावा. निजामाशीं झगडावयाचें कीं नाहीं हा मुद्दा वादाचा असेल तर, तो स. १७२७ च्या पावसाळ्यांतही झालेला असेल. कारण तोंपावेतों निजामाशीं मराठ्यांचें वैर उपस्थित झालें नव्हतें. या वादांत एका बाजूस बाजीराव व दुसऱ्या बाजूस प्रतिनिधि होता. संभाजी, चंद्रसेन जाधव वगैरे घरच्या शत्रूंचा बंदोबस्त प्रथम करून, सातारा राजधानींत राज्याची स्थिरस्थावर झाल्यावर मग माळवा, दिल्ली, वगैरे उत्तरेकडील भागांत यथाशक्ति उद्योग करावा, असें प्रतिनिधि–पक्षाचें म्हणणें होतें. त्याचे उलट बाजीरावानें वर सांगितलेल्या उठावाच्या पद्धतीचें प्रतिपादन केलें, तें राजकीय व्यवहार जाणणाऱ्या राष्ट्रोद्योगी योध्यास शोभेल असें होतें. ( १ ) मूळ शिवाजीचा संकल्प हिंदुपदपातशाही स्थापण्याचा होता; ( २ ) औरंगजेबाशीं लढून मराठ्यांनीं जय मिळविला; ( ३ ) मोगल बादशाही मोडकळीस आली आहे; ( ४ ) अशा संधीस एकदम चढाईचा उद्योग केला असतां तो यशस्वी झाल्याशिवाय राहणार नाहीं; ( ५ ) बाहेरचा उद्योग यशस्वी झाल्यानेंच घरचे शत्रु आपोआप निर्वीर्य होतील, ( ६ ) आणि आपली शक्ति व पराक्रम जोंपर्यंत महाराष्ट्राबाहेर

वाढलीं नाहींत, तोंपर्यंत घरच्या शत्रूचा पाडाव होणें शक्य नाहीं. सबब प्रथम माळव्यांत व पुढें इतर प्रदेशांत चढाई करून हिंदुपदपातशाही स्थापन करणें हेंच मराठमंडळाचें कर्तव्य होय, असा बाजीरावाचा युक्तिवाद होता. हा वाद केवळ तात्त्विक स्वरूपाचा नसून प्रत्यक्ष कृतीचा होता, त्यामुळें मराठमंडळांत त्या वेळीं जोराची चळवळ उडाली. विचार करणारें डोकें व कृति करणारे हात बाजीरावाला होते[१], असें डफ म्हणतो, तोच अर्थ रा. राजवाडे पर्यायानें सांगतात, कीं बाजीराव ही व्यक्ति स्वतंत्र विचाराची व स्वतंत्र आचाराची होती.[२] हीं दोनही विधानें अर्थपूर्ण आहेत. त्यांचें सार वरील वादांत दिसून आलें. बाजीराव व चिमाजीआपा हे दोघेही पराक्रमी असून त्यांच्या अंगीं राष्ट्रप्रेम उचंबळत होतें. त्यांच्या उद्योगास महाराष्ट्राची भूमि तोकडी होती. तेव्हां त्यांनीं आपल्या जोरदार वाणीनें आपल्या म्हणण्याची सत्यता शाहूचे मनास पटवून दिली. प्रतिनिधीला राज्यांच्या घडामोडी समजत होत्या, असें त्याच्या एकंदर आयुष्यक्रमावरून दिसत नाहीं. बाळाजी विश्वनाथास कारभारांत प्राधान्य मिळाल्यापासून प्रतिनिधीचें महत्त्व कमी होत गेलें. पेशव्याचें पारडें कमी करण्याचा प्रतिनिधीचा यत्न होता, परंतु स्वतःच्या म्हणण्याची तड पोंचविण्याची कांहीं विशिष्ट योजना त्यानें सिद्धीस नेल्याचें आढळत नाहीं. स्वतः मोहिमांवर जाऊन लढाया जिंकण्याचें सामर्थ्य त्याच्यांत विशेष नव्हतें. गुजराथ, माळवा, बुंदेलखंड वगैरे प्रांत पेशव्यांनीं व त्यांच्या नवीन सरदारांनीं हस्तगत केले. कर्नाटक व कोंकण इत्यादि स्वाऱ्यांत प्रतिनिधि हजर होता, पण त्या ठिकाणा त्याच्या हातून विशेष पराक्रम झाला नाहीं. प्रतिनिधीनें निजामाला महाराष्ट्रांत बळजोर होऊं दिलें. जेव्हां जेव्हां बाजीरावानें निजामास पेंचांत आणून त्याचा नाश करण्याचा योग आणावा, तेव्हां आयत्या वेळीं प्रतिनिधीनें मध्यें पडून तो योग बिघडविलेला आहे. या मंडळीची करामत तीन चार वर्षें पाहून त्यांचे हातून कार्यसिध्दि होत नाहीं याचा अनुभव आला, तेव्हां मग शाहूनें बाजीरावावर भिस्त टाकिली. महाराष्ट्राची व्यवस्था सुरळित करणें हा जर विरोधक मंडळीच्या मनांतला खरोखर हेतु असता, तर निजामास पायबंद लावणें हें त्यांचें पहिलें काम होतें. या कामी

---

१ Bajirao had the head to plan & the hand to execute.
२ पहा खं. ३ प्रस्तावना पृ. ६२.

या विरोधकांनीं व्यत्यय आणिला. कोणतेंही राजकारण सिद्धीस जाण्यास पाठी- मागें मनगटाच्या जोराची अपेक्षा असते. हा प्रकार सीदी सातावरील मोहिमेंत प्रत्यक्ष प्रतिनिधीच्याही पुढें अनुभवास आला. वारणेच्या तहापूर्वी प्रतिनिधीनें संभाजीवर स्वारी केली एवढी त्याची तीस वर्षांच्या कारभारांतली एकच काम- गिरी इतिहासांत नमूद आहे. तो शाहूला सोडून दूर जात नसे, आणि जवळ राहून बाहेरच्यांची बरी वाईट चिकित्सा भरपूर करी. बाहेरच्या पराक्रमापेक्षां राजधानींतील शाहूचा खासगी कारभार, देणग्या बक्षिसें, लग्नकार्यें, दानधर्म इत्यादि प्रकारचा घरगुती उद्योगच बहुधा प्रतिनिधीनें उरकलेला आहे[1]. खासगी वर्तनांत तो सज्जन व मनमिळाऊ असून शाहूचा त्याजवर लोभ होता. बाजी- रावाची त्यास भीति वाटे, तेवढ्यापुरताच तो त्यास विरोध करी. पुढें नानासाहेबाशीं प्रतिनिधीचें चांगलें सख्य झालें. शाहू मात्र राज्यांतलीं कारस्थानें व निरनिराळ्या व्यक्तींची करामत ओळखून होता. त्यास स्वपराक्रमाची जोड असती तर त्याचें नांव विशेष गाजलें असतें. प्रतिनिधीचा कमकुवतपणा प्रत्ययास आल्यावर शाहूनें बाजीरावास हाताशीं धरिलें आणि पुढें त्यास मनापासून पाठबळ दिलें.

२. **चित्रदुर्ग व श्रीरंगपट्टणच्या स्वाऱ्या** ( स. १७२५–२७ ).— मराठशाहीचा मुख्य फैलाव शाहू महाराजांच्या वेळेस पेशव्यांच्या उद्योगानें झालेला असून, खुद्द बाजीरावाचा संचार दक्षिणेस श्रीरंगपट्टणपर्यंत व उत्तरेस दिल्लीपर्यंत झालेला आढळतो. रा. राजवाडे म्हणतात, शाहूनें बाळाजी विश्व- नाथास दिलेल्या यादींतील कलमें सर्व स. १७३१ च्या सुमारास साधलीं. त्यापुढचीं बाजीरावाचीं वर्षें हिंदुपदपातशाहीच्या स्थापनेंत गेलीं.[2] विवेचनाच्या सोयीसाठीं विषयाचे कांहीं विभाग पाडणें अवश्य असल्यामुळें नर्मदेच्या दक्षिणे- कडील प्रकरणें म्हणजे कर्नाटक, निजाम, गुजराथेंतील मोहिमा व कोंकणांतील युद्धप्रसंग हे सर्व प्रथम कालानुक्रमानें घेऊन, उत्तरेकडील व्यवहारांचा सर्व भाग एकदम शेवटीं घेतला आहे. मात्र पुष्कळ ठिकाणीं राज्याचा हा उद्योग निरनिराळ्या सरदारांमार्फत एकदमच चालू होता हें ध्यानांत ठेविलें पाहिजे.

कर्नाटकांत शाहूनें लागोपाठ दोन स्वाऱ्या करविल्या. पहिली नोव्हें. स.१७२५ पासून मे १७२६ पर्यंत, हिला चित्रदुर्गची स्वारी असें तत्कालीन कागदांत नांव

१ रुमाल १ पृ. १२९. २ खं. १ प्र० पृ. ३८.

आहे. दुसरी नोव्हेंबर स. १७२६ पासून एप्रिल १७२७ पर्यंत, श्रीरंगपट्टणची. ता. २०·११·१७२५ रोजा सातारा सोडून पूर्व बाजूनें इंदापुर, करमाळ, परांडें, पंढरपुर वगैरे ठिकाणें करून निजामाच्या सरहद्दीवरून त्याजवर टेहळणी ठेवीत, विजापुर, करजगी, गलगलें, हणमंतसागर, कलबुर्गे, कोपळवरून बाजीराव १६ मार्च १७२६ रोजीं चित्रदुर्गास पोंचला. तेथून परत फिरून, हरपनहळ्ळी, गदग, गोकाकवरून पश्चिम बाजूनें २२ मे रोजीं सातार्‍यास परत आला. लगेच त्याच सालीं पावसाळ्यानंतर ता. २३ ऑक्टोबर रोजीं सातारा सोडून, बत्तीस-शिराळें, हुकेरी, सामानगड वरून बेळगांव, कित्तूर, सोंधें वगैरे ठिकाणच्या खंडण्या घेऊन, बेदनूर प्रांतांतून अजमपुर, बाणावर, हसन वगैरे ठिकाणीं जाऊन, ता. ६ मार्च रोजीं श्रीरंगपट्टणास पोंचला. तेथें एक महिना मुक्काम करून परत सोंधें वगैरे ठिकाणांवरून पहिल्याच वाटेनें कापशी, शिरोळ इत्यादि ठिकाणीं जाऊन एप्रिल अखेरीस सातार्‍यास आला. दर स्वारींत त्याचा काळ सहा महिने पावेतों गेला.

कर्नाटक प्रांतावर मराठे आपला हक्क पूर्वीच्या शहाजीशिवाजींच्या उद्योगामुळें सांगूं लागले. संभाजी व राजाराम यांनीं तिकडे आपला हक्क राखण्याचा प्रयत्न केला. राजारामानें जिंकिलेलें राज्य आपण सांभाळिलें पाहिजे अशी भावना शाहूची असून, आरंभींच त्यानें शंकराजी महाडिक यास तिकडे रवाना केलें होतें. शाहूची ही आज्ञा तडीस नेण्याचा उद्योग बाळाजी विश्वनाथ व बाजीराव यांजकडे आला. उलट पक्षीं जिंजीचा पाडाव केल्यापासून कर्नाटक प्रांतावर औरंगजेबाचा अंमल चालू होऊन, त्याजवर दक्षिणचे मोगल सुभेदार हक्क सांगूं लागले. कर्नाटक प्रांतावरील आपला हा हक्क निजामानें कधींच सोडिला नाहीं. अर्थात् निजामापासून दक्षिण देश सोडविणें हें जसें बाजीरावाचें कर्तव्य, तसेंच कर्नाटक सोडविणेंही त्यास ओघानेंच प्राप्त झालें. वास्तविक कृष्णेपलीकडील हिंदुस्थानचा समग्र प्रदेश मराठ्यांचे ताब्यांत आला असें कधींच झालें नाहीं. या प्रदेशांत अनेक पाळेगार व लहान मोठे सत्ताधीश आपापल्या शक्तिप्रमाणें वावरत होते. तंजावरास शाहूच्या भाईबंदांचें राज्य असून, अडचणीच्या प्रसंगीं त्या राज्याचें संरक्षण करणें आणि त्याजकडे जाण्याचे मार्ग सलंग आपल्या ताब्यांत राखणें, हीं कामें शाहूस करावयाचीं होतीं. बेळगांव, गजेंद्रगड, कोपळ,

सोंदूर, बल्लारी, शिरें, बंगलोर, कोलार, वेलूर, आरणी, जिंजी, तृणामली व तंजावर इतकी नाक्यावरची मुख्य ठिकाणें मराठ्यांचीं होतीं. शिवाजी प्रथम कर्नाटकांत गेला, तो रायगडावरून पूर्वेस सोलापुरकडे जाऊन तेथून कलबुर्गा, गोवळकोंडा, कर्नूळ ( येथें जवळच श्रीशैल आहे ), कडाप्पा, गुरमकोंडा, तिरुपती (बालाजी), व्यंकटगिरी, वेलूर, अर्काट, जिंजी, या मार्गानें गेला. त्या वेळचे हे मार्ग व नाक्याचीं ठिकाणें नकाशावर ध्यानांत ठेविलीं म्हणजे त्या मोहिमांचें स्वरूप मनांत भरण्यास मदत होते. सारांश, पूर्वपश्चिम दोनही मार्गावरील नाक्याचीं ठिकाणें मजबूद राखणें, सोंधें, बिदनूर, सुरापूर, गदग, लक्ष्मेश्वर वगैरे ठिकाणच्या सत्ताधीशांकडून खंडण्या वसूल करणें, आणि तंजावरचें मराठी राज्याचा सांभाळ करणें, हे उद्देश शाहूनें ठरविलेले असून, तिकडील प्रदेशांत उद्योग करण्याचें क्षेत्र त्यानें फत्तेसिंग भोसल्याचे हवालीं केलें होतें. आरंभापासूनच अशीं उद्योगक्षेत्रें शाहूनें निरनिराळ्या इसमांस वांटून देण्याची पद्धत घातली; आणि याच पद्धतीचा मराठशाहींत उत्तरोत्तर परिपोष होत गेला. अक्कलकोटास फत्तेसिंगाची स्थापना करण्याचें प्रयोजन एवढेंच, की तेथून त्यानें खालीं दक्षिणपावेतों आपला अंमल गाजवून, इकडे वेळ पडेल त्याप्रमाणें पूर्वोत्तर भागीं निजामावरही शह ठेवावा. या व्यवस्थेमुळें कर्नाटकच्या ह्या स्वारीचें आधिपत्य फत्तेसिंगाकडे येऊन त्याचें साह्य करण्यासाठीं पेशवे, सेनापति वगैरे सरदारांस शाहूनें हुकूम सोडिले, म्हणजे पर्यायानें या प्रधानांस त्यानें फत्तेसिंगाच्या हाताखालीं काम करण्यास लाविलें. फत्तेसिंगास राजपुत्र बनविण्याचा शाहूचा उद्देश यांत व्यक्त होतो, आणि त्याच्या अंगीं तशी लायकी असती तर बाजीरावाचें प्रस्थ वाढलें नसतें. सर्व माणसें व्यवहारांत वावरूं लागल्यावर त्यांच्या अंगच्या लायकीप्रमाणें परिणामीं त्यांची योग्यता कमी अधिक कशी होते हें या कर्नाटक स्वारीच्या उदाहरणावरून चांगलें दिसून येतें. ता. १२-९-१७२५ रोजीं शाहूनें खंडेराव दाभाड्यास लिहिलें, कीं 'तुम्हांस दक्षिण प्रांतें मसलतेस जाण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे; फौजेचा गाहा करून विजयादशमीकारणें यावें. केला मनसबा सिद्धीस पाववावा लागतो,हें जाणून स्वामी संतोष पावे तें करणें. तुमच्या सरंजामाचे ताकीद रोखे पाठविले आहेत.'[१] त्या

१ शा. रो. १५७; खं. ३-७

पूर्वीच ठरविलेल्या मनसुब्याची सिद्धता करून शाहूनें सेनापति व सरलष्कर यांस ता. ५ सेप्टेंबरास खालील आज्ञा केली होती. ' तुम्हांस कित्येक मनसुब्याचे आज्ञा कर्तव्य ते करून प्रतिनिधींचा व तुमचा एक बेत करून दिल्हा आहे. प्रस्तुत विजयादशमीचे मुहूर्तें स्वामी प्रतिनिधीस रवाना करतील. तर तुम्हींही आपले फौजेचा गाहा करून विजयादशमीस स्वार होऊन पंढरपुरचे रोखें येणें; व प्रतिनिधीस सामील होऊन त्यांचे विचारें वर्तोन स्वामिकार्य करणें. ' यावर्षी विजयादशमी ता. ५ ऑक्टोबरास असून, त्या पूर्वीचे पावसाळ्यांत कर्नाटकचा मनसबा करून शाहू सरदारांचे रुसवे काढून फौजेची सिद्धता करीत होता. या पूर्वीच निजामाकडे जाऊन कर्नाटक मोहिमेसंबंधीं त्यानें दुश्चित्त होऊं नये, शक्य तर निजाम व मराठे उभयतांनीं एकमेकांस मदत करून आपापले हेतु सिद्धीस न्यावे, अशी वाटाघाट करण्यासाठीं बाजीराव व पिलाजी जाधव यांस शाहूनें निजामाकडे पाठविलें होतें. शाहूचा आप्त निळकंठराव जाधव साखरखेर्ड्यावर निजामानें कैद केला होता, त्यास सोडवून आणण्याचीही ताकीद बाजीरावास होती. म्हणजे निजाम व शाहू यांचा या वेळीं चांगला मिलाफ होता, इतकेंच नाहीं तर ' रावसाहेब पेशवे, घोरपडे वजारतमाब, व मोगल सर्व एक होऊन मनसुबा उत्तमच केला,' या वाक्यावरून कर्नाटकच्या या मनसब्यांत मोगल म्हणजे निजाम सामील होता याविषयीं संशय राहत नाहीं. शाहूनें बाजीरावाला नोव्हेंबरांतच निजामाशीं बोलणें करावयास पाठविलें होतें. बाजीराव ता. २५-११-१७२५ रोजीं शाहूस लिहितो, ' स्वामींनीं फौजा जमा केल्या, पंढरपुरच्या रोखें येतात ही खबर निजामास पावेलच. तेही विचारांत पडतील. स्वामीशीं बिघाडतात असें नाहीं, व आम्ही होऊन नबाबाशीं विरुद्ध करूं हें सहसा होणें नाहीं. हा कालपर्यंत आम्ही नबाबास पत्र लिहिलें नाहीं. स्वामी तिकडून लिहिणें ते लिहितात, आमच्या व आपल्या लिहिण्यास द्वैत पडेल म्हणून लिहिलें नाहीं. प्रस्तुत नबाबास ल्याहावयाचा मजकूर स्वामींनीं कळविला आहे, त्या अन्वयेंच लिहितों. स्वामींनीं कोणेविशीं चिंता न करावी. स्वामींचे पुण्यप्रतापेंकरून जें होणें तें उत्तमच होईल. इकडे मनसुब्याचे नेट पडावे, असा नूर मात्र जाहला आहे.' या पत्रांतील वाक्यें अनेक प्रकारें खोंचदार आहेत. शाहू निजामाशीं वाटेल त्या तऱ्हेनें सख्य ठेवण्याची खटपट करीत असून

बाजीराव लष्करी जोरावर त्यास अडविण्याचा विचार सुचवीत असावा. बाजीराव परभारें निजामाशीं हातघाईवर येईल असा बनाव शाहू टाळीत असून, त्यानें बाजीरावास चांगलेंच धाकांत ठेविलें होतें. मुत्सद्देगिरीच्या मागें तलवारीचा जोर असल्याशिवाय राजकारण यशस्वी होत नाहीं, हें तत्त्व बाजीराव प्रतिपादित होता. याच विरोधी तत्त्वांच्या झगड्यांत बाजीरावनिजामांची चुरस वीस वर्षें हेलकावे खात राहिली, निकालांत आली नाहीं.[१]

प्रस्तुत कर्नाटकस्वारींत निजाम मराठ्यांच्या फौजा संगनमतानें कर्नाटकांत कामगिरीवर होत्या. पुढें गुजराथेंत निजामाच्या जहागिरांचे परगणे होते त्यांस मराठ्यांनीं उपद्रव देऊं नये अशा आज्ञा शाहूनें त्याच सालच्या पावसाळ्यांत काढिलेल्या दिसतात. यावरून शाहू त्याजबरोबर गोडी ठेवण्याची पराकाष्ठा करीत होता हे उघड आहे.

स्वारीची व्यवस्थित हकीकत उपलब्ध नाहीं. प्रतिनिधि, दाभाडे, सरलष्कर, पेशवे, बाबूजी नाईक, घोरपडे वजारतमाब इत्यादि सरदारांस फत्तेसिंग बावांबरोबर जावें, त्यांचे विचारांत चालावें, ऐसें सांगितलें. यांनीं जाऊन तुंबलेल्या खंडण्या वसूल घेतल्या, सालाबाद पुढें घेण्याचा ठराव केला. हुजूरचीं ठाणीं गेलीं होतीं तीं सोडाविलीं; ज्यांनीं मगरुरी केली त्यांचे प्रांतास जरब दिली. शाहूनें स्वतःच्या देखरेखीखालीं पहिली मोठी मुलूखगिरी करविली ती हीच होय. स्वतः स्वारीत गेला असता तर जरब राहून पुष्कळ कार्य झालें असतें; तसें न झाल्यामुळें जी बजबजपुरी माजली, तीच पुढें सामान्यतः मराठ्यांचे अंगीं मुरत गेली. स्वारींतून खबर कळेना, तेव्हां चिंता लागून शाहूस कागदी घोडे कसे नाचवावे लागत त्याचा एक मासला पहा. ता. २१-३-१७२६ रोजा सर्व सरदारांस त्यानें एक फर्म्याचीं पत्रें लिहिलीं, त्यांत ' तुम्हांकडून विनंतिपत्रें येत नाहात, कोठपर्यंत गेलां, काय मनसुबा करतां कळत नाहीं, ऐशास तुम्ही सरकारचे कुल अखत्यारी सेवक, आठ चार रोजीं हुजूर विनंतिपत्र पाठवून मनसुब्याचा अर्थ स्वामींस विदित करावा हें उचित आहे. गेलाया दारभ्य विनंतिपत्र पाठविलें नाहीं यावरून अपूर्व भासतें. तरी, यापुढें दिनप्रतिदिन स्वामींस लिहून पाठवीत जाणें.' पेशवे व प्रतिनिधि यांनी सोंध्यावर चाल करून जरब दाखविली,

१ खं. ६·२२. शा. रो. १७, ७, १८५–१८६.

तेव्हां तेथील संस्थानिकानें शाहूकडे वकील पाठवून[1] त्याची करुणा भाकली ह्मणून त्याचें संरक्षण करण्याबद्दल शाहूनें आज्ञा पाठविली. 'सोंधेकर पुरातन, त्यांजवर चोहों-कडून कसाला जाला, त्यामुळें श्रमी आहेत, स्वामींचें ठायीं अकृत्रिम हेत धरतात, त्यांचें चालवणें स्वामींस अवश्य. या निमित्त बोली करावयासाठीं हुजरून गोपाळराम पाठविले आहेत, ते बोली करतील, तदनुरूप निर्वाह जीवन माफक खंडणीचा भाग वारून घेऊन, संस्थान संरक्षण करणें.' सोंध्याच्या बचावाबद्दल पुढें स. १७३२ तही शाहूनें फत्तेसिंग भोसल्यास लिहिलेलें आहे. एकंदरींत ही स्वारी पुष्कळ यशस्वी झाली, तरी आपसांतल्या चुरशीमुळें व्हावा तितका उपयोग घडला नाहीं. फौजांचेही हाल अतोनात झाले. बुद्धिहाळ किल्ल्यापुढें कशी अवस्था झाली, त्याचें वर्णन एका पोवाड्यांत उपलब्ध आहे.[2] 'रा. बाजी-राव व वजारतमाब व मोगल सर्व एकत्र होऊन मनसबा उत्तमच केला. दौलतेंत ताकद नसतां लौकिक उत्तम केला मुख्य गोष्ट रावसाहेब पुण्यवंत, त्यामुळें यशच येतें. नाईक त्या प्रांतीं राहिले घोरपडे वजारतमाब यांची स्वामी निरंतर तारीफ करितात. महाराजांचें पुण्य अधिक असे.' अशा प्रकारें दक्षिणची ही पहिली मोठी स्वारी फलद्रूप होऊन शाहूचें वैभव व बाजीरावाची करामत लोकांचे नजरेंत भरूं लागली.

कर्नाटकांत थोडा बहुत कार्यभाग होतांच हुरूप येऊन झालेल्या उद्योगाची दृढता करण्याचा विचार शाहूनें लगोलग हातीं घेतला. ता. २०-७-१७२६ रोजीं म्हणजे भर पावसाळ्यांतच शाहू लक्ष्मेश्वरच्या देशमुखास लिहितो. 'तुम्हीं विनंतिपत्रें पाठविलीं. अभिप्राय कळों आला. नवाबांनीं आपणावरी बहुत अतिशय मांडिला आहे. गावगन्ना ठाणीं घालावयाचा उद्योग करितात, तरी स्वामींनीं आपलें साहित्य करून स्थळ रक्षण होय तें केलें पाहिजे म्हणून लिहिलें, ऐसीस तुमचा अभिमान पूर्वींपासून स्वामींस आहे. त्या प्रांतींचे बंदोबस्त करणें आहेत, याबद्दल सरलष्कर, प्रधान व सेनापति यांस फौजा आणावयाची आज्ञा केली आहे. तुम्हीं जमाव करून नबाबास आपल्या स्थलामध्यें प्रवेश होऊं न देणें. उपरीया कारणें स्वारी फौजा रवाना करितील.'[3] यावरून स. १७२६ च्या पावसाळ्यांतच निजामाशीं बिनसूं

१ शा. रो. १५, १९६ व २००. २ म. ३. १०९. ३ शा. रो. २७

लागलें, आणि कर्नाटकचा उद्योग पुरा करण्याचा शाहूनें संकल्प केला. मात्र निजामाच्या खऱ्या उपद्व्यापाची शाहूस या वेळीं कल्पना नसल्यामुळें पुढें त्याची धांदल उडाली. दसऱ्यास फौजा रवाना करण्याचें ठरवून त्यापूर्वी पांच दिवस शाहूनें बाजीराव व सेनापति यांस कळविलें कीं,[१] 'कित्येक मनसुब्याचा अर्थ आलाहिदा स्वहस्ताक्षरपणीं लिहिला आहे. याउपरी दिवसगत न लावितां अति सत्वर फौजेची तयारी करून विजयादशमीच्या मुहूर्ते पंढरपुरचे रोखें येणें.' ता. १९–९–१७२६. या भाषेवरून अनुमान होतें कीं बाजीराव निजामाचा डाव ओळखून कर्नाटकाकडे जाण्यास नाखूष असावा. परंतु फत्तेसिंग भोसले व प्रतिनिधि यांचा आग्रह पाहून शाहूनें बाजीरावास निक्षून लिहिलें. बाजीरावाची दृष्टि निजाम व उत्तर यांजकडे असून इतरांची दक्षिणेकडे होती. नोव्हेंबरचे आरंभीं बाजीराव निघून पश्चिम बाजूनें बेळगांवपर्यंत गेला, तोंच शाहूचे आसमंतांत निजामाची धामधूम चालू झाली. ता. १९·११·२६ रोजीं सरलष्करास शाहू लिहितो[२] कीं 'प्रधान व सेनापति दक्षिणप्रांतीं फौजनिशीं गेले आहेत. परंतु या प्रांतीं धामधुमेचा प्रसंग आहे, तरी दोन हजार चांगले स्वार हुजूर पाठवून देणें.' शाहूचीही धांदल उत्तरोत्तर वाढत गेली. बाजीराव कर्नाटकांत गेला आणि रगडून कामगिरी करीत फेब्रुवारींत श्रीरंगपट्टणास एक महिना मुक्काम करून एप्रिल अखेर परत आला. त्यापूर्वीच परत येण्याविषयीं शाहूचीं पत्रें त्यास निकडीचीं जात होतीं. या वेळीं अर्काटपर्यंतच्या प्रांताच्या बंदोबस्ताचा ठराव नबाबाबरोबर बाजीरावानें केला, तो त्याचे हयातीपर्यंत चालला.[३] याप्रमाणें चित्रदुर्ग व श्रीरंगपट्टण अशा दोन स्वाऱ्या कर्नाटकांत होऊनही शाहूचा योजलेला कार्यभाग घडून आला नाहीं; आणि दक्षिणप्रांतांचा बंदोबस्त प्रस्तुत अपुरा राहिला तो शाहूनें कधींही दृष्टिआड केला नव्हता. तथापि स. १७३९ पावेतों मुख्य फौजा कोंकण, वसई, उत्तर हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं गुंतलेल्या असल्यामुळें, कर्नाटकचा जिव्हाळ्याचा कार्यभाग शाहूस लांबणीवर टाकावा लागला. या दरम्यान चंद्रसेन जाधव, उदाजी चव्हाण वगैरे मंडळी लाग साधून शाहूस त्रास देत, आणि शाहूही सिधोजी थोरात, खंडोजी बांडगर वगैरे आजूबाजूचे लहान लहान सरदार जमा करून चंद्रसेनासारख्यांस दाबांत ठेवी. बाजीराव दक्षिण

१ शा. रो. १९. २ रो. रो. २१ व२२०; ३ ऐ टि. २·४४.

बाजूस लक्ष घालीना, तेव्हां कर्नाटकचें काम शाहूनें सन १७३९ त रघूजीस सांगितलें. नानासाहेब पेशव्यानेंही पुढें कर्नाटकासंबंधानें जो एवढा अट्टाहास मनांत ठेविला, तो शाहूची ही मनीषा पुरी करण्यांतच होय. प्रथम हा दक्षिणचा कार्यभाग उरकून मग उत्तरेंतला उद्योग बाजीरावानें हातीं घेतला असता तर तो राज्यास फायदेशीर झाला असता, असें पुष्कळांचें प्रतिपादन आहे. बाजीरावाच्या दुर्लक्षामुळें निजामाला कर्नाटकाकडे शह बसविण्यास हळूहळू संधि मिळाली; अर्काटचे नबाब व श्रीरंगपट्टणचे राजे यांस जोर आला; मराठ्यांचे विरुद्ध त्यांस फ्रेंच, इंग्रज वगैरेंशीं कारस्थानें करतां आलीं; तेणेंकरून या परस्थ व्यापाऱ्यांनीं कर्नाटकच्या कारभारांत प्रवेश केला. याचे ऐवजीं शाहूची छाप अगोदरच कर्नाटकावर चांगली बसती तर, तंजावरचे राजांस जोर येऊन त्यामुळें क्लाइव्ह, डुप्ले, हैदरअली यांच्या कारस्थानांस अवकाशच राहिला नसता. ह्या दृष्टीनें कर्नाटकच्या कारभाराचें महत्त्व मराठशाहीस अतोनात होतें. पुढें नानासाहेब पेशव्यानें स. १७५२ पासून लागोपाठ अनेक स्वाऱ्या करून कर्नाटक प्रांत पादाक्रांत केला, परंतु त्यापूर्वीच युरोपियनांचा पाय तिकडे चांगला मजबूद होऊन गेला होता. ( खं. २ प्र. पृ. २९; शा. रो. २१२, ७१, ७२, २१५ ).

६. **निजामाची चढाई, शाहूची नागंवळ** ( स. १७२६–२७ )–शाहूनें कर्नाटकांत जो हा जोराचा उद्योग चालविला, तो बहुधा कोल्हापुरच्या संभाजीस पसंत पडला नसावा. कृष्णा व तुंगभद्रा यांजमधील प्रदेशावर संभाजी आपली मालकी समजत होता, त्यास या कृत्यानें व्यत्यय येऊन संभाजी चंद्रसेनाच्या व निजामाच्या कारस्थानांस बळी पडला; आणि शाहूशीं अनुरक्त नसलेले कित्येक सरदार निंबाळकर, घोरपडे, तोरगलकर शिंदे वगैरेंस उठवून त्यानें शाहूशीं तंटा सुरू केला. ' स्वामी तीन वर्षे स्वारीस होते, प्रस्तुत आगमन झालें, या उल्लेखावरून शके १६४७-४८-४९ या सालीं म्हणजे सरासरीनें मार्च स. १७२५ पासून स. १७२८ पर्यंत संभाजी बाहेर होता. या दरम्यान कोल्हापुरचा कारभार बहुधा राजसबाई पाहत असावी, कारण ता. ७-९-१७२६चा एक कागद व. १७२८ चा एक असे राजसबाईच्या नांवचे आहेत. ता. १९ जुलई १७२७ रोजीं संभाजी धारूरास निजामापाशीं होता, असा उल्लेख त्यानें मुक्तेश्वरास दिलेल्या सनदेंत आहे. संभाजी असें विरुद्ध आचरण करीत असतांच

त्याची समजूत काढण्याकरितां शाहूनें त्यास तहनामा लिहून दिला, त्याची ता. ३०-१२-१७२५ आहे, यावरून शाहू व संभाजी यांचा तंटा या सालपासून पुनरपि जोरांत आला असें स्पष्ट दिसतें.[१]

या तंट्याचें बीज चंद्रसेन जाधवानें पेरिलें. चंद्रसेन निजामाचा केवळ हस्तक असून, शाहू व निजाम यांचें सख्य असल्यानें चंद्रसेनाच्या कर्तृत्वास अवकाश मिळेना. शाहूचा व पेशव्यांचा पाडाव हें त्याचें मूळ ब्रीद होतें. कदाचित् कालांतरानें बाजीरावानें निजामास हुसकून दिल्यास संभाजीचा व आपला सर्वच कारभार आटपेल असें वाटून, स १७२१ पासूनच हलके हलके त्यानें निजामाला व संभाजीला शाहूचे विरुद्ध फोडून नवीन कारस्थान सिद्ध केलें. 'जाधवरावांनीं कित्येक अर्थ लिहून व सांगोन पाठविला. त्यांस स्वामींचें मनसुब्याचें यश येतें. तर तुह्मीं स्वामींच्या कार्याविषयीं सावध राहून जाधवरावांस सामील होणें.' अशी संभाजीची आज्ञा ता. २३-७-१७२१ची रायाजी मल्हारास आहे.[२] हें कारस्थान अंतस्थ रीतीनें कैक वर्षे घाटल्यावर स.१७२५च्या सुमारास रंगास आलें, तें एका त्रुटित कागदांत उपलब्ध आहे. संभाजीनें विश्वावसु संवत्सरांत ह्मणजे बहुधा सन १७२६ च्या फेब्रुवारींत चंद्रसेनास लिहिलेलें पत्र आहे त्यांत 'स्वामींचें आज्ञाधारक आहों. स्वामींच्या संरक्षणापेक्षां व राज्याभिवृद्धीपेक्षां दुसरा निदिध्यास नाहीं. निजामुल्मुल्काकडे स्वामींच्या मनोभिष्टाचीं पत्रें लिहिलीं होतीं. त्यावरून निजामांनीं समाधान पावोन स्वामींचा अभिमान धरून उत्तरें पाठविलीं तीं स्वामिसेवेशीं पाठविलीं आहेत. अतःपर महत्कार्याचा प्रसंग व्हावा, संधि फिरोन येणार नाहीं, सेना समुदायानिशीं त्वरा करून तोरगलास पत्र पाठवावें. चिरकालें करून समय प्राप्त झाला आहे. जितकी त्वरा होईल तितकें हित आहे,' अशा मजकुराचें चंद्रसेनाचें पत्र संभाजीस आलें,त्याचा जबाब त्यानें पाठविला तो असा.'तुमचें पत्र वाचून स्वामींचे मनोरथ सिद्धीस गेले असेंच वाटलें. खास त्वरा करावयाविशीं लिहिलें, तरी याहून अंतर तें काय ! दीलभरीनें सांगणें तें सांगोन, हिंदुराव व त्यांची सगुणाबाइ,

---

१ खं. ८·९४ इ. ऐ. सरदेसाई घ. ले. २९, व खं. ८·९६; ग्रं. मा. मुक्तेश्वर पृ. २; का.सं.प.या. ४१९. २ खं. ३·५५९; जाधव घ.कैफियत,दळवीकृ.पृ.८१.

पिराजी घोरपडे यांची स्त्री, व पुत्र राणोजी इत्यादिकांचा जमाव समागमें घेऊन तुंगभद्रातीरापर्यंत स्वारी केली. पुढें श्रीपतराव प्रतिनिधि चालून आले, त्यांचे उपमर्दाचा विचार करण्यासाठीं तुम्हांस त्वरेनें दर्शनास बोलाविलें. निजाम अदवानीस आले, त्यांचीं पत्रेंही स्वामींस आलीं, कीं फौज पाठवून देणें. तेव्हां निळकंठराव त्रिंबक प्रधान यासह फौजेंत येऊन निजामास सामील होणें अशी आज्ञा केली. तुम्हांस दर्शन द्यावयाकरितांच स्वामींनीं तोरगल येथें मुक्काम केला. तरी तुम्हीं बहुत त्वरेनें येऊन स्वामींचें दर्शन घ्यावें. इकडील वर्तमान तरी प्रतिनिधि व बाजीराव व तोरगलकर असे या प्रांतें आले आहेत. आपणांकडे येणें म्हणून निजामाचीं लिहिलीं येतात. पठाणांचे वाढीमुळें श्रीपतराव व बाजीराव यांत एक मत नाहीं. स्वामीकडील अगत्य धरावयाविशीं निष्कर्ष तुह्मीं निजामास कळवावा. सातारवासीयांकडील तह मोडून स्वार्थ साधावा हा अर्थ निजामांनीं तुह्मांस सांगून पाठविला, हे गोष्ट तुह्मीं बरी केली. याउपरी कोणे गोष्टीचा उजूर न धरितां स्वामींचे दर्शनास येणें. इकडे आबाजी सुरो, मुरारजी (घोरपडे), उदाजी चव्हाण इत्यादिकांची फौज संपूर्ण आहे. ऐवजखानाकडूनही राजकारण बहुत निराळ्या तऱ्हेचें आलें आहे. पांढरे वगैरे तुह्मांजवळ आहेत त्यांचा दिलासा केला हें उत्तम केलें. त्यांसही समागमें घेऊन येणें.'

या पत्रावरून दिसतें, कीं बाजीराव व श्रीपतराव यांनीं कर्नाटकांत स्वारी केली त्यामुळें संभाजीस चीड येऊन त्यानेंही तुंगभद्रेपर्यंत स्वारी केली, आणि चंद्रसेनाचे द्वारें निजामाशीं संधान लाविलें; आणि सर्व सरदार व फौज घेऊन तो पुढें लवकरच निजामास मिळाला. स. १७२६ च्या दसऱ्यापासून तों पालखेडच्या लढाईपर्यंत संभाजी निजामाबरोबर होता यांत संशय नाहीं. निजाम या काळीं मराठ्यांपुढें चांचपडत आपलें पुढील धोरण ठरवीत होता; आणि स. १७२६चे पावसाळ्यानंतर त्यानें शाहूचे विरुद्ध डाव उघड सुरू केला

शाहूच्या विरुद्ध बंडावा कोल्हापुर हद्दींतल्या सरदारांनीं बाजीराव वगैरे दूर गेलेला पाहून स. १७२६तच सुरू केला. स. १७२६च्या ता. १० मार्चला जानोजी नाईक निंबाळकर व सुलतानजी निंबाळकर सरलष्कर यांचा, मुलखास उपद्रव दिल्याबद्दल, शाहूनें निषेध केला आहे. कंठाजी व रघूजी कदम,

कृष्णाजी दाभाडे व पिलाजी गायकवाड यांस २३ मार्चला पत्र लिहून अगत्य दाखविलें आहे. सिधोजी थोरात वगैरे मिरजकडील सरदारांस गनिमाचा शह राखण्याविषयीं व एकनिष्ठा ठेवण्याविषयीं शाहूनें एप्रिल ८ रोजीं बजावलें आहे. 'कोल्हापुरचे कोटास गनिमाचा वेढा पडला असून आंतील सरदारांनीं युद्ध-प्रसंग कष्ट मेहनत करून शाहूची बाजू राखिली त्याबद्दल त्या सेवानिष्ठ सरदारांस शाहूनें ता.१२-७-१७२६ रोजीं वंशपरंपरेचे इनामगांव दिल्हे"[1], यावरून संभाजीनें बंडावा सुरू केल्याबरोबर शाहूनें कोल्हापुरावर चाल करून स्थळ काबीज केलें, तें सोडविण्यासाठीं संभाजीची फौज आली तिला शाहूच्या सरदारांनीं दाद दिली नाहीं, हा प्रकार उघड होतो. चिमणाजी दामोदर राजाज्ञा यास तारीख ३०-७-१७२६ रोजीं शाहू विचारतो, 'तुम्ही मनसबा काय करितां, चंद्रसेन पन्हाळ्याकडे गेले म्हणून वर्तमान आलें, तुम्हीं कांहीं लिहिलें नाहीं. या उपर चंद्रसेन व पांढरे यांचें वर्तमान लिहिणें, दहा हजार पावेतों फौजबंदी करणें. निजामुल्मुल्क यांचे भेटीस जाऊन भागानगर प्रांतींचा तह करून घेणें.[2]' म्हणजे या वेळपर्यंत शाहू निजामाशीं सख्यच ठेवण्याचा प्रयत्न करीत होता; आणि याच भरंवशावर १७२६ च्या पावसाळ्यानंतर त्यानें मराठी फौजा कर्नाटकांत रवाना केल्या. चंद्रसेन व संभाजी हे निजामाच्या जोरावर बंडखोरी करीत आहेत, अशी भावना प्रथम शाहूची नव्हती. उदाजी चव्हाणानें तासगांवावर चाल केली, त्याच्या बंदोबस्तास जाण्याविषयीं रायाजी जाधव वगैरे सरदारांस ता. ५–८–२६ रोजीं शाहूनें आज्ञा केली, लगेच पंधरा दिवसांनीं रहिमतपुरावर कोल्हापुरीय सरदार चालून आले, म्हणून त्याचे संरक्षणास देखतआज्ञापत्र जाण्याविषयीं रायाजी जाधवास शाहूनें ता. २३-८-२६ रोजीं हुकूम सोडिला. लहानसहान सरदारांकरवीं आपण बंदोबस्त राखूं अशी शाहूची भावना होती.

परंतु स. १७२६ चे नोव्हेंबरांत बाजीराव व सेनापति फौजेनशीं दक्षिण-प्रांतीं मसलतीस गेल्याबरोबर शत्रूंना एकदम उचल खाल्ली. 'या प्रांतीं धामधुमेचा प्रसंग आहे, तरी दोन हजार चांगले स्वार पाठविणें', अशी आज्ञा शाहूनें १९ नोव्हेंबरास सुलतानजी निंबाळकरास पाठविली. लवकरच निजामाचें उग्र

१ पे. द, पृ. १२०. २ शा. रो. २०८. २८. २०९. २०.

स्वरूप शाहूच्या नजरेस पडूं लागलें. ऐवजखान नांवाचा निजामाचा एक हुशार सरदार पूर्वी वऱ्हाडांत कामावर होता त्यानें एकाएकीं कान्होजी भोसल्यावर चाल करून त्यास पिटून लाविलें. इतक्यांत फतेसिंग भोसले व नारोराम यांनीं कलबुर्गे प्रांतीं चिमणाजी दामोदरास सामील करून ते कान्होजांच्या मदतीस धावून आले, तेव्हां ऐवजखान माघारा गेला. या प्रसंगीं सर्व सरदारांस पत्रें लिहून शाहूनें १-२-१७२७ रोजीं कान्होजींचें समाधान केलें, आणि चंद्रसेनाचा फितूर मोडून दर्शनास यावें अशी आज्ञा पाठविली. हिंदुराव घोरपडे कापशीकर व त्याचे पदरचा सरदार धारराव निंबाळकर ( निपाणकर देसाई यांचा पूर्वज ) यांस आपल्या बाजूस वळविण्याचा चंद्रसेनाचा प्रयत्न होता, परंतु हे दोघेही शाहूच्या बाजूसच राहिले असें दिसतें. निंबाळकरांचे घराण्यांत मातुश्री सगुणाबाई या वेळीं प्रमुख असून तिचा ( पुत्र ? ) नरसिंगराव धारराव निंबाळकर स्वामिकार्यावर पडल्याबद्दल भूमिदानाची सनद ता. ११-२-१७२७ ची आहे. घोरपडे व निंबाळकर हे पुढेंही शाहूचीच सेवा करीत असून त्यांजवर शाहूचा मोठा लोभ होता. एवंच चंद्रसेनाचें कारस्थान स. १७२७ च्या आरंभीं रंगांत येऊन शाहूची फारच तारांबळ उडाली. ‘ बाजीराव व सेनापति दक्षिणप्रांतास गेले असतां सांप्रत मनसुब्याचा प्रसंग प्राप्त झाल्यामुळें त्यांस एकदम परत यावयाची आज्ञा पाठविली आहे. ’ संभाजी अगोदरच निजामाचे कच्छपीं लागून शाहूचे विरुद्ध जोराची खटपट करीत होता. त्यानें चिमणाजी दामोदरास आपल्याकडे वळवून निजामास घेऊन पुण्यावर चाल केली. संभाजीनें निजामास पुण्यास आणून सल्ला बिघडविला, ’ असें भा. व. शकावलीकार ह्मणतो. तारीख १८-२-१७२७ रोजीं संभाजी व निजाम पुण्यास होते.तिकडच्या प्रदेशांतील लोकांनीं संभाजीकडून इनामाच्या सनदाही मागण्यास सुरुवात केली. अशा सनदा तुकारामबावा देहूकर याचे वंशजांस देहू व किन्हीं गांवच्या ता. १०-२-१७२८ च्या असून त्या चिमणाजीपंत प्रधान यानें दिलेल्या आहेत. अर्थात् चिमणाजी दामोदरानें शाहूस सोडून स. १७२७-२८त संभाजीचें प्रधानपद मिळविलें. या कारणांनीं

१ शा. रो. २२, २३, २४, २२०, २६६; पे. द. पृ. १३०, १३१, २५१; इचलक. इ. पृ. १७, २९. या भानगडी उकलण्यास खं. ३-१५ व ३-८३, पे. द. पृ. १३०-१३१ व २४० वरील सनदा व शा. रो. २४, २५, २७ हे

शाहूंची तारांबळ एवढी उडाली होती कीं प्रत्यक्ष पेशवा व सेनापति हे तरी आपणास मनापासून मदत करतील कीं नाहीं याबद्दल संशय वाटून त्यानें प्लवंगाच्या चैत्र शु. प्रतिपदेस ( १२-३-१७२७ ) अंबाजी त्र्यंबकास लिहिलें ' तुह्मी बाजीरावास चार गोष्टी विचाराच्या सांगोन अमित्राचे पिच्छावरी जाऊन फितूर तुटे तो अर्थ करणें. तुह्मीं स्वामींजवळ बोलोन गेलां काय, करितां काय, हा विचार कळत नाहीं. सेनापति व प्रधान यांचे चित्तीं विचार तरी काय आहे त्याचा शोध घेऊन लिहून पाठविणें, त्यावरून स्वामी निश्चिति मानितील. वारंवार लिहावयाची सीमा झाली, परंतु कार्यभागाचा विचार दिसत नाहीं. याउपरी (अमित्राचें) गुज काढावें आणि फितूर तुटावा, ऐसें चित्तांत असेल तरी पत्रदर्शनीं अमित्राचे पिच्छावरी येऊन वाताहत करणें.* नुसत्या शाब्दिक पत्रांच्या खेळानें राजकारणें सिद्धीस जाणें शक्य नाहीं हें शाहूच्या अनुभवांत या वेळी नव्हतें. अशा विवंचनेंत फौजेचा गाहा करावयासाठीं शाहूनें गुजराथेंतून कंठाजी कदम, पिलाजी गायकवाड व उदाजी पवार यांसही ता. १९-३-१७२७ रोजीं निकडीनें बोलाविलें.[१] कान्होजी भोसले चंद्रसेनाचे पाठीवर मालखेडाकडे होता, परंतु चंद्रसेन बाहेर आला नाहीं. तेव्हां निजामाची व त्याची बातमी राखून सर्वांनीं अमित्राचा उपमर्द करावा अशी शाहूची आज्ञा २१ मार्चची आहे. रघूजी भोसल्यासही शाहूनें पत्रदर्शनीं फौजेनिशीं बोलाविलें. परंतु शाहूची जमवाजमव होण्यास विलंब लागला, आणि निजामानें चहूंकडे दंगा उठवून दिला. त्याचा सरदार तुरुकताजखान यानें नगराकडे चाल करून शाहूकडील जाधव मंडळीचा समाचार घेतला. त्यांचे मदतीस रघूजी कदम यास जाण्याविषयीं शाहूनें १०-६-१७२७रोजीं लिहिलें. या वेळीं निजाम धारुरांत असून पावसाळ्यांत फौजा तयार करण्याची व्यवस्था शाहूनें सिधोजी निंबाळकरास २१-६-२७ रोजीं लिहिली. जुलई

कागद मननीय आहेत. पहिले दोन कागद फाल्गुन शु. ९ रजब ७ चे ता. १९-२ स. १७२७ चेच असले पाहिजेत. कारण स. १७२५ व १७२६ सालीं निजामाचें व शाहूचें सख्य होतें. खं. ३-१५च्या कागदांत उल्लेखिलेला ' छत्रपति स्वामी ' संभाजी असावा. शाहू व निजाम एकत्र पुण्यास येण्याचा संभव नाहीं. स. १७२७ च्या मार्चानंतर चिमणाजी दामोदर संभाजीकडे गेला असावा.

* का. सं. प. या १६७. १ शा. रो. २५, २६, १६२, ३९, ३२, ४०, १८७, ३३ व ३०; पे द. पृ. २३.

महिन्यांत निजामानें शाहूची पुष्कळच धांदल उडवून दिली. बाजीराव व सेनापति पावसाळ्यामुळें दिलाई करतील तर उभयतांनीं मोठ्या फौजेनें स्वामिकार्य करणें म्हणून शाहूनें त्यांस २-८-१७२७ रोजीं आज्ञा केली आहे. दसरा झाल्यावर मोहीम जोरांत चालू झाली. 'आपलाल्या फौजांनिशीं किलीचखानाचे पिछावर जाऊन पायबंद देऊन नतीजा पोंचवावा असी सर्व सरदारांस शाहूनें १३-१०-२७ रोजीं ताकीद दिली. 'संभाजी व निजाम एकत्र होऊन चालून येत आहेत, तरी सर्व गडकऱ्यांनीं सावध राहून बंदोबस्त ठेवावा असा सरहुकूम ७-११-२७ रोजीं काढण्यांत आला अत्यंत अडचणीच्या प्रसंगी बाजीराव व त्याचा भाऊ चिमणाजी बल्लाळ यांनीं निजामावर एकदम चहूंकडून जोराची मोहीम चालवून शाहूची बाजू अशा शिताफीनें संभाळिली, कीं या पेशव्यांच्या एकंदर कुटुंबावर त्याचा कायमचा विश्वास बसला; आणि इतरांपेक्षां यांचीच करामत जास्त अशी त्याची खात्री झाली. वास्तविक प्रतिनिधि, फत्तेसिंग भोसले, दाभाडे, कान्होजी भोसले, हेच सरदार आरंभीं वजनदार असून बाजीराव व चिमाणाजी आपा वयानें व अनुभवानें अप्रौढच होते. पांच सात वर्षें सर्वांचे उद्योगास विस्तृत क्षेत्र मिळालें, त्यांत शेवटीं विशेष करामत पेशव्यांची दिसून आली. इतरांचे अंगीं कर्तृत्व असतें तर बाजीराव मागें पडला असता, हेंही पुढील मोहिमेवरून चांगलें निदर्शनास येतें.

सरदारांस नुसत्या शाब्दिक आज्ञा सोडून युद्धाची सांगता होत नसते. नेटानें मोहीम अंगावर घेऊन तडीस नेल्याशिवाय दृश्य कार्य होत नाहीं. बाजीरावाविषयीं सुद्धां शाहू साशंक होता, तथापि तो व चिमाजी आपा यांनीं परिस्थिति ओळखून एकदम चहूं बाजूंनीं निजामावर लगट केली. डिसेंबर १७२७ चे सुमारास शाहू लिहितो. 'चिमणाची बल्लाळ कामगिरी जे. तांब्राचा विचार कळत नाहीं. निजाम नांदेडास आला. ऐवजखान जाऊन भेटला. जनवार्ता नाना प्रकारची आइकीजेते. तुम्हीं जाऊन यश संपादिलेंत, यामुळें त्यास एक प्रकार वाटलें आहे. तर तुम्हीं भरीं न भरणें. दुरून लांबणी बातमी राखीत जाणें. संपादिलें यश जतन करणें.[१]

१ पे. द. पृ. २३ व १२०; शा. रो. २९.

उगाच साहस केल्यानें अनिष्ट परिणाम होईल अशी भीति शाहूस होती, म्हणून त्यानें हें पत्र लिहिलें.

एप्रिल १७२७ च्या अखेरीस बाजीराव परत येऊन साताऱ्यास दाखल झाला. तेथें त्याचा मुक्काम दोन महिने शाहूजवळ होता. त्या अवधींत पुढील मोहिमेची व्यवस्था ठरवून पावसाळ्यांतच १ जुलई रोजीं बाजीराव बाहेर पडून निजामाचे पाठावर गेला. या वेळीं निजामानें अगदीं भीमेपर्यंतच्या प्रदेशांत सत्ता बसविली होती, तेव्हां बाजीरावानें गनीमी काव्यानें त्यास हैराण करण्याचें ठरवून, ऑगस्टांत पुणें प्रांतीं सर्व जमवाजमव करून ता. १३ सेप्टेंबरास दसरा झाल्यावर मोहीम सुरू केली, ती फाल्गुन अखेर संपली. स. १७२८ च्या २९ फेब्रुवारीस गुडीपाडव्याचे मुहूर्तावर पालखेड येथें निजामाचा पाडाव करून व मोठें यश संपादून बाजीरावानें शाहूचा जम पुनरपि यथास्थित बसवून दिला. बाजीराव हाच शिवाजीनंतर गनीमी काव्याचा उत्तरकालीन पुरस्कर्ता समजला जातो, त्या दृष्टीनें या पालखेडच्या मोहिमेचा विचार केला पाहिजे. कारण या प्रकरणाचीं सविस्तर वर्णनें उपलब्ध नाहींत. बाजीरावाचे मुक्काम व शकावली वगैरेंतले उल्लेख एकत्र करून या युद्धाचा चित्रपट बनविला पाहिजे. दसऱ्यानंतर पुणें सोडून उत्तरेस पुणतांबें येथें बाजीरावाचा मुक्काम १७·१० रोजीं होता. तेथून तो पूर्वेस निजामाच्या औरंगाबाद जिल्ह्यांत धुमाकूळ उडवीत डिसेंबरांत वासिम येथें गेला. तेथून त्वरेनें वायव्येस वळून खानदेशांत उतरून तापीच्या उत्तर तीरानें कोकरमंड्यावरून जानेवारीचे आरंभीं रेवातीरीं आला. तेथून पश्चिमेस गुजराथेंत महिनाभर महीकांठा प्रांतांत व्यार सोनगडकडे संचार केल्यावर, तो एकदम दक्षिणेस वळला. फेब्रुवारी १४ रोजीं त्याचा मुक्काम धुळ्याजवळ बेटावद येथें होता. तेथून दहा दिवसांचे आंत गोदा उत्तरभागीं पैठण जवळ पालखेड येथें त्यानें निजामास गांठलें, आणि एक आठवड्यांत निजामास शरण आणून शेवगांवास फायदेशीर तह करून घेतला. अशी ही पांच महिन्यांची मोहीम मराठ्यांचे इतिहासांत मोठी महत्त्वाची व एक प्रकारें क्रान्तिकारक आहे. मुक्काम ना. सा. रो० भा. २ यांत आहेत.

बखरींच्या वगैरे आधारानें निजामाशीं बिघाड होण्याचें कारण दिसतें तें असें. माळवा व गुजराथ प्रांत हातचे जाऊन मराठयांचे सरदार दक्षिणच्या सहा सुभ्यांतून आपले हक्क उघड वसूल करूं लागले, या योगानें निजामाच्या स्वतंत्रतेस मोठीच अडचण आली. बाजीराव एवढा पराक्रमी निघेल अशी त्यास कल्पना नव्हती. बाळाजी विश्वनाथाच्या व्यवस्थेनें व बाजीरावाच्या कर्तबगारीनें मराठमंडळांत जूट उत्पन्न होऊन त्यांस नवीन कार्यक्षेत्र मिळालें, आणि दुहीचें निरसन परभारें होऊं लागलें. महाराष्ट्र व कर्नाटक या दोनही प्रांतांत शाहूनें आपला अंमल चांगला बसविल्यामुळें, निजामाची पैदास बंद झाली. त्यामुळें बाजीरावाचा बंदोबस्त करणें त्यास प्राप्त झालें, आणि प्रतिनिधीच्या मार्फत त्यानें शाहूकडे नवीन डाव सुरू केला. मराठयांच्या वाढत्या शक्तीवर कायमचें दडपण बसविण्याकरितां निजामानें औरंगाबाद सोडून हैदराबादेस आपलें वास्तव्य केलें. तेथून कर्नाटकांत शिरून तिकडचा मराठ्यांचा उद्योगही हाणून पाडण्याचा त्याचा बेत होता. चौथाई सरदेशमुखीच्या निमित्तानें मराठे वाटेल तिकडे संचार करितात, तो त्रास मिटविण्या करितां त्यांच्या हक्कांबद्दल त्यांस रोख रक्कम देऊन आणि प्रतिनिधीस हाताशीं घेऊन बाजीरावास निस्तेज करण्याचा आणि अशा रीतीनें फूट पाडून मराठ्यांची शक्ति नाहींशी करण्याचा निजामाचा ह्या कारस्थानांत अंतस्थ व दूरदृष्टीचा घाट होता. परंतु हा घाट बाजीरावानें पूर्णपणें ओळखिला. आपल्या राज्याच्या मध्यभागीं हैदराबादेस निजामानें ठाणें दिलेलें बाजीरावास रुचलें नाहीं. डफ ह्मणतो, या वेळीं लढाईची चांगली संधि बाजीरावानें फुकट घालविली. हें डफचें म्हणणें चुकीचें आहे. बाजीरावानें निजामाचा डाव ओळखून त्याचा त्यानें लगेच कसा योग्य प्रतीकार केला, हें पुढें लवकरच दिसून आलें.

हैदराबाद राजधानींत मराठे चौथाई घेतात, त्याऐवजीं दुसरें उत्पन्न कांहीं देऊन मराठ्यांचें येणें जाणें त्या मुलखीं बंद करावें असें मनांत आणून, 'कांहीं द्रव्य व इंदापुराजवळ कांहीं मुलूख मराठयांस द्यावा,' असें बोलणें करण्याकरितां आनंदराव सुमंताचे मार्फत निजामानें आपले वकील प्रतिनिधीकडे पाठविले; आणि प्रतिनिधीस वऱ्हाडांत एक नवीन जहागीर दिली. शाहूनें मुत्सद्दी मंडळीचा विचार घेतला. बाजीरावास या मसलतीचा राग आला. ती आपल्या राज्यास व

मराठ्यांचे उद्योगास विघातक आहे, असें त्यानें साफ कळविलें. परंतु हें त्याचें म्हणणें शाहूला मान्य झालें नाहीं. 'निजाम दूर भागानगर प्रांतीं जाऊन राहतात तें एका अर्थी चांगलें आहे,' असें शाहूनें बाजीरावास सांगितलें. त्यावरून बाजीराव रुसून पुण्यास गेला. 'शाहूनें दादो भीमसेन ह्मणून हैदराबादकडील हक्कवसुलाच्या कामावर होता, त्यास आणवून, आकार व मोबदला महाल कोणते द्यावे हें पाहून, तसा मोबदला करून तहनामा ठरविला, आणि प्रतिनिधीचें मनोगत सिद्धीस नेलें. अशा प्रकारें स्वराज्याच्या हद्दीवर निजामाची सुव्यवस्था आपल्या हातानें प्रतिनिधीनें करून हिंदुपदपातशाहीच्या उद्योगास व्यत्यय आणिला. प्रतिनिधीचें कमकुवत राजकारण बाजीरावानें मान्य केलें नाहीं[१]

बाजीरावाचा पाडाव करण्यासाठीं निजामानें चंद्रसेनाचे मार्फत संभाजीस उठविलें आणि देशस्थ व कोंकणस्थ या दोन ब्राह्मण जातींत वैमनस्य उभारिलें. प्रतिनिधि देशस्थ व बाजीराव कोंकणस्थ. बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून पुष्कळसे कोंकणस्थ लोक राज्यकारभारांत पुढें आले, तेणेंकरून प्रतिनिधीसारख्या जुन्या पुरुषांचें माहात्म्य अर्थात् कमी झालें. याबद्दल प्रतिनिधीस वैषम्य वाटे, आणि तो हरतऱ्हेनें बाजीरावाचे उद्योग हाणून पाडी. शाहूला हे कावे समजत नव्हते असें नाहीं. तो प्रत्येकाची करामतही ओळखून होता. परंतु आपलें वजन कायम राखण्यासाठीं तो एकाचे विरुद्ध दुसऱ्यास चढवीत असे. दरबारांतच दोन पक्ष व फूट असल्यामुळें कोणत्याही कारस्थानास जोर आला नाहीं, आणि शत्रूंस मात्र उचल घेण्यास अवकाश मिळाला. प्रतिनिधीनें निजामाकडून आपणास वऱ्हाडांत जहागीर घेतली, ही एक प्रकारची लालूच होय; आणि त्यावरून बाजीरावाशीं त्याचा विरोध केवळ मतलबाचा होता, तत्त्वाचा नव्हता असें ह्मणतां येत येतें. राज्यकारस्थानाची वाटाघाट चालू असतां मराठे वकिलांनीं शत्रुपक्षाकडून अशा जहागिरी मिळविल्याचीं उदाहरणें अनेक आहेत. आनंदराव सुमंतानें व पुढें नानाफडणिसानें, निजामाकडून जहागिरी मिळविल्या शाहूच्या दरबारांतील दुफळीचा फायदा घेऊन निजामानें लगेच भयंकर कारस्थान रचिलें. चंद्रसेन जाधव, रावरंभा निंबाळकर, दाभाडे व पिलाजी गायकवाड हे सरदार त्यास थोडे बहुत वश होतेच. प्रस्तुत कोल्हापुरच्या संभाजीसही त्यानें

---

१ खं. २ पृ. ५५, शा. म. च. पृ. ५२–५३.

वश करून घेतलें.संभाजीस चिथवून त्याजकडून शाहूपाशीं राज्याचा निम्मा हिस्सा त्यानें मागविला. दोघां बंधूंचा हा कज्जा आपण मध्यस्थ होऊन तोडूं, असा बहाणा करून निजामानें चौथाई व सरदेशमुखी या हक्कांचा पैसा जप्तींत ठेविला. या उपक्रमानें शाहूसंभाजींचा भाऊबंदकीचा तंटा पुनः उपस्थित येऊन, लवकरच शाहूची सर्वथैव उचलबांगडी होण्याचा समय आला

संभाजी या राजकारणांत कां सामील झाला त्याची मीमांसा शाहूचे बखरींत दिलेली आहे. संभाजी नाराज होता, शाहू त्यास राज्याचा वांटा हवा तितका देईना. उत्तरोत्तर शाहूची भरभराट होऊन त्याचे सरदार गुजराथ, माळवा वगैरे प्रांतांत कारभार करूं लागले, त्याजबद्दल वैषम्य वाटून आपली हीन स्थिति सुधारण्यासाठीं संभाजीनें आपला प्रधान केशव त्र्यंबक यास चंद्रसेनाकडे पाठवून त्याचे मार्फत निजामाशीं मसलत केली. तदनुसार संभाजी आपली फौज व सरदार यांजसह निजामास जाऊन मिळाला. शाहूनें संभाजीस बोधपर पत्र लिहून त्याची पुष्कळ कानउघाडणी केली. त्याचा उपयोग न होतां निजाम व तो आपल्या साथीदारांसह शाहूच्या प्रदेशावर चालून आले.

सन १७०८ त राज्याभिषेक झाल्यापासून सुमारें १८-२० वर्षें अनेक संकटांतून शाहूनें आपला निभाव केला. बाळाजी विश्वनाथानें दिल्लीच्या सनदा फडकावीत आणिल्या, पण त्यांचा उपयोग अद्याप फारसा झाला नाहीं. वारणेच्या पलीकडील प्रदेश अगोदरच त्यानें संभाजीस देऊन टाकिला होता. म्हणजे पुणें-साताऱ्याचे दरम्यान चार दोन तालुक्यांपलीकडे शाहूचें राज्य असें कांहींच नव्हतें. त्यांतही निजामानें पूर्वोत्तर भागीं आटोप करून आपली हद्द पुण्यास आणून भिडविली,तेव्हां मुलुखगिरीसाठीं शाहूनें माळवा व कर्नाटक या प्रांतांत उद्योग आरंभिला. पैकीं उत्तरेंतील उद्योग अनुभवी सल्लागारांनीं नापसंत केला, तेव्हां कर्नाटकांत शाहूनें लागोपाठ दोन वर्षें हें काम करविलें. त्या संधीचा फायदा घेऊन इकडे निजाम, संभाजी व चंद्रसेन यांनीं शाहूच्या विरुद्ध जबरदस्त कारस्थान रचिलें. त्यायोगें सन १७२७ च्या उन्हाळ्यांत शाहूचे डोळ्यांत आपल्या ह्या भयंकर स्थितीचा लख्ख उजेड पडला. त्या वेळची त्याच्या मनाची तारांबळ मागें दाखविलेल्या कागदांत व्यक्त झालीच आहे. इतक्या दिवसांचा उद्योग फुकट जाऊन पुनः आपल्या घरगुती तंट्याचा निकाल निजामानें आपणाकडे

घेतला ही गोष्ट शाहूचे मनास अतिशय झोंबली. बाजीराव तर प्रथमपासूनच निजामाचा हा कावा शाहूस कळवीत होता. कर्नाटकांतील मोहीम फसल्याबद्दल प्रतिनिधि शाहूच्या मनांतून पुष्कळ उतरलाच होता. इतक्यांत निजामानें केलेला बखेडा प्रत्ययास आल्याबरोबर प्रतिनिधीच्या कर्तृत्वासंबंधानें शाहूचा आदर मावळला, आणि आलेल्या अरिष्टाचें निरसन करण्यासाठीं शाहूनें बाजीरावास लगेच तयारी करण्यास सांगितलें. सन १७२७ च्या ऑगस्टांत बाजीरावानें चहूंकडून पाठलाग सुरू करितांच संभाजी घाबरून मागें आपल्या प्रदेशाकडे राहिला. निजामास त्याची मदत झालीच नाहीं. पालखेडावर निजामाचा कोंडमारा होण्यापूर्वींच संभाजी स. १७२८ चे जानेवारीचे सुमारास ‘ दक्षिणेस आपले स्थळीं कोकटनुरास गेले. ’ खं. ८-९४ चें संभाजीचें पत्र २४·२·२८ चें मोहिमेंतून आल्यावरचें आहे.( भा. व. श. )

७. **पालखेडावर निजामाचा कोंडमारा** ( फे. १७२८ ).—पेशव्याची मुख्य फौज व सरदार या वेळीं माळव्यांत गुंतलेले होते. निजामानें आपली तयारी साखरखेड्याच्या लढाईपासून अत्यंत काळजीनें केली होती संभाजी आपल्या फौजेसह त्यास येऊन मिळाला होता. अशा बिकट प्रसंगीं बाजीरावानें निजामाचा पाडाव करण्याचा जो उद्योग केला, त्यामुळें त्याच्या कर्तृत्वाची छाप मराठमंडळावर बसली, आणि शत्रुसुद्धां त्यास वचकूं लागले. शाहूच्या मनांत आपण होऊनच निजामावर चालून जावें असें होतें, परंतु संभाजीवर चालून गेल्यास त्याची आपली बरोबरी होते; प्रत्यक्ष बादशहावर चालून जाणें आपणास योग्य होईल, अशा सरदारांनीं शाहूची समजूत घातली. ‘ शाहू बादशहाचा व बादशाही अंमलदारांचा मिंधा असल्यामुळें मोगल वर स्वतः चाल करून जाण्यापेक्षां सरदारांनाच पाठविणें त्याला योग्य दिसलें ’ ( राजवाडे ). बाजीरावाचे हाताखालीं काम करण्याविषयीं शाहूनें सरदारांस निकडीचे हुकूम सोडिले. प्रतिनिधि मात्र या तयारींत सामील झालेला दिसत नाहीं. उलट निजामानें त्यास आपला हस्तक बनवून शाहूस असें कळविलें, कीं ‘ आमचा उपक्रम सर्वस्वी तुमच्या हिताचा आहे. कोंकणी ब्राह्मणांनीं तुह्मांस ग्रासून टाकिलें आहे, त्यांच्या ताब्यांतून तुह्मास मुक्त करावें एवढाच आमचा हेतु. तुमचे मोकासदार दूर करून त्यांचे जागीं संभाजीचे कामगार नेमिले यांत गैर

कांहीं नाहीं. तुमच्याच तर्फेनें काम करण्यास तूर्त आह्मी संभाजी यांस नेमिलें आहे. एकदां कोंकणी ब्राह्मणांचा निकाल लागला ह्मणजे आपण आपले पसंतीचे कामगार वाटेल ते नेमावे.' निजामानें दाखविलेली शाहूच्या हिताची ही कळकळ काय किमतीची होती हें सांगण्याची जरूर नाहीं.

एकदम समोरासमोर युद्ध न करितां निरनिराळ्या ठिकाणीं हुलकावण्या दाखवून शेवटीं कोठें तरी शत्रूस पेंचांत पकडावयाचें, असा बेत बाजीरावानें आरंभापासूनच करून त्या धोरणानें मोहीम चालविली. सेनानायकाचें धोरण व युद्धाचे डावपेंच बाजीरावाचे अंगीं कसे होते हें या मोहिमेंत व्यक्त झालें. प्रथम औरंगाबाद जिल्ह्यांत शिरून जालना प्रांत त्यानें उद्ध्वस्त केला. नोव्हें-बरच्या आरंभीं निजामाचा सरदार ऐवजखान यानें चिमाजी आपावर चाल केली. त्याजबरोबर जी चकमक झडली तिचाच उल्लेख मागें केला आहे. नंतर बाजी-राव आग्नेयीस माहूरकडे वळला. तेथून ताबडतोब पुनः औरंगाबादेकडे येऊन 'बऱ्हाणपुरावर जाऊन तें शहर जाळून टाकतों,' असा पुकार करून तो लूट करीत खानदेशांत शिरला. तेव्हां तिकडचा बचाव करण्यासाठीं निजाम व ऐवज-खान ताबडतोब बऱ्हाणपुराकडे गेले. बाजीरावानें नुसती हूल दाखविण्याकरितां एक टोळी बऱ्हाणपुराकडे रवाना केली, आणि आपण मुख्य फौजेनिशीं नर्मदे-वरून पश्चिमेकडे वळून लूट करीत गुजराथेंत उतरला. गुजराथचा सुभेदार सर-बुलंदखान व निजाम यांचें वाकडें होतें. सरबुलंदखानास बाजीरावानें असें कळ-विलें, कीं 'आमचा व निजामाचा स्नेह होऊन त्याच्याच सांगण्यानें आह्मी गुजराथेवर आलों आहों.' इकडे निजाम बऱ्हाणपुरास येतांच बाजीरावानें आप-णास फसविलें असें पाहून रागारागानें तो एकदम पुण्यावर चालून येण्यासाठीं दक्षिणेस भीमेवर पेडगांवपावेतों आला. भीमेच्या अलीकडे येऊन त्यानें इंदापुर काबीज केलें.[१] मोगलांच्या या स्वारीनें शाहू अगदीं गडबडून गेला आणि देवजी सोमवंशी, साबाजी निंबाळकर वगैरे मंडळीस धीर देऊन तो निजामाचा प्रती-कार करीत होता. पाटस येथें राणोजी शिंदे होता, तो तें ठाणें सोडून जाईल तर सर्व कारभार आटपेल, असें वाटून बाजीरावानें ठासून राहण्याबद्दल सन १७२८ च्या फेब्रुवारींत राणोजीस लिहिलें. 'दहा पांच हजार फौज भीमेअली-

१ शा. रो. ३४ व ३१; ए. टि. २·३५ ( ता. १९·२·१७२८ ).

कडे येईपर्यंत ठाणें सोडीत नाहीं ' असें सांगून, राणोजीनें आपल्या पेंचाचें वर्णन बाजीरावास लिहिलेलें अप्रतिम आहे. त्यावरून बाजीरावाचा व या सरदाराचा ओढा व्यक्त होतो.

निजाम पुण्यावर आला ही बातमी बाजरिावास गुजराथेंत कळतांच, करवंद-बारीनें घाट चढून, त्यानें गोदावरीच्या पूर्व तीरावरचे वैजापुर व गांडापुर हे निजामाचे परगणे लुटून फस्त केले. ही बातमी निजामास अहंमदनगरास कळली. तेव्हां लगेच पुण्याचा रोख सोडून तो गोदावरी उतरून पूर्वेकडून बाजीरावास आडवा झाला. तेव्हां बाजीरावानें पैठण व औरंगाबादचे मध्यें पालखेड नजीक एका अत्यंत अडचणीच्या जागीं निजामास गांठून सभोंवारच्या प्रदेशांतील दाणावैरण सर्व जाळून शत्रूस पाणी सुद्धां मिळण्याची बंदी केली, (२५ फेब्रु. १७२८). इकडून शाहूनेंही शितापी करून निजामाच्या पाठलागासाठीं प्रतिनिधीस रवाना करून त्याजबरोबर दौलतराव शिर्के व महादाजीराव निंबाळकर यांस पाठविलें. कान्होजी भोसले कदाचित् कुचराई करील तर त्यासही व त्याचा हस्तक बापूजी सोनाजी दिघे यास शाहूनें दटावून लिहिलें आणि सर्वांनीं बाजीरावाचा पाठपुरावा करण्याविषयीं निक्षून हुकूम सोडिले[1]. पण लढाई यापूर्वीच संपली होती.

संभाजी व चंद्रसेन याजकडील मराठी फौज ' जशास तसें ' या न्यायानें, बाजीरावाशीं लढून आपल्या उपयोगी पडेल अशी निजामास आशा होती, ती सफळ झाली नाहीं. त्यांची व निजामाची पुष्कळ बाचाबाच झाली. ' पुढें चालणें घडेना; तेथेंच मुकाम करून राहणें तर पाणी सुद्धां नाहीं; असे बहुत घाबरे झाले. ' तेव्हां ऐवजखानामार्फत निजामानें तहाचें बोलणें लाविलें. तें ऐकिल्यावर प्रधान व सरदार यांनीं एकविचारें करून सांगून पाठविलें कीं, 'दोन मातबर कारभारी ओलिस पाठवून द्यावे, म्हणजे पाण्याची वाट देऊन मुक्काम करावितों. ' त्याप्रमाणें मुंगीशेवगांवच्या बाजूस पाण्याचे जागीं निजामास बाजीरावानें मोकळीक दिली; आणि तेथें तहाच्या अटी कळविल्या त्या अशा:—

१ संभाजीस आपल्या हवालीं करावें; २ मोगलांचे सहा सुभ्यांवर मराठ्यांचे हक्क सुरळित चालवावे; आणि ३ पुनः या हक्कांस हरकत न व्हावी

[1] शा. रो. ३५-३८.

म्हणून ठिकठिकाणीं तटबंदीच्या जागा आहेत त्या मराठ्यांचे हवाली कराव्या. निजामानें पुढच्या दोन अटी कबूल केल्या, मात्र पहिली संभाजीची मान्य केली नाहीं. त्या संबंधीं वाटाघाट होऊन संभाजी पन्हाळ्याकडे गेलाच होता, त्याजबद्दल पाहिजे ती व्यवस्था शाहूनें करावी असें ठरावांत आलें. याप्रमाणें तह पुरा होऊन दोनही पक्षांचे लोक आपापल्या ठिकाणीं गेले. मुंगीशेवगांवचा हा तह ता. ६ मार्च १७२८ रोजीं झाला. याच सुमारास बारामावळें निजामाकडून रंभाजी निंबाळकरामार्फत पेशव्यांस मिळालीं.[१] संभाजीस कृतकर्माचा चांगलाच पश्चात्ताप झाला. तह झाल्यावर निजामानें सर्व सरदारांस वस्त्रें, जवाहीर, मेजवानी वगैरे दिली. भेटी झाल्या. महाराजांस पोषाख, जवाहीर, हत्ती, घोडे नजर दिले निजामासही उलट पोषाख बाजीरावानें दिले. बाजीरावादि मंडळी परत येतांच महाराजांनीं सामोरे जाऊन सन्मान करून स्वतः सर्वांचा गौरव केला. युद्धकलेच्या संबंधानें निजाम हा तत्कालीन योद्ध्यांत चतुर गणला जात असमुळें त्याला नरम आणिल्यानें बाजीरावाचा लौकिक एकदम वाढला.

पालखेडवरील विजयाचा फायदा घेऊन निजामास कायमचा जाग्यावर बसविण्याचा उद्योग या वेळीं झालाच नाहीं. वास्तविक एवढ्या या युद्धांत निजामाचा पाडाव झाला नाहीं. तो सर्वस्वी शाहूस उखडून टाकणार होता, तितक्यापुरता त्याचा प्रतीकार झाला. आरंभांतच निजामाचा पाडाव करण्याकरितां ही मोहीम् स्वीकारिलेली नव्हती. चंद्रसेन व संभाजी यांस उठवून निजाम शाहूचे राज्यावर चालून आला, त्यापासून तूर्त आपला बचाव करणें एवढेंच कर्तव्य शाहूनें मानिलें होतें. म्हणून या प्रसंगीं किंवा पुढेंही बाजीरावानें निजामाचा कायम पाडाव कां केला नाहीं हा प्रश्नच मुळीं अवास्तव ठरतो. शाहूचे मनांत निजामास नेस्तनाबूद करावयाचें नव्हतें, आणि शाहूची आज्ञा झुगारून केवळ स्वतःच्या मुखत्यारीनें वागण्याची बाजीरावास इच्छा असली तरी ताकद नव्हती. शाहूनें आंखून दिलेल्या मर्यादेंत हिंदुपदपातशाहीचा उद्योग बाजीराव शक्य तितका करीत होता. निजामाशीं शेवगांवावर एकवार तह झाल्यावर, पुनः त्यानें दाभाड्याचे वगैरे मार्फत आगळिक केली असतांही सल्ला बिघडून निजामाचे वाटेस जाणें शाहूनें कैकवर्षें पावेतों मंजूर केलें नाहीं. ‘ नबाबाचा

१ खं. ६-२७.

व स्वामींचा सल्ला आहे, यास्तव वऱ्हाड, देवगड चांदा व भागानगर या प्रांतीं आपल्या फौजा गेल्यानें नबाब अजुर्दा होऊन, सल्ल्यास विक्षेप होतो, यास्तव त्या प्रांतीं स्वारीस जाऊंच नये,' अशी आज्ञा शाहूनें आपल्या प्रमुख सरदारांस ह्मणजे प्रतिनिधि, फत्तेसिंग भोसले, कान्होजी भोसले, बाजीराव प्रधान व सरलष्कर इत्यादिकांस ता. १५-१-१७२९ रोजीं केली आहे. ह्मणजे या सर्व सरदारांनीं मराठशाहीचा फैलाव सर्व बाजूंस करण्याचा बेत ठरविला असतांही केवळ निजामास दुखवावयाचें नाहीं या भावनेनें शाहूनें त्यांस आवरून धरिलें. स. १७३६ त बाजीरावानें दिल्लीकडे चाल केल्यावर निजामानें त्यास पायबंद दिला, तेव्हांच पुनरपि बाजीरावानें त्यास नरम केलें. परंतु स. १७३६ पावेतों शाहूचा निश्चय, 'निजामाचा आमचा स्नेह, या स्नेहास अंतर होई ऐशी गोष्ट न करणें, घडीचा विलंब न लावणें,' इतका सक्त होता. यावरून निष्कर्ष इतकाच कीं बाजीरावाच्या हयातींत मराठशाहीचीं धोरणें ठरविण्याचें स्वातंत्र्य बाजीरावाकडे नसून तें काम शाहूच मुखत्यारीनें करीत होता.(शा. रो. १८८,१८९.)

मराठ्यांचा उत्कर्ष गनिमी काव्याच्या पद्धतीनें झाला हें शिवाजीच्या व राजारामाच्या हकीकतींत स्पष्ट आहे. या गनिमी पद्धतीचा अंगीकार व परिपोष पुढें बाजीरावानें केला, आणि त्यासाठीं स्वतःचे नवीन साथीदार त्यानें तयार केले. चाळीस वर्षेपावेतों ह्याच पद्धतीनें मराठ्यांनीं मुलूखगिऱ्या केल्या. या कामीं बाजीरावाचा पक्का चेला मल्हारराव होळकर होय. गुजराथ, माळवा, वऱ्हाड नागपुर वगैरे प्रांतांत मराठ्यांचा संचार गनिमी काव्याच्या जोरावर झालेला आहे. या पद्धतींत निष्णात ठरले ते सरदार पुढें आले व जे कमकुवत ठरले ते मागें पडले. बाजीरावाचें या पद्धतींतील नैपुण्य प्रथम पालखेडच्या मोहिमेंत निदर्शनास येऊन, त्याची छाप तेव्हांपासून इतर सरदारांवर बसली. प्रतिनिधि, दाभाडे, चिमणाजी दामोदर, सुलतानजी सरलष्कर वगैरे जुनी मंडळी बाजीरावाच्या पराक्रमानें व त्याच्या उत्तरेकडील नवीन उठावानें आपोआप मागें पडली. त्यांजशीं समोर विरोध केल्यानें शाहूचें मन द्विधा होऊन, त्यास त्यांची भीड तुटत नाहीं, तेणेंकरून आपलेंच कारस्थान बिघडतें, ही खुणेची गोष्ट बाजीरावानें मनांत ठेवून इतःपर त्यानें या मंडळीचा व दक्षिणेकडील कारभाराचा नाद साफ सोडून दिला. पुढील उद्योगांत त्यानें शिंदे,

होळकर, पवार इत्यादि आपल्या भरंवशाची नवीन मंडळी हाताशीं घेतली, तेणेंकरून जुने सरदार मागें पडले. शाहूचें धरसोडीचें पातशाही धोरण यास कारण आहे. या धोरणानुसार प्रत्येक इसम शाहूचा हुकूम मिळवून आपापल्यापरी निरनिराळ्या स्थळीं उद्योग करूं लागला. त्या सर्वांस एकसूत्री निश्चित धोरण शाहूनें वेळींच लावून दिलें नाहीं म्हणून ते उद्योग विसकळीत दिसतात. उत्तरेंत शिंदे, होळकर, पवार, गुजराथेंत दाभाडे व गायकवाड, दक्षिणेस संभाजी व त्याच्या पदरचे सरदार आणि शाहूचा फत्तेसिंग भोसले, तसेच कोंकणांत आंग्रे, सीदी, ब्रह्मेंद्रस्वामी, आणि पूर्वोत्तर दिशेनें निजाम वगैरे परस्थ, अशांचीं अनेक मचत्त्वाचीं प्रकरणें व कारस्थानें केव्हां एका काळीं, तर केव्हां पृथक्पणें चालू होतीं. त्या सर्वांत बाजीरावाचें अंग होतेंच असें नाहीं. सबब बाजीरावाच्या हकीकती केवळ कालक्रमानें दाखल करणें शक्य नाहीं. योग्य समजुतीकरितां एक एक प्रकरण स्वतंत्रपणें दिलें आहे. निजामाच्याच झगड्याचें एक अंग संभाजीचा पाडाव होय, त्याचें वर्णन पुढील प्रकरणीं देण्यांत येईल.

८. **रघूजी भोसल्याचा उदय.**—बादशाही कैदेंतून सुटून शाहू दक्षिणेंत आला, तेव्हां त्यास पहिली मोठी मदत परसोजी भोसल्याची मिळाली· ती मदत मिळाली नसती तर शाहूचा जम बहुधा इकडे बसला नसता. अर्थात् परसोजीचें घराणें शाहूच्या कृपेनें उदयास येऊन मराठशाहीच्या इतिहासांत त्यानें मोठीच भर घातलेली आहे. पेशव्यांचे विरुद्ध वागणाऱ्या सरदारांत हे नागपुरकर भोसले अग्रगण्य होत. पुढील संदर्भासाठीं या घराण्याची आरंभींची माहिती येथेंच देणें जरूर आहे.

परसोजी भोसले शिवाजीचे तालमींत तयार झालेला असून, वऱ्हाड व गोंडवण प्रांतांत त्यानें मराठ्यांचा अंमल बसविल्यामुळें राजारामानें स. १६९९त त्यास सेना–साहेबसुभा हा किताब देऊन वऱ्हाडांत ठेविलें. तिकडे त्यानें वणी तालुक्यांत भाम येथें आपलें मुख्य लष्करी ठाणें केलें. नागपुरास येण्यापूर्वीं भाम हेंच त्याचें मुख्य ठिकाण होतें. स. १७०७ त परसोजी शाहूस मिळाल्यानें त्या घराण्यावर शाहूची मर्जी अखेरपर्यंत विशेष होती. परसोजी स. १७०९-१० त कृष्णा वेण्यासंगमीं मरण पावल्यावर त्याचा अधिकार

कान्होजीस मिळाला, तो त्यानें २० वर्षे ह्मणजे १७२९ पावेतों चालविला. कान्होजीनें वऱ्हाडांत अंमल बसवून गोंडवण व कटक या प्रांतांवर स्वाऱ्या केल्या, आणि अनेक प्रकरणांत शाहूस मदत केली. या घराण्याचा उत्कर्ष होण्यास सर्वस्वी शाहू कारण होता, पेशव्यांचें त्यांत बिलकुल अंग नव्हतें; ह्मणून या भोसल्यांनीं पेशव्यांस कधींच जुमानिलें नाहीं. ही उभयतांतील चुरस मराठशाहींत बहुधा सदैव कायम होती. बाळाजी विश्वनाथ दिल्लीस गेला तेव्हां त्याजबरोबर संताजी व राणोजी शाहूच्या हुकुमानें गेले होते. तेथें लढाईत संताजी मारला गेला. तेव्हां बादशहानें नुकसानभरपाई देऊन राणोजीस ' सवाई संताजी ' हा किताब दिला. कान्होजीस प्रथम मुलगा नव्हता, ह्मणून चुलत बंधु बिंबाजी याचा मुलगा रघूजी यास त्यानें जवळ ठेवून वाढविलें. पुढें कान्होजीस औरसपुत्र झाला, तेव्हां रघूजीवरील त्याचें लक्ष कमी झालें. नंतर रघूजीनें साताऱ्यास येऊन रामाजी नारायण कोल्हटकराचे शिफारसीनें शाहूची मर्जी संपादिली. एका प्रसंगीं शाहू शिकारीस गेला असतां रघूजीनें तलवारीनें वाघाला ठार मारुन शाहूचा जीव बांचविला, तेव्हांपासून शाहूचा लोभ त्याजवर विशेषच जडला.

वंशावळ. ( ऐ. टि. १-५८, ना. भो. मुधोजी. का. प. ५०.)







यामुळें पुढें भोसल्यांचे घरांत कलह सुरू झाले. पूर्वी मसूरचे मुक्कामीं बाळाजी पंडित प्रधान यांचे विद्यमानें शाहूनें स. १७१३ चे सुमारास कान्होजीस सरंजाम करून दिल्हा होता, त्यांपैकीं पुढें शाहूनें दोन भाग कान्होजीस देऊन तिसरा भाग राणोजी व रघूजी या दोघांस ठरवून दिला, त्यानें कान्होजीचें समाधान झालें नाहीं. आपल्या सरंजामाचा निकाल करून द्या, असा लकडा कान्होजीनें शाहूकडे जोरानें लाविला होता. तेव्हां पराभव संवत्सराचे मार्गशीर्षात ह्मणजे नोव्हेंबर १७२६ त त्याच सरंजामाचे तीन हिस्से कान्होजीस व चवथा हिस्सा राणोजी व रघूजी या दोघांस शाहूनें विभागून दिले; आणि पुढें लवकरच कान्होजीस दर्शनास बोलावून त्रिवर्गांची गोडी करून, राणोजी

व रघूजी यांनीं कान्होजीबरोबर राहून स्वामिकार्य निष्ठेनें करावें असें शाहूनें ता. १८ ५·१७२७ रोजीं लेखी ठरवून दिलें.[१]

इकडे बाजीरावानें माळव्याचा उद्योग चालविला, तेव्हां त्यास वऱ्हाडांतून भोसल्यांचे पाठबळाची जरूर लागली. परंतु कान्होजी त्याच्याशीं फटकून वागत असल्यामुळें राणोजी ऊर्फ सवाई संताजी यास वश करून त्याजबरोबर ता. ७·१०·१७२८ रोजीं बाजीरावानें करार केला, कीं राणोजीनें फौज घेऊन चिमणाजी आपास माळव्यांत सामील व्हावें; आणि तसें केल्यास उभयतांनीं एकमेकांचे मुकाशांत उपद्रव करूं नये. पेशव्यांच्या मोकासबाबी वऱ्हाडांत व भोसल्यांच्या दक्षिणेंत पेशव्यांचे हद्दींत असत. हा राणोजीनें बाजीरावाशीं केलेला करार कान्होजीस बिलकूल आवडला नाहीं. त्याजला भेटून तंटा मिटवावा ह्मणून बाजीरावानें आपले दोन सरदार कान्होजीकडे पाठविले असतां, त्यांजबरोबरच कान्होजीनें कलह केला, तेव्हां ही तक्रार बाजीरावानें शाहूकडे नेली. इकडे कान्होजीनेंही बापूजी सोनाजी दिघे यास शाहूकडे पाठवून बाजीरावानें वऱ्हाडांत येण्याचें प्रयोजन नाहीं अशी आपलीही तक्रार शाहूस कळविली. त्यावरून ' कान्होजी हुजूर दर्शनास येतात, तुह्मी वऱ्हाडप्रांतीं धामधूम न करणें, ' अशी ताकीद ता. ११·२·१७२९ रोजी शाहूने बाजीरावास दिली. या वेळीं बाजीराव व कान्होजी यांचा तंटा त्रिंबकराव दाभाड्याप्रमाणेंचा विकोपास जाण्याचे अगदीं बेतांत होता, परंतु याच संधीस कान्होजीवर शाहूची इतराजी होऊन तो कैदेंत पडला आणि कान्होजीपुरता हा तंटा संपला.[२]

रघूजी पराक्रमी निघाला. ' राणोजीनें आपलें कुल काम रघूजीचे गळां घातलें. कान्होजींनीं शाहू महाराजांची मर्जी बिघडवून चित्तींचे उतरले. वऱ्हाडप्रांतीं बदफैलीवर जुलूम करून महाराजांशीं बंडखोरी करूं लागले. सबब त्यांचे पारिपत्यास रघूजीस पाठविलें. काबीज करून साताऱ्यास घेऊन आले. तेथेंच कान्होजी कैदेंत वारले. रघूजीस सेना साहेब सुभा पद दिलें. कान्होजी व रघूजी यांचे युद्धाचा हा प्रकार सन १७३४त अगर त्यापूर्वी कांहीं काळ झालेला दिसतो. रघूजीनें कान्होजीच्या दोघां मुसलमान सरदारांस लढाईत पकडून

---

१ शा. रो. १५७,२३,२४,२७, १६३, १११ व ४१; पे. द. पृ. १८५;
२ तह व करारमदार पृ २२०.

कैदेंत ठेविलें हें शाहूस मंजूर झालें नाहीं. त्यानें ता. २३-६-१७३४ रोजीं रघूजीस आज्ञापत्र पाठवून त्या सरदारांस साताऱ्यास आणविलें, तसेंच कान्होजीचा कबिला ज्या ठिकाणीं होता, त्यास रघूजीनें मोर्चे लाविले, त्याबद्दल शाहूनें रघूजीस २०-११-१७३४ रोजीं मनाई हुकूम पाठविले. कान्होजीवर जरी शाहूची इतराजी झाली, तरी त्याचे माणसांवर व साथीदारांवर दुसऱ्यानें सूड घ्यावा ही गोष्ट शाहूस कधींच संमत नसे. काय शिक्षा करणें ती आपण करूं, इतरांनीं त्यांत दरम्यानगिरी करूं नये, ही शाहूची भावना अनेक प्रसंगीं व्यक्त झाली आहे. शाहूचा मृदु स्वभाव यांत दिसून येतो. रघूजी सुद्धां लवकरच धन्याचे हुकूम धाब्यावर बसवूं लागला, त्याबद्दल शाहूनें सन १७३५ पासून अनेक वेळां त्याची कानउघाडणी केलेली आहे. बापूजी सोमाजी दिघे उर्फ बापूजी प्रभु हा गृहस्थ भोसल्यांचे पदरीं पुष्कळ वर्षें जबाबदारीनें कामें करीत होता हेंही अनेक कागदांवरून दिसून येतें.[१]

# प्रकरण आठवें.

## दोघां राजबंधूंचा समेट.

### स १७३०-३१.

१. संभाजीचा पाडाव ( मार्च, स. १७३० ).
२. शाहूसंभाजीची भेट ( २७ फेब्रुवारी, १७३१ ).
३. वारणेचा तह ( २१ एप्रिल, १७३१ ).
४. संभाजीचा पुढील आयुःक्रम.

**१ संभाजीचा पाडाव** ( मार्च, १७३० ).—बाजीरावाच्या पूर्व कारभाराचे दोन भाग मागें सांगितले, त्यांतील पहिल्यांत निजामाचा पाडाव, संभाजीचा बंदोबस्त व राज्योद्योगास अडथळा आणणाऱ्या सेनापतीस ताळ्यावर आणणें हीं तीन प्रकरणें मुख्य होत.

---

१ ना. भो. का. प. ले. १ व ऐ. टि. १-५८; शा. रो. २७०, २२२, २६, ३७, ४१, १६४–१६६.

शाहू दक्षिणेंत आल्यावर त्याचें चुलत बंधूशीं जें युद्ध सुरू झालें तें तेवीस वर्षांनीं स.१७३१ त कऱ्हाडनजीक कृष्णेच्या कांठीं उभय बंधूंची भेट होऊन संपलें. या अवधींत त्या युद्धाचीं कसकशीं स्थित्यंतरें होत गेलीं, त्यांचें वर्णन वेळोवेळीं आलेंच आहे. बाळाजीच्या अकालीं मृत्यूनें तर शाहूच्या शत्रूंस पुनः जोर आला असता, परंतु बाजीरावाचा पराक्रम चमकूं लागून चार पांच वर्षांच्या अवधींत शाहूचे शत्रु नरम झाले. १७२८ तील मुंगीशेवगांवच्या तहानें संभाजीची बाजू अगदींच बसली. त्याचा साह्यकर्ता रामचंद्रपंत अमात्य गेल्यावर भगवंतराव अमात्यावरही त्याचा विश्वास बसला नाहीं. सन १७२३ पासून संभाजी व जिजाबाई भगवंतरावास गोंजारून आपल्या बाजूस ठेवण्याचा प्रयत्न करीत होतीं, परंतु भगवंतरावाचें मन त्यांजविषयीं अनुरक्त नव्हतें. बाजीरावानें निजामास तंबी दिल्यावर, संभाजी उघडा पडला, आणि भगवंतराव अमात्य व उदाजी चव्हाण हिंमतबहाद्दर यांच्या मदतीनें त्यानें शाहूशीं कांहीं काळ विरोध चालविला. ' तुम्हीं परपक्ष अवलंब केला, ' असें संभाजी भगवंतरावास लिहितो. स. १७३० त चिमाजीआपा गुजराथेंत चौथाईचा अंमल बसवीत असतां, इकडे संभाजी उदाजी चव्हाणाची मदत घेऊन शाहूवर चढाई करून येत होता, त्याचा समाचार प्रतिनिधीनें घेतला. हा प्रकरा आतां सांगावयाचा आहे.[१]

अथणीकर उदाजी चव्हाण याची हकीकत मागें थोडी येऊन गेली आहे. शाहूला तो बंडखोर वाटे, परंतु संभाजीचा तो केवळ मुख्य साह्यकर्ता होता. त्यास प्रथम रामचंद्रपंत अमात्यानें वाढविलें. तो बलाढ्य व पुंड असून त्याच्याच आधारावर संभाजीनें शाहूशीं थोडीबहुत धडपड चालविली होती. बाजीरावानें त्यास चांगलें धाकांत ठेविलें होतें. ' उदाजी चव्हाणाची बातमी राखोन वळवळ करील तर नतीजा देणें ' असें ८·३·१७२८ रोजीं शाहू लिहितो. यानंतर लवकरच उदाजी शाहूस शरण आला. सन १७२९ ता. ६ जानेवारीस शाहूनें त्यास लिहिलेल्या पत्रांत खालील मजकूर आहे. ' बोलीप्रमाणें वर्तावयास अंतर न पडे म्हणून लिहिलें, त्यावरून स्वामी संतोष पावले. तुम्ही एकवचनी आहां, तुह्मां पासोन बोलिले वचनास वर्तावयास अंतर न पडे, हा निशा आहे· इमान श्रींचा बेलभंडार पाठविला.' परंतु लगेच स.१७२९ त

१ खं. ८·८५,९२,९४,९५,९६–१०१, व १०५–११०.

बाजीराव व चिमाजी आपा दोघेही बाहेर गेलेले पाहून उदाजी चव्हाणानें वारणेच्या तीरीं येऊन मुलूख लुटण्यास आरंभ केला. शिरोळचे ठाण्यांत राहून बाहेरच्या मुलखास तो उपद्रव देऊं लागला. एके दिवशीं शाहू त्या बाजूस शिकारीस गेला असतां, चव्हाण जवळच आसपास आहे असें कळलें. त्यावरून अभय देऊन शाहूनें त्यास भेटीस बोलाविलें. भेट होऊन तो परत गेला. पुढें एके दिवशीं शाहूला मारण्यासाठीं आलेले चार मारेकरी जंगलांत भेटले. चव्हाणाकडून किंवा संभाजीकडून ते आले होते असें कळलें. तेव्हां संभाजीचें व चव्हाणाचें पारिपत्य करण्याचा विचार करून शाहूनें त्यासाठीं मोठी तयारी केली. ' स्वामी पन्हाळे प्रांतीं मोहिमेस जातात,' असें लिहून, शंभुसिंग जाधव, दावलजी सोमवंशी, सिधोजीराव निंबाळकर, सखोजी आंगरे, बाजीराव प्रधान, पिलाजी जाधव या सर्वांस पत्रें लिहून मोहिमेस बोलाविलें. हीं पत्रें ऑक्टोबर १७२९ पासून १६ फेब्रुवारी १७३० पावेतोंचीं आहेत. त्यावरून पुढील मार्च एप्रिलांत प्रतिनिधीची ही लढाई झाली असली पाहिजे. त्रिंबकराव दाभाडे यासही शाहूनें शा.रो. ४६ चें पत्र लिहिलेलें आहे. 'हेरलें येथील वाडा घेऊन कोल्हापुराभोंवते राहून चव्हाणास तंबी पोंचविणें, लांब न जाणें,' अशी शाहूची आज्ञा सेनापतीस आहे. सिधोजी थोरात, दावलजी सोमवंशी, राणोजी घोरपडे इत्यादि अनेक लहान मोठ्या सरदारांस उदाजी चव्हाणावर चालून जाण्याची शाहूनें आज्ञा केली. सारांश, शाहूचा विचार असा दिसतो कीं, संभाजीनें पुनः निजामाशीं कारस्थान करूं नये, त्याचा बंदोबस्त कायमचा करावा, आणि त्याचे सर्व साथीदार नाहींसे करावे. अशा उद्देशानें प्रधान, प्रतिनिधि, सेनापति व इतर झाडून सारे सरदार जमवून आपण स्वतः वारणेच्या बाजूस तळ देऊन पलीकडे कोल्हापुरच्या राज्यांत शाहूनें मोहीम सुरू केली. निजामास सामील झाल्या वेळेपासून प्रतिनिधीच्या मनांतून शाहूची मर्जी संपादावी अशी उत्कंठा झाली होती. तेव्हां या वेळीं मुद्दाम शाहूनें प्रतिनिधीस चव्हाणावर रवाना केलें, आणि त्याजबरोबर शंभुसिंग जाधव यास जाण्याचा हुकूम केला. हा शंभुसिंग जाधव धनाजीचा मुलगा कांहीं वर्षे भाऊ चंद्रसेन याजबरोबर निजामाकडे होता. परंतु तेथें भावाशीं बिघाड होऊन तो शाहूकडे आला. त्याजला बहुधा हीच पहिली कामगिरी सांगितलेली असावी. रोजनिशींतील लेखांक ४२-४५ यांवरून कळतें, कीं

ही स्वारी संभाजीच्या पन्हाळे प्रांतावर शाहूनें चालविली असून, खुद्द शाहू उंब्रजपर्यंत गेला होता. स. १७२९ ऑगस्ट पासून स. १७३० च्या ऑगस्टपर्यंत बाजीरावाचा मुक्कामही सबंद वर्ष पुणें साताऱ्याचे बाजूस शाहूचे समीप होता.[१]

उदाजी चव्हाणानें संभाजीस हिंमत देऊन शाहू महाराजाशीं लढण्यास प्रवृत्त केलें. संभाजीनें आपल्या अष्टप्रधानांस व सरदारांस पत्रें पाठवून आपआपल्या फौजांसह हजर होण्याची आज्ञा केली, त्याप्रमाणें सर्व फौज येऊन वारणातीरीं जमा झाली. व्यंकटराव घोरपडे व भगवंतराव अमात्य हेही या फौजेंत होते. पण त्यांची भक्ति अंतर्यामीं संभाजीकडे नव्हती. शाहूची तयारी होतांच त्यानें श्रीनिवासराव प्रतिनिधि यास संभाजीवर चालून जाण्याचा हुकूम केला. ' उदाजी चव्हाण शिरोळ येथें घुमटांत होते. त्यास प्रतिनिधि व शंभुसिंग जाधव यांनीं वेढा घातला. संभाजीनें शिरोळचा वेढा उठवून उदाजीस ठाण्यांतून लष्करांत आणिलें. दुसरे दिवशीं पुनः लढाई होऊन मोड झाला, तेव्हां चव्हाणासह निघून पन्हाळ्यास आले. जाधवराव व प्रतिनिधींनीं बुणगे लुटले.[२] सडेच पळून गेले. प्रतिनिधीनें सर्व लष्कर लुटून फस्त केलें, आणि हजारो लोक पाडाव केले. पाडाव झालेल्यांत ताराबाई, राजसबाई, संभाजीच्या बायका, भगवंतराव अमात्य व व्यंकटराव घोरपडे हे प्रमुख होते. यांपैकीं राजसबाई व संभाजीच्या बायका यांस पन्हाळ्यावर पोंचवून बाकीच्या तिघांस घेऊन प्रतिनिधि साताऱ्यास आला ताराबाईस परत पाठविण्याचा शाहूचा विचार होता, परंतु ' मला कोठें झालें तरी कैदेंतच राहवयाचें, त्या अर्थी तुम्हांजवळच राहूं. ' असें तिचें म्हणणें पडल्यावरून, सातारच्या किल्ल्यावर राजवाडा होता तो दुरुस्त करून तेथें ताराबाईस ठेविलें; आणि यादो गोपाळ यास तिचा कारभार सांगितला. ताराबाई कोल्हापुरास जाती तर पुढें साताऱ्यास रामराजाची स्थापना बहुधा झाली नसती, आणि कांहीं अंशीं मराठशाहीचा इतिहास बदलला असता. भगवंतराव अमात्याचा दंड स्वतःच्या इज्जतीखातर संभाजीनें भरून त्यास सोडवून आणिलें. व्यंकटरावाचा तपासच त्यानें केला नाहीं. प्रतिनिधि त्यास बंडखोर समजून मुक्त करीना. तेव्हां बाजीरावानें दहा हजार रुपये दंड भरून प्रतिनिधी-

१ शा. रो. १२३, ४२–४६, २१५, २१६. ४२ ची ता. १४·१·७१७२३ व ४४ ची ता. ५·१·१७३०. २ का. सं. प. या. ४४२; भा. व. श. पृ. ८.

पासून त्याची सुटका केली. प्रतिनिधि व बाजीराव एकाच धन्याचे सेवक; आणि लढाईत पाडाव झालेल्या शत्रूचा दंड एक सेवक दुसऱ्या सेवकापासून घेतो, हा राजनीतीचा मासला तत्कालीन राज्यव्यवस्थेचा निदर्शक आहे[१]. पुढें संभाजीनें शाहूस शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेण्याचा निश्चय केला. संभाजी कोणाचे सल्ल्यानें वागत होता तें समजत नाहीं. त्याची बायको जिजाबाई हीच बहुतेक कारभारीण होती. जिजाबाईच्या स्वभावाचें वर्णन रा. खरे यांनीं मार्मिकपणें केलें आहे, त्यावरून संभाजीचें राजकारण व कर्तबगारी समजण्यास मदत होईल. ' जिजाबाई अग्नीप्रमाणें प्रखर असून तिचीं शासनें निष्ठुर व कडक असत. स्वकार्य साधण्याच्या नादांत एखादा पसंत पडलेला मार्ग योग्य आहे कीं अयोग्य आहे याचा विचार ती करीत नसे. तिचा स्वभाव अत्यंत संशयी होता. आपला नाश करण्याविषयीं सर्व टपले आहेत असें तिला वाटे. कोल्हापुरच्या राज्याची स्थापना करण्याचें श्रेय जिजाबाईस आहे असें सामान्यतः म्हणण्यास हरकत नाहीं. या वेळेस व पुढें माधवराव पेशव्याचे वेळेस कोल्हापुरच्या राज्याचा बचाव झाला, याचें कारण जिजाबाईचें शहाणपण होय. जिजाबाईप्रमाणेंच ताराबाई दंगेखोर, खटपटी व अधिकार गाजविण्याविषयीं आतुर होती, परंतु अशा प्रयत्नांनीं आपला हेतु सिद्धीस जाईल कीं नाहीं हें ताराबाईला कळत नव्हतें. जिजाबाई तशा स्वभावाची असूनही मोठी धोरणी होती. आपलें व प्रतिपक्षाचें बलाबल ओळखून आणि प्रसंग पडेल त्याप्रमाणें वागून, केवळ आपलाच हेका न चालवितां प्रसंगीं पडतें घेऊन, ती आपलें कार्य साधीत असे. हें तडजोडीचें चातुर्य ताराबाईस मुळींच नव्हतें. तथापि स. १७३० च्या सुमारास कोल्हापुरचा कारभार सर्व अव्यवस्थित होता. जिजाबाईचें व दुसऱ्या कोणाचें पटत नसे. सरदारांवर व प्रधानांवर तिजकडून जुलूम होत असल्यामुळें करवीर राजमंडळांत घोटाळे व जुलूम चालू होते. शिवाय राज्यांत जिजाबाईचें वजनही आरंभीं तिच्या अपक्व वयांत विशेष नव्हतें'.

जिजाबाईशिवाय कोल्हापुरचे प्रधान संभाजीचे सल्लागार होते असें म्हणतां येईल. असे प्रधान तेव्हां कोण होते व ते कशा योग्यतेचे होते हें समजेल तर त्या वेळच्या घडामोडींवर जास्त प्रकाश पडेल. स. १७२३ त तिमाजी रघुनाथ

---

१ का. सं. प. या. ले ४२२, शा. म. ब., खरेकृत इचलकरंजी इ० पृ. ३९.

ह्मणमंते हा कोल्हापुरचा प्रधान होता.स.१७२९त चिमणाजी दामोदर प्रधान असून, तद्याच्या नंतर स. १७३१ त पुढें केशव त्र्यंबक नांवाचा प्रधान होता. राजा कर्णाचा कारभारी सुंदर तुकदेव व त्याचा मुलगा त्रिंबक सुदर यांच्या उत्पन्नांतील बाहें गांवासंबंधानें कोल्हापुरच्या राज्यांत भानगडी चाललेल्या होत्या.[1] राज्याचे विभाग झाले नव्हते तोंपावेतों संभाजी शाहूच्या राज्यांत व शाहू संभाजीच्या राज्यांत इनामें वगैरे देऊन मुद्दाम आपला अधिकार चालवून पाहत असत.

वर सांगितलेल्या लढाईत प्रतिनिधींकडून संभाजीचा पूर्ण पराभव झाला नाहीं. १२ जुलै व १७ ऑक्टोबर स. १७३० चीं पत्रें शाहूनें संभाजी आंगरे व सिधोजी निंबाळकर यांस विशाळगड काबीज करण्याविषयीं लिहिलेलीं आहेत, त्यांवरून दिसतें, कीं शाहूनें प्रतिनिधीकरवीं पन्हाळ्यास बंद देऊन विशाळगडास तंबी पोंचविली, म्हणजे पर्यायानें संभाजीचा अगदीं धुव्वा उडवून दिला, आणि आतां आपली धडगत नाहीं अशी संभाजीची खात्री झाली, तेव्हांच तो शरण येऊन तह करण्यास तयार झाला. उदाजी चव्हाणाची धरसोड अगदीं अखेरपर्यंत चालू होती. स.१७२९त त्यानें प्रथम शाहूचा पक्ष स्वीकारिला.तरी संभाजीच्या व शाहूच्या राज्यांत दंगा करण्याचें काम त्यानें चालूच ठेविलें होतें. त्याचा व संभाजीचा प्रधान केशव त्र्यंबक यांचा पत्रव्यवहार होता. सन १७३१–३२ त यशवंतराव महादेव पोतनीस यास शाहूनें त्याजवर पाठविलें. यशवंतरावानें त्याचा मोड करून मोठा दंड घेऊन सोडून दिलें; आणि शाहूनें त्यास कामगिरीही सांगितली. त्यानंतर पुनः मिरजेवर स्वारी करण्याकरितां ह्मणून स. १७३५त शाहू निघाला असतां उदाजी चव्हाण गनिमाची कुमक करूं लागला, ह्मणून त्याजवर प्रतिनिधीस रवाना केलें. चव्हाण पळून मोगलाईत गेला. ता. ८ नोव्हेंबर रोजीं प्रतिनिधीनें आथणीचें ठाणें काबीज करून मध्यरात्रीं निशाण चढविलें. चव्हाण मोगलाईतून परत आला नाहीं, मधून मधून त्रास देतच होता. त्याचा निःपात होय ते गोष्ट करणें, ह्मणून त्रिंबकराव सोमवंशी यास स. १७४८ सालची आज्ञा

---

१ खंड ३ ले. २३८, २३९, २४०, २४१, २३६ याक्रमानें. खं. ८ ले. ८३, १२५, १२३; खं. २० ले. १८३, १८४; शा. रो. ४७, ४८, २१३.

आहे. नानासाहेब पेशव्यानें सन १७५१ त युक्तीनें उदाजीस मोगलाईंतून आणून डिग्रज येथें सरंजाम देऊन ठेविलें. तेथें अद्याप त्याचा वंश सांगली संस्थानचे ताब्यांत आहे. तथापि उदाजीची खोड गेली नाहीं. डिसेंबर १७५२त व फेब्रुवारी १७५३त त्याजवर नानासाहेबानें स्वाऱ्या केल्याचे उल्लेख आहेत. त्यांत पेशव्यानें उदाजीचा उपद्रव न लागेल असा बंदोबस्त केला. उदाजीचा शेवटही लढाईंतच झाला. मिरज प्रांतीं एका खेड्यावर रोखा केला तो गांवकऱ्यांनीं मानला नाहीं, त्यावरून उदाजीनें गांवावर स्वारी केली, त्यांत घोर्डाम गोळी लागली, ती उधळली. रिकिबींत पाय अडकून डोकें फुटून मेले, ( ता. २४·११·१७६२ ). पुत्र विठोजी डिग्रजेस व प्रीतिराव करवीरीं शिवाजी महाराजांपाशीं राहिले[१].

४. **शाहूसंभाजींची अखेर भेट**, ( २७-२-१७३१ ).—साह्यकर्त्यांचा पाडाव झाल्यामुळें संभाजीचा उपाय हरला लवकर शरण जाऊन आपली व्यवस्था लावून घेतली नाहीं तर कठिण प्रसंग गुदरणार. शाहूनें आतां सर्व बाजूंनीं उत्कृष्ट तयारी केली होती. संभाजीकडचे बहुतेक सरदार शाहूस अनुकूल झाले.शाहूनें त्यांची व्यवस्था लावून त्यांस आपल्या नोकरींत घेतलें.प्रत्यक्ष ताराबाई पूर्वीचा ताठा सोडून त्याच्याच सन्निध जाऊन राहिली.स्वतः संभाजी स्वप्रवृत्तीनें मसलत उभारून तडीस नेण्यास असमर्थ होता. दुसऱ्याच्या जिवावर त्याचे प्रयत्न चालत. परंतु त्याचे सर्व साथीदार नाहींसे होण्याचें मुख्य कारण शाहूची चलती होय. शाहूचा मनमिळाऊ स्वभाव, शत्रूस सुद्धां क्षमा करून आपलेसे करून घेण्याची त्याची हातोटी, लोकांचा परामर्ष घेण्याची त्याची कळकळ, आणि त्याच्या सरदारांचे चहूंकडे चाललेले पराक्रम, इत्यादि कारणांनीं संभाजीचें तेज अगदींच मंद झालें. 'या करवीर राज्यांत विवेक, विचार, शहाणे लोक, सभ्य, चतुर विद्यावंत कोणी नाहींत. रा. शाहूराजे यांचे राज्यांत सरकारकून लक्षांचे लक्ष जिल्हे मामले खाऊन सुखरूप आहेत, असे भगवंतराव अमात्याचे उद्गार आहेत. लोकांसही या आपसांतील युद्धाचा कंटाळा आला होता. दुहींचे अनर्थ पुष्कळ लोकांस कळत होते. दोनही बाजूंस समंजस व राष्ट्रहित जाणणारी मंडळी

---

१ शा. म. च. ६१, ६५ ७० व खं. २ पृ ६० व ७७. पे. द. पृ. २९. खं. ६·१८७. का. सं प. या. १४४ व ४४२. शा. म. रो. २२०, २२६, २२७, २३०, २३२. खरे पु. १ ले. ११७.

बरीच होती. दोहोंकडील मुत्सद्यांच्या व हितचिंतकांच्या वारंवार भेटी होत. लग्न-कार्यादि प्रसंगानें चालू राजकारणांची पुष्कळच वाटाघाट होई. सारांश, शाहू व संभाजी यांच्या प्रत्यक्ष भेटी होत नव्हत्या, तरी बाह्य दृष्टीनें दोघांचेही व्यवहार एका कुटुंबाप्रमाणेंच चाललेले होते. ताराबाई पन्हाळ्यास कैदेंत असतांनाही शाहूचा व तिचा पत्रव्यवहार चाले. इनाम, उत्पन्नें, लग्नकार्य इत्यादि व्यवहार त्यांस पत्रांनेंच उलगडावे लागत. सारांश, अशा रीतीनें हें दोघांचें भांडण मिटविण्यास अनुकूल वातावरण तयार होत गेलें.

वास्तविक उभयतांचा कांहीं तरी तह ठरवावा असा प्रयत्न अव्वलपासून ह्मणजे १७०८ त झालेला दिसतो. अशाच मासल्याचा दुसरा एक तह ३०-१२-१७२५ चा आहे. असे ठराव वेळोवेळीं झाले असावे. राज्याचा हिस्सा संभाजीस देऊन त्याची समजूत करण्याचा विचार शाहूच्या मनांत आरंभापासूनच होता. अगदीं पहिल्या तहांत उत्तरेकडील प्रदेशांत संभाजीचा हिस्सा शाहूनें ठेविला होता. संभाजीचा बंडखोरपणा वाढत गेला, तसतशा तहाच्या अटी संकुचित होत गेल्या, हें सर्वांची तुलना केल्यानें दिसून येईल.[1]

स. १७२९ च्या उन्हाळ्यांत ताराबाई शाहूकडे येऊन राहिल्यावर दोघां भावांचा तह ठरविण्याचा उपक्रम सुरू झाला. प्रत्यक्ष उपक्रम कोणीं व कसा सुरू केला तें समजत नाहीं. प्रतिनिधि, भगवंतराव अमात्य, ताराबाई इत्यादिकांच्या मध्यस्थीनें सख्य घडून आलें व भेटी व्हाव्या असें ठरलें. खालील पत्र संभाजीनें शाहूस लिहिलें.

' तीर्थस्वरूप मातुश्री साहेबीं वडिलांचे ममतेचा अर्थ व उभयपक्षीं स्नेहाची दृढता होऊन विवेक व्हावा ह्मणून वडिलांचा चित्ताभिप्राय लिहिला, तरी हे गोष्टी वडिलांस • उचितच आहे. परस्पर विवेक होऊन लोकोत्तर उभय पक्षीं निर्दोष कीर्ति व्हावी हेंच आह्मांस अगत्य आहे. या अगोदरच मातुश्री साहेबीं राजश्री बावाजी प्रभु यांसी पाठवावयाविषयीं लिहिलें होतें, तेव्हांच पाठवावे

१ खं ८–९९; शा.रो. १७२,१७३. हीं पत्रें सन १७२३ ते २६च्या दरम्यानचीं असून त्या पुढील ले. १७४ चें पत्र शाहूनें संभाजी व ताराबाई या दोघांस ता. १३ ऑगस्ट स. १७२८ रोजीं लिहिलेलें आहे. खं. २०·२८२; तह व करारमदार पृ. ४३; का. सं. प. या. ले ४१९ व कोल्हापुरचा इ. परिशिष्ट नं. ३.

तरी त्यांचे शरीरीं सावकाश नव्हतें. प्रस्तुत मशारनिल्हेस पाठविलें आहे. सेवेसीं आलियानंतर सविस्तर अर्थ विदित करतील.[१] पत्राची प्रतिकृति नवयुग १९१८ त रा. य. रा. गुप्ते यांनीं दिली आहे.

या पत्रांत उल्लेखिलेला बावाजी प्रभु हाच बुवाजी अथवा बोवाजी नीलकंठ प्रभु पारसनीस हा चतुर व दुसऱ्यावर छाप बसविणारा असून उभय बंधूंचा स्नेह घडवून आणण्यांत यानें फार श्रम केले. हा आजारी असल्यामुळें तहाचें काम थोडें लांबणीवर पडलें. पारसनीय घराण्याची हकीकत शेवटीं दिली आहे.

याप्रमाणें राज्याची अर्धी वांटणी घेण्याचा हेका सोडून मराठी राज्यांत दुय्यम प्रतीचा धनीपणा पत्करून, शाहू महाराजांशीं कशाही प्रकारें समेट करून घेण्यास संभाजी कबूल झाला. इ. १७३१ च्या माघमासीं साताऱ्याहून संभाजीस आणण्याकरितां श्रीपतराव प्रतिनिधि, नारोराम मंत्री, बाळाजी बाजीराव, भवानीशंकर मोरेश्वर, अंबाजीपंत पुरंदरे, कृष्णाजी दाभाडे, निंबाळकर व पांढरे वगैरे कित्येक नामी नामी सरदार फौज सुद्धां पन्हाळ्याच्या मुक्कामीं आले सर्वांनीं नजरा करून जडजवाहीर हत्ती घोडे नजर केले. उपरांत पद्धतीप्रमाणें पोशाख घेऊन किल्याखालीं उतरले. नंतर संभाजीची स्वारी किल्याखालीं येऊन देवाळें नावली येथें मुक्काम जाहला. तेथून कूच दरकूच जाऊन वाठारावर मुक्काम केला. भगवंतराव अमात्यासही शाहूनें आदरपूर्वक बोलाविलें. पन्हाळ्याहून कऱ्हाडास थेट दक्षिणोत्तर रस्ता येतो त्यावर पन्हाळा, नावली, वडगांव, वारणातीर, इसलामपुर, वाठार, जखीणवाडी, कऱ्हाड हीं ठिकाणें आहेत.[२]

जखीणवाडीच्या मैदानांत भेटीची जागा मुक्रर केलेली होती. श्रीपतराव व नारोराम मंत्री वाठाराहून पुढें उंब्रजेस गेले. सफाईचीं बोलणीं समजाविलीं. शाहूनें कऱ्हाडावर श्रीकृष्णेतीरीं डेरे देऊन मुक्काम करविला. जखीणवाडीपासून वाठारापावेतों उभतां कडील संपूर्ण सरदार वगैरे मिळून दोन लक्ष पावेतों जथ जाहला. उभय महाराजांच्या स्वाऱ्या हत्तीवर बसून बिछायतीवरून मोठ्या मिरवणुकीनें लोकांचे मुजरे घेत घेत भेटीच्या जागे पावेतों आले. थोडें अंतर राहिल्यावर उभयतां महाराज हत्तीवरून उतरून स्वार झाले. नजीक आल्यावर उभयतां घोड्यांवरून उतरले. संभाजीनें शाहूच्या पायांवर मस्तक ठेविला. शाहूनीं

१ भा. व.पु.१ प.या. ले.५२व.५३. २ खं. ८·१११,११२,११६, १२१,१२३.

त्यास उठवून आलिंगन दिलें. उभयतांच्या प्रथम भेटीं श्रीकृष्णेसांनिध्यें होऊन बहुत आनंद जाहला. त्या वेळीं परस्पर सुवर्ण रौप्य वगैरे सत्के व पुष्पांची वृष्टि झाली. वाद्यें वाजलीं. तोफांची सरबत्ती झाली. फाल्गुन शुद्ध द्वितीया मंदवार शके १६५२, फेब्रुवारी ता. २७ स. १७३१, रोजीं राजश्री स्वामी कऱ्हाडास जाऊन राजश्री संभाजी राजे यांची भेट चवदावे घटकेस मध्यान्हीं झाली, आणि सायंकाळीं मावारे कऱ्हाडास गेले. मुक्काम कऱ्हाडास केले. कऱ्हाड व जखीणवाडीमध्यें माळावर दुसरी भेट होऊन कसबे मजकुरीं श्रीकृष्णातीरावर मुक्काम केले. नंतर शाहूनें संभाजीचा हात धरून उभयतां बंधू एका हत्तीवर स्वार झाले. खवासखान्यांत शंभुसिंग जाधव दोन मोर्चेलें घेऊन बसले. नंतर संपूर्ण लोकांचे मुजरे घेत स्वाऱ्या मुक्कामाच्या डेऱ्यावर आल्या. तेथें बहुत प्रकारें बोलणीं झालीं, आणि हत्ती घोडे, सुवर्णाचें सामान, जवाहीर, कोठार ऐसें शाहूनें संभाजीस दिलें. पुढें कऱ्हाडाहून उंबरजेस उभयतां महाराजांच्या सड्या स्वाऱ्या आल्या. तेथें मेजवान्या भोजनें झालीं. साताऱ्यास शिमगी पौर्णिमा व्हावी म्हणून ममतायुक्त आग्रहानें बोलावून साताऱ्यास घेऊन आले.

त्या समयीं संपूर्ण शहरचे लोक बाहेर येऊन उभयतां बंधूंचा समारंभ पाहून सत्के व खैरात बहुत जाहली. संभाजीचा मुक्काम साताऱ्यास पेशव्यांच्या वाड्यांत म्हणजे अदालतीच्या वाड्यांत होता. दोन महिने मुक्काम झाला. चैत्र व. २ शके १६५३ ता १३ एप्रिल १७३१ रोजीं तह ठरला. त्यास वारणेचा तह असें म्हणतात. फाल्गुन व चैत्र दोन महिने संभाजीचा मुक्काम साताऱ्यास होता. मोठमोठ्या सरदारांनीं संभाजीस मेजवान्या केल्या. शाहूनें हत्ती, घोडे, जडावाचा खंजीर, पोषाख व रोख दोन लक्ष रुपये असें देऊन रवानगी केली. बरोबर फत्तेसिंग भोसले फौजेनिशीं पन्हाळ्यापर्यंत दिले. स्वतः शाहू चार कोस पावेतों पोंचविण्यास गेला होता. या भेटीचें वर्णन तत्कालीन स्थिति डोळ्यांपुढें आणून वाचलें असतां, तें भाषेच्या दृष्टीनेंही बहारीचें असून, त्यावरून फ्रान्समध्यें स. १५२०त कनकवस्त्रांगणावर इंग्लंडचा आठवा हेन्री व फ्रान्सचा राजा फ्रॅन्सिस यांची भेट झाली त्याची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. या वेळीं सातारा किल्यावर कांहीं कारस्थान चाललें होतें.[1]

---

१ शा. रो. १७५;. का. सं. प. या. ४१७, ४१८, ४१९ व ४५६; खं. ६-५१ हा कागद ११·३·१७३१ चा असून २५·७·१७५० चा मल्हे.

**३. वारणेचा तह,** ( १३ एप्रिल १७३१ ).—तहाची हकीकत रा. खरे यांनीं इचलकरंजीच्या इतिहासांत दिलेली मार्मिक आहे. तह चैत्र महिन्यांत झाला दोन महिने वाटाघाट चालली होती, आणि सामान्य कलमें भेटीच्या पूर्वीच उभय पक्षांत ठरून गेला होता. हा तह शाहूनें संभाजीस लिहून दिलेला आहे.

' कलम १—इलाखा वारुण महाल तहत संगम दक्षिण तीर कुल दुतर्फा मुलूख दरोबस्त देखील ठाणा व किल्ले तुह्मांस दिले असत. २—तुंगभद्रेपासून तहत रामेश्वर संस्थानें निम्मे आह्मांकडे ठेवून निम्मे तुह्मांकडे करार करून दिला असत. ३—किल्ले कोपळ तुह्मांकडे दिला. त्याचा मोबदला तुह्मी रत्नागिरि आह्मांकडे दिला. ४—वडगांवचें ठाणें पाडून टाकावें. ५—तुह्मांशीं जे वैर करतील त्यांचे पारिपत्य आह्मी करावें. तुह्मी आह्मी एक विचारें राज्याभिवृद्धि करावी. ६—वारणेच्या व कृष्णेच्या संगमापासून दक्षिणतीर तहत निवृत्तिसंगम तुंगभद्रेपावेतों दरोबस्त देखील गड ठाणा तुह्मांकडे दिला असत. ७—कोंकण प्रांत साळशीपलीकडे तहत पंचमहाल अकोल(?)पावेतों दरोबस्त तुह्मांकडे दिले असत ८—इकडील चाकर तुह्मीं ठेवूं नये, तुह्मांकडील चाकर आह्मीं ठेवूं नये. ९—मिरज प्रांत विजापुर प्रांतींचीं ठाणीं देखील आथणी तासगांव वगैरे तुह्मी आमचे स्वाधीन करावीं. एकूण कलमें ९ करार करून तहनामा दिला असे. सदरहुप्रमाणें आह्मी चालूं, यास अंतराय होणार नाहीं. ' कलम ५ व ८ हीं दोन सामान्य व्यवस्थेचीं कलमें अमलांत आलीं, तसेंच कलम ३ हीं अमलांत आलें. वारुण महाल उदाजी चव्हाणाचे ताब्यांत होता, त्याजपासून घेऊन शाहूनें तो प्रतिनिधीस दिला. प्रतिनिधीपासून पुढें तो पेशव्यांनी घेतला, परंतु करवीरकरांस मिळाला नाहीं. कलम २ प्रमाणें तुंगभद्रेच्या पलीकडे अनेक स्वाऱ्या झाल्या, त्यांत कोल्हापुरकरांनीं भाग घेतला नाहीं, आणि खंडणीही त्यांस मिळाली नाहीं. वडगांवचें ठाणें करवीरकरांनीं पाडिलें नाहीं. कलम ६ प्रमाणें वारणेपासून तुंगभद्रेपावेतोंच्या मुलुखापैकीं जो प्रत्यक्ष संभाजीच्या ताब्यांत नव्हता तो पुढें शाहूनें व पेशव्यानें जिंकून घेतला, संभाजीस मिळाला नाहीं. कलम ७ ची हीच व्यवस्था आहे. कलम ९ तील मिरज, आथणी वगैरे ठाणीं

१ का.सं. प.या.४१७.,ता.१६.४.१७३१ व. शा.रो. १७६,ता.१३.५.१७३१.

उदाजी चव्हाणाच्या ताब्यांत होतीं तीं संभाजीनें शाहूस दिलीं नाहींत, शाहू व पेशवे यांनीं पुढें जिंकून घेतलीं. कृष्णा व तुंगभद्रा यांचे दरम्यानचे प्रदेशांतील किल्ले वगैरे संभाजीचे हवालीं करण्याबद्दल शाहूनें आपल्या किल्लेदारांस पत्रें लिहिलीं. तथापि या तहानें संभाजीच्या राज्याची वाढ झाली नाहीं. पूर्वी जेवढें होतें तेवढेंच आद्यापपर्यंत राहिलें आहे. वास्तविक शाहूनें संभाजीस स्वतंत्र राज्य तोडून दिलें नाहीं. राज्याचा हिस्सा असा संभाजीस मिळाला नाहीं. मुख्य राज्याचे ताब्यांत एक प्रकारची मोठीशी स्वतंत्र जहागीर राजघराण्यांतील पुरुष समजून, संभाजीस तोडून देण्यांत आली. २३ वर्षांच्या युद्धांत संभाजीची स्थिति सर्वथा इतकी खालावली, कीं संभाजी आपण होऊन भेटीस आला नसता तर इतकेंही त्यास मिळालें नसतें. हल्लीं ब्रिटिश राज्यांत जशीं संस्थानें आहेत, तसें मराठी राज्यांत हें एक संस्थान निर्माण झालें. याच वेळीं शिंदे, आंग्रे, होळकर इत्यादिकांचीं संस्थानें निर्माण होत होतीं; परंतु तीं स्वपराक्रमावर वाढत आल्यामुळें त्यांची सर कोल्हापुरास कधींच आली नाहीं. मात्र संभाजीला व त्याच्या वंशजांला शाहूच्या पश्चात् आलेले अधिकारी धनीपणाचा औपचारिक मान देत गेले, परंतु त्यामुळें ना धनी ना नोकर अशी या राज्याची केविलवाणी स्थिति झाली, त्याचें आख्यान पुढें येईलच.

ममताळु अंतःकरणाचे गुण व दोष दोनही शाहूच्या कारभारांत दिसून येतात. खासगी व्यवहारांत अशी दया शोभते, पण राजकीय व्यवहारांत त्यांमुळें ढिलाई होऊन राज्याचीं कामें बिघडतात. मराठशाहीच्या कारभारास शाहूच्या अमदानींत नेट किंवा जोर आला नाहीं आणि अनेक पुरुषांचें कर्तृत्व फुकट गेलें याचें एक कारण शाहूचा हा अत्यंत मृदु स्वभाव होय. संभाजीनें कितीही विरोध केला, तरी शाहूनें त्याजला कठोरपणा दाखविला नाहीं. कसा झाला तरी संभाजी आपला भाऊ, आपल्या सारखाच त्याचाही राज्यावर हक्क आहे, हें शाहू कधीं विसरला नाहीं. संभाजीनें आगळिक केल्यास त्याचा विचार आपण करूं, पण इतरांनीं संभाजीच्या वाटेस जाऊं नये, असा सक्त बंदोबस्त शाहूचा होता. चिमणाजी बल्लाळास शाहू लिहितो. ‘ राणोजी घोरपडे व भगवंतराव यांणीं संभाजी राजांची अमर्यादा केली. त्यांचें पारिपत्य ते करीत असतां, तुह्मी आपणांकडील राऊत घोरपड्यांचे मदतीस पाठविले व चिरं-

जिवाचे प्रांतास उपसर्ग केला, हे गोष्ट बिलकूल कार्याची नाहीं. हें उचित न केलें. पत्रदर्शनीं आपली फौज माघारी आणविणें. पर्याय न लिहितां, चिरंजिवांचे चित्तांत विपर्यास नये तो अर्थ करणे. पत्रदर्शनीं फौज बोलवा, नाहीं तर आम्ही त्यांचें साहित्य सर्वथा करूं. ' यावरून संभाजीचा मान ठेवण्यास शाहू किती जपत होता हें दिसून येतें.[1]

**४. संभाजीचा पुढील आयुःक्रम** ( स. १७३१–१७६० ).—सन १७३१ त उभय महाराजांच्या भेटी होऊन वारणचा तह ठरला. त्यानंतर उभयतांच्या भेटी वारंवार एक दोन वर्षांनी तरी होत असत. संभाजीस आणण्यासाठीं शाहू मुद्दाम फत्तेसिंग भोसले, प्रतिनिधि, पेशवे वगैरेंस कोल्हापुरास पाठवी. नोव्हेंबर १७३२ त संभाजी सातऱ्यास आला असावा. फत्तेसिंग भोसल्यास तो दादा ह्मणे. त्यानंतर एकदां स. १७३४–३५ त संभाजी व जिजाबाई यांच्या स्वाऱ्या जेजुरीस आल्या; तेथून प्रतापगडास व महाबळेश्वरास जाऊन साताऱ्यास आल्या; समस्त सरदारांसह शाहू त्यांस सामोरा गेला. दोन महिने मुक्काम साताऱ्यास झाला. शाहू सुद्धां सर्व मंडळी शंभुमहादेवास गेली, तेथून बोरगांवपर्यंत सर्व बरोबर येऊन संभाजी कोल्हापुरास व शाहू साताऱ्यास आले. त्यानंतर पुनः स. १७४१ च्या माघफाल्गुनांत त्यांच्या स्वाऱ्या साताऱ्यास आल्या. ही भेट कांहीं कारणानें विशेष महत्त्वाची आहे. या भेटींत नानासाहेब पेशव्यानें संभाजीशीं एक गुप्त ठराव करून शाहूच्या पश्चात् संभाजीनें सातारच्या गादीवर बसावें असें ठरविलें. हा प्रकार पुढें सांगण्यांत येईल. वारणेच्या तहाप्रमाणें अम्मल होत नाहीं, आपणांस नाना तऱ्हेच्या अडचणी येतात, अशी संभाजीची नेहमीं तक्रार असून तदनुसार स. १७४१ च्या भेटींत व त्यापुढें स. १७४४–४५ त शाहूनें स्थानिक अम्मलदारांस पत्रें लिहून संभाजीचे हक्क बिनकसूर पोंचविण्याविषयीं ताकिदी लिहिलेल्या आहेत. वरील भेटींत भगवंतराव अमात्याचें व संभाजीचें शाहूनें सख्य करून दिलें. कर्नाटकांतील कांहीं तालुक्यांसंबंधानें लढा होता तो मिटविण्याकरितां स.१७४६त

१ इ. सं. ऐ. टि. १–२२. राणोजी घोरपड्याची हयात सुमारें स. १७२३–८३ ची आहे(वा.इ.वृ.१८३६पृ.६०.)संभाजीची आगळिक करण्यास तो १६–१७वर्षांचा तरी असला पाहिजे, ह्मणजे वरील पत्र१७४०चें बाजीरावाच्या मृत्युनंतरचें असावें.

संभाजी सहा महिने साताऱ्यास येऊन बसला होता. पेशव्यानें जामीन राहून तंटा मिटविला.[२]

स. १७५४ त नानासाहेब पेशवे व सदाशिवराव यांनीं कर्नाटकांत जातांना कोल्हापुरास संभाजीची भेट घेतली. या भेटींत संभाजीकडून नानासाहेबानें सदाशिवरावास प्रधानकीचीं वस्त्रें देवविलीं. पुनः परत येतांनाही ते कोल्हापुरास गेले आणि त्यांनीं जिजाबाईस आपल्याबरोबर पुण्यास आणून तिचा सन्मान केला.[३] एकंदरींत पेशव्यांनीं संभाजीशीं प्रेमभाव राखिला होता.

संभाजीचा स्वभाव आळसी होता. लुटीच्या वगैरे आशेनें स्वारींत जाण्यास तो सर्वकाल तयार असे. त्यानें बराच पैसा व्यसनांत घालविला असें म्हणतात. तो ता. २० माहे डिसेंबर सन १७६० रोजीं ठाणें वडगांव येथें मरण पावला. त्यास सात बायका होत्या, त्यांत तोरगलचे शिंदे घराण्यांतील जिजाबाई हीच कर्तृत्ववान होती. यांच्या पदरच्या अनेक सरदारांच्या व घराण्यांच्या व्यवहारांचा मुख्य इतिहासाशीं निकट संबंध येतो. घोरपडे, भगवंतराव अमात्य, इचलकरंजी-कर इत्यादिकांच्या उलाढालींची स्पष्टता कसोशीनें होणें जरूर आहे.[४]

मागील पानावरील कलम ४ चे आधार. खं० ८.१४३; का. सं. प. या. ले ४१८ व ४२९. मोडक कृ. कोल्हा. इति. ले. ६. स. १७३६च्या एप्रिलांत संभाजीस आणण्यासाठीं चिमाजी आपा गेला होता, ऐ. चरित्रें भाग २ पृ. ६४. २ अप्रकाशित, पारसनीस संग्रह; शा. म. रो. १७७, १७९, १८०. ३ मोडककृत कोल्हापुरचा इतिहास, परिशिष्ट ६, ७, ८, ९. ४इचलक. इ० ले १, शा. रो. २६६ इ०; सं. प. पृ. २१०

# प्रकरण नववें.

## सेनापति दाभाड्याचें पारिपत्य.[1]

## सन १७३१.

१ खंडेराव दाभाडे ( मृ. १७२९ ).

२ सरबुलंदखान व गुजराथच्या चौथाईचा झगडा ( स. १७२५०-३० ).

३ पेशवे सेनापतींचा बेबनाव.

४ डभईची लढाई, दाभाड्याचा पाडाव.

५ दाभाडे प्रकरणाचा राज्यकारभारावर परिणाम.

६ अभयसिंग व पिलाजीचा खून ( स. १७३२ ).

**१ खंडेराव दाभाडे** (मृ. १७२९).–मराठे सरदारांपैकीं निजामास मदत करणाऱ्या मंडळीस नरम करण्याचा उद्योग शाहू व बाजीराव यांनीं आरंभिला, त्यांत दाभाडे सेनापतीची गणना असून, त्यास ताळ्यावर आणण्यांत प्रकरण विकोपास गेलें तें आतां सांगावयाचें आहे. दाभाड्याचे पूर्वज तळे. गांवास पाटिलकी करून होते. त्यांचा एक पुरुष येस पाटील बिन बाज पाटील दाभाडे हा शिवाजीजवळ हुजऱ्याचे कामावर होता. शिवाजीचे मृत्यूनंतर संभाजीनें येसाजी दाभाडे यास रायगडावर राजारामाचे तैनातीस ठेविलें होतें. संभाजीचा वध होऊन राजाराम जिंजीस गेला. तेव्हां त्याजबरोबर येसाजी व त्याचे दोन मुलगे खंडोजी व शिवाजी हेही जिंजीस गेले. तेथें राजसबाईचे पोटीं संभाजी जन्मास आला,त्या वेळीं राजारामानें तळेगांव येसाजीस इनाम करून दिला. पुढें राजाराम जिंजीहून महाराष्ट्रांत आला, तेव्हां जनानखान्याच्या बंदोबस्तास येसाजी व त्याचे दोघे मुलगे बरोबर होते. रस्त्यांत संकटें आलीं असतां, या तिघांनीं आपल्या जिवाकडे न पाहतां धन्याची सेवा शिकस्तीनें केली. प्रवासांत शिवाजी दाभाडे मरण पावला; आणि राजारामाचा जनानखाना पन्हाळ्यास

१ **आधार**–डफ, डॉ. बर्गेसची इंडियन क्रनॉलॉजी; टॉड; बखरी, पत्रें.

**दाभाडे सेनापति.** [ का. सं. बखर; खं. ३·१६७; स. प. पृ. १७६. ]

**बजाजी, पाटील तळेगांव.**




येऊन पोंचल्यावर तेथेंच येसाजीही मरण पावला. नंतर राजारामानें खंडेरावास सेनाखासखेल हें पद व आणखी कांहीं इनामें करून दिलीं. अशा प्रकारें खंडेराव दाभाडे यानें राजाराम व ताराबाई यांची नोकरी केली. पुढें शाहू दक्षिणेंत आल्यावर खंडेरावानें कित्येक वर्षें ताराबाईचे तर्फेनें झगडण्याची शिकस्त केली, परंतु ताराबाईचा पराभव झाल्यावर खंडेराव शाहूस मिळाला. तेव्हांपासून त्यानें बाळाजी विश्वनाथाच्या संमेलनांत राहून राज्याची जी कामगिरी केली तिचा उल्लेख मागें ठिकठिकाणीं आलाच आहे. स. १७१७ त शाहूनें खंडेरावास सेनापतिपद दिलें, आणि चाकण व पारनेर या परगण्यांत मोठमोठ्या जहागिरी देऊन, त्यांतून नवीन फौज ठेवून गुजराथेंत मोहीम करून तो प्रांत सर करण्याचा हुकूम दिला. बाळाजी विश्वनाथ व खंडेराव दाभाडे यांचें एक मत असून, बाळाजीची व्यवस्था अंमलांत आणण्यास खंडेरावानें त्यास चांगलें पाठबळ दिलें. बाळाजी विश्वनाथाबरोबर तो दिल्लीस गेला होता. महाराष्ट्राच्या उत्तर सरहद्दीवर राहून तो खानदेश, वऱ्हाड व गुजराथ या तीनही प्रांतांवर नजर ठेवीत असे. बाळापुरच्या लढाईंत तो हजर होता. पुढें वयोवृद्ध झाल्यामुळें त्याचा मुलगा त्रिंबकराव व पिलाजी गायकवाड असे गुजराथेंत अंमल बसवूं लागले. ' खंडेराव दाभाडे सेनापति यांनीं फौजेचा भरणा मोठा करून मुलखाचा

बंदोबस्त केला. खानदेश, बागलाण, कोंकण प्रांत वसईपासून सुरतपर्यंत घेतले. बडे सरदार, मातबर कामकरी, हुशार होते!' त्रिंबकराव दाभाडे कर्नाटक स्वारींत शाहूचे कामगिरीवर होता. दाभाडे व शिर्के यांचा शरीरसंबंध शाहूनें जुळवून दिलेला आढळतो. पुढें सेनापतिप्रमाणें सेनानायकाचें काम स्वतः बाजीराव करूं लागला, आणि त्याचें तेज हळूहळू चमकूं लागलें याबद्दल, खंडेरावास वैषम्य वाटलें असावें. कारण बाजीरावानें योजलेल्या कामांतून दाभाडे उत्तरोत्तर अलिप्त राहूं लागला. या संबंधानें शाहूनें त्याची अनेकवार कान-उघाडणी केल्याचे उल्लेख आहेत. खंडेराव वृद्ध होता, आणि बाजीराव कारभार करूं लागल्यावर सेनापतीचे तर्फेनें त्याचा मुलगा त्रिंबकराव व पिलाजी गायकवाड हेच मुखत्यारीनें कामें करीत असल्याळें त्यांचें व बाजीरावाचें जुळलें नाहीं. त्यांचीं मनें एकमेकांविषयीं हळू हळू कुलुषित होत गेलीं.[1] यावरून आपसांतील या भानगडी बरेच वर्षांपासून हळूहळू विकोपास जात होत्या, असें दिसतें. खंडेराव ता. १५ मे सन १७२९ नंतर मूतखड्याचे विकारानें मरण पावला. त्यास मुलगे तीन, त्रिंबकराव, यशवंतराव व सवाई बाबूराव, हे सर्व साताऱ्यास गेले. तेथें शाहूनें ता. ८ जानेवारी १७३० रोजीं त्रिंबकरावास सेनापतीचीं व यशवंतरावास सेनाखासखेलीचीं वस्त्रें दिलीं. सेनापति धनाजी व त्याचा मुलगा चंद्रसेन यांच्या संबंधानें जो प्रकार बाळाजी विश्वनाथाकडून झाला, तसाच कांहींसा प्रकार सेनापति खंडेराव दाभाडे, व त्याचा मुलगा त्रिंबकराव, यांच्या संबंधानें बाजीरावाकडून झाला. पण चंद्रसेनाप्रमाणें मराठशाहींतून फुटून जाण्याची संधि बाजीरावानें त्रिंबकरावास दिली नाहीं. त्रिंबकराव दाभाडे निजामास मिळणार असें पाहून, बाजीरावानें ताबडतोब त्रिंबकरावाशीं लढाई केली, तींत त्रिंबकराव मरला गेला आणि त्याचा भाऊ यशवंतराव कर्तृत्ववान नसल्यामुळें मराठी राज्यांतून सेनापतीचें महत्त्व नाहींसें झालें. हा प्रकार कां व कसा बनला हें सांगण्यापूर्वी गुजराथेंतील मराठे सरदारांच्या हालचालींचें प्रथम अवलोकन केलें पाहिजे.

**२. सरबुलंदखान, गुजराथच्या चौथाईचा झगडा,** (१७२५-३०). अकबरानें गुजराथ प्रांत जिंकल्यावर त्या प्रांताचा कारभार करण्यास तोडरमल्ल याची पहिला सुभेदार म्हणून नेमणूक केली. तेव्हांपासून मोगल सुभेदारांची

१ शा. रो. ९५, १७४, १५७, १०५ व ३३७; माघ शु० १ शके १६५१.

मालिका बादशाहीच्या अखेरीपर्यंत बर्गेसच्या जंत्रींत व्यवस्थित सांपडते. निजामउल्मुल्कचा बाप गाजीउद्दीन हा ४४ वा सुभेदार १७०८ त नेमला गेला. तो सन १७११ त मरण पावल्यावर, त्याचे जागीं अनामतखान याची नेमणूक झाली. त्याच सालीं मराठ्यांनीं गुजराथेवर स्वारी केली असतां, त्यांचा मोगलांनीं अंकलेश्वर येथें पराभव केला. सन१७१२त दाऊदखान पन्नीची नेमणूक गुजराथवर झाली, तो ४७ वा सुभेदार होय. दाऊदखान सय्यदांच्या हस्तें मारला गेल्यावर,बादशहानें गुजराथचा कारभार आपला सासरा अजितसिंग यास दिला. बाळाजी विश्वनाथ दिल्लीहून परत आल्यावर नवीन मिळविलेल्या हक्कांच्या जोरावर मराठ्यांच्या फौजा निरनिराळ्या प्रांतांत संचार करूं लागल्या, त्यांत खंडेराव दाभाड्याचा हस्तक पिलाजी गायकवाड यानें सन १७१९ त सुरतेवर स्वारी करून त्या ठिकाणीं मोगल फौजेचा पराभव केला, आणि सोनगड येथें कायमचें ठाणें दिलें. तेथून हळू हळू उद्योग चालवून सन १७२३ त दाभाडे व गायकवाड यांनीं गुजराथ प्रांतावर आपली खंडणी लागू केली. तेव्हां बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें सरबुलंदखान यास काबुलाहून बदलून मुद्दाम गुजराथेंत आणिलें. सरबुलंदखान हा गुजराथचा ५३ वा सुभेदार होय. त्याचें संपूर्ण नांव मुबारीझुन्मुल्क सरबुलंदखान बहादुर दिलावरजंग असें होतें. हा हुशार व थोर घराण्यांतला असून, तो फरुखसेयर बादशहाचा मामा होता. या बादशहानें त्यास प्रथम १७१३त अयोध्येच्या सुभ्यावर नेमून स.१७१६त त्याची बदली बहारच्या सुभ्यावर केली. पुढें सन १७१८ त सय्यद बंडखोरपणा करूं लागले, तेव्हां बादशहानें सरबुलंदखानास आपल्या मदतीस दिल्ली येथें आणिलें. पण बादशहाचे *धरसोडीमुळें सरबुलंदच्या हातून सय्यदांना विरोध झाला नाहीं. उलट रिकामा बसून त्याची दौलत मात्र सर्व खलास झाली. सन १७१९ त बादशहानें त्यास काबूलच्या सुभ्यावर पाठविलें; तेथून पुढें सन १७२३ त बादशहानें निजामाकडून गुजराथचा सुभा काढिला, तेव्हां तेथें सरबुलंखानाची नेमणूक त्यानें केली.तरी प्रत्यक्ष येऊन काम सुरू करण्यास त्यास दोन वर्षें लागलीं. सरबुलंदखनानें गुजराथचा कारभार स. १७२५ पासून १७३० पावेतों केला.

औरंगजेबाशीं युद्ध चालू असतां स. १७०२ सालीं मराठ्यांनीं गुजराथेंत प्रवेश करून सुरतेवर शह बसविला. त्यानंतर स. १७०५ सालीं बाबापिराचे

उतारावर नर्मदा ओलांडून त्यांनीं पलीकडच्या प्रदेशांत स्वाऱ्या आरंभिल्या. तरी बाजीराव पेशवाईवर येईपर्यंत निश्चित स्वरूपाची मुलूखगिरी सुरू झाली नव्हती. दाभाडे व त्यांचे हस्तक गायकवाड हे प्रथमपासूनच गुजराथेंत वावरत होते. सरबुलंदखानास येण्यास अवकाश होता, म्हणून त्यानें आपल्या तर्फेनें सुजायतखान यास आपला दुय्यम म्हणून गुजराथचा कारभार सांगितला. परंतु निजामाच्या मनांत तो प्रांत सोडण्याचें नसल्यामुळें त्यानें आपला मामा हमीद-खान यास गुजराथेंत ठेवून दिलें. याच वेळीं कंठाजी कदम बांडे हा शाहूचा दुसरा एक सरदार गुजराथेंत मुलूखगिरी करीत होता, त्यास कुमकेस घेऊन हमीदखानानें अहंमदाबाद नजीक सुजायतखानावर हल्ला करून त्यास ठार मारिलें. सुजायतचा भाऊ रुस्तुमअलीखान सुरतेच्या बंदोबस्तास होता, त्यास बंधूच्या मृत्यूची बातमी कळतांच त्यानें पिलाजी गायकवाडाची मदत घेऊन हमीदखानावर चाल केली. दोघां फौजांची गांठ पेटलादजवळ आडास येथें पडली, पण आपले जातभाई विरुद्ध पक्षाकडे असलेले पाहून पिलाजीनें आयत्या वेळीं रुस्तुमलीचा पक्ष सोडिला. शिवाय याच वेळीं उदाजी पवार, दावलजी सोमवंशी वगैरे आणखी मराठे सरदार मोठी फौज घेऊन हमीदखानाच्या मदतीस आले. त्यामुळें ता. ११-८-१७२५ रोजीं पेटलाद नजीक वसो येथें रुस्तुमली पराभव पावून मारला गेला. वास्तविक कंठाजी व पिलाजी या उभयतांचाही विचार हमीदखान व रुस्तुमलीखान यांचे भांडणांत गुजराथेंत आपला प्रवेश कायमचा करून घ्यावा असा होता. दोघे एकमेकांविरुद्ध वागण्याचा देखावा करून अंतर्यामीं संगनमतानें चालत. रुस्तुमली मरण पावल्यावर हमीदखानानें महीच्या उत्तर प्रदेशाची चौथाई कंठाजीला आणि दक्षिण प्रदेशाची पिलाजीला कबूल करून त्यांचें साह्य मिळविलें. मुसलमानांस अडचणींत गांठून चौथाई मिळविण्याची मराठ्यांची ही पद्धत पूर्वीचीच होती. (गोविंदभाई हाथीभाईकृत गुजराथनो इ०).

हमीदखान बोलून चालून बंडखोर होता. ही बंडखोरी निजामानें बाद-शहाविरुद्ध चालविलेली असून महाराष्ट्रांत मुबारीजखानाबरोबर निजामाचा झगडा झाला, त्याच स्वरूपाचा गुजराथेंत हा झगडा हमीदखान व सरबुलंद-खान यांजमध्यें स. १७२५ त झाला. मराठ्यांचा कटाक्ष मुख्यतः चौथाईचा

हक्क कायमपणें गुजराथेवर बसविण्याचा असून, जिकडून हा हेतु सिद्धीस जाईल तिकडून त्यांचे प्रयत्न चालू होते. मराठ्यांनी गुजराथ प्रांत बळकाविला हें बादशहास सहन न होऊन त्यानें स. १७२५ च्या मार्चात सरबुलंदखानास मोठ्या त्वरेनें गुजराथेंत पाठविलें. या वेळीं पैशाची व फौजेची तयारी सरबुलंदखानास बादशहानें दिल्लीहून करून दिली. सय्यदबंधूंच्या कुटुंबांतले पुष्कळसे इसम व त्यांचे साथीदार कैदेंत होते त्यांस मुक्त करून बादशहानें खानाचे मदतीस दिले. पूर्वीचा सय्यदांचा हस्तक मुहकमसिंग यासही पंचहजारी बनवून त्याजबरोबर पाठविलें. परंतु सरबुलंदनें मात्र तितकी निकड दाखविली नाहीं. स. १७२५ च्या एप्रिलांत तो दिल्लीहून निघाला आणि वाटेनें अनेक ठिकाणीं मुक्काम करीत डिसेंबरांत अहंमदाबादेपुढें येऊन उतरला. ही ढिलाई मराठ्यांच्या चांगली पथ्यावर पडली. आपली परिस्थिति जाणूनच निजामानेंही या वेळीं मराठ्यांशीं सख्य ठेविलें होतें. या संधीचा फायदा घेऊन कंठाजी कदम व पिलाजी गायकवाड यांनीं समग्र प्रांतांतून आपले हक्क चापून वसूल केले. हमीदखानास मदत करणें हें केवळ त्यांचें दाखविण्याचें कारण होतें. सरबुलंदखान येण्यापूर्वींच त्यांनीं इतका जम बसवून ठेविला कीं त्यास सुद्धां मराठ्यांच्या मागण्या कबूल करण्याशिवाय गत्यंतर राहिलें नाहीं. सरबुलंदखान येतोसें पाहून हमीदखानानें मात्र आपला पाय माघारा घेतला. त्यानें डिसेंबर स १७२५ त अहंमदाबाद खानाचे हवालीं केली, परंतु इतर ठिकाणीं शक्य तितका त्यास विरोध केला. सरबुलंदखानाचा अंमल अहंमदाबादेंत बसला, तेव्हां मराठे कपडवंज येथें जमा झाले, त्यांजवर सरबुलंदखानानें मोठा तोफखाना रवाना केला, तेव्हां प्रथम सोजित्रा येथें व पुनः कपडवंज येथें पराभव पावून मराठे मागें सरत अलीमोहन ऊर्फ छोटाउदेपुर येथें आले. येथें त्यांजला शाहू छत्रपतीकडून अंताजी भास्कर* नांवाचा एक नवीन सरदार ताजी फौज घेऊन मदतीस आले. ही मदत घेऊन कंठाजी वडनगरावर व पिलाजी बडोद्यावर असे चाल करून आले. कंठाजीनें वडनगर हल्ला करून धुळीस मिळविलें, आणि

*हा कोण? गुजराथेंतील उद्योगांत इतक्या भानगडी व मोहिमा झाल्या, कीं त्यांचा योग्य छडा लावण्यास नवीन कागद उपलब्ध झाले पाहिजेत आर्विन व गोविंदभाई यांनीं बराच तपशील भा. २ पृ. १६५-२१५ यांत दिला आहे.

धनाढ्य नागर ब्राह्मणांपासून चार लाख दंड घेतला. त्या वेळीं वडनगरचीं अनेक ब्राह्मण कुटुंबें बचावासाठीं देशत्याग करून मथुरा व बनारस वगैरे ठिकाणीं गेलीं, त्यांचें वास्तव्य त्या भागीं अद्यापि दिसून येतें. हे प्रकार स. १७२६ च्या उन्हाळ्यांत घडले, आणि पुढील वरसातीसाठीं मराठ्यांच्या फौजा महाराष्ट्राकडे परत आल्या[१].

गुजराथेंतील चौथाईचा उद्योग शाहूच्या विशिष्ट योजनेंतच सिद्ध झाला होता. कर्नाटक, माळवा व गुजराथ ह्या प्रांतांत मराठ्यांची मुलूखगिरी शाहूच्या आज्ञेनें स. १७२४-२६ त एकसमयावच्छेदें चालू होती. या वेळच्या आज्ञापत्रांत शाहूनें सरदारांस दिलेलें प्रोत्साहन चांगलें दिसून येतें. कंठाजी कदम, कृष्णाजी दाभाडे, रघूजी कदम व पिलाजी गायकवाड यांस खालील आज्ञापत्र आहे, 'तुमचे विषयीं राजश्री सेनापति यांनीं सांगितलें तें कळलें. सर्व प्रकारें तुमचें अगत्य आहे. स्वामी तुमचें ऊर्जित करणें तें करितील.[२]"

हमीदखानानें गुजराथेस कायमचा रामराम ठोकिला. तरी मराठ्यांनीं मात्र सरबुलंदखानाचा पिच्छा सोडिला नाहीं. पिलाजीनें लगोलग खंबायत व सुरत यांजवर चाल करून तीं शहरें लुटलीं. तेव्हां त्यांच्या त्रासांतून मुक्त होण्यासाठीं खानानें आपण होऊनच चौथाईचे हक्क मराठ्यांस कबूल करून दिले. शाहूच्या एका आज्ञापत्रांत या कबुलातीचा उल्लेख दिसतो. 'प्रांत गुजराथ व माळवा येथील तह रा. अंबाजी त्रिंबक, मुतालिक दिम्मत पंतप्रधान, यांनीं सरबुलंदखानापाशीं चौथाई सरदेशमुखीचा तह केला आहे, तरी तुह्मीं प्रांत मजकूरचा चौथाईचा आकार होईल त्यापैकीं बाबती वजा करून राहिला ऐवज मोकासबाब निम्मे चिमणाजी बल्लाळ यांजकडे व निम्मे त्रिंबकराव दाभाडे याजकडे पावले, तरी तुह्मीं त्याप्रमाणें उपसर्ग न करणें.' असें पत्र ता. २३-४-१७२६ रोजीं कंठाजी कदम बांडे व पिलाजी गायकवाड यांस लिहिलेलें आहे.[३]

स. १७२६ चा पावसाळा पुरा होतांच कंठाजी कदम उत्तर गुजराथ प्रांतांत कडी विजापुर भागावर चालून आला. सरबुलंदखानास लढण्याची उत्कंठा नव्हतीच, आणि कंठाजीसही बिनत्रासानें आपला कार्यभाग साधेल तर

१ आर्व्हिन पु. २ पृ. १९१–१९२. कदम बांडे यांची वंशावळ शेवटीं दिली आहे.
२ शा. रो. १६० ता. २३-३-१७२६. ३ शा. रो. १०५.

हवाच होता. तेव्हां उभय पक्षांत तडजोड चालू होऊन कंठाजीनें आपला वकील सुरतसिंग याचे मार्फत चौथाईचा तह सरबुलंदखानाकडून लिहून घेतला. अहंमदाबाद शहर शिवाय करून मही नदीच्या पश्चिमेकडील सर्व भागावर चौथाई वसूल करण्याचा हक्क या तहानें कंठाजीनें मिळविला, आणि सर्व फौजदारांस तशा मतलबाचे हुकूम खानानें सुरतसिंगाच्या हवालीं केले. याप्रमाणें प्रथम कंठाजीनें तोड काढून मग सरबुलंदनें वढवाण येथील व काठेवाडांतील इतर जमीनदारांस वठणीस आणिलें.

गुजराथेंत सेनापति व पेशवे यांचा दावा काय कारणानें उपस्थित झाला, त्याची निश्चिति उपलब्ध कागदांवरून होत नाहीं. पेशवा बाजीराव व त्याचा भाऊ चिमाजी, त्रिंबकराव दाभाडे व त्याचा हस्तक पिलाजी गायकवाड, कंठाजी कदम बांडे, आणि उदाजी, पवार इतक्यांचा संबंध गुजराथच्या व्यवहारांत या वेळीं येतो. बांडे याचा उद्योग पिलाजीचे अगोदरचा होता, तरी पिलाजी ज्यास्त धाडशी व युक्तिवान असल्यामुळें आरंभींच त्यांजमध्यें चुरस उत्पन्न झाली. गुजराथच्या नाक्यावर बांडे यानें नवापुर हस्तगत केलें, तर पिलाजीनें सोनगड किल्ला बांधून तेथें आपली व्यवस्था लाविली. तेथून त्रिवर्गांनीं म्हणजे पवार, बांडे व गायकवाड यांनीं सुरत अठ्ठाविशींत दोन वर्षे अंमल बसविला; आणि पुढें राजपिंपळेकरास अनुकूल करून, बावा पिराचे उतारावर नर्मदापार होऊन करनाळीस आले. तेथून छाणी, भायली, पादरा येथील पाटलांस सामील करून बडोदें प्रांत हस्तगत केला. त्यांतून पिलाजीची जमेत भारी, बांडे व पवार यांचा सरंजाम कोता होता, सबब त्यांनीं पिलाजीचे ताबेदारीनें राहवें, अशी सेनापतीची आज्ञा झाली. पुढें बडोद्यास कायम मुक्काम करून काठेवाड प्रांतीं जाऊन खंडण्या घेऊं लागले[१]. या मुलूखगिरीसंबंधानें पेशवे व सेनापति यांजमध्यें अव्वलपासून चुरस होती. सेनापतीस गुजराथच्या मुलुखगिरीची व बाजीरावास माळव्याचे मुलुखगिरीची, अशी आज्ञा महाराजांची असतां, बाजीरावानें सेनापतीशीं बोलणें घातलें,[२] कीं " गुजराथेंतील महाल तुम्हीं निंमे आम्हांकडे द्यावे, व माळव्यांतील महाल आम्ही सर करूं त्यांतील निंमे तुम्हीं घ्यावे." त्यावर सेनापतींनीं उत्तर केलें, कीं " महाराजांनीं तुम्हांस माळव्याची

१ का. सं. गायकवाडांची हकिकत, पृ. ३८. २ का. सं. दाभाड्यांची हकिकत पृ. ८

मोहीम व आम्हांस गुजराथची सांगितली. तुमचा कारभार तुम्हीं करावा, आमचा आम्हीं करावा, वांटणी मागूं नये.' ' या वाक्यांत पुढील तंट्याचें बीज आहे. शाहूनें मोहिमेचे प्रांत दरएक सरदारास स्वतंत्र तोडून दिले, ही व्यवस्था पेशव्यांस मान्य झाली नाहीं. अशा रीतीनें मराठ्यांची एक जूट राहणार नाहीं, जो तो सरदार मध्यकारभारांतून निराळा पडेल आणि तेणेंकरून राज्य बलहीन होईल. या काणारस्तव सर्व ठिकाणीं मुख्य प्रधानाची देखरेख व हुकमत चालावी. सर्वांनीं पेशव्याचे आज्ञेंत चालावें, पेशवे व महाराज मिळून मध्यवर्ती सरकार होय, अशी भावना पेशव्याची दिसते; आणि ही व्यवस्था तडीस नेण्यासाठींच सेनापति दाभाडे, आंग्रे, रघूजी व फत्तेसिंग भोसले वगैरे सरदारांशीं पेशव्यांचे झगडे झाले. राज्याच्या व्यवस्थेसाठीं पेशव्यांना हें अनिष्ट कार्य स्वीकारणें भाग पडलें. गुजराथेंत बांडे व पवार हे पेशव्याचे तर्फेनें वावरत असून पिलाजी गायकवाड सेनापतीचे तर्फेनें वागत होता. बांडे व पिलाजी यांजमध्यें तंटा उपस्थित होऊन त्यांची डिसेंबर स. १७२६ त खंबायतजवळ जोराची लढाई झाली, तींत पिलाजी पराभव पावून खेड्याकडे गेला, आणि कंठाजीनें खंबायतेंतून हजार रुपये वसूल केले. तेथें इंग्रजांची वखार होती तींतून कंठाजीनें पांच हजार रुपये मागितले, असा डफनें उल्लेख केला आहे. दोघां मराठे सरदारांमधील हा विकोप शाहूस बिलकूल पसंत पडला नाहीं. पेशवे-सेनापतींचें हें भांडण कदम व गायकवाड या त्यांच्या हस्तकांनीं उचललेलें होतें, आणि शाहू आपणाकडून उभयतांचा तडजोड काढीत होता. कंठाजीस हत्ती देण्यासंबंधीं बाजीरावाचीं पत्रें आहेत, तीं १४-४-१७२४ चीं असावीं. इकडे उदाजी पवार यासही बाजीरावानें चौथाई वसूल करण्यासाठीं गुजराथेंत पाठविलें. डभई येथें उदाजी व पिलाजी यांची लढाई होऊन तेथचा कोट उदाजीनें हस्तगत केला. त्यावर कंठाजी व पिलाजी एक होऊन उदाजीवर चालून आले, तेव्हां उदाजीनें गुजराथचा नाद सोडून माळव्यांत प्रयाण केलें. इकडे कंठाजी व पिलाजी यांनीं बडोदें व डभई येथें आपला बंदोबस्त केला. तसेंच कंठाजी कदमाचा दत्तक मुलगा कृष्णाजी यानें चांपानेर काबीज करून तेथें आपली व्यवस्था लाविली. या समयीं पेशव्याचा भाऊ चिमाजी आपाही मधूनमधून गुजराथेंत उतरून चौथाईचा हक्क स्थापन करीत होता. ' प्रांत गुजराथ निम्मे चिमणाजी बल्लाळ

याजकडे मुकासा होता तो दूर करून खंडेराव दाभाडे यांजकडे बेगमीस मुकासा दिला.' यानंतर ता. १९-६-१७२८ रोजीं प्रधानपंताची हुजूरची मुतालकी शाहूनें चिमाजीस दिली. त्या सालच्या पावसाळ्यानंतर चिमाजीनें उदाजी पवारासह गुजराथेंत जाऊन सरबुलंदखानाशीं तडजोड चालविली, पण त्यापासून फलप्राप्ति न होतां, त्यानें अहंमदाबादच्या बाजूस खंडण्या गोळा करून, गोधरा, दाहोद, चांपानेर हीं स्थळें हस्तगत करून माळव्यांत प्रयाण केलें. या मोहिमेची तक्रार बहुधा सेनापतिमार्फत शाहूकडे जाऊन त्यानें बाजीराव, चिमाजी व उदाजी पवार या सर्वांस ता. २३-४-१७२९ रोजीं पुढील मनसुबा ठरविण्या-करितां सातार्‍यास बोलाविलें. 'त्या प्रांतें गुंतोन न राहणें. कुल फौजेनिशीं स्वामींच्या दर्शनास येणें.[१]'

इकडे बाजीरावाचें व निजामाचें हळूहळू वितुष्ट पडून स.१७२८च्या आरंभीं निजामाला बाजीरावानें नरम आणिलें. स.१७२८च्या पावसाळ्यानंतर गुजराथेंत व कर्नाटकांत मोहिमा करण्याचा विचार सातार्‍यास घाटत होता. (खं.१८.५२). निजामानें दक्षिणेंत स्वतंत्र पंथ काढिला ही गोष्ट बादशहासही पसंत नव्हतीच, आणि त्याचा पाडाव करण्यास जो उद्योग मराठे करीत होते त्यास बादशहाचेंही अनुमत होतें. परंतु पुढें दक्षिण, गुजराथ व माळवा या तीनही प्रांतांत चौथाईचा उद्योग बाजीरावानें झपाट्यानें चालविला, तेव्हां त्याचा बंदोबस्त करणें बादशहास जरूर पडलें; आणि सरबुलंदखानानेंही आपली शिकस्त केली. गुजराथेंत पेशव्यानें हात घातला याजबद्दल दाभाडे यास वैषम्य वाटून, त्यानें, निजामबाजीरावाचें युद्ध चालू असतांच, बहुधा निजामास मदत करण्याच्या बुद्धीनें माळव्यावर स्वारी करून मोठ्या धामधुमीनें तेथून खंडण्या वसूल केल्या. या आगळिकीबद्दल शाहूनें ३१ मे १७२८ शा. रो. २२४ चें जरबेचें पत्र दाभाड्यास लिहिलेलें आहे.'तुह्मास माळवे प्रांतीं धामधूम करून पैका घ्यावयास, मुलुख करावयास गरज काय ! या उप्पर तुह्मीं पैका घेतला आहे तो बाजीराव पंडित यांजकडे फिराऊन देणें; नाहीं तर तुमच्या महालीं मोबदला करतील. या उप्पर माळवे प्रांतीं उपसर्ग न देणें, फिरून बोभाट येऊं न देणें.' यावरून पेशवे व सेनापति यांचें वांकडें आलें ही गोष्ट स्पष्ट होते. पुढें सेनापति निजामाशीं कारस्थान करूं लागला

---

१ खं.६.१८,१९; अर्व्हिन २ पृ.१९६; शा.रो.१०७,१०८,१५०,(ता.३१-५-१७२७)

तेव्हां तिकडे शाहूनें प्रतिनिधीस हातीं घेऊन संभाजीवर चाल केली, आणि इकडे बाजीरावानें दोनही प्रकरणांवर नजर ठेवून सेनापतीचा बंदोबस्त आरंभिला.

मराठ्यांशीं सामना करण्यास आपणांस पैशाची व फौजेची मदत पुरेशी नाहीं अशी सरबुलंदखानाची तक्रार बादशहाकडे सारखी चालू होती. मराठ्यांची सरशी पाहून स्वतः बादशहानेंच गुजराथेंत येण्याचाही विचार केला. परंतु तो सिद्धीस गेला नाही. तरी त्यानें मोठी मदत सरबुलंदखानास पाठविली. हा प्रकार बाजीरावास कळल्यावर त्यानें आपला वकील शामराव यास सरबुलंदखानाकडे पाठवून, दक्षिणच्या प्रमाणेंच गुजराथची चौथाई आम्हांस द्या, म्हणजे आम्ही सर्व शत्रूंचा बंदोबस्त करून बादशहाचा कारभार सुरळीत चालवूं, असें बोलणें १७२८ त सुरू केलें. या वेळीं निजामाशीं मुंगीशेवगांवचा तह ठरत होता; आणि कंठाजी व पिलाजी हे अहंमदाबादेजवळ सरबुलंदखानापासून पराभव पावून मुलखांत लुटालूट करीत होते. पुढें दिल्लीहून मदत येणार होती ती आली नाहीं, आणि बाजीरावाच्या मागणीप्रमाणें चौथाईचे हक्क कबूल केल्याशिवाय मराठ्यांचा उपद्रव बंद होईना सरबुलंदखानास आणखी अडचणींत गांठून गुजराथ प्रांताची चौथाई कायम करून घेण्याकरितां सन १७२९ च्या पावसाळ्यानंतर बाजीरावानें चिमाजी आपास मोठा फौज देऊन गुजराथेंत रवाना केलें. चिमाजीनें ही स्वारी मोठ्या जोरानें चालविली. एकामागून एक प्रदेश लुटीत व खंडण्या घेत, चिमाजीनें सन १७२९ च्या मार्च महिन्यांत पेटलादेंतून खंडणी घेऊन, धोलका शहर लुटलें; आणि सरबुलंदखानापासून चौथाईची मागणी केली. बाजीरावानेंही खानास कळविलें, कीं चौथाई सरदेशमुखीचे हक्क करार करून द्याल तरच आमच्या फौजा परत येतील. त्याजवरून सरबुलंदखानानें नाइलाजास्तव पेशव्यांचा वकील शामराव याचे मार्फत, सुरत शहर खेरीज करून, तमाम गुजराथ प्रांताच्या चौथाई सरदेशमुखीचे हक्क शाहू महाराजांस करार करून लिहून दिले. अहंमदाबाद शहरच्या उत्पन्नावर पांच टक्केच घ्यावे असा या करारांत उल्लेख होता. हे करार दक्षिणच्या करारासारखेच असून ग्रँट डफ यास पाहण्यास मिळाले होते. दक्षिण प्रांतांत हे हक्क दिल्यापासून सुव्यवस्था होऊन रयतेची आबादानी झाली, तसाच परिणाम गुजराथेंतही व्हावा, म्हणून हे हक्क मराठ्यांस लिहून दिले आहेत, असा उल्लेख आरंभी सरबुलंदखानानें

त्या लेखांत केलेला आहे. मराठ्यांनीं पंचवीसशें फौज गुजराथेंत कायमची ठेवून बादशहाच्या शत्रूंचा बंदोबस्त करावा, आणि त्याजबद्दल वरील हक्क बादशहाकडून त्यांस मिळावे, असा हा करार होता. पिलाजी गायकवाड भिल्ल व कोळी लोकांस सामील करून घेऊन प्रांतास उपद्रव देईल तर त्याचा बंदोबस्त करण्याची हमी बाजीरावानें घेऊन ती या करारांत लिहून दिली होती. डफ म्हणतो, हा करार १७२९ त झाला, त्याचा उल्लेख खालील ता. १७-१०-१७२९ च्या पत्रांत आहे.

'श्रीमंत महाराज राजश्री छत्रपति स्वामीचे सेवेशीं विनंति, सेवक बाजीराव बल्लाळ प्रधान, सेवेशीं विज्ञापना. प्रांत गुजराथ व प्रांत माळवा वगैरे येथील जिल्हा बाबती व सरदेशमुखीचा अंमल आमचे स्वाधीन केला, त्याचा मक्ता साल दरसाल हुजूर पाववावयाची मोईन मुक्रर केली, रुपये दोन लक्ष एक. त्यापैकीं महाराज कृपाळू होऊन, आह्मी कर्जदार मसलतीमुळें जाहलों, याजकरितां महाराजांनीं साल दरसाल सदरहू ऐवजापैकीं रुपये पन्नास हजार दिले. बाकी रुपये दीड लक्ष एक राहिले ते पावते करूं. येणेंप्रमाणें पावते होतील.'[1]

**३. पेशवे व सेनापति यांचा बेबनाव.**—बाजीराव व बादशहाचा सुभेदार यांजमध्यें जो वरील करार झाला त्यानें सेनापति दाभाड्याचें व त्याचे हस्तक गायकवाड यांचें महत्त्व राहिलें नाहीं. गुजराथेंतलि आपल्या कारभारांत बाजीराव व चिमाजी आपा यांनीं हात घातला, याजबद्दल दाभाड्यास अत्यंत वैषम्य वाटलें. शाहूच्या तर्फेनें चाललेल्या उद्योगास पूर्वी चंद्रसेनानें अडथळा आणिला, त्याचप्रमाणें आतां दाभाडे विरोध आणूं लागला. बादशाहीची सत्ता नाहींशी करण्यास स्वतः शाहू तयार नव्हता, आणि बाजीराव डोईजड होईल असाही त्यास संशय होता. दाभाडे पक्षानें बाजीरावाचे विरुद्ध पुष्कळ कागाळ्या शाहूकडे नेल्या. गुजराथेंतील कारभार सुरळीत चालण्यास पिलाजी अडथळा करील तर त्याचा बंदोबस्त करण्याची हमी वरील करारांत बाजीरावानें घेतली होती. चिमाजी आपानें परभारें फौज आणून गुजराथचा बंदोबस्त केला, याचा दाभाड्यास मोठाच अपमान वाटला. हें वितुष्ट वेळेवर मिटविण्याचें काम शाहूचे हातून झालें नाहीं. शाहूनें आपल्या सरदारांस निरनिराळ्या ठिकाणीं मुलुखगिरी वांटून दिली होती, त्यांत गुजराथचा भाग दाभाड्याचे वांटणीस आला होता.[2]

---

१ पे, द. पृ. १२७ ले. २. २ शा. म. च. पृ. ३५.

ही मुलुखगिरी मराठशाहीच्या मुख्य धोरणास अनुसरून ज्यानें त्यानें चालवावयाची होती. त्याविरुद्ध वागून मराठ्यांच्या शत्रूंस सामील होणें ह्मणजे राजद्रोह होय. त्याजबद्दल दाभाड्याचें पारिपत्य करणें शाहूस व पेशव्यास भाग पडलें.

सरबुलंदखानानें मराठ्यांचा बंदोबस्त करण्याऐवजीं उलट त्यानें त्यांस चौथाई सरदेशमुखी कायमच्या करार करून दिल्या, हा प्रकार बादशहा व त्याचा वजीर खानडौरान यांस पसंत पडला नाहीं. खानडौरानचें व सरबुलंदखानाचें वांकडें होतें. निजामाप्रमाणेंच सरबुलंदखानही स्वतंत्र होण्यासाठीं बंडखोरी करितो अशी समजूत होऊन, त्याचें पारिपत्य करण्यासाठीं बादशहानें मारवाडचा राजा अभयसिंग यास गुजराथच्या सुभ्यावर नेमून पाठविलें. या अभयसिंगाचें दिल्लींत मोठें प्रस्थ वाढून वजिरास तो तेथें नको होता. सरबुलंदचे पारिपत्यास कोण जातो असें बादशहानें विचारिलें असतां भरदरबारांत विडा उचलून अभयसिंगानें ती कामगिरी पत्करिली.[१] स. १७३० च्या जून महिन्यांत अभयसिंग दिल्लीहून निघाला. रस्त्यांत अजमीर येथें त्यानें जयसिंगाची भेट घेतली; आणि दोघांनीं मिळून इतर मंडळी स्वतंत्र पंथास लागलेली पाहून आपणही बादशहाचा नाद सोडून आपलीं राज्यें शक्य तितकीं वाढवावीं असा बेत ठरविला. पुढें अभयसिंगानें गुजराथेंत येऊन स. १७३० च्या विजयादशमीस अहंमदाबाद काबीज करून सरबुलंदखानास पकडून दिल्लीस पाठविलें. तेथें बादशहानें खानाची फारच विटंबना केली; आणि तेथेंच तो पुढें हाल अपेष्टा होऊन स. १७४२ त मरण पावला. इकडे अभयसिंगानें गुजराथेंतून चार कोटी रुपये व एक हजार तोफा इतकी लूट जोधपुरास आणिली, असें टॉड ह्मणतो. हिंदुस्थानांतील द्रव्यानें केवळ मराठ्यांचेच तोंडास पाणी सुटलें असें नाहीं; ज्यास सामर्थ्य झालें त्यानें तेंच काम त्या वेळीं केलें आहे. अभयसिंगाला तर गुजराथ प्रांत जिंकण्याची अतिशय हाव होती. रजपुतांच्या या सर्व हालचाली बाजीरावास त्याच्या वकिलामार्फत कळत होत्या.

सरबुलंदखान व अभयसिंग यांचा झगडा जवळजवळ एक वर्ष चालला. ह्मणजे राजकारस्थानांत स. १७३० च्या ऑक्टोबर पासून स. १७३१ जून

१ या प्रसंगाचें रसभरीत वर्णन टॉडने केलें आहे. पु. २ पु. ७८–८३; व ऑर्म्हन पु. २ पृ. २०५–२१५.

पर्यंतचें वर्ष मराठशाहीला विशेष महत्त्वाचें आहे. निजाम व बंगश यांचें कारस्थान, त्यांस सेनापति वगैरे कित्येक मराठे सरदारांचा मिलाफ, आणि शाहू व पेशवे यांचे भिन्न कारभार, इतक्यांचा समुच्चय या एका दाभाडे प्रकरणांत येतो. बादशहाचे प्रांतिक सुभेदार स्वातंत्र्य धारण करूं लागले. दक्षिण, माळवा, गुजराथ इत्यादि ठिकाणीं संचरणाऱ्या मराठे सरदरांस ते अटकाव करीत, आणि पुष्कळदां निरनिराळ्या मराठे सरदारांस एकमेकांविरुद्ध उठवून आपले हेतु साधीत, हे प्रकार जसे प्रत्यक्ष त्यांत वावरणाऱ्या लोकांस चांगले समजत, तसे शाहूस घरीं बसल्या समजत नसत. शाहूच्या अशा या शांत स्वभावाचा फायदा निजामासारखे लोक फार चांगला करून घेत. सन १७३० त संभाजीवरील मोहीम शाहूचे अंगावर असतांच निजामाचा डाव निराळा चालला होता. बाजीराव व चिमाजी यांनीं माळवा व गुजराथ हे मोठे प्रांत पळकाविलेले पाहून बादशहानें त्यांच्या प्रतिकारासाठीं अभयसिंगास गुजराथेवर व महमंदखान बंगसास माळव्यावर पाठविलें. डिसेंबर १७३० त महंमदखान उज्जन जवळ आला, तेव्हां त्याजबरोबर निजामाचें कारस्थान चालू झालें, आणि उभयतांनीं नर्मदेवर भेटून पुढील उद्योग ठरविण्याचा संकल्प केला. या हालचालींवर मल्हारराव होळकराची टेहळणी होती, आणि केव्हां समोर तर केव्हां आड रस्त्यानें येऊन स.१७३१च्या पहिल्या तीन महिन्यांत होळकरानें बंगाळास बिलकूल चैन पडूं दिलें नाहीं. मात्र निजाम सावधगिरीनें वागून बाजीरावा विरुद्ध कारस्थानें रचित होता. कंठाजी कदम व त्याचा भाऊ रघूजी ऊर्फ सवाई कटसिंग हे बाजीरावाचे विरुद्ध वागूं लागले. त्यांस त्रिंबकराव दाभाडे व पिलाजी गायकवाड अनुकूळ झाले. बाजीराव निजामावर नजर ठेवीत फिरत असतां या त्रिवर्गांनीं पेशव्याच्या 'खानदेशच्या भागांत धामधूम मांडिली, आणि प्रधानाचे फौजेशीं कटकट सुरू केली,' याबद्दल स. १७३० च्या नोव्हेंबरांत त्या त्रिवर्ग मराठे सरदारांचा शाहूनें निषेधकेला.[१] यावरून यांचा विचार केवळ स्वार्थासाठीं बाजीरावास अडविण्याचा व निजामास साह्य करण्याचा स्पष्ट दिसतो. निजामानें बंगसास कळविलें,[२] कीं 'पिलाजी गायकवाड व उदाजी पवार यांचें बाजीरावाशीं वांकडें आलें असून ते मुसलमानांशीं संगनमत करण्यास तयार आहेत. आपण सर्व एक झालों म्हणजे

१ शा. रो. ४९, २१८. २ आर्व्हिन २·२५०, २५१.

यश येण्यास विलंब नाहीं. लवकरच आम्ही नर्मदेवर येऊन आपणांस भेटतों'. मराठे सरदारांशीं वाटाघाटी करण्यांत निजामाचा वेळ बराच फुकट गेला आणि मार्च ता. २० चे सुमारास नर्मदेवरील अकबरपुरच्या उतारावर निजाम व बंगशच्या भेटी झाल्या, त्याच संधींत मुसलमानांस सामील होणाऱ्या सेनापतीची व त्याच्या साह्यकर्त्यांची बाजीरावानें डभईच्या लढाईत खरी खोड मोडिली.

निजामाशीं बंगासानें गोडी करणें बादशहास इष्ट नव्हतें. माळव्यांत मराठ्यांचा बंदोबस्त केल्यावर मग निजामाचा पाडाव करावा, अशीच बादशहाची बंगसास आज्ञा होती. निदान उभयतांच्या भेटी होण्यापूर्वी निजामाच्या फौजेंत तरी सर्वांचा समज असा होता, कीं आतां निजामाचें व बंगसाचें युद्ध जुंपणार, याचे उलट जेव्हां ते दोघे नर्मदेवर भेटून गोड गोड खलबतें खेळूं लागले, तेव्हां लोकांस मोठा अचंबा वाटला. खलबत आटोपल्यावर ता. २८-३-१७३१ रोजीं बंगस उत्तरेकडे गेला आणि निजाम परत सेनापतीचे साह्यास आला. परंतु आदले वर्षापासूनच निजामानें शाहूचे मुलखांत धामधूम चालविली होती. सेनापतीचें व बाजीरावाचें बिनसलें आहे ह्या गोष्टीचा फायदा घेऊन निजामानें त्याजबरोबर कारस्थान रचिलें त्यांतील मुद्दे बखरींत व शकावलींत दिसतात ते असे.[१]

' निजामुल्मुल्कचा व बाजीरावाचा तह झाला असतांही त्याजला बाजीराव यांनीं आपला नाश केल्याचें स्मरण होतें. त्यानें आपलें अंग न दाखवितां, दुसऱ्याकडून सूड उगविण्याचें मनांत आणिलें. त्रिंबकराव दाभाडे त्या कामाचे उपयोगी त्यास वाटला. त्याचें व बाजीरावाचें पहिलेंच वांकडें होतें. गुजराथची चौथ व सरदेशमुखी पेशव्यास प्राप्त झाल्यावर दाभाडे फौज ठेवावयास लागला; आणि मराठमंडळांत फूट पाडून त्यानें बाजीरावाविरुद्ध कारस्थान चालविलें. ३५ हजार फौज जमा केल्यावर निजामाचें साह्य आपणास मिळेल असें समजून, तो दक्षिणेवर चालून येण्यास सिद्ध झाला, व लोकांत असेंही प्रसिद्ध करूं लागला, कीं आमचा धनी मराठा याचें राज्य बाजीरावानें घेतलें तें त्याचें त्यास द्यावयास जातों. असें बोलून पिलाजी गायकवाड, कंठाजी व रघूजी कदम बांडे, उदाजी व आनंदराव पवार आणि चिमणाजी दामोदर असे मदतीस घेतले. हें वर्तमान पेशव्यांस सम-

१ शा.रो. ५१,५२; चिटणीस, ग्रँट डफ, शकावल्या वगैरेंची एकवाक्यता असून दाभाडे बखर पेशव्यांचे विरुद्ध दिसते. खं. २ शकावलि पहा.

जतांच तेही फौजेसहित खानदेशांत गुजराथचे सरहद्दीवर आले. त्या वेळीं बाजीरावाजवळ दाभाड्याचे निंमे सुद्धां फौज नव्हती. दाभाडे व निजामुल्मुल्क यांच्या बेताची सर्व माहिती बाजीरावास होती. हीं कारस्थानें बाजीरावानें शाहूस कळविलीं. मराठी राज्याचे दोन हिस्से करून कोल्हापुरच्या संभाजीला पुढाकार द्यावयाचा, असाही या कारस्थानाचा आशय होता, त्यामुळें शाहूलाही सेनापती-बद्दल राग उत्पन्न झाला. '

हीं कारस्थानें केव्हां व कशीं बनत गेलीं हें नक्की ठरवितां येत नाहीं. सर-बुलंदखानाशीं तह झाल्याबरोबर चिमाजीआपा उंब्रज येथें जाऊन ८ जुलै १७३० रोजीं शाहू महाराजास भेटला. बहुधा बाजीरावही त्याजबरोबर होता. महिना पंधरा दिवस शाहूचीं व त्यांचीं खलबतें होऊन पुढील विचार ठरला असला पाहिजे. शाहूच्या रोजनिशींतील कागदपत्र वाचले म्हणजे सातारा व पन्हाळा या शेजारच्या टापूपलीकडील कारस्थानांचें क्षेत्र शाहूच्या दृष्टिक्षेपांत उतरलेलें बिलकूल दिसत नाहीं. थोरात, सरलष्कर, शंभुसिंग जाधव, सोमवंशी इत्यादि आजूबाजूच्या सरदारांच्या पाटिलकीचे, देशमुखीचे वगैरे अंतस्थ कलह मिटविण्यांत शाहू आपल्या वजनाचा व जरबेचा उपयोग अव्याहत करी, परंतु माळवा, गुज-राथ, वऱ्हाड, नागपुर वगैरे ठिकाणीं त्याच्या सरदारांचे किंवा बादशाही उम-रावांचे काय उद्योग चालले होते, त्यांचें स्वरूप केवढें प्रचंड होतें, व त्यांचा पुढें आपल्या राज्यावर काय परिणाम होणार, याची कल्पना शाहूचे मनांत असल्याचें बिलकूल दिसून येत नाहीं. दोन भांडगीं मुलें तक्रार घेऊन आलीं असतां ' अरे भांडूं नका, गप्प बसा, ' असें म्हणून पंतोजी वेळ मारून नेतो, तशांतलाच कांहींसा प्रकार शाहूचा दिसून येतो.

सर्व पक्षांची व प्रतिपक्षांची बातमी ठेवून व पुढील धोरण ओळखून स. १७३० च्या पावसाळ्यांतच बाजीरावानें आपली तयारी गुप्त रीतीनें चाल-विली. सेनापति विरुद्ध वागतो अशी शाहूची खात्री झाली होती. गुजराथेंत जाऊन युक्तीनें सेनापतीस महाराजांकडे घेऊन यावें, निजामाची व त्याची गांठ पडूं देऊं नये, असा बेत महाराजांपाशीं ठरवून बाजीराव ऑगस्टांत पुण्यास आला; आणि तेथें पुढील स्वारीची व्यवस्था लावून ता. १०·१०·१७३० रोजीं दसऱ्यास संगमावर डेरे देऊन चिमाजीसह मोहिमेस निघाला, तो डभईची

मोहीम आटपून १४·५·१७३१ रोजीं परत पुण्यास आला. निजामानें राज्यांत धुमाकूळ आरंभिला, दाभाड्याशीं त्याचीं कारस्थानें खेळूं लागलीं, कदम बांडे, पवार वगैरे सरदार बाजीरावाचे विरुद्ध आचरण करूं लागले, कोल्हापुरचा प्रधान चिमणाजी दामोदर सेनापतीचे कटांत सामील झाला, बंगश व निजाम यांचें संगनमत होणार, इत्यादि प्रकार ध्यानांत आणून, नेटानें हा प्रसंग पार पाडण्याचा इरादा बाजीरावाचा होता. आवजी कवडे, अंबाजी पुरंदरे रघुनाथजी प्रभु, आयाबा मुजूमदार व फडणीस वगैरे सरंजाम घेऊन, नासिक-कडून खानदेशांत जाऊन ठिकठिकाणचा अंदाज काढीत. बासद्याचे वाटेनें डिसेंबरचे आरंभीं सुरते जवळ आले. त्यापूर्वीच कंठाजी कदमाची आगळिक शाहूचे कानावर घालून त्याजशीं विचारानुरूप वागण्याची मोकळिक बाजीरावानें मिळविली होती.[१] ता. ६ डिसेंबर पासून जानेवारी अखेर बाजीरावाचा मुक्काम सुरत, भडोच, बडोदेंवरून नडियादेस आला. पिलाजी गायकवाड बडोदें हस्तगत करून बंदोबस्तानें राहिला होता. त्यास तेथून काढून द्यावा असा बाजीरावाचा इरादा असून अभयसिंगासही पिलाजीचा कांटा हरतऱ्हेनें काढून टाकावयाचा होता. बाजीराव गुजराथेंत उतरल्याचें कळल्यावर अभयसिंगानें त्यास अहंमदाबाद येथें आपल्या भेटीस बोलाविलें. ह्मणून बाजीरावानेंही प्रथम पिलाजीचे वाटेस न जातां फेब्रुवारींत अहंमदाबादेस जाऊन अभयसिंगाची भेट घेतली. शाहीबागेंत ही भेट झाल्याचा उल्लेख आहे या भेटींत असें ठरलें, कीं बडोद्यांतून पिलाजीस काढून देण्यास बाजीरावानें अभयसिंगास मदत करावी, आणि त्याबद्दल अभयसिंगानें बाजीरावास चौथाई पुरी करून द्यावी. अशा रीतीनें अभयसिंगाची फौज घेऊन बाजीराव बडोद्यास वेढा घालण्यासाठीं ह्मणून मार्च २५ चे सुमारास सावळीपावेतों आला, तेथें त्यास खबर मिळाली कीं सेनापति, कंठाजी, उदाजी, पिलाजी वगैरेंच्या फौजा एकत्र होऊन, निजामाची फौजही त्यांस सामील होण्यास येत आहे. अशा स्थितींत निजाम येऊन मिळण्यापूर्वींच सेनापतीशीं गांठ घालण्याचा विचार बाजीराव करितो, तोंच आवजी कवडे यास सेनापतीनें लुटलें, चालून आले, तेव्हां भिलापुर डभईचे मैदानावर बाजीरावानें ता. १ एप्रिल रोजीं सामना करून त्याचा पाडाव केला.

१ शा. रो. २१८ व गुजराथनो इ. गोविंदभाईकृत.

**४. डभईची लढाई, दाभाड्याचा पाडाव,** (१ एप्रिल १७३१ ).– ' माळवा प्रांत आपल्याकडे असून हे पेशवे या ( गुजराथ ) प्रांतीं स्वारी करितात; हिंदुस्थान आपण ( दाभाड्यानें ) काबीज करावें तें हे करीत चालले आहेत, ऐसें चित्तीं आणोन नबाबापासून कांहीं द्रव्य घेऊन त्यास अनुकूल झाले. हे बातमी बाजीराव यांस कळली. सेनापति सरकारचे पदरचे मातबर सरदार असोन हे बुद्धि धरिली, ह्मणून महाराजांस वर्तमान लिहिलें. त्यावरून महाराजांनीं आज्ञापत्र पाठविलें जे, ' तुह्मी त्या मार्गें येऊन सेनापति यांस बुद्धिवाद करून समजोन सांगून येतां बरोबर घेऊन यावें येथें उभयतांचा तह करून देऊन एक विचारें चालेल असें करतां येईल.' यावरून बाजीराव त्या मार्गें येत असतां सेनापति चालून पुढें आडवे आले जे, तुह्मी आमचे तालुक्यांत येऊं नये, ऐसें लिहिलें. तिकडून नबाबही चालून पुढें आले. त्यावरून जलदी करून बाजीराव पुढें आले. सेनापतीची फौज चाळीस हजार. बाजीरावापाशीं पंचवीस हजार. याचा विचार कसा करावा ! या समयीं सेनापति विरोध करून नबाबाहातीं आमची फौज बुडवितात. सरकारचा बदनक्ष होतो, त्या अर्थी सेनापतींनीं विरुद्ध केल्यानें यांशींच लढाई देणें प्राप्त आलें. सरकारचीं आज्ञा आणविण्यास अवकाश नाहा. ह्मणोन आपले फौजेंतील धारकरी किती हे निवड केली; व त्यांचे फौजेंत किती हे बातमी आणितां, आपणापाशीं यांहून अधिक माणसें कामाचीं आहेत, असें दिसून आलें.' डफ् लिहितो, पुणें सोडल्यापासून बाजीराव दाभाड्यशीं सलुयाचीं बोलणीं करून प्रत्यक्ष लढाई सुरू होईपर्यंत त्याचें मन वळवीत होता. आवजी कवडे याच्या हाताखालीं बाजीरावाच्या आघाडीची तुकडी होती,तिनें नर्मदा उतरून पर्लीकडे जाबांच दाभाड्याकडील दमाजी गायकवाडानें त्याजवर हल्ला करून त्याचा पराभव केला. हें पाहून बाजीरावास त्वेष आला; आणि स्वतःची फौज थोडी असतांही त्यानें एकदम दाभाड्यावर चाल केली. हें पाहतांच कंठाजी कदम दाभाड्याचा पक्ष सोडून चालता झाला. चिटणीस पुढें लिहितो.

' महाराजांचे पायांशीं सेनापतीनें बदनेद धरिली, तेव्हां त्यास यश कदापि यावयाचें नाहीं ह्मणोन तसेच पुढें चालून आले. आह्मांस सरकारी प्रांतांत उपद्रव करावयाचा नाहीं; नबाब फौजसुद्धां पिच्छावरी आहेत, याजकरितां त्या मार्गानें जाणार ह्मणोन लिहिलें असतां, त्रिंबकराव सेनापति लढाईचा इरादा करून

चालून आले. आपण जातीनें हत्तीवर बसून युद्धास प्रवर्तले. तीन प्रहरपर्यंत लढाई झाली. दोहोंकडील नामीं माणसें रणांत बहुत पडलीं. सेनापति हत्तीवरून तिरंदाजी करतां बोटांचीं सालें गेलीं. बाजीराव यांनीं धारकरी यांजबराबर जातीनें घोडा घालून तरवार केली. नामी लोक निवड करून हत्तीपर्यंत जातीनें चालून घेतलें. त्रिंबकराव जातीनें अडून उभे राहिले. लोक थोडे राहिले. हत्तीवरील महात पडला असतां जातीनें पायानें हत्ती चालवून तिरंदाजी केली. बाजीराव यांनीं सांडणीस्वार पाठविला, जे 'अशी लढाई शत्रूंशीं करून महाराजांस संतुष्ट करावें. आह्मी लढाई तहकूब करतों, आणि भेटीस येतों.' परंतु वीरश्रीस पडून तसाच हत्ती पुढें चालावला. बाजीराव यांनीं आपले लोकांस ताकीद केली कीं सेनापतीस कोणी जायां करूं नये. परंतु इतक्यांत सेनापतीच्या कपाळास गोळी लागली ठार झाले, हें पाहून बाजीराव मागें सरले. लूट पाठलाग करूं नये, हत्ती घोडे पाडाव झाला असेल तें सोडून द्यावें, मातबर मजला करून निघून जावें,' असें सांगून निघाले, महाराजांस वर्तमान लिहून पाठविलें; आणि महाराजांस येऊन भेटले. महाराजांनीं चित्तांत आणिलें जे, 'अविवेकें करून नबाबाशीं राजकारण केलें, दुर्बुद्धि धरून आगळिक करून आपणांतच लढाई केली, त्याचें फळ झालें. परंतु मोठे माणूस पदरचे, व्यर्थ जायां झाले. झाली ते गोष्ट पुनः येत नाहीं. पुढें उभयतांचेंही मनास आणून करणें तसें करतां येईल.' असें ह्मणून प्रधान यांस पुण्यास जावयास निरोप दिला. ही लढाई ता. १ एप्रिल १७३१ रोजी डभईनजीक भिलापुर येथें झाली. तिचें वर्णन खुद्द बाजीरावानें ब्रह्मेंद्र स्वामींस[१] लिहिलें आहे तें असें. 'त्रिंबकराव दाभाडे, उदाजी व आनंदराव पवार, कंठाजी व रघूजी कदम, व पिलाजी गाईकवाड व चिमणाजीपंत दादा ऐसे तीस हजार फौजेनिशीं आह्मांशीं युद्धास आले. ता. ४ सवालीं युद्ध जाहलें. त्रिंबकराव दाभाडे, जावजी दाभाडे व मालोजी पवार व पिलाजी गाईकवाडाचा पुत्र असे चौघे ठार जाहले. उदाजी पवार, व चिमणाजीपंत पाडव जाहले. आनंदराव पवार व पिलाजी गाईकवाड व कुवर बहादुर जखमी होऊन पळून गेले, व बांडे पळाले. फौज लुटली. हत्ती पाडाव केले. सारांश स्वामींचे

---

१ ब्र.च.ले.२६ व खं.३-३० दोनही एकच आहेत. पुढील पत्र रिंगणगांवकर चिमणाजी दामोदर यांचे दप्तरांतून घेतलेलें रा. श्री. वि. आठल्ये यांनीं दिलें.

आशीर्वादें फत्ते जाहली. आपणांस कळावें यास्तव लिहिलें आहे. आमचेकडील नारायणजी ढमढेरे ठार पडले, व आणखीही कितेक लोक पडले व जखमी झाले. परंतु कार्य झालें. कळलें पाहिजे.'

बाजीरावानें आपला सरदार कृष्णाजी कदम मागें सुरतेकडे मदतीची फौज घेऊन होता त्यास खालील पत्र लिहिलें त्यांतील मजकूरः—'काल छ ५ सवालीं आमचा मुक्काम डभई अलीकडे पांच कोसांवरी झाला होता, तेथें त्रिंबकराव दाभाडे, बांडे, गायकवाड, पवार, चिमणाजीपंत कुल चालून आले. त्यांची मारून शिकस्त केली. त्रिंबकराव व मालोजी पवार ठार पडले. उदाजी पवार व चिमणाजीपंत पाडाव झाले. आनंदराव पवार, पिलाजी गायकवाड, यशवंतराव व जावजी दाभाडे, कुवरबाबा पवार जखमी होऊन गेले. त्रिंबकरावाचा मुरदा व पिलाजीचा जखमी लेंक पाठवून दिल्हे. वरकड त्यांजकडील शिपाई लोक व मोगल मारले गेले. कित्येक जखमी जाले. नारायणजी ढमढेरे मातबर मनुष्य व त्यांजकडील चौघे भले माणूस व आणखीही लष्करचे लोक मातबर कामास आले. दोन्ही फौजांचें युद्ध बहुत इरेचें झालें. त्यांची फौज व सामान बहुत होतें तें तुह्मांसही ठावकेंच आहे. सारांश, धन्याचे पुण्यें यश आलें लोकीं मेहेनत बहुत केली. सुरतेस नवा किल्लेदार आला आहे, त्यांणीं पिलाजीकडील लोक मदतीस आणिले आहेत, त्यांचे खबरींत राहून, त्यांस मारून टाकणें, ह्मणजे अवघा प्रसंग निःप्रांजल होईल. ' याच कृष्णाजी कदमास लिहिलेलें दुसरें पत्र आहे, त्यांत, सेनापति व निजामुल्मुल्काची फौज ऐसी डबईस आली. आह्मीही दों कोसांवरी दोन रोज मुक्काम केला. नित्य सेनापति कोसावरी येऊन युद्धास उभे राहत,तेथें युद्धास न बने यास्तव डबई येथें आलों'. असा आणखी जास्त मजकूर आहे, त्यावरून निजामाची प्रत्यक्ष फौज सेनापतीचे साह्यास होती; डभई स्थळ सोयीचें पसंत करीपर्यंत, बाजीरावानें सेनापतीशीं सामना केला नाहीं. यांत त्याचें युद्धनैपुण्य दिसतें. ऐ. टि. ३-२४.

' धन्याचे पुण्यें यश आलें, ''स्वामींचे आशीर्वादें फत्ते जाली,' या वाक्यांवरून, दाभाडे, गायकवाड, पवार, चिमणाजी दामोदर वगैरे मंडळी निजामास मिलाफी होऊन बंडखोरी करीत असून, त्यांचा बंदोबस्त करण्याविषयीं बाजी-

रावास शाहूची आज्ञा होती हें निःसंशय दिसतें; आणि एवढ्या मोठ्या अरिष्टाचें निरसन करण्यांत बाजीरावाची चतुराई दिसून येते. या फितुरी मंडळीचें पारिपत्य करून बाजीरावानें त्यांची चूक पदरांत घातल्यावर मग पुढें त्यांजशीं पूर्ववत् स्नेहभाव ठेविला आणि तेही पुढें मराठशाहीच्या उद्योगांत सामील झाले. एक दाभाडे शिवाय करून या प्रसंगाचें वैमनस्य कोणाचेही मनांत कायम राहिलें नाहीं, हें त्यांच्या पुढील कामगिरीवरून कळून येईल. चिमणाजी दामोदर व त्याचा वंश यांची पुढील हकीकत म. वि. ३ चे घराण्यांत स्वतंत्र दिली आहे.

डभईच्या लढाईसंबंधानें दाभाड्यांच्या बखरींत थोडा जास्त मजकूर आहे, तो असा. ' बाजीराव एकदम डभईवर चालून आला. त्र्यंबकरावास हें वर्तमान समजतांच तोही त्याजबरोबर सामना करण्यास आला. त्याचे फौजेंत बाजीरावानें फितूर केला होता तें त्याजला माहीत नव्हतें. कित्येक पथकें पाण्यावर जाण्याच्या निमित्तानें जाऊन पेशव्यास मिळालीं त्रिंबकरावाचे भाऊ यशवंतराव[1] व बाबूराव मागें वीस कोसांवर होते. हुजरातीचे पांच हजार स्वारांनिशीं त्रिंबकराव लढाईस उभा राहिला. त्यास बाजीरावानें वेढा घातला. सूर्योदयापासून तिसरा प्रहर पर्यंत मोठ्या शिकस्तीनें त्रिंबकराव लढला. पेशव्यांकडील पुष्कळ लोक त्यानें मारिले. पेशव्यांची फौज एक कोस मागें हटली. फत्ते झाली ह्मणोन शहाजनें वाजों लागलीं. इतक्यांत त्रिंबकरावाचे सापत्न मामा भावसिंगराव टोके पेशव्याचे फितुरांत होते त्यांनीं बारगिरांस सांगून गोळी मारविली, ती त्रिंबकरावाचे कानफटींत लागून त्या योगें सायंकाळीं मृत्यु पावले. गोळी मारणारास सेनापतीचे बारगिरानें ठार मारिलें. जातीनिशीं तिरंदाजी करून युद्ध केलें. ते समयीं कमातीच्या चिल्यान बोटांचीं कातडीं उडोन गेलीं. लढाई शिकस्त जाली. पिलाजी गायकवाड याचा ज्येष्ठ पुत्र संभाजी गायकवाड कामास आला समागमें पागा हुजरात होती ती कामास आली. लेकवळे कामास आले. शिलेदार पथकें होतीं तीं फितूर होऊन पेशवे यांशीं मिळालीं. पाणी पाजावयाचे मिसें चाळीस हजार फौज पळून गेली. सायंकाळ जाल्यानंतर पेशवे यांचे फौजेनें हत्ती सहा घटका रात्रीस मुडद्यासुद्धां लष्करांत नेला, नंतर हें वर्तमान मागें यशवंतराव सेनाखासखेल यांस सांडणीस्वार लढाई सुरू जाल्यावर रवाना जाला होता तो पोहोंचल्यावर, कळलें. ते फौजेनिशीं तयार

---

१ लढाईत होते, जखमी होऊन पळून गेले असें वरील पत्रांत आहे.

होऊन चढोन गेले. त्यांनीं युद्धप्रसंग करून मुडदा व निशाणें वगैरे नेलीं होतीं, तीं आणून त्रिंबकराव सेनापति यांस अग्न देऊन, तैसेच पंतप्रधान यांचे मागें लागले. पेशवे पुढें पळों लागले. ते पुढें, हे मागें कूच दरकूच सातारियास दाखल जाले. सेनाखासखेल व बाबूराव आले त्यांस राजश्री यांनीं आज्ञा केली कीं, तुह्मी माझा गळा कापून ब्राह्मणास मारणें, मी अपराधी आहें. ऐसें उत्तर महाराजांचें ऐकोन उभयतां बंधू कूच करोन रुसोन तळेगांवीं आले. मागें राजश्री तयारी करून समजाविशीकरितां तळेगांवास आले, बोलण्याचालण्याची तोड पाडून, राजश्रीस मेजवानी सवाई यांचे वाड्यांत केली. तेथें मोहरा रुपयांचा चौतरा करून वर राजश्रीस बसविलें. ते समयीं राजश्रीनीं गळ्यांत पडदाळें व व तरवार घालून, बाजीराव यांस हातीं धरून, उमाबाईस बोलावून आणून, पडदाळ्यांतील तरवार काढोन बाईपुढें ठेविली, व बाजीराव याजला पायावर घातलें, आणि बोलले कीं, तूं आपले हातें याचा गळा काप. नंतर समजूत पटली. परस्परें बहुमान दिल्हे नंतर राजश्री यांनी कृपा करोन यशवंतराव दाभाडे यांस सेनापतीचें पद दिधलें व सवाईबाबूराव दाभाडे यांस सेनाखासखेलचें पद दिधलें. नंतर महाराज सातार्‍यास गेले. ' ( खं. ३·१६७. )

डभई येथें मोठ्या शिकस्तीचें लढणें होऊन सेनापति पडल्यामुळें बाजीरावास जय मिळाला तरी त्याची परिस्थिति बिकटच होती. ' बाजीराव बाबापिराच्या घांटें नर्मदा उतरोन अलीकडे आले. त्यांच्या मागें दाभाड्यांच्या फौजा आहेत; व पुढें यांच्या सा गांवच्या अंतर्‍यानें किलिजखान व बंगस आहेत. यांचा हर्षामर्ष होणार आहे. उदाजी पवार व चिमणाजी दामोदर या उभयतांस वस्त्रें व हत्ती देऊन सोडिलें. हें वर्तमान महाराजांस बाजीरावांचे कागद जेजुरीच्या मुक्कामीं आले त्यावरून लिहिलें आहे. ' प्रधानपंत रेवा उतरोन अंकलेश्वरावर आले हें वर्तमान आज ह्मणजे २८·४-१७३१ रोजीं आलें. ' दाभाड्यांचा कोणी आप्त कृष्णाजी लिहितो, 'सेनापतीस युद्धीं जखमा लागोन देवाज्ञा जाल्यावरी महाराज स्वामी व समस्त सरदार कुल तळेगांवास जाऊन मातुश्री उमाबाईचें बहुत प्रकारें समाधान करून मातुश्रीस फौजेसह वर्तमान सातार्‍यास घेऊन आले. मनोदयानुरूप कारभार होऊन, अविलंबें निरोप घेऊन, माघारे तळेगांवास जाऊं.' हें ता. १५-५-१७३१ चें सातार्‍याहून लिहिलेलें आहे. ( ब्र. च. ३५२ व १८८ ).

लढाई होऊन बाजीराव परत जात असतां निजाम व बंगश त्यास आडवे आले, त्यांचा शह चुकविण्यसाठीं बाजीराव तिरकस नैर्ऋत्येस वळून बाबापिराचे उतारावर नर्मदा पार होऊन १० एप्रिलचे सुमारास अंकलेश्वर येथें पोंचला. तेथून अठरा दिवसांनीं निघून लांबलांब मजला करीत शत्रूंस मागें टाकून बाजीराव बारा दिवसांत जुन्नरास व मेच्या उत्तरार्धांत पुण्यास दाखल झाला. वाटेंत निजामाची व त्याची दमण जवळ एक चकमक उडाली असें अर्व्हिन मांगतो. मे अखेर बाजीराव साताऱ्यास पोंचला, त्या पूर्वींच शाहूनें तळेगांवास जाऊन उमाबाइसही साताऱ्यास आणिलें होतें.

सेनापती त्रिंबकराव दाभाडे बाजीरावाकडून मारला गेला ही गोष्ट महाराष्ट्रांत त्या वेळीं अत्यंत अनुचित अशी भासली. 'मारल्याची सर्व पृथ्वी आहे,' असें ब्रह्मेन्द्रस्वामींनें सेखोजी आंगऱ्यास लिहिलें. त्यावर सेखोजीनें जबाब लिहिला तो असा. ' त्रिंबकराव निधन पावले हे गोष्टी भावी अर्थानुरूप झाली. राजश्री स्वामादिक सहवर्तमान तळेगांवास उमाबाईचे समाधानास गेले, मातुश्रीस बराबर साताऱ्यास नेली. बाजीरावांचा पिच्छा मोगलानें केला. हे लांब लांब मजला करून मिळून पुण्यास आले. राजदर्शनासही जासील.'[१] बाजीराव डिसेंबर अखेर पावेतों साताऱ्यास महाराजापाशींच होता. त्या अवधींत शाहूकडून थोडी-बहुत तडजोड चालू असतां इकडे बाजीरावानें निजामाशीं एक गुप्त करार करून असें ठरवून ठेविलें, कीं निजामास बाजीरावानें दक्षिणेंत उपद्रव देऊं नये आणि माळवा वगैरे बाह्य प्रदेशांत मराठ्यांच्या उद्योगास निजामानें हरकत आणूं नये[२] अशा तडजोडीनें निजामाचा शह बाजीरावाकडे हलका झाला. आणि दाभाड्यांशीं त्याची दिलसफाई हळूहळू झाली. ता. १४-५-१७३२ चें उमाबाईचें पत्र बाजीरावास आहे.[३] ता. ४-११-१७३४ रोजीं प्रधानपंत व सेनापति यांचें सख्य राजश्री स्वामींना साताऱ्यास केलें.[४] त्यानंतर जानेवारी १७३५ त बाजीराव कांहीं दिवस तळेगांवास गेला असल्याचा दाखला त्याचे मुकामांत आढळतो.

**५ दाभाडे प्रकरणाचा राज्यकारभारावर परिणाम.**—मराठशाहींतील दोन प्रमुख सरदार आपसांत लढले; एकाच राजाचे छत्राखालीं नांदणाऱ्या लोकांनीं एकमेकांचे प्राण घेतले, आणि विशेषतः सेनापतीसारखा

---

१ खं. ३-२४९. २ अर्व्हिन २-२५२. ३ खं. ६-७९. ४ शा. रो. ११०.

थोर मोहरा बाजीरावाचे हातून मारला गेला,हा प्रकार विचारवंत लोकांस बरे वाटले नाहींत, तथापि हें काम बाजीरावानें अनुचित केलें, अगर बाजीरावाचाच अन्याय होता, असें कोणीं लिहिलेलें आढळत नाहीं. सेनापतीला कृतकर्माचें प्रायश्चित्त मिळालें, असाच ध्वनि दिसतो. प्रत्यक्ष शाहूचा अभिप्रायहीं तसाच होता. यावरून सेनापतीनें शत्रूस सामील होऊन राजद्रोह केला हा प्रकार सिद्ध होतो. बाजीरावानें त्याच्या बंदोबस्ताचें काम अंगावर घेतलें नसतें,तर निजामानें दाभाडे व संभाजी यांस हाताशीं धरून वीस वर्षांचा शाहूचा उद्योग फुकट घालविला असता, आणि तेणेंकरून मराठ्यांचें राज्य एकदम मोडण्याची पाळी आली असती. शाहू सहन-शील होता. पूर्ण खात्री झाल्याशिवाय एवढ्या मोठ्या सरदारावर स्वारी करण्यास त्यानें बाजीरावास परवानगी दिली नसती, आणि धन्याच्या परवानगीशिवाय बाजीरावानें तरी एवढें काम अंगावर घेतलें नसतें. चंद्रसेन जाधवाप्रमाणें दाभा-ड्यास राजरोस शत्रूकडे जाऊं देणें योग्य नव्हतें. बाजीराव दोन तीन महिने गुजराथेंत होता, त्यावरून सेनापतीस समजुतीच्या गोष्टी सांगून त्यास महाराजांकडे भेटीस नेण्याचा प्रयत्न त्यानें केला असावा. तो तडजोडीनें वागता तर प्रकरण निकरावर आलें नसतें. तशी तडजोड अशक्य झाली, तेव्हांच बाजीरावानें बळाबळ पाहून मनाचा हिय्या करून सेनापतीवर चाल केली. बाजीराव व चिमाजी आपा बरोबर असून नीट विचारपूर्वक प्रत्येक डाव खेळत होते. सेनापति शाहूच्या भेटीस गेला असता अथवा लढाईत कैद झाला असता, तर बाजीरावाचें काम भागलें असतें; त्यास ठार मारण्याची बाजीरावाची भावना असल्याचा पुरावा मुळींच नाहीं. त्रिंबकराव मोठा बाणेदार पुरुष होता. नुसता पाडाव होऊन तो जिवंत हातीं सांपडला नसता. थोडासा उतावळेपणानें तो वागला. सावधगिरीनें वागता तर त्याच्या कारस्थानास जास्त रंग चढला असता. प्रत्यक्ष बाजीराव व चिमाजी आपा चालून आलेले पाहतांच सेनापतीचे साथीदार त्यास सोडून गेले. यावरून सेनापतीचा पक्ष त्यांस अविचाराचा वाटला असावा. शाहूनें तरी पुढें अशीच आपल्या स्वभावानुरूप उभयतांची समजूत काढिली.

त्रिंबकरावाची आई उमाबाई दाभाडे पाणीदार होती. तिला पुत्राच्या मरणानें फार दुःख झालें. बाजीराव स. १७३१ ता. २९ मे रोजीं महाराजांस भेटण्यासाठीं साताऱ्यास गेला; तो त्या वर्षाच्या ९ डिसेंबर पावेतों तेथेंच महा-

राजापाशीं होता. चिमाजीआपा मात्र खानदेशांतून माळव्याकडे जाऊन जुलै सन १७३१ त साताऱ्यास आला. तोही तेव्हां पासून डिसेंबर पावेतों तेथेंच होता. या चार महिन्यांत दाभाड्याच्या प्रकरणाचा निकाल लावण्यांत आला. उमाबाईची समजूत करण्याकरितां शाहू मुद्दाम तळेगांवास आला. रस्त्यांत श्रीशंभुमहादेव व जेजुरी येथें देवदर्शन करून त्यानें सेनापतीच्या वधाचें लौकिक रीत्या थोडेंसें पापक्षालन केलें. बाजीरावास ( व बहुधा चिमाजी आप्पांसही ) उमाबाईचे पायांवर घालून तिच्याकडून त्यांस क्षमा करविली. माळवा व गुजराथ यांची हद्द ठरवून निम्मे स्वराज्याचा ऐवज पेशव्यांचे माफत सरकारांत द्यावा, आणि बाकीच्या अर्ध्यांत फौजेचा व आपला खर्च भागवावा, सर्व व्यवहारांचा हिशेब सरकारांत द्यावा, जातीचे खर्चाची नेमणूक करून नजराणा येईल तो हुजूर द्यावा, असा उभयतांचा तह करून दिला. त्रिंबक-रावाचा भाऊ यशवंतराव यास सेनापतीचीं वस्त्रें दिलीं आणि पिलाजी गायक-वाडास सेनाखासखेल हें पद व दाभाड्याचा कारभारी नेमून उभयतांनीं उमा-बाईचे आज्ञेंत चालावें असें ठरवून दिलें. परंतु ही गोष्ट कायमची न होतां उमाबाई व दाभाडे हे मराठ्यांच्या राज्योद्योगांत भाग घेईनातसे झाले असें रोजनिशी ले. ६८ वरून ह्मणतां येतें.

वरील सेनापतीचा ठराव विशेष स्मरणीय आहे. उमाबाईच्या समजुतीसाठीं गुजराथच्या उद्योगांत पेशव्यानें हात घालूं नये असें जरी शाहूनें ठरवून दिलें, तरी सेनापतीने पेशव्याचे ताब्यांत राहिलें पाहिजे, त्यास सर्व हिशेब दिला पाहिजे, एकंदर प्राप्तीचा ठरीव अंश सरकारांत भरला पाहिजे, हें तत्त्व शाहूनें अंमलांत आणिलें. याचा अर्थ असा झाला, कीं उत्पन्नाचा हिस्सा सरकारांत न दिला किंवा हिशेब न दाखविला, तर तो त्यांजकडून घेण्यासाठीं सरदारांवर शस्त्र उचलणें पेशव्यांस भाग पडूं लागलें. हिशेबासंबंधानें बयाद सांगून सरदार सरकारदेणें देईनातसे झाले, ह्मणजे त्यांस वठणीवर आणण्यासाठीं पेशव्यास शस्त्र घ्यावें लागल्याचे अनेक प्रसंग आहेत. नानासाहेब पेशवा व नागपुरकर रघूजी भोसले यांचा तंटा असाच पुढें उपस्थित झाला, पण तो शाहूनें वेळींच तोडला. तुर्त गुजराथेंतून बाजीरावानें आपलें लक्ष काढून घेतलें. ही बापाची आठवण पुढें त्याचा मुलगा नानासाहेब यास होऊन त्यानें कैक वर्षे खटपट करून शेवटीं

आरंभींच्या ठरावाप्रमाणें स. १७५२त निम्मो गुजराथ गायकवाडापासून हस्तगत करून घेतली, तो प्रकार पुढें येईल.

त्रिंबकरावानंतर सेनापतीच्या घराण्यांत पराक्रमी पुरुष निघाला नाहीं. यशवंतराव व्यसनाधीन होता आणि त्याच्या हातून राष्ट्रकार्य कांहीं झालें नाहीं. तेणेंकरून गायकवाडांस पुढें येण्यास संधि मिळाली; आणि इतउत्तर दाभाडयांचें कर्तृत्व नाहींसें होऊन गुजराथेंतील कारभार गायकवाडच मुखत्यारीनें पाहूं लागले. सेनापति हें नांव मात्र दाभाड्याच्या घराण्यांत राहिलें. यशवंतराव नालायक आहे असें समजतांच त्याचें सेनापतिपद काढून शाहूनें तें गायकवाडास दिलें असतें तर शाहूचा दरारा बसला असता. परंतु उमाबाईचे हयातींत तें शक्य नव्हतें. उमाबाईला शाहू व पेशवे चांगलाच मान देत असत. शाहूचे पश्चात् त्यांनीं नानासाहेब पेशव्याशीं थोडीशी बंडाळी केली तो प्रकार पुढें येईल. यशवंतरावास शाहूनें प्रोत्साहन देण्याची शिकस्त केली, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. उदाहरणार्थ, खालील पत्र पहा. ' राजमान्य राजश्री यशवंतराव दाभाडे सेनापति यांसी आज्ञा केली ऐसीजे. राजश्री बाजीराव पंडित प्रधान उत्तर प्रांतास जातात, त्यांस आपली फौज सामील करणें म्हणून तुह्मांस आज्ञा केली होती. परंतु फौज त्यां समागमें दिली नाहीं व हुजूरही यावयाचा प्रसंग जा ( ला ? ) नाहीं. रमलियास (रनाळयास ?) कालहरण करीत राहिले आहां, यावरून काय ह्मणावें ? तुह्मी सेनापति आणि हे नूर तुमची सेवा करून जग नामोष करून घ्यावयाची होत असतां ईरे व उमेद धरीत नाहीं. तेव्हां पुढें आतां तुमचे हातें काय होणें ! हल्लीं राजश्री प्रधानपंतास व निजामुनमुलकास समीपता होऊन गांठ पडली असेल. औरंगाबादची फौज जमा जाहली आहे, ते निजामाकडेस कुमकेस जाणार. गेलियानें निजाम भारी होईल. याजकरितां इकडेच अडकवून पाडावी, जाऊं न द्यावी असें आहे. तरी तुह्मी आपले सारे फौजेनशीं राजश्री चिमणाजी बल्लाळ यांस शिताबीनें सामील होऊन स्वामी संतोषी होत असें करणें. पत्र पावतेक्षणीं फौजेनिशीं जाऊन सामील होणें. दिरंग एक क्षणाचा न करणें. बहुत शिताबीनें जाणें. घालघमरीवर सर्वथा न घालणें, सुज्ञ असा. ' (भा. व. पु. १ ऐ. प. ७३. )

सेनापतीच्या प्रकरणानें बऱ्याच गोष्टींचा निकाल लागला. डोईजड सरदारांस नरम करण्यास शाहू कमी करीत नाहीं अशी सरदारांची खात्री झाली. चंद्रसेन

व त्रिंबकराव दाभाडे असे एकामागून एक दोन सेनापती बडंखोर निघाले आणि त्यांस वठणीस आणण्यास पेशव्यांनीं कमी केलें नाहीं, यावरून मराठी राज्य फुटूं न देण्याची पेशव्यांची व शाहूची धमक व्यक्त होते. प्रथम पालखेडावर, त्यानंतर संभाजीच्या प्रकरणांत, व हल्लीं सेनापतीनें व निजामानें शाहू व पेशवे यांजला मोठ्या उपद्व्यापाचा विरोध केला असतां, तीनही प्रसंगीं बाजीरावानें त्यास चीत केलें, त्यामुळें त्याचा लौकिक वाढला, आणि मराठ्यांच्या राज्यकारभारास थोडेंबहुत संघटित स्वरूप येऊन, पुढील पांच दहा वर्षांत बाजीरावाचे हातून राज्याची वृद्धि बरीच झाली. बाजीरावाच्या कर्तबगारीचा फायदा राज्यास मिळण्यास सेनापतीच्या सारखा परिणाम लोकांच्या निदर्शनास येणें राज्यकारभाराचे दृष्टीनें अत्यंत जरूर होतें. त्या योगानें शत्रूंवर सुद्धां मराठ्यांची छाप बसली; आणि रजपुताना दिल्लीपावेतों मराठ्यांचे उद्योगास जोर आला. लवकरच हबशास व पोर्तुगीझांस जिंकून मराठ्यांनीं कोंकणपट्टीचा समुद्रकिनारा स्वराज्यांत आणिला. सारांश,यापुढील नऊ वर्षांचा बाजीरावाचा कारभार निराळ्या स्वरूपाचा आहे. या नऊ वर्षांत पेशव्याच्या कर्तबगारीची दहशत सर्व देशांत केवढी बसली, ही गोष्ट इंग्रजांनीं मराठ्यांशीं स्नेह जोडण्याच्या इच्छेनें कॅ. गॉर्डन यास स. १७३९ त साताऱ्यास पाठविलें त्याच्या हकीकतीवरून पटणारी आहे

**६ अभयसिंगाकडून पिलाजीचा खून,** ( स. १७३२ ).— सरबुलंदखानास घालवून दिल्यावर अभयसिंग पिलाजी गायकवाडाच्या पाठीस लागला. जयसिंगाची व मराठ्यांची गोडी होती तशी जोधपुरकर अभयसिंगाची नव्हती. मराठ्यांचे विरुद्ध दिल्लीस जो पक्ष होता त्यांत अभयसिंग प्रमुख असून, मराठ्यांचा पाडाव करण्यास तो टपून बसलेला होता. त्रिंबकराव दाभाडे पडल्यावर मराठी फौजा परत गेल्या, तेव्हां पिलाजी व त्याचे पराक्रमी भाऊ व मुलगे यांनीं अनेक युक्त्या करून गुजराथेंत हळू हळू आपला जम बसविला. बडोदें पिलाजीच्या ताब्यांत होतें, तें अभयसिंगानें हिसकावून घेतलें, आणि डभईस वेढा घातला. नंतर तहासंबंधानें उभयतांची वाटाघाट सुरू झाली. त्याकरितां एकमेकांचे वकील एकमेकांकडे जाऊं येऊं लागले. अशा उपक्रमानें अभयसिंगानें कपटव्यूह रचून एका मारवाड्याच्या मदतीनें डाकोर येथें पिलाजीचा खून करविला ( स. १७३२ ). पिलाजीच्या लोकांनीं त्या खुनी

इसमास लगेच कापून काढिलें, आणि मही अलीकडे सावळीस येऊन तेथें पिला-जीच्या मुर्दाचें दहन केलें. पिलाजी शूर, धोरणी व बाणेदार होता आणि त्याचेंच उदाहरण पुढें त्याचे घराण्यास प्रोत्साहक झालें. डभई त्यांनीं हातची जाऊं दिली नाहीं. ता. १९-४-१७३२ रोजीं शाहूनें पत्र लिहून दमाजी गायक-वाडाचें समाधान केलें.'पिलाजीस बोकळसिंगानें दगा केला, त्यामागें तुह्मीं हिंमत धरून अंगेजणी बरीच केली, ह्मणून यशवंतराव दाभाडे सेनापतीनें लिहिलें. तरी होणार ती गोष्ट जाली. त्याचा खेद न करणें. तुम्हांविषयीं सेनापतीस आज्ञा केली आहे. ते तुमचें उभारणी करून चालवितील. तुम्ही त्यांचे हुकमाप्रमाणें वर्तणूक करणें. ( शा. रो. १६१. )

पिलाजीच्या खुनापासून अभयसिंगास कांहीं एक निष्पत्ति झाली नाहीं. उलट पिलाजीचे पुत्रांस व भाऊ महादजीस व उमाबाईस विशेष चेव येऊन त्यांनीं बडोदें व डभई हीं ठाणीं तर परत घेतलींच, परंतु खुद्द अहंमदाबादेवर चाल करून, त्याच्या पूर्वेकडील जोधपुरच्या हद्दींत धुमाकूळ उडवून दिला. तेव्हां अभयसिंगानें दमाजी गायकवाडास चौथाई व सरदेशमुखी देण्याचा करार लिहून दिला, आणि शिवाय अहंमदाबादच्या खजिन्यांतून ८० हजार रु. रोख देण्याचें ठरविलें. रक्कम पदरांत पडेपर्यंत जवानमर्दखान बाबी यास ओलीस ठेविलें. पुढें कांहीं काळ भानगडी चालून स. १७३४ त बडोदें दमाजीच्या कबजांत आलें तें अद्यापि त्यांजकडे आहे. दमाजीशीं कसाबसा तह करून अभयसिंगास आपलें राज्य बचावण्यासाठीं गुजराथ सोडून परत जावें लागलें. जातांना त्यानें आपला एक हस्तक रतनसिंग भंडारी अहंमदाबाद येथें ठेवून दिला. पण गायकवाडांपुढें त्याचा टिकाव लागला नाहीं. त्यांनीं अहंमदबादेंतून चौथाईचे हक्क वसूल केले. पुढें अभयसिंगानें आपले भाऊ आनंदसिंग व राय-सिंग यांस गुजराथेंत पाठविलें. त्यांनीं शिंदे होळकरांस आपल्या मदतीस आणून जवानमर्दखान बाबी हा गृहस्थ अहंमदाबाद बळकावून बसला होता त्याजवर चाल केली. तेव्हां शिंदे होळकरांस पावणे दोन लाख रुपये देऊन जवानमर्द-खानानें आपला बचाव केला. दोन तीन वर्षे अशा भानगडी चालल्यावर स. १७३७त[1] मोमीनखान याची गुजराथेवर नेमणूक झाली, तो५५वा सुभेदार होय.

---

१ बर्गेसची शकावली. डफ १७३५ देतो.

मोमीनखनास रतनसिंग कारभार देईना, तेव्हां त्यानें दमाजीची मदत घेतली. दमाजीनें रंगाजी गायकवाडास मोमीनखानाचे मदतीस पाठविलें. त्यांनीं २० मे १७३७ रोजी अहमदाबाद हस्तगत केलें, आणि तेथील वसूल पुढें उभयतांनीं निमेनीम घ्यावा असें ठरविलें. सन १७४३ पर्यंत कारभार करून मोमीनखान मरण पावला. त्यानंतर अबदुल अजीजखान यानें बनावट फरमान आणून सुभेदारी बळकाविली, परंतु दमाजीनें त्याचा जम बसूं दिला नाहीं. स. १७४४ त फकरुद्दौला सुजायतजंग बहादुर याची ५९ वा सुभेदार म्हणून दिल्लीहून नेमणूक होऊन त्याचे हाताखालीं जवानमर्दखान बाबी यास ठेवण्यांत आलें. हळहळू दमाजी मोठा झाला, आणि बापाच्या खुनामुळें त्वेष चढून त्या भानगडीच्या दिवसांत त्यानें नानाप्रकारचे उद्योग करून आपल्या घराण्यांत पहिल्या प्रतीचें नांव कमाविलें, त्याची हकीकत पुढें येईल.

# प्रकरण दहावें.

## जंजिऱ्याची मोहीम, आंगरे व पेशवे.

### सन १७३३–३६.

१. मोहिमेचीं पूर्वकारणें.
२. स्वारीची वाटाघाट व तयारी.
३. पहिली जोराची मोहीम ( मे–ऑगस्ट १७३३ ).
४. अव्यवस्था व फसगतीचीं कारणें.
५. सीदीसाताचा पाडाव व तह ( १९–४–१७३६ ).
६. आंगऱ्यांचा गृहकलह.
७. संभाजी व मानाजी आंगऱ्याचा तंटा ( सन १७३६–४१ ).
८. ब्रह्मेंद्रस्वामीची योग्यता.

**१. मोहिमेचीं पूर्वकारणें.**—जंजिऱ्यावरील स्वारीचा उद्भव ब्रह्मेंद्रस्वामीमुळें झाला. राजाराम छत्रपति जिंजीस असतां त्यास स्वामीचा उपयोग घडला, म्हणून राजारामानें कोंकणांतील धामणीगांव स्वामीस इनाम दिला. त्या गांवांतील

अरण्यांत स्वामी तपश्चर्येस येऊन राहत असतां रानांत बाळगोळी गुरें चारावयास येई, त्यास स्वामींचें दर्शन झालें, आणि त्याच्यामार्फत स्वामींच्या अद्भुत सामर्थ्या-संबंधाची लोकांत प्रसिद्धि झाली. तेव्हांपासून लोक स्वामीच्या दर्शनास येऊं लागले. हळूहळू स्वामीच्या सर्व मोठमोठ्या लोकांशीं ओळखी होऊं लागल्या. त्यांत बाळाजी विश्वनाथाची व स्वामींची ओळख होऊन, बाळाजीची भक्ति पाहून, ' तूं महत्पदास चढशील ' असा स्वामीनें त्यास आशीर्वाद दिला. बाळा-जीचें व हबशाचें वांकडें होतें हें मागें सांगितलेंच आहे. पेशवाई मिळाल्यावर आंग्रे व हबशी यांचे भांडणांत बाळाजीस पडावें लागलें जंजिऱ्याचा हबशी हा मोगल बादशहाचा अंकित समजला जात असे, ह्मणून त्याचा उच्छेद करावयाचा हें शिवाजीपासून मराठशाहीचें एक कर्तव्यच बनलें होतें; तशांत ही आपली जन्मभूमि कोंकण प्रांत मराठशाहीखालीं सलग असावी असें बाळाजीस वाटे. पेशवेपद प्राप्त झाल्यापासून स्वामींवर बाळाजीची भक्ति अतोनात बसली; आणि बाळाजीचें सर्व कुटुंब स्वामींची सेवा करण्यांत अग्रेसर बनलें. असा हा या बाबतीचा पूर्वसंबंध आहे.[१] ( पा. ब्र. ले ३२३).

जंजिऱ्याचा अधिकारी सीदी कासम स. १७०७ त मरण पावला, तेव्हां-पासून स. १७३१ पर्यंत सीदी रसूल याकूदखान जंजिरा येथें कारभार करीत होता. ब्रह्मेंद्रस्वामीच्या अद्भुत शक्तीची माहिती याकूदखानास होऊन त्यानें स्वामीच्या परशुराम येथील देवालयाच्या खर्चासाठीं पेढें व आंबडस हे दोन गांव इनाम दिले. दाभोळ खाडीच्या मुखावरील दक्षिण बाजूचें अंजनवेल ठाणें हबशाचें ताब्यांत असून तेथें सीदी सात नांवाचा अधिकारी होता. त्यास कर्नाटकांतील सावनूरच्या नबाबाकडून एक सुंदर हत्ती बक्षीस मिळाला. तो इतक्या लांबून अंजनवेल येथें सुरक्षित आणणें हें काम मोठें बिकट होतें. तें सीदी सातानें ब्रह्मेन्द्रस्वामीस सांगितलें. स. १७२५ च्या डिसेंबरपासून स. १७२६ च्या मे-

---

१. **या प्रकरणाचे आधार**. रा. खं. ३ प्रस्ता०, व ले ५६८ चेउलची बखर; खं. २ शकावलि; इ. सं. आंगऱ्यांची बखर; शा. म. ची रोजनिशी; पारसनिसकृत ब्र. स्वा च, त्यावर आळेकरकृत टीका, ग्रंथमाला; आठल्येकृत जंजिऱ्याची मोहीम, केसरी २१-६-१९०४ पासून जानेवारी १९०५. शेवटचें विशेष मार्मिक आहे. भा. व. पु. २ यांत जंजिरेकरांचा वृत्तान्त खुलासेवार आहे.

पर्यंत, पेशवे, भोसले वगैरे प्रमुख सरदारांनीं कर्नाटकांत स्वारी केली, त्याचवेळीं ब्रह्मेन्द्रस्वामीही भिक्षाटनार्थ तिकडे गेला असतां, त्यास ही हत्ती आणण्याची कामगिरी सीदीसातानें सोंपिली. स्वामीस लोकप्रियतेची मोठी आवड व पाहिजे त्याला जरबेंत आणण्याची घमेंड असल्यामुळें, त्यानें हें काम अंगावर घेतलें. त्या वेळीं ठिकठिकाणीं निरनिराळ्या अधिकाऱ्यांच्या चौक्या असत, आणि त्या चौक्यांतून परवानगीशिवाय फौज, जनावरें किंवा माल सोडण्यांत येत नसे. विशाळगडच्या घाटांत हत्तीस अडवूं नये अशाबद्दलचीं छत्रपति संभाजीचीं व प्रतिनिधीचीं दस्तकें स्वामीस पूर्वींच मिळालीं होतीं. तेथून हत्ती सुरक्षित आला. परंतु संगमेश्वरच्या पुढें माखजनच्या चौकीवरील आंगऱ्याच्या लोकांनीं हत्तीस अटकाव करून तो जयगडास पाठविला. कान्होजी आंगरे आपला शिष्य असल्यामुळें हत्तीस अटकाव होईल असें स्वामीस वाटलें नव्हतें, ह्मणून त्यानें आंगऱ्याचें दस्तक घेतलें नव्हतें. आपला हत्ती आंगऱ्याच्या लोकांनीं नेला असें ऐकून सीदी सात खवळला आणि जबरदस्तीनें हत्ती आणण्याकरितां त्यानें कांहीं फौज अंजवेलीहून जयगडाकडे रवाना केली. त्या लोकांस आंगऱ्यांकडील लोकांनीं हांकून दिलें. माखजनच्या चौकीवर हत्तीस आंगऱ्यांकडून झालेला अटकाव स्वामीस मागच्या मुक्कामावर कळला. त्याबरोबर हत्ती सोडून देण्याविषयीं स्वामीनें कान्होजीस पत्र लिहिलें. कान्होजीनें लगेच जयगडास हुकूम पाठवून हत्ती सोडून दिला. त्यापूर्वींच सीदीसाताचे लोक हत्ती घेतल्याशिवाय परत आलेले पाहून तो ज्यास्तच चिडला, आणि हें सर्व कृत्य स्वामीच्याच मसलतीनें घडलें असा बहाणा करून,सीदीसातानें एकदम अविचारानें स्वामीच्या परशुराम येथील देवालयावर स्वारी केली. स. १७२७ च्या फेब्रुवारींत शिवरात्रीच्या दिवशीं त्या पवित्र स्थानाचा सीदीनें विध्वंस केला; देवालयाची व ब्राह्मणांची संपत्ति लुटून नेली; आणि पळून न जातां जे ब्राह्मण तसेच तेथें राहिले, त्यांस द्रव्य दाखविण्याकरितां मार देऊन त्यांची नानाप्रकारें हालअपेष्टा केली(.पा.ब्र.च.,पत्र पृ, २३.)

हा प्रकार पाहून स्वामीस अतोनात दुःख झालें. त्यानें सीदीचा हत्ती जयगडाहून चिपळुणाजवळ गोवळकोटास आणिला; सीदीसात यास बोलावणें पाठवून हत्ती त्याचे स्वाधीन केला; आणि 'देवब्राह्मणांचा तूं उच्छेद केलास, अतःपर तुझाही उच्छेद लवकरच होईल, ' असा सीदीस शाप देऊन स्वामी परशुरामास

गेला. तेथील एकंदर भयंकर विध्वंस पाहून स्वामीस अत्यंत क्रोध आला. कान्होजीच्याही लक्षांत हें सर्व प्रकरण येऊन त्यानें स्वामीस आपणाकडे समजुतीसाठीं बोलाविलें. परंतु स्वामीनें तें ऐकिलें नाहीं. जंजिऱ्याचा मुख्य सीदी रसूल यानेंही स्वामीस समजुतीसाठीं जंजिऱ्यास बोलाविलें; व दोन गांव इनाम देण्याचें आश्वासन दिलें. परंतु हिंदुधर्माचा उच्छेद ज्याच्या राज्यांत होतो, त्यास भेटणें स्वामीस योग्य वाटलें नाहीं. तथापि सीदी रसूलनें सीदीसातास हुकूम पाठवून स्वामीच्या देवालयाची नेलेली चीजवस्त त्यास परत देवविली. यापुढें कोंकणांत राहवयाचें नाहीं असें स्वामीच्या मनानें घेतलें; आणि बाजीरावाच्या विचारानें देशावर जाण्याचा निश्चय केला. स्वामीनें कोंकण सोडून जाऊं नये ह्मणून कान्होजी आंगऱ्यानेंही पुष्कळ मध्यस्थी केली; आणि शेवटीं शपथही घातली. त्यावरून स्वामी आणखी एक वर्ष कोंकणांत राहिला. दरम्यान सीदी सातानें पुनः स्वामीस थोडीशी तंबी दिली. त्यावरून कान्होजीनें स्वामीची कुचंबणा पाहून व आपल्या एकट्याच्या हातून सीदीचा पाडाव होणें कठीण असा विचार करून, स्वामीस घातलेली शपथ मोकळी केली; तेव्हां स्वामी परशुराम सोडून साताऱ्यानजीक धावडशी येथें येऊन राहिला, ( स. १७२८ ). जंजिऱ्याचा अधिकारी सीदी रसूल याकूदखान हा भला मनुष्य होता. कान्होजीचा कुलाबा किल्ला घेण्यासाठीं त्याजबरोबर सीदी रसूलचा कैक वर्षे झगडा चालत असल्याची हकीकत प्रसिद्ध आहे. कान्होजी आंगऱ्याचा व सीदीचा तह बाळाजी विश्वनाथानें जुळविला तेव्हांपासून दहा वर्षे हबशी व आंगरे यांची गोडी होती. स्वामीचें प्रकरण उपस्थित झालें नसतें, तर ही गोडी तेव्हां एकदम बिघडण्याचें कारण नव्हतें. परंतु आपल्या मंदिराची दुर्दशा सहन न होऊन कान्होजीच्या मार्फत सीदीस तंबी पोचविण्याचा प्रयत्न स्वामीनें सुरू केला. कान्होजीनें तें काम एकदम अंगावर घेतलें नाहीं. त्यानें शाहूस कळविलें, कीं 'श्यामल व वरकड शत्रूंचा उपद्रव बहुत आहे. हुजुरून साहित्य गनीमास नतीजा पाठवावयाचें होत नाहीं; स्वामींनीं आपले स्थळास दुसरा पाठवून, आपणास मामल्यापासून मुक्त करावें.' याच सालच्या दसऱ्याचे दिवशीं कान्होजी साताऱ्यास जाऊन शाहूस भेटला. या भेटींत हबशाचें प्रकरण सलुखानें मिटवावें असें ठरलें असावें;

कारण या वेळीं निजामाच्या संबंधानें शाहूची तारांबळ होती आणि आंगऱ्यास तरी ही नवीन उठाठेव अंगावर घेण्याची उत्कंठा मुळींच नव्हती. सीदीनें मात्र या वेळीं मराठ्यांचे रयतेस अतोनात छळणें चालविलें होतें, पुढें कान्होजी स. १७२९ त मरण पावला. स. १७३०-३१ त बाजारावानें संभाजी व दाभाडे यांचीं प्रकरणें उरकलीं, तेव्हां ब्रह्मेन्द्राच्या टोंचणीमुळें, हबशास जिंकणें हें स्वीकृत कर्तव्याचें एक मुख्य अंग शाहूनें पुढें स. १७३२ त अंगावर घेतलें.[१]

जंजिऱ्यावरील मोहिमेचा पूर्ववृत्तान्त हा अशा प्रकारचा आहे. धावडशीस गेल्यावर स्वामींनें साताऱ्च्या मुत्सद्यांस व शाहूस भर घालून जंजीरा काबीज करण्याची खटपट सुरू केली. मराठमंडळाची शक्ति पाहिजे तितकी असूनही त्याची रचना राजवृद्धीस कशी अपायकारक होती याचें विशिष्ट उदाहरण ही जंजिऱ्यावरची मोहिम होय. जंजिरा जिंकून पश्चिम किनारा पूर्णपणें निर्धास्त करणें हें राज्याचें पहिलें कर्तव्य होय हें प्रत्येक असामी जाणत होता. प्रतिनिधि, पेशवे, आंगरे, फत्तेसिंग भोसले वगैरे सरदार व्यक्तिशः प्रबळ व कर्तृत्ववान होते; पण गेल्या पांच सात वर्षांच्या कारभारांत प्रत्येकास असा कांहीं अनुभव आला होता, कीं एकानें दुसऱ्याच्या भानगडींत केव्हांही पडूं नये, आपल्या एकट्याच्या हातून होईल तें करावें, आणि साधेल तितका स्वतःचा पंथ स्वतंत्र ठेवावा; सर्वांची मोट एक ठिकाणीं बांधल्यापासून नुकसान मात्र होतें, आणि फलप्राप्ति कांहींच होत नाहीं. हा अनुभव बाजीरावाच्या कारकिर्दीत विशेष दिसून येतो. कोणतेंही राज्यकाम एकतंत्री प्रयत्नाशिवाय होत नसतें, आणि बाजीरावाच्या अमदानींत असा एकतंत्री प्रयत्न थोडा बहुत उत्तर हिंदुस्थानांत मात्र घडून आला.

२. **स्वारीची वाटाघाट व तयारी.**—जंजिऱ्यावर स्वारी करण्या-संबंधानें स्वामींनें प्रमुख मुत्सद्यांमार्फत जोराची खटपट चालविली. स्वतः शाहूनें कुटुंबसहवर्तमान धावडशीस येऊन स्वामीचें दर्शन घेतलें. हिंदूंच्या साम्राज्यांत देवब्राह्मणांचा छळ होणें, ही गोष्ट किती लज्जास्पद आहे हें स्वामीनें शाहूच्या मनांत भरविलें. बाजीरावासही वारंवार पत्रें लिहून स्वामीनें या प्रकरणांत

१ इ ऐ. विविध विषय ले. ३१; शा. रो. १३८, २०-७-१७२६ ऐ. टि. १.२४ नारोशंकरचीं पत्रें.

पुष्कळ गळ घातली. परंतु स. १७३१.३२ पावेतों प्रमुख सरदार निरनिराळ्या कामांत गुंतलेले होते. ब्रह्मेंद्रस्वामी शाहूपाशीं पेशव्याची तरफदारी करतो हा प्रकार प्रतिनिधीचा मुतालिक यमाजी शिवदेव वगैरे मंडळीस खपत नव्हता. ते स्वामीचीं कारस्थानें बिघडवून टाकण्याचा प्रयत्न करीत.

कान्होजी आंगरे थोडाबहुत मराठमंडळाशीं फटकून वागे. वसुलाची फेड वेळे-वर न केल्याबद्दल शाहूनें त्याची अनेकवार कानउघाडणी केली आहे. त्याचा मुलगा सेखोजी आंगरे यास शाहूनें सरखेलीचा कारभार ता. २१-७-१७२९ रोजीं सांगितला. हा सखाराम ऊर्फ सेखोजी राजनिष्ठ व इमानी असून हबशांचें प्राबल्य मोडून मराठी राज्याच्या अभिवृद्धीसाठीं मनापासून झटणारा होता. शौर्याची आवड, भारदस्तपणा व शालीनता हे गुण सेखोजीच्या अंगीं विशेष होते. त्याची आई मथुराबाई ही कर्तृत्ववान् व मराठी राज्याची अभिमानी होती. तिचा व ब्रह्मेंद्रस्वामीचा पत्रव्यवहार वाचण्यालायक आहे. हबशांच्या युद्धांत तिनेंच आंगऱ्यांचे तर्फे पुढाकार घेतला होता. स. १७३२ ता. १२ फेब्रुवारीस बाजीराव कुलाब्यास गेला होता. ' त्यांच्या आमच्या परस्पर भेटी झाल्या उत्तम प्रतीनें सौरेस्य जाहलें, ' असें सेखोजी लिहितो. याशिवाय बांकाजी नाईक महाडिक नांवाचा दुसरा एक शूर सरदार आंगऱ्यांचे पदरीं होता त्यानें या पुढील मोहिमेंत चांगलाच पराक्रम गाजविलेला आहे. (शा. रो. १३९).

कान्होजीच्या पश्चात् हबशांनीं कोंकणांत बराच उपसर्ग मांडिला. तथापि सेखोजीच्या व्यवस्थेपुढें हबशांचें विशेष कांहीं चाललें नाहीं. हबशांचें निर्मूलन करण्याचा मात्र उद्योग ब्रह्मेंद्रस्वामीनें तसाच नेटानें चालविला होता. त्यावरून यशवंतराव महादेव पोतनीस यास शाहूनें जंजिऱ्याचें कारस्थान रचण्यास कोंक-णांत पाठविलें. त्या सुमारास म्हणजे सन. १७३३ च्या फेब्रुवारींत जंजिऱ्याचा मुख्य अधिकारी सीदी रसूल मरण पावला. त्यास अबदुल्ला नांवाचा वडील मुलगा असून, सीदी संबूल, अंबर, रहआन, याकुत, हसन वगैरे आणखी सहा लहान मुलगे होते. अबदुल्लाचा मुलगा सीदी रहमान हा आणखी एक वारस असून त्याचा इतराशीं बेबनाव होता. शिवाय शेख याकूब नांवाचा हबशांचा एक पराक्रमी सरदार मूळचा कोळी असून मुसलमान झाला होता, तो शेखजी

या नांवानें प्रसिद्ध असून हबशांचे राज्यांत त्याचें वजन मोठें होतें. त्याच्या मार्फत यशवंतराव महादेवानें आपलें कारस्थान चालविलें. मराठ्यांच्या सर्व आरमाराचें आधिपत्य, हबशांच्या सर्व मुलखाची सुभेदारी, कित्येक किल्ले व इनाम गांवें, पेणपासून कोल्हापुरापर्यंत तळ कोंकणांतील सरगोंडपणाचा हक्क, या गोष्टी शेखजीस देण्याचें कबूल करून, शिवाय त्याचे भावास रायगडची किल्लेदारी व फौजेंतील लोकांस एक लक्ष रुपये बक्षीस देऊन त्यांस आपल्या राज्यांत सामील करून घ्यावें, असें यशवंतरावानें ठरविलें. सीदी रसूल मरण पावतांच यशवंतराव महादेव पोतनीसानें पूर्वी सांगितलेल्या शेखजीच्या मार्फत हें कारस्थान रचून, सीदीच्या घरांत दुफळी उत्पन्न केली. वडील मुलगा अबदुल्ला हा मराठ्यांस सामील झाला, म्हणून त्यास गादी मिळूं नये, अशी खटपट इतर भावांनीं चालविली. अबदुल्ला मराठ्यांच्या मदतीची वाट पाहत जंजिऱ्यास राहिला: आणि सीदी रहमान आजाचा मुर्दा दफन करण्याकरितां बंदराबर राजपुरींत आला असतां, धाकट्या भावांनीं जंजिऱ्याचे दरवाजे बंद करून मराठ्यांशीं लढण्याची सिद्धता केली. सीदी रहमान बाहेरच राहिला. त्यानें शेखजी व यशवंतराव महादेव यांचे मार्फत मराठ्यांची मदत तावडतोब मागितली. या कारस्थानाचा शाहूनेंही तात्काळ फायदा घेतला. त्यानें बाजीरावास तावडतोब साताऱ्यास बोलाविलें. 'आधीं पत्र न वाचणें. घोड्यावर बसणें, मग पत्र वाचणें,' अशीं पत्रें शाहूचीं बाजीरावास गेलीं होतीं. सातारा येथें शाहूनें बाजीरावास हें कारस्थान कळविलें, आणि मोहिमेस लागणाऱ्या खर्चाची तजवीज कर्ज काढून लावून दिली.[1] वास्तविक ही खटपट प्रतिनिधीमार्फतच होती, हें शाहूनें ठिकठिकाणीं आपल्या पत्रांत व्यक्त केलें आहे. शाहूनें प्रतिनिधीस अगोदरच कोंकणांत रवाना केलें होतें; आणि मागाहून बाजीराव व फत्तेसिंग भोसले यांसही तिकडे पाठविलें. ते दोघे पुण्यास एकत्र होऊन स. १७३३च्या एप्रिलांत कोंकणांत उतरले. प्रतिनिधि मात्र लगोलग न येतां बाजीरावाच्या मागून मे महिन्याच्या अखेरीस कोंकणांत आला. यशवंतराव महादेवामार्फतचें कारस्थान प्रतिनिधीचे सल्ल्यानेंच चाललें होतें.

या वेळीं शाहूनें लढण्याची तयारी फार चांगली केली होती. दाभाडे, गायकवाड आंग्रे या सर्वांस बाजीरावाची कुमक करण्याविषयीं त्यानें आग्रहाचीं

१ शा. रो ३६४.

त्रें लिहिलीं. सुरतेहून सीदी मसूद जंजिऱ्यास कुमक घेऊन येणार होता, त्यास अडवून धरून हस्तगत करण्याचीही तर्तूद करणें, असें दामाडे गायकवाडांस शाहूनें पुनः लिहिलें. बाजीरावानें आंगऱ्यास तयारीचीं पत्रें लिहिलीं. मराठ्यांच्या फौजा कोंकणांत उतरल्या. शेखजीच्या गुप्त मसलतीनें त्यांनीं मुख्य स्थळें हस्तगत करण्याचा क्रम आरंभिला. शाहूनें मुद्दाम दोन हजार निवडक मावळे तयार करून राजगडावर पाठविले. मोहिमेची खबर वरचेवर मिळावी म्हणून सचिवाचे मुलखांत शाहूनें डांक बसविली. आंगऱ्याच्या संबंधानें शाहू व बाजीराव दोघेही साशंक होते. त्याजकडून कामगिरीस व्यत्यय येऊं नये म्हणून शाहूनें जिवाजी खंडेराव यास ता. २ मे रोजीं सेखोजी आंगऱ्याकडे पाठविलें, आणि आंगऱ्याचा कारभारी रघुनाथ हरि नांवाचा प्रभु गृहस्थ होता त्याच्या मार्फत आंगऱ्यास चांगली भर दिली. तथापि इतक्या तयारीनें हबशी कबजांत येणार नाहीं हें सेखोजी जाणून होता. हबशाचा जोर सेखोजी इतका दुसऱ्या कोणास माहीत नव्हता. बाजीरावाच्या मनांत थोड्या फौजेनें काम संपवावेंसें होतें. बाजीरावाचा विचार आंगऱ्यानें नापसंत केला; आणि चांगली तयारी असल्याशिवाय हबशी कबजांत येणार नाहीं असें बाजीरावास कळविलें. ब्रह्मेन्द्रस्वामीनेंही सेखोजी व संभाजी आंगरे या उभयतांस उत्तेजनपर पत्र लिहिलें.[१]

३. पहिली जोराची मोहीम ( मे–ऑगस्ट १७३३ ).–बाजीरावानें सीदीच्या मुलखांत शिरतांच तळें व घोसाळें हे किल्ले काबीज केले. सेखोजी आंगरे व बाजीराव यांची भेट दंडाराजपुरी येथें मे महिन्यांत झाली. मानाजी आंगरे ता. १ मे रोजीं निघून आरमार घेऊन जंजिऱ्यावर आला. बाजीराव राजपुरीवर आला त्याच दिवशीं सीदी अब्दुल्लाचा किल्ल्यांत खून झाला, आणि त्याचा मुलगा सीदी रहमान पेशव्यास सामील झाला. मे महिन्याचे पहिल्या आठवड्यांत किल्ल्यांतील सीद्यांपैकीं सीदी रहयाण बाजीरावावर राजपुरी येथें चालून आला, त्यावेळीं निकराचें युद्ध होऊन सीदी रहयाण व त्याचे १००लोक ठार झाले. एक सीदी मराठ्यांचे कबजांत आला, त्यास त्यांनीं बेडी घातली. बाजीरावानें जंजिरा काबीज केला अशी यावरून लोकांत आफवा उठली. वास्तविक प्रकार तसा नव्हता. दंडाराजपुरी येथें पराभव पावल्यावर सर्व सीदी सरदार जंजिऱ्यांत

१ शा. म. रो. ३५४, ५६, ५८, ५९, ६१. ब्र स्वा. ले. ३१०.

जाऊन बंदोबस्तानें राहिले. या वेळच्या हकीकतीचें पत्र ता. २६ मे स १७३३ चें बाजीरावानें सातान्यास अंबाजीपंत पुरंदन्यास लिहिलेलें आहे, त्यावरून हकीकत चांगली कळून येते. जंजिरा कबजांत येईना, तेव्हां मराठ्यांनीं राजपुरी व नजीकचें ठिकाण खोकरी हीं लुटलीं. तसेंच अंतोणें, नागोठणें, अश्वधारा, अवचितगड, बिरवाडी, निजामपुर वगैरे स्थळेंही मराठ्यांनीं लढून घेतलीं. मानाजी आंगरे आरमार घेऊन जंजिन्यावर आला होता त्यानें सीदीच्या आरमाराचा पूर्ण पाडाव केला.[१] अशा रीतीनें सीदीचा किल्ल्यांत चांगलाच कोंडमारा झाला. तरी ते फार बंदोबस्तानें होते. अंजनवेल, गोवळकोट, विजयगड, जंजिरा, रायगड, उंदेरी हे त्यांचे बळकट किल्ले सर झाले नव्हते. ह्या प्रत्येकावर सीदीचा चांगला बंदोबस्त होता. मराठ्यांचा निश्चय पाहून त्यांसही स्फुरण चढलें. चौलच्या पोर्तुगीजांकडे, मुंबईच्या इंग्रजांकडे, सुरतेच्या मोगलांकडे व हैदराबादच्या निजामाकडे सीदींनीं आपणास मदत करण्याबद्दल जोराचीं कारस्थानें चालू केलीं. दिल्लीच्या बादशहाकडेही त्यांनीं या आणीबाणीच्या प्रसंगीं आपला बचाव करण्याची विनंति केली. वजिरानें त्यांस फौजेची व आरमाराची मदत तावडतोब करण्याबिषयीं मुंबईच्या इंग्रजांस हुकूम पाठविला. ' आमचा धंदा व्यापाराचा आहे, तत्राप आपण फौजेची व पैशाची मदत केल्यास, आम्ही आरमार पाठवून सीदीस मदत करूं ', असें इंग्रजांनीं परत कळविलें. जंजिन्याच्या गादीवर जो सीदी सरदार बसला होता, त्याच्या नांवानें पातशाही फर्मानही सीदींनीं आणविलें.

हबशांनीं जिकडे तिकडे नेटानें उद्योग चालविल्यामुळें मराठ्यांचा जोर विशेष चालेना. निरनिराळे मराठे सरदार पर्जन्यकाळा ठिकठिकाणीं छावणी देऊन बसले. शेखजी व सीदी रहमान हे दोन मराठ्यांस मिळाल्यामुळें त्यांची आपल्या जातभाईकडे फार नाचक्की झाली. इकडे मराठ्यांच्या हातून तडकाफडकी काम होईल अशी शेखजीस खात्री न वाटल्यामुळें, तोही थोडासा शिथिल झाला. पन्नास हजार रुपये द्यावयाचा करार असतांही बाजीरावानें दहा पांच हजारांवर त्याची बोळवण केली, त्यामुळेंही तो बेदील झाला कबिले ठेवण्यासाठीं ह्मणून मराठ्यांनीं नुकताच काबीज केलेला अवचितगड किल्ला जंजिन्याचे ईशान्येस सुमारें २० मैलांवर होता तो शेखजीनें मागितला, तेव्हां तो किल्ला त्यास देणें बाजी-

१ पा. ब्र. च. ले. ३५८; का. सं. प. या. १६६; खं २ पृ ६८; Forrest.

रावास भाग पडलें. शेखजीनें आजाराचें ढोंग करून पर्जन्यकाळचे चार महिने आपल्या हातून कांहीं होणें नाहीं असें कळविलें एकंदरींत खोकरीच्या किल्ल्याची वाट दाखविण्यापलीकडे त्यानें कांहीं एक काम केलें नाहीं असें बाजीरावानेंच लिहिलें. बाजीरावानें कोंकणांत छावणी केली आणि शाहूनें त्यास फौजेची वगैरे पुरवणी करण्याचें पत्करिलें.

बाजीरावाचें व सेखोजी आंगऱ्याचें संगनमत होतें. सेखोजीनें मानाजीस पाठवून सीदीचें आरमार बुडविलें हे वर सांगितलेंच आहे. इकडून खुषकीच्या वाटेनें त्यानें आपला शूर व पराक्रमी सरदार बांकाजी नाईक महाडिक यास मंडणगड, विजयगड, गोवळकोट व अंजनवेल हे शत्रूचे मजबूद किल्ले घेण्यास पाठविलें. बांकाजीनें प्रथम बाणकोट व नंतर पूर्वेकडील मंडणगड हे दोन किल्ले मोठ्या जवामर्दीनें ता. २३ रोजीं काबीज केले. मराठ्यांचें विजयी निशाण मंडणगडावर फडकूं लागल्याचें मनोरंजक वर्णन कान्होजीची बायको मथुराबाई इनें ब्रह्मेन्द्र-स्वामीस लिहिलें आहे. स्वामीनें उलट उत्तर ईर्षात्मक मथुराबाईस पाठविलें. श्रावणमासीं स्वामी एक महिना समाधि लावून बसत असे. या सालीं समाधीसाठीं स्वामीनें परशुरामास यावें असा मथुराबाईचा आग्रह होता. परंतु गोवळकोट व अंजनवेल हस्तगत झाल्याशिवाय कोंकणांत समाधीस येत नाहीं, असा स्वामीनें आपला निर्धार तिला कळविला. त्यावरून कोंकणांतील ही मोहीम त्वरेनें संपविण्याकरितां शाहूनें ता. २० मेच्या सुमारास श्रीनिवास प्रतिनिधि, आनंदराव सरलष्कर, कृष्णाजी दाभाडे वगैरे सरदारांस फौज देऊन कोंकणांत रवाना केलें. उदाजी चव्हाण, शंभुसिंग जाधव व सचिव यांसही कोंकणांत फौजा पाठविण्यास शाहूनें आज्ञा केली[१]

शाहूच्या हुकमाप्रमाणें प्रतिनिधि मे महिन्यांत कोंकणांत उतरला. या पूर्वीच तो कां आला नाहीं तें कळत नाहीं. बाजीराव ज्या कामांत आहे त्यांत प्रतिनिधि मनापासून पडत नसे, आणि प्रतिनिधि आल्यावर बाजीरावाचेंही मन या मोहि-

१ ब्र. च. ले. २० व ३३०; व. च. ले. २०३. का. सं. प. या. ले. १६६ व शा. रो. ६३. या मोहिमेंतील पत्रांच्या तारखा रा. राजवाडे व पारसनीस यांनीं चुकीच्या दिल्यामुळें, पुष्कळ घोटाळे झालले असून, त्यांचा बराचसा उलगडा रा. आठल्ये यांनीं केसरींतील पत्रव्यवहारांत केला आहे.

मेंत तितकें दक्ष राहिलें नाहीं. यशवंतराव पोतनिसानें रायगडचें राजकारण सिद्ध केलें होतें, त्यास अनुसरून प्रतिनिधीनें रायगडावर भेद करून ता.८ जून रोजीं तो इतिहासप्रसिद्ध किल्ला कार्बीज केला. सन १६९० त औरंगजेबानें हा राजधानीचा किल्ला कार्बीज केल्यापासून त्रेचाळीस वर्षे तो मुसलमानांचे कबजांत होता, आतां मराठ्यांनीं घेतला. मावळ खोऱ्यांतील झुंझारराव जिवाजी मरळ वगैरे देशमुखांनीं या मोहिमेंत चांगली कामगिरी बजावल्याबद्दल त्यांस इनामें करून दिलीं[१]. ' राजश्री आनंदराव बहिरव यासमागमें आपण जमावानिशीं मोहिमेस आलों. खोकरी, राजपुरी कुल देशदुर्ग रायगडासहवर्तमान हस्तगत जालिया, खुशालीच्या प्रसंगीं मावळ प्रांतींच्या जमेदारांचें बरें करावें म्हणून बाबाजी झुंजारराव व जिवाजी मरळ देशमुख यांनीं राजपुरीचे मुकामीं विनंति केली, त्यावरून येणेंप्रमाणें तह केला असे. ' मावळांतील लोक या वेळीं मुद्दां राष्ट्रकार्यार्थ कष्ट करीत होते; आणि पेन आणीबाणीच्या प्रसंगीं लढण्यासाठीं मुद्दाम मावळे लोक पैदा करून आणीत. या प्रसंगीं मावळे लोकांनीं कसे कष्ट केले त्याचें वर्णन रा. देशपांडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या एका सनदेंत फार सुरेख केलेलें आहे. ' दुसरे दिवशीं फौजा उतरून मजल दरमजल सिखऱ्यास आले. वैशाख व ३० म्ह. ता. २ मे १७३३ रोजीं रोजीं खोकरी हस्तगत केली. त्याउपरी राजमाची व राजपुरी हस्तगत झाली. त्या उपरी पुढें रायगडसहवर्तमान कोंकणप्रांतींचे देशदुर्ग हस्तगत झाले. ते समयीं मावळच्या कुल सरदारांनीं व जमेदारांनीं व गडकिल्ल्यांचे लोकांनीं बोली घातली, कीं तक्ताचा जागा रायगड सुटला, या उपरी मावळ प्रांतींची मोगलाई *चाकर लोकांस खासगत शेतावर ज्याचे त्यास बांधून द्यावी. ह्याप्रमाणें मनास आणून हे सनद सादर केली असे. ही सनद ता. ३ ऑगस्ट स. १७३३ रोजीं नारो शंकर सचिवानें मुसेखोरेकर देशमुख व देशपांडे यांस दिलेली आहे. या स्वारींत अंबाजी त्रिंबक पुरंदरे प्रतिनिधीबरोबर

१ खं. १६ ले. ८१ व खं. १७ ले १९. केसरी २८-३-१९०५.

* स्वराज्य व मोगलाई असे दोन भाग. आतां मोगलांकडून प्रदेश जिंकल्यावर मावळे मोगलाई मागतात. भागवतकृत भोरचे इतिहासांत या मोहिमेचा स. १७३४ दाखल आहे, तो स. १७३३ पाहिजे. पुढच्या पृष्ठावरील पत्र रा. वासुदेव विष्णु जोशी सातारा यांनीं मे. दिलें.

राहून युद्धाचें वर्तमान बाजीरावास कळवीत असे. ' आह्मीं तेथून स्वार होते समयीं खर्चाविशीं राजश्री स्वामीस लिहिलें त्यावरून पंधरा हजार रु. रवानगी झाली व हल्लीं आह्मी येथें पावल्यावरी पंधरा हजार रु. रवाना करविले आहेत. एका दो रोजांत रवाना होतील. स्वामींनीं तेथील बंदोबस्तास अंतराय न करावा. सीदी साताकडील राजकारणाचा अर्थ पूर्वी लिहिलाच आहे. त्यास, छ १३ सफरीं १४·७·१७३३ रोजीं राजश्री पंत प्रतिनिधीच्या भेटीस सीदीसात आला. भेटी झाली. सारा कोंकण प्रांत आपले स्वाधीन करावा, असे कित्येक मुद्दे बहुतच भारी घातले. यामुळें यांचा त्याचा बनाव झाला नाहीं. फिरोन माघारा गोवळकोटांत गेला आहे. बोलीचालीची हालमेल लागलीच आहे, म्हणोन वर्तमान आलें आहे. पुढें काय जें वर्तमान येईल तें लेहून पाठवूं. विदित जालें पाहिजे.'

एकंदरीत या मोहिमेंत शाहूचें लक्ष किती होतें आणि तो सरदारांची समजूत कशी काढीत होता, हें त्यानें बाजीरावास लिहिलेल्या खालील पत्रावरून कळून येतें. ' सहा किल्ले फत्ते जाले, उत्तम गोष्ट जाली. तुह्मी कार्यकर्ते बुद्धिमंत सेवक आहां, कार्यसिद्धि होऊन ये, तोच अर्थ संपादाल हा स्वामीस निशा आहे. तुह्मी सामदाम भेदबुद्धि कर्तव्य तैसी करून महद्यश संपादणें. सर्वांचें मनोधारण करून कार्यसिद्धि करणें. रा. श्रीनिवास पंडित प्रतिनिधीकडील जमाव व सचिव पंताकडील जमाव तुम्हांसंनिध आहे त्यांचा, व जे मराठे लोक भेटले असतील त्यांचा, बहुतां प्रकारें दीलदिलासा करून खर्चा वेंचास देत जाणें. उभयतां एकामतें वर्तोन सेवेचा मजुरा करून घेणें. सविस्तर चिरंजिवास (ह्म. फत्तेसिंग भोसले यास ) लिहिलें आहे त्यावरून कळों येईल, सुज्ञ असा.' निरनिराळ्या सरदारांस अंतस्थ चुरस असून त्याचा परिणाम अनिष्ट होईल असा शाहूच्या मनांतील ध्वनि या पत्रांत व्यक्त होतो. बाजीरावासही असेंच पुष्कळदां चढवून लिहावें लागे.

याप्रमाणें आंगरे, प्रतिनिधि, पेशवे वगैरे सरदारांनीं सीदीची अगदीं त्रेधा उडवून दिली. जूनच्या अखेरीपावेतों मुंबईजवळच्या थळचा मोठा किल्ला व पेणनदीमधील रावळीचा किल्ला सेखोजी आंगऱ्यानें सीदीपासून सर केला, त्यामुळें मुंबईस इंग्रजांस मोठी धास्ती पडली पोर्तुगीझ लोक हबशांस मदत करीत, सबब त्यांचा चौल शहराचा भाग आंगऱ्यानें हस्तगत करण्याचा प्रयत्न चालविला. इंग्रजांचें 'रोझ' नांवाचें जहाज त्यानें पाडाव केलें होतें, तें ७६०३ रुपये दंड

घेऊन आंगऱ्यानें इंग्रजांस परत दिलें. सेखोजी आंगरे उत्तरेकडे गुंतला असतां, त्यानें व त्याची आई मथुराबाई इनें बांकाजी नाइकास अंजनवेल, गोवळकोट वगैरे ठिकाणें कार्बाज करण्यास पाठविलें. बांकाजीच्या या वेळच्या पराक्रमाची हकीकत मथुराबाईनें ब्रह्मेंद्रस्वामीस कळविलेली वाचण्यालायक आहे, ती अशी[1]

' अंजनवेल व गोवळकोट दोनी स्थळें स्वराज्यांत झालीं,ह्मणजे मोठीं सुकीर्ति होईल, यास्तव बांकाजीनाईक याबरोबर जमावाची बळकटी करून रवानगी केली होती. विजयगड किल्ला सा सात रोज भांडला. चिपळुणीं एक दोन युद्धें बकाजी नाइकाजवळ हबशानें तुंबळ दिला आषाढ शु. ७ स सीदीसात तानही गांवचा जमाव भारी करून चालून आला. हजार दीड हजार जमाव त्याचा झाला, आह्मांकडील तानशें माणूस होतें. तेथें युद्ध बहुत तुंबळ झालें. मोड होऊन गनीम मारून काढिला, गोवळकोटांत घालविला. तों श्रीपतराव श्रीस्थळीं (परशुरामास) येऊन आपले नजरेनें युद्ध पाहिलें त्याउपर जयगडाहून तोफा व जमाव आला. गोवळकोटास[2] मोर्चे देऊन जागा घ्यावा, तों राजश्री प्रतिनिधि यांही गोवळकोटास अनुसंधान लाविलें. बकाजी नाईक व प्रतिनिधीच्या भेटी झाल्या तों मजकूर प्रतिनिधीनें घातला कीं, गनीम सुलाखेंकरून घेतों, तुह्मांस भांडावयाचें प्रयोजन नाहीं. त्या उपरी बकाजीनाईक बोलिले, तुह्मी अंजनवेलीस जावें, त्यांचा तो जागा घ्या, आह्मी गोवळकोट घेतों तें कबूल करीतना. त्याकडील अनुसंधान चाललें. सीदीसाताची व प्रतिनिधीची भेट झाली. त्यावरून तेथें राहून कारण नाहा असें पाहून, बाकाजीनाईक परत आणविलें. त्यामागें सीदीसातानें प्रतिनिधीशीं एक दोन युद्धें तुंबळ दिला. त्यांचे हातून कार्यसिद्धि होतां दिसत नाही पुढें प्रसंग होईल त्याप्रमाणें वर्तणूक केली जाईल.' या मजकुरावरून त्या वेळची मराठे सरदारांची आपसांतली चुरस व्यक्त होते. प्रतिनिधाला सीदीचा कावा समजला नाहीं आणि त्यानें बाकाजीस मदत केली नाहीं. प्रतिनिधीच्या हातून सीदीचा बंदोबस्त होईना तेव्हां त्यानें शाहूमहाराजांकडे मदत पाठविण्याबद्दल एकसारखा तगादा लाविला. त्यावरून चिमाजीआपास शाहूनें प्रतिनिधीस मदत पाठविण्याविषयीं अनेक वेळां लिहिलें. परंतु चिमाजीनें वेळेवर

---

१ खं ६.८५ ता. १६-५-१७३३; खं ३-२०५. या पत्राची तारीख ९-८-१७३३ पाहिजे.

२ चिपळूण, परशुराम, गोवळकोट हीं स्थळें मैल दोन मैलांच्या अंतरांत आहेत.

मदत पाठविली नाहीं. त्यावर संतापून जाऊन 'तुह्मी जर मदतीस गेलां नाहीं, तर मी स्वतः जाईन,' असें शाहूनें खरमरित पत्र चिमाजीस लिहिलें. त्यावरून पिलाजी जाधव याची रवानगी झाली, पण त्यामुळें आणखी एक रुष्ट इसम मध्यें येण्यापलीकडे जास्त कार्य झालें नाहीं; आणि प्रतिनिधि हार खाऊन परत आला.

बांकाजीची वर सांगितलेली गोवळकोटची निकराची लढाई ता. ८ जुलै रोजीं झाली. त्या प्रसंगीं बांकाजीनें दाखविलेली चिकाटी अप्रतिम असून त्यामुळेंच पराभव झालेला नाहींसा होऊन मराठ्यांस जय मिळाला. पराभव झाला तरी चिकाटी न सोडतां फिरून उद्योग करणें हा गुण इंग्रजांच्या संबंधानें विशेष परिचयाचा आहे. प्रतिनिधीनें निराळाच उपक्रम आरंभिल्याबरोबर मथुराबाईनें बांकाजीस मोहिमेवरून परत बोलाविलें. सरलष्कर आनंदराव सोमवंशी प्रतिनिधीस सोडून जात होता, त्यास शाहूनें निषेधदर्शक पत्र लिहिलें[1]

**४. अव्यवस्था व फसगतीचीं कारणें.**—बाजीरावानें जंजिरा काबीज करण्याची शिकस्त चालविली होती. हबशाचा बराचसा मुलूख हस्तगत झाला. खुद्द जंजिरा, अंजनवेल, वगैरे चार पांच मजबूद ठिकाणें मात्र त्यांजकडे राहिलीं. तरी सीदीही मोठ्या आवेशानें लढत होते. त्यांनीं चहूंकडून कारस्थानें चालवून मदत आणिली, व निजामाचे मार्फत शाहूशीं तह करण्याचाही उपक्रम चालविला. शिवाय प्रतिनिधि व पेशवे यांजमध्यें बेबनाव असल्यामुळें मोहीम बिघडली. प्रतिनिधि व पेशवे एकमेकांच्या द्वेषानें एकमेकांचे उद्योग हाणून पाडीत, आणि एकमेकांच्या कागाळ्या छत्रपतीस लिहून कळवीत. आपणास खरी हकीकत कळावी म्हणून शाहूला मुद्दाम आपल्या भरंवशाचे इसम स्वारींत पाठवून खरी माहिती आणवावी लागे. पेशव्यांचा हस्तक लिहितो. 'पांडुरंग गोविंद परभु राजश्री स्वामींनीं जंजिऱ्यास पाठविला होता, तो काल शुक्रवारीं संध्याकाळीं आला. त्यानें वर्तमान निवेदन केलें, कीं राजश्री पंतप्रधान शामळास सांगोन पाठवितात कीं तुम्हीं चिंता न करणें, तुमचें अधिष्ठान मोडीत नाहीं, आपण कांहीं तुमच्या वाटेस जात नाहीं. पहिल्यानें आपण कांहीं येत नव्हतों. परंतु खावंदांच्या आग्रहास्तव आलों. आतां तुम्हीं कोणे गोष्टीची फिकीर न करणें. आपण तुमच्या वाटेस जात नाहीं. ऐसें शामळास सांगोन पाठवितात. तेणेंकरून श्यामळ खुशाल आहेत. जंजिऱ्यांत मनुष्य तर पांचशें. ऐसें सामान्य वर्तमान

---

१ शा. रो. ६०, ३० ऑगस्ट.

पांडुरंग गोविंद याणें रा. स्वामीस सांगितलें. तेणेंकरून बहुत श्रमी जाले. राजश्री नारबाही श्रमी जाले, कीं ' आजपर्यंत कोंकणस्थांचा लौकिक बरा जाला. परंतु या गोष्टीनें भ्रम गेला. याजकरितां श्रमी आहेत. येथें तजविजा होत आहेत कीं रा. स्वामी खुद्द आपण रायगडीं येणार. रा. नारबावास राजपुरीवर पाठविणार. यमाजी शिवदेव व उदाजी चव्हाण ऐसे अंजनवेलीस पाठविणार. ऐशा तजविजा होत आहेत. राजश्री स्वामी बोलले कीं अंबाजीपंत राजपुरीस गेले आहेत, ते चार गोष्टी प्रधानपंतास सांगोन, कार्य होऊन येई ऐसें जालें तर उत्तम आहे. ऐसें येथील वर्तमान तुम्हास कळावें म्हणून लिहिलें आहे. प्रतिनिधीचा बहुमान बराच होत आहे. कार्यकर्ते विश्वासनिधि तर तेच. प्रतिनिधीस बहुमान कडींतोडे व वस्त्रें पाठवूं लागले, तेव्हां राजश्री नारबाही व यमाजीपंतीं बहुतशी रदबदल केली, कीं प्रधानपंतांस बहुमान पाठविल्याशिवाय राव ( प्रतिनिधि ) घेणार नाहींत, तेव्हां उभयतांच्या आग्रहास्तव बहुमान ( उभयतांस ) पाठविला. ' यावरून त्या वेळच्या खटपटी लक्षांत येतील अशा द्वैधीभावाची अडचण बाजीराव व इतर मुत्सद्यांस एकसारखी जाचत असे.[1]

जुलै अखेर पावेतों मराठ्यांची सरशी होती. हबशी नाहींसा झाल्यानें आंगऱ्याचा जोर वाढून शेजारीं मुंबईस आपला निभाव लागणार नाहीं अशी इंग्रजांस धास्ती पडली. आंगऱ्यांविषयीं त्यांचे मनांत नेहमीच द्वेष होता, म्हणून इंग्रजांनीं हबशास फोज, दारूगोळा, अन्नसामुग्री वगैरेचा पुरवठा केला, तें पाहून सखोजी आंगऱ्यानें मुंबईवरच स्वारी करण्याची तयारी केली. परंतु पर्जन्यकाळ असल्यामुळें त्याचा इलाज चालला नाहीं. सखोजी व संभाजी आंगरे यांचें बनत नव्हतें, हें पाहून ब्रह्मेंद्रानें उपदेशपर पत्रें लिहून दोघांची समजूत काढिली. इंग्रजांस शह देण्याकरितां आंगऱ्यानें उंदेरीवर हल्ला चढविला. उंदेरी किल्ला हबशांचे कबजांत होता. त्या प्रसंगीं हबशास मदत करण्याकरितां इंग्रजांनीं टॉमस होल्डन यास ' मेरी ' नांवाचें लढाऊ जहाज व मुबलक साहित्य देऊन रवाना केलें. कॅप्टिन इंचबर्ड हाही जहाजावर होता. इंग्रजांनीं जुलै १६ रोजीं उंदेरीवर फौज उतरवून आपलें निशाण चढविलें. तेव्हां नजीकचा खांदेराचा किल्ला

१ आनंदराव सुमंताचें पत्र, तारीख १६·७·१७३३, भा. व. प. या. . ६५; खं. ६·८६, ता. १८·६·१७३३; ब्र. च. ले. ३०६.

मराठ्यांचा होता, त्यावरून मराठ्यांनीं उंदेरीवर मारा चालू केला. इंग्रजांचीही खोड मोडण्याचा शाहूचा विचार होता. ' बंदरोबंदरींचे सावकारांशीं इंग्रजांस प्रयोजन काय ! उंदेरी त्यांस श्यामलानें विकत दिली असेल तर पैके दिले असतील ते घेऊन त्यांनीं स्थळ द्यावें व सलूख करावा.'

सेप्टेंबर महिन्यांत इंग्रजांनीं सीदीच्या मदतीकरितां एक थोरलें लढाऊ जहाज पाठविलें व जंजिऱ्यासही लहान मोठीं लढाऊ जहाजें रवाना केलीं. त्यामुळें सीदीस मोठाच हुरूप आला तिकडे निजामानें हबशांच्या तर्फेनें कारस्थान चालविलें. निजामावर देखरेख ठेवण्याकरितांच चिमाजीआपा पुण्यास राहिला, शाहूचा हुकुम आला असतांही कोंकणांत गेला नाहीं सुरतेहून सीदी मसूद हबशाचे मदतीस येणार अशी बातमी आली, तेव्हां त्यास अडवून धरण्यासाठीं शाहूनें उमाबाई दाभाडे व दमाजी गायकवाड यांस तिकडीचे हुकूम पाठविले. दाभाडे व गायकवाड यांचें व बाजीरावाचें वांकडें असल्यामुळें वरील हुकूम त्यांनीं मानले नाहींत, आणि सेप्टेंबरांत सुरतेची मदत जंजिऱ्यास आली, तेणें करून जंजिरा बळावत चालला. आपसांतील कलह व सीदीला चहूंकडून येत असलेली मदत यांमुळें मोहीम फसण्याचा रंग येत चालला. इतक्यांत सेखोजी आंगरे सेप्टेंबर १७३३ त मृत्यु पावला तेणेंकरून मराठ्यांचें अतिशय नुकसान झालें. त्याच्या मृत्यूचें कारण कळत नाहीं. सेखोजीनें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेलीं पत्रें वाचलीं ह्मणजे त्यांवरून त्याची निष्ठा व नीति दिसून येते. बाजीराव, संभाजी आंगरे वगैरे सर्वांशीं सेखोजीचें वर्तन गोड अष्टपैलू होतें कुटुंबांतील बायामाणसांशीं प्रेम व सलोखा असे. लग्नादि कौटुंबिक व्यवहारांची व्यवस्था सेखोजी यथायोग्य लावीत असे. भांडण, तंटा, वैमनस्य वगैरे कोणाशीं नाहीं, असा हा त्या काळचा लौकिकवान पुरुष दिसतो. कान्होजीचा वक्रपणा त्याच्यांत नव्हता. तो अल्पायुषी झाला हें राष्ट्राचें मोठें नुकसान होय[१].

---

१ शा. रो. ६१; शा. रो. ५८-५९; ब्र. च. ले. १२८: खं. ३ ले. २४२—२६०. शकावली राबिलाखर ह्मणजे सेप्टेंबर देते, परंतु वा. इ. सू. १८३५ पृ. १६५ वरील नोंधींत वार व संवत्सराचा मेळ बसत नाहीं. खं. ३-१३१ व ६-८७ वरून सेखोजी ऑक्टोबर १७३३ चे पुढें वारला असें दिसतें.

सेखोजी मरण पावल्यानें सीदींस ज्यास्तच जोर झाला, तेव्हां त्यांचा समाचार घेण्यासाठीं चिमाजी आपा ऑक्टोबरांत कोंकणांत उतरला. जंजिरा फत्ते झाल्याशिवाय परत येऊं नये, अशी स्वामीनें त्यास आज्ञा केली. बांकाजी नायकासही गौरवून स्फुरण आणणारें पत्र लिहिलें, परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. सेखोजी मृत्यु पावल्यावर त्याचा भाऊ संभाजी आंग्रे विजयदुर्गास होता तो कुलाबा येथें सरखेलांच्या पदावर दाखल झाला. तो तिरसट, उतावळा व सन्देवाईक होता. शावांचें व त्याचें बरें नव्हतें. मानाजी त्याजविरुद्ध पेशव्यांस मिळून होता. स. १७३१ पासूनच संभाजीनें आपल्या तक्रारी शाहूकडे नेल्या होत्या. ता. २४-१-१७३१ रोजीं सातान्यास जाऊन त्यानें शाहूची व राण्यांची भेट घेतली. त्यांनीं त्याचा गौरव केला. पुढें त्यानें आपला कारभारी रघुनाथ हरि यास शाहूकडे पाठविलें, तेव्हां त्याजबरोबर शाहूनें संभाजीस उत्तेजनाच्या पुष्कळ गोष्टी सांगून पाठविल्या. परंतु संभाजीची समजूत पटलेली दिसत नाहीं. सरखेलीचे पदावर दाखल झाल्यावर त्याची त्रेधा उडाली त्यानें साबाजी प्रभु चिटनिसास लिहिलेलीं ५-१०-१७३३ चीं पत्रें या संबंधांत चिंतनीय आहेत सीदी व इंग्रज यांचा एकदम जोर झाला, त्यासंबंधीं आपल्या अडचणी शाहूचे कानावर घालण्यासाठीं त्यानें साबाजी प्रभूस पाठविलें. बांकाजी नाइकास हे गृहकलह माहीत असल्यामुळें 'धन्याचा हुकूम झाल्याशिवाय मला गोवळकोटावर जातां येत नाहीं,' असें त्यानें स्वामीस ता. ६-१०-१७३३ रोजीं साफ कळविलें. एवंच सरदारांत दुही उत्पन्न होऊन बहुतेक यशस्वी झालेली ही मोहीम फुकट गेली, आणि हबशास समूळ काढून टाकण्याचा शिवाजीचा संकल्प मराठमंडळाकडून कधींच सिद्धीस गेला नाहीं. ' फौजा येऊन मनसबा निरर्थक झाला. दुहीमुळें काम फसून गेलें. इंग्रजांचा मोठा शह आहे, ' असें संभाजी आंग्रे स्वामीस लिहितो. ही दुही दोन प्रकारची होती. सर्व सरदार एकाच्या तंत्रानें चालत नव्हते. प्रत्येकास शाहू महाराजाकडून स्वतंत्र हुकूम येई. शिवाय आंग्र्याचे घरांतील दुही होती तिचा फायदा इंग्रजांनीं घेतला. कान्होजी आंग्रे मरतो केव्हां, यासाठीं इंग्रज टपून बसले होते. तो मेल्याबरोबर त्याच्या मुलांस आपले शत्रु ठरवून त्यांचा नाश करण्याचे तह इंग्रजांनीं सावंतवाडीकर व जंजिरेकर यांच्यांशीं केले. मानाजी व संभाजी यांचें वांकडें पाहून मुंबईच्या इंग्रजांस आनंद होऊन त्यांनीं मानाजीस मदत करण्याच्या निमित्तानें आपलें आरमार कप्तिन इंचबर्डचे हाताखालीं कुलाब्यावर पाठविलें.

शाहूनें मात्र सरदारांस पत्रें लिहून शक्य तितकी भर दिली. इकडे इंग्रजांच्या मध्यस्थीनें शेखजी व अब्दुल रहमान यांची व इतर सरदारांची गोडी झाली; आणि ६·१२·१७३३ रोजीं कायम दोस्तीचा तह झाला. त्यांत एकमेकांच्या शत्रूंस पादाक्रान्त करण्यासाठीं एकमेकांस मदत करावी, आंगऱ्यांचा निःपात करावा, खांदेरीचा किल्ला आंगऱ्यापासून घेऊन इंग्रजांस द्यावा, आणि कुलाबा जमीनदोस्त करावा, वगैरे अनेक कलमें या तहांत होतीं. या तहामुळें प्रस्तुत जरी आंगऱ्यांचें वांकडें झालें नाहीं, तरी मार्गशीर्षांत बाजीरावानें ही मोहीम सोडून दिली. डिसेंबर सन १७३४ च्या आरंभीं सीदीशीं जसा तसा तह करून जंजिऱ्याचा वेढा उठवून बाजीराव साताऱ्यास आला. ' सीदी अब्दुल रहमान यास जंजिऱ्यांत तख्तावर बसवून, किल्ले घेतले त्यांपैकीं रायगड व महाड हुजूर महाराजांनीं ठेवून वरकड किल्ल्यांचा बंदोबस्त बाजीरावसाहेब यांणीं केला. साडेपांच महाल हबशास देऊन वरकड सरकारांत घेतले. हा तह अलीबाग नजीक नवदरें येथें झाला[१].

अशा रीतीनें मोहीम अर्धवट सोडून बाजीराव कां परत गेला याचा खुलासा होत नाहीं. तथापि एकतंत्री काम असल्याशिवाय त्यांत आपण पडावयाचें नाहीं असा त्याचा उद्देश इतरत्रही दिसतो. विभक्त हुकमत ठेवल्यापासून काम बिघडतें, ही गोष्ट शाहूच्याही प्रत्ययास आली असली पाहिजे. परंतु कोणा एकाच इसमास डोईजड होऊं द्यावयाचें नाहीं अशा झटापटींत बाजीरावाची वीस वर्षांची करामत व्हावी तितकी फलदायी झाली नाहीं. प्रस्तुतच्या मोहिमेंत पेशवे, आंगरे व प्रतिनिधि हे तीनही सरदार हुकमत चालवीत होते. कोंकणांत मोहीम असल्यामुळें आंगऱ्याला त्याबद्दल विशेष कळकळ होती. संभाजीची समजूत बाजीरावाकडून निघाली असती तर यापुढेंही मोहीम सफळ होण्यास वेळ लागला नसता. प्रतिनिधि व पेशवे यांजमध्यें पहिला मानानें तर दुसरा कर्तृत्वानें मोठा, अशा चुरस होती. एकंदरींत कोणतेंही काम तडीस नेण्यास जी

१ शा. रो. १४०, १४१; खं. ६·८७,८८; खं. ३·३३१; ब्र. च. पृ. ५४—५६ वरील पत्रें; ता १७·४·१७३० चे तह, एचिसन पहा; Anderson's Western India; भा.व. २ सीदांची ह०;शा.रो.१४१ची ता.४·१·१७३४ रोजीं बाजीराव पालीस आहे. पे. ब. खं. ४.

एकी व चिकाटी ह्मणून लागते ती या प्रसंगीं मराठ्यांनीं दाखविली नाहीं. प्रथम एकदम घाईघाईनें त्यांनीं मोहीम पावसाळ्यांत सुरू केली, आणि पावसाळा संपल्यावर पुनः नेटानें काम पुढें चालविलें नाहीं. चिमाजी आपानें पुढें अशीच चिकाटी फिरंग्यांवरील युद्धांत दाखविली ह्मणून वसई काबीज झाली. हे प्रकार ऐतिहासिक दृष्ट्या ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत.

५. **सिद्दीसाताचा पाडाव व तह**, (१९-४-१७३६).—बाजीराव निघून गेल्यावर संभाजी आंगऱ्यानें जंजिऱ्याची मोहीम तशीच शाहूच्या हुकुमानें पुढें चालविली, ती स. १७३४–३६ पावेतो तीन[1] वर्षे चालली. अंजनवेल व गोवळकोट काबीज झाल्याशिवाय युद्ध बंद करणें शाहूस पसंत नव्हतें. स. १७३४ च्या जानेवारी १४ ची, संभाजीस उपसर्ग न करण्याविषयीं, व ३-११-१७३४ रोजीं श्यामलाचें साह्य पोर्तुगीझ करितात सबब त्यांचें पारिपत्य करण्याविषयीं फोंडसांवतास शाहूची आज्ञा आहे. ‘अंजनवेलीस शह देऊन स्थल हस्तगत करावें, अशी संभाजी आंगरे यास आज्ञा केली आहे. त्यांजकडील प्रांतास उपसर्ग न लावणें, ते तुह्मांस उपसर्ग लावणार नाहींत. नारोराम मंत्री यांस येविशीं आज्ञा केली आहे, ते तुह्मांस लिहितील.’ ता. २५ डिसेंबर सन १७३४ त गोवळकोटास फौज रवाना करण्याविषयीं आनंदराव सोमवंशी सरलष्कर यास आज्ञा आहे. फौजा जमविण्याविषयीं या वेळच्या शाहूच्या आज्ञा, जीव तोडतोडून लिहिलेल्या आहेत. त्याचप्रमाणें वतनदार मराठे सरदारांस ऑगस्ट ता. १६ स. १७३५ची शाहूची ताकीद आहे; आणि ता. २६ डिसेंबर स. १७३५ ला उमाबाई दाभाडे यांस लिहिलेलें पत्र असून त्यांत ‘कोंकणचे मसलतीस आज तीन वर्षे झालीं’ असा मजकूर आहे. या पत्रावरून दाभाडे वगैरे सरदार कशी कुचराई करीत तें निदर्शनास येतें. ता. १ ऑक्टोबर १७३६ चे पत्रांत उदाजी पवार यास कोंकणांत फौज पाठविण्यास आज्ञा केली आहे. सारांश, परशुरामक्षेत्राजवळील अंजनवेल व गोवळकोट हीं स्थळें मराठ्यांनीं काबीज करावीं असा ब्रह्मेन्द्रस्वामीचा आग्रह सारखा चालू होता; आणि शाहूनेंही त्या कामांतून आपलें लक्ष काढिलें नव्हतें. प्रतिनिधि व फत्तेसिंग भोसले हे तर या मोहिमेवर होतेच, पण त्यांशिवाय उदाजी पवार, देवराव मेघशाम, हरि मोरेश्वर

१ शा.रो.ले. ६२,६६-६८,७०,१९२,२६८ व २६९; ब्र.स्वा.च.पृ.५४,५६व५८.

राजाज्ञा, शेखमिरा, बाजी भीवराव, वगैरे सरदारांस शाहूनें या कामीं रवाना केलें होतें. जानेवारी १७३४ त राजाज्ञानें शाहूस लिहिलेलें व १० फेब्रुवारीचें संभाजी आंगऱ्याचें अशीं[1] पत्रें छापिलेलीं आहेत, त्यांवरून कोकणांतील या मोहिमेच्या आडचणी चांगल्या कळून येतात. मुख्यतः दारूगोळा व तोफा यांचा मुबलक पुरवठा असल्याशिवाय अंजनवेल, महाड वगैरे ठिकाणें काबीज होणार नाहीत, दुहीमुळें काम बिघडत आहे, इंग्रज व पोर्तुगीझ हबशांस मदत करीत आहेत, इत्यादि वर्णन खुलासेवार आहे. त्यांत ब्रह्मेन्द्रस्वामीची दरम्यानगिरीही चांगली दिसून येते. धाकदपटशानें व शाहूच्या मदतीनें स्वामी मराठे सरदारांवर छाप बसवी, तोच मार्ग इंग्रजांकडेही त्यानें योजिलेला पाहून हसूं येतें. 'इंग्रज बंद करावयास मुंबईस जाण्याचा विचार होता.' इंग्रजांची दृष्टि अगदीं निराळ्या प्रकारची होती हें स्वामीस ठाऊक नव्हतें; आणि स्वामीच्या तपःप्रभावास इंग्रज भीक घालणारे नव्हते. एकंदरींत राज्यकारस्थानाची दृष्टि स्वामीस फारशी नव्हती हें या व अशाच प्रसंगांवरून उघड होतें. इकडे सीदी सातास फितविण्याचा उपक्रम शाहू व स्वामी यांनीं चालविला होता, आणि सीदी सातही मराठ्यांस झुकवीत होता.

संभाजी व मानाजी यांच्या तंट्यामुळें जंजिऱ्यावरील मोहिमेचा परिणाम निष्फळ झाला. स. १७३४त 'राजश्रींनीं उदाजी पवारास श्यामलावर पाठविला. त्याजबरोबर वाडी पाचाड येथें सीदी अंबर अफवानी युद्धास उभा राहिला. त्याचा मोड करून अफवानीचें शीर कापून आणिलें. महाड, बाणकोट हस्तगत केला. रायगडचे मोर्चे उठविले. मग गोवळकोटावर गेला, तेथें राजश्री कडील बाबूराऊ यांसीं न पटे म्हणून परत आले.' बाणकोट फत्ते जाल्याची बातमी १४-३-१७३४ रोजीं आली. तथापि शाहूनें व स्वामीनें हबशाचा पिच्छा मनांतून सोडिला नव्हता. स. १७३५ त पिलाजी जाधवास शाहूनें कोंकणांत पाठविलें. पिलाजीनें बाणकोट काबीज करून पुढें गोवळकोट व अंजनवेल हस्तगत करावीं अशी शाहूची त्यास ताकीद होती, असें जाधव ता. १५-४-१७३५ च्या पत्रांत[1] लिहितो. बाजीरावही स. १७३५ त जानेवारीपासून एप्रिलपर्यंत कोकणांत होता.

---

१ भा. व. श. पृ. १०; ब्र. च. ले. ५७८; इ. सं. ऐ. चरि. १०७.

इकडे पुनरपि सीदी सातानें उचल करून मराठ्यांनीं जिकिलेल्या प्रांतास उपद्रव देण्याचा सपाटा जालविला. तेव्हां त्याचा बंदोबस्त करण्यसाठा शाहूनें चिमाजी आपास मुद्दाम कोंकणांत पाठविलें. ता. २० मार्च स. १७३६ रोजीं चिमाजी कोंकणांत गेला. सीदी सात व त्याचे पराक्रमी साथीदार आरमार व फौजा घेऊन नागोठण्याच्या खाडीच्या तोंडाशीं रेवास बंदर आहे, तेथें येऊन सागरगड किल्ला घेऊं लागले. त्याचा बंदोबस्त आंगऱ्याचे हातून न होतां उलट इतके दिवस केलेला उद्योग फुकट जाण्याची वेळ आली. म्हणून मानाजीच्या आग्रहावरून चिमाजी आपा मुद्दाम घाईघाईनें कोंकणांत गेला. मानाजीचा बचाव करणें हेंहि त्याचें अगत्याचें काम होतें. रेवासनजीक कामारलें तर्फे श्रीगांव येथें सीदीची व मराठ्यांची लढाई झाली. सीदीची अकरा हजार फौज लढाईस आली, पैकीं १३०० लोक कापले गेले. मराठ्यांकडील ८०० माणूस कामास आले. मानाजी आंगऱ्यास उरांत गोळी लागली. सीदीसातास नानाजीराव सुर्वे यानें स्वतः ठार केला त्यांत त्याला २७ जखमा लागल्या, त्याबद्दल त्यास कुसगांव इनाम मिळाला. ' राज्य घेइन, नाहीं तर मरून जाइन, ' अशा निकरानें सीदीसात लढला. त्यास पळून जाण्यास चिमाजीनें संधि दिली असतां तो पळून गेला नाहीं, उलट ज्यास्त त्वेषानें चालून आला, तेव्हां चिमाजीनेंही शिताफीनें चरईनजीक चाल करून सीदीसातास मारलें, ( १९-४-१७३६ ). हें यश घेऊन मानाजी व चिमाजी आपा कुलाब्यास आले. उंदेरीचा किल्लेदार सीदी याकूतही वरील लढाईंत मारला गेला. या विजयानें मराठमंडळास अतिशय आनंद झाला. ' सीदीसात केवळ रावणासारखा दैत्य, तो मारून हबशांचा मूळ कंदच उपटून काढिला. चहूंकडे लौकिक विशेषात्कारें जोडिला. ' शाहू, ब्रह्मेंद्रस्वामी, फत्तेसिंह भोसले, जिवाजी खंडेराव चिटणास या सर्वांनीं चिमाजींचें वरप्रमाणें अभिनंदन केलें. बहुमानवस्त्रें, हिरेजडित पदक, मोत्यांची कंठी, रत्नखचित तलवार, असे वस्त्रालंकार शाहूनें चिमाजीस अर्पण केले. हबशांचे दोन प्रबळ सरदार पडल्यामुळें त्यांच्या दोन पक्षांपैकीं एक मोडला जाऊन, दुसऱ्याचा प्रमुख सीदी रहमान यानें पेशव्याशीं सख्य केलें,[१] आणि पूर्वीचा

१ ब्र. च ले. ३६४, २८१, १२९, १३०, २७, ४६, १३६. खं. १०-१७८. तह व करारमदार पृ. १०७ ऐ. चरि. १०७ पिलाजी जाधवाची पत्रें.

तह कबूल करून जंजिऱ्याचें आधिपत्य स्वीकारिलें. तथापि परशुराम क्षेत्राजवळचीं अंजनवेल व गोवळकोट हीं स्थळें तूर्त हबशांचेच कबजांत राहिलीं. वरील बंदोबस्त करून चिमाजी स. १७३६ च्या मे महिन्याचे अखेरीस पुण्यास आला. पेशवे व सीदी यांजमधील तह २५-११-१७३६ रोजीं पुरा झाला[१].

सन १७३७ त बाजीराव कोंकणांत मुळींच उतरला नाहीं. स. १७३६ च्या डिसेंबरांत तो माळव्यांत गेला, तो १७३७ च्या एप्रिलांत दिल्लीकडे होता. सीदीच्या संबंधानें तूर्त विशेष कांहीं झालें नाहीं. अंजनवेलचा किल्ला मात्र तुळाजी आंगऱ्यानें २३-१-१७४५ रोजीं हबशापासून काबीज केला.[१] परंतु गोवळकोट काबीज झाला कीं नाहीं तें समजत नाहीं. अर्थात् परशुरामक्षेत्र हबशाचे त्रासापासून निर्बाध करण्याचा ब्र. स्वा. चा प्रयत्न त्याचे हयातींत सिद्धीस गेला नाहीं. स्वामी १७४५ त वारला. हबशास जिंकण्याचे मराठ्यांचे प्रयत्न पेशवाईच्या अखेरपर्यंत चालू होते अशी या मोहिमेची एकंदर हकीकत पाहिल्यानें मराठ्यांच्या अंतस्थ कलहांची चांगली प्रतीति येते.

८. **आंगऱ्यांचा गृहकलह,** ( सन १७३४--४२ ).[२]—शाहूची सीदीवरील मोहीम चालू असतांच आंगरे बंधूंचें भांडण मोठ्या आवेशांत आल्यामुळें पुढें या मोहिमेंत आंगऱ्यांचे हातून फारशी कामगिरी झाली नाहीं. या भांडणाचा अनुवाद संदर्भापुरता येथें देणें जरूर आहे. कान्होजी आंगरे यास तीन बायका, मथुराबाई, लक्ष्मीबाई व गहिनाबाई अशा असून, कांहीं रक्षाही होत्या. त्यांच्या पोटीं पुष्कळ संतति होती. कोणाच्या पोटीं कोणते मुलगे झाले आणि औरस व अनौरस संतति कोणती याचा बिनचूक छडा लागलेला नाहीं. मथुराबाई व लक्ष्मीबाई यांचीं बरींचशीं पत्रें ब्रह्मेंद्रस्वामीच्या चरित्रांत आहेत, त्यांवरून त्या दोघी कर्तृत्ववान् व घराण्याच्या लौकिकास जपणाऱ्या होत्या, असें दिसतें. सेखोजी व संभाजी हे सख्खे भाऊ कान्होजीचे वडील मुलगे असावे, व त्यांशिवाय, येसाजी, मानाजी, तुळाजी व धोंडजी असे आणखी चार मुलगे असून, त्यांजमधील कलहानें आंगऱ्यांच्या

---

१ खं. २ पृ. १०१. ऐ. टि. २·२१ व १·५. २ इ स. आंगऱ्यांची हकीकत, ३–५६८ चेऊची बखर, खं. ८ ले. १४५-१५७. आंगरे घराण्याची संपूर्ण वंशावळ पुढील पानावर आहे ती पहावी.

## आंगऱ्यांची वंशावळ.

सेखोजी संकपाळ, रा. आंगरवाडीचे. आंगरवाडी कोठें आहे?

तुकोजी आंगरे, स. १६९०

१ कान्होजी, सरखेल, १६९०–१७२९

१ स्त्री मथुराबाई, २ री लक्ष्मीबाई (मानाजी जगताप), ३ री गहिनाबाई (दिनकरराव भोसले).

२ सेखोजी १७२९–३३. ३ संभाजी १७३४–३५, मृ. ४१. ४ तुळाजी १७३४–५६. ५ मानाजी १७३५–५८. ६ येसाजी ७ धोंडजी

मानाजीचे मुलगे १०, बायका २ राधिकाई व भागीरथीबाई.

१ महिमाजी २ रघूजी ३ चिमाजी ४ हिरोजी ५ धोंडजी

६ तुकोजी ७ कृष्णाजी ८ सुभानजी[1] ९ तुळाजी १० रामाजी.

येसाजी — मैनाबाई दौलतराव शिंद्याची आई.

६ रघूजी ७५८–९३.

१ स्त्री नर्मदाबाई शितोळे, आनंदीबाई भोसले, राधाबाई = रघूजीच्या बायका.

० — ७ मनाजी २ रा. — कान्होजी — जयसिंग, कारभारी, खून १८००.

[१ अथवा संभाजी]

मनाजी: प्रथम १७९४–१७९९ नंतर कैद, पुनः १८१३–१७.

१ स्त्री — ८ बाबूराव १७९९–१८१३.

२ री गजराबाई, नरसिंहराव कदम — ९ रघूजी २ रा. १८१७–३८.

जयसिंग — स्त्री सकवारबाई — मुराराव.

[१८४० त राज्य खालसा.

९ या रघूजीच्या स्त्रिया ५ भागीरथी, कमळा, भवानी, यशोदा, अंबिका. येशोदेचा मुलगा कान्होजी १८३८–३९.

घराण्याची पुष्कळ वाताहत झाली. सेखोजीच्या पश्चात् संभाजी कारभार पाहूं लागला, तेव्हां त्याचें व मानाजीचें वांकडें आलें. शाहूच्या दरबारांत नारो राम शेणवी वगैरे कित्येक मंडळी संभाजीला अनुकूल होती, तर इकडे मानाजीला पेशव्यांचा पाठिंबा होता. सन १७३४ च्या आरंभीं तुळाजीस बरोबर घेऊन संभाजी सिद्दीच्या हातून अंजनवेल काबीज करण्यासाठीं चालून गेला. जाण्यापूर्वी संभाजीनें धोंडजीला कुलाब्याचा कारभार सांगून मानाजीला आरमाराचा अधिकार दिला. परंतु परत आल्यावर संभाजीस या दोघांचा कारभार पसंत पडला नाहीं मानाजीनें कपट करून फिरंगी लोक कुलाब्यांत आणिले, आणि तुळाजीस दिवाणगिरी देऊन रात्रीं कुलाब्यास येऊन येसाजीचे डोळे काढिले.* पेशव्यांच्या व ब्रह्मेंद्राच्या शिकवणीनें मानाजी आपल्या विरुद्ध हीं कारस्थानें करितो, आणि इंग्रज व पोर्तुगीझ यांस आपल्या बाजूस वळविण्याचा उद्योग मानाजीनें चालविला, या गोष्टी संभाजीस कळून तो चिडून गेला. नागांवचा पारसनीस महादाजी राम यास मानाजीनें मुंबईस इंग्रजांकडे पाठविलें; आणि संभाजी आपला जीव घेईल या भीतीनें मानाजी पळून रेवदंड्यास पोर्तुगीज हद्दींत जाऊन राहिला. अशी दोघां भावांची बरेच दिवस झटापट चालू होती. संभाजीचा स्वभाव उतावळा व रागीट असल्यामुळें तो पुष्कळांस अप्रिय झाला होता. इंग्रजांनीं या गृहकलहाचा फायदा घेऊन संभाजीची उचलबांगडी करण्याचा घाट घातला. अंजनवेल व गोवळकोट हीं स्थळें हबशाच्या हातून काबीज करण्याचा संभाजीचा उद्योग जोरांत चालू असतां इंग्रजांनीं हबशास मदत केली; तेव्हां संभाजीचा उद्योग फसला, आणि तो मानाजीवर जास्तच चिडून गेला. ता. २७ नोव्हेंबर स. १७३४ चें मानाजीचें पत्र महादाजीराम पारसनीस नागांवकर यास लिहिलेलें केसरींत' छापलें आहे, त्यांत मानाजी लिहितो. 'संभाजी बाबाचे अविवेकावरून आह्मी दौलत, संकट जाणून सोडून रेवदंड्यांत चौलास आलों, पोर्तुगीज कप्तान यांहीं बहुत सन्मान केला; व बहुतसे साहित्यांत आहेत. साबाजी प्रभु येऊन भेटल्यानें संतोष झाला. या समयीं आपण उभयतां पुत्रांसह येऊन पावावें. मनसोब्याचे विचार दृढ होत जातील.

---

* का. सं. या. ले. ११९ यांत डोळे काढण्याचा उल्लेख येसाजी करीत नाहीं. पे. व. खंड ४ पृ. ४१. ' १ ता. ३० मे १९०५ चा अंक.

अगोदर निराश्रित समजून वरघांटीं जावयाचा विचार आमचा होता. परंतु साबाजी प्रभु आल्यावर आमचे आज्ञेवरून कित्येक विचार स्वहितावह निघाले, त्यावरून स्थिरता धरून, साताऱ्यास रा. स्वामींचे सेवेशीं, रा. जिवाजी बाबा व गोविंदराव चिटणीस व यशवंतराव पोतनीस आदिकरून सामाजिकांस व रा. बाजीराव पंडित प्रधान व आपा दाजी यांस पत्रें लिहून पाठविलीं आहेत. या समयीं इंग्रज व श्यामळ अनुकूळ करून घ्यावे लागतात. या समयां, इंग्रजांचा वैरकाल आजीकालचा नाहीं, तो स्नेहांत आणावयाचा विचार, महादाजी बाबा, आपल्या खेरीज होणार नाहीं. तीर्थरूप कैलासवासी यांचे समयीं तुह्मी अगस्त्यवाद धरून कित्येक कार्यभाग करीत आलेत, तो विचार आह्मीं चित्तांत आणून आपला आदर धरिला आहे. साबाजी प्रभु व कृष्णाजी प्रभु व आपणाखेरीज अधिकोत्तर कोणी कारभारास आहे ऐसें नाहीं. हें आमचें सत्यवचन आहे. ह्याजवरी विश्वास ठेवून तुह्मी निघून याल हा भरंवसा मानून, पालवाचे खाडींतून महागिरी पाठविली आहे. तरी, सहकुटुंब तेथें कांहीं गुंता न ठेवितां, निघून यावें.'

७ **संभाजी व मानाजी यांचा तंटा**, ( १७३६–४१ ).—याप्रमाणें आंगरे बंधूंचें भांडण उत्तरोत्तर विकोपास गेलें. मानाजीनें बाजीरावास तावडतोब आपल्या मदतीस बोलाविलें. दीड दिवसांत बाजीराव पुण्याहून पालीस आला. ता. ४ फेब्रुवारीपासून ३ एप्रिल १७३५ पर्यंत बाजीरावाचा मुक्काम कोंकणांत कुलाब्याजवळ होता. त्यानें येऊन खांदेरी व कोथळा हे किल्ले काबीज केले नंतर बाजीरावानें मानाजीस 'वजारतमाब' असा नवीन किताब देऊन त्याची स्थापना कुलाब्यास केली आणि संभाजीनें 'सरखेल' हा किताब घेऊन सुवर्णदुर्गास राहवें असें ठरवून, या दोन भावांचा तंटा तात्पुरता तोडिला. येणेंप्रमाणें बाजीरावानें आंगऱ्याच्या एकंदर दौलतीचे दोन भाग करून त्यांच्या घरांत कायमचें वितुष्ट पाडून ठेविलें, असा त्याजवर आरोप आहे. हा प्रकार पुढील भानगडींच्या संबंधानें ध्यानांत ठेविला पाहिजे. (खंड १ पृ. ७१ व ब्र. च ले. १३० )

बाजीरावाची ही व्यवस्था मोडून संभाजीलाच सर्व दौलत यावी, अशी खटपट प्रतिनिधि शाहूपाशीं करीत होता, हें खालील पत्रावरून व्यक्त होतें[१].

---

१ हें पत्र स. १७३६–३८ च दरम्यानचें नानासाहेबानें चिमाजीस लिहिलेलें रा. वासुदेव विष्णु जोशी सातारा यांजकडून मिळालें.

पुरवणी ती. रा. आपा स्वामींचे सेवेशीं. विनंती उपरी. प्रतिनिधि विचार करीत आहेत कीं राजश्री स्वामीस उत्तेजन द्यावें. राजश्री प्रधानपंतास हुजूर आणवावे. लक्ष्मीबाईस ( कान्होजी आंगरे याची बायको ) आणवावें. मानाजी आंगरे यास माकूल करून सांगावें, आणि संभाजी आंगरे याचीं स्थळें जीं घेतलीं आहेत तीं त्यांचीं त्यांस देवावीं. संभाजी आंगरे यास जमावानशीं अंजनवेलीस आणावें. आपण खासा जावें. समागमें राजश्री फत्तेसिंगबावास न्यावे. दोनही स्थळें हस्तगत करून राजश्रीस द्यावीं. आपण यश घ्यावें. संभाजी आंगरे याचा गेला मामला त्यांस देवावा. त्याजकडून कांहीं आपलें काम करून घ्यावें. ऐसा विचार करीत आहेत. कळावें म्हणून लिहिलें आहे. सेवेशीं श्रुत होय हे विज्ञापना'. चौदा पंधरा वर्षांचा नानासाहेब महाराजांजवळ राहून कशा बातम्या कळवीत होता तें या पत्रावरून दिसतें. प्रतिनिधीची ही खटपट सिद्धीस गेली नाहीं

बाजीरावानें केलेल्या व्यवस्थेनें संभाजीमानाजींचें ऐक्य झालें नाहीं, उलट कायमचेंच वांकडें आलें. पेशव्यांनीं एकाचाच पक्ष उचलिला, न्याय केला नाहीं, याचा संभाजीस राग आला. त्यानें बाजीरावाचीं नानाप्रकारें आर्जवें केलीं, शपथा घेतल्या, आपण चुकलों तर अन्याय पोटांत घालून आम्हांस मार्गास लावा, असें वारंवार विनविलें. ता. ११ जून स. १७३६ चें संभाजीचें बाजीरावास गेलेलें पत्र वाचण्यालायक आहे, त्यावरून बाजीरावानें आंगऱ्याचे घरांत दुही माजविली अशी भावना होते. अशा रीतीनें आंगऱ्यांचें प्रकरण उत्तरोत्तर विकोपास गेलें. सन १७३६ च्या जून २३ पासून जुलई १२ पावेतों बाजीराव थोडा वेळ कोंकणांत साष्टी प्रांतांत तांतडीनें गेला होता. परंतु त्या प्रसंगाचा संबंध आंगऱ्यांशीं आलेला दिसत नाहीं. त्या वेळीं संभाजीची समजूत बाजीरावानें न काढतां उलट दिलेलें वचन मोडून संभाजीला ज्यास्त चिडविलें. तेणेंकरून संभाजी उघडपणें पेशव्यांचे विरुद्ध पक्षास सामील होऊन नानाप्रकारचीं कारस्थानें रचूं लागला. बावडेकर अमात्याला आपणाकडे वळविण्यासाठीं संभाजीनें एक पत्र ता. २९ आगस्ट १७३६ चें लिहिलें, त्यावरून संभाजीचा भाव व पेशव्यांचें कपट व्यक्त होतें. आंगरे हा बलाढ्य सरदार मुख्य सरकाराशीं फटकून वागत असल्यामुळें, त्यास निर्बल करण्याचे प्रयत्न बाळाजी विश्वनाथापासून चाललेले दिसतात. आंगऱ्यांच्या घराण्याचे दोन भाग केल्यानें त्यांची शक्ति अर्थात् कमी झाली. संभाजी बाणेदार असल्यामुळें त्यास आपली पूर्वीची सत्ता व

मुलूख कमी झालेला खपला नाहीं. पेशव्यांनीं मानाजीस हाताशीं धरून संभाजीस दुर्बल केलें. पेशव्यांचे विचारानें मानाजी इंग्रजांशीं सख्य ठेवून घरगुती तंट्यांत त्यांची मदत आणूं लागला. अर्थात् तितक्या मानानें मराठशाहीचा समुद्राकडील पाया लंगडा पडला.तेणेंकरून आंगरे व पेशवे या दोघांचेंही अकल्याण होऊन मुंबईच्या तिऱ्हाईत इंग्रजांचा फायदा झाला, ही गोष्ट पेशव्यांचे कर्तृत्वास व राजकारणचातुर्यास कमीपणा आणते. मानाजीच्या मानानें संभाजी ज्यास्त शूर व कर्तृत्ववान् होता, आणि तोच कान्होजीचा औरस वारस असल्यामुळें त्यास दूर सारण्यांत पेशव्यांनीं दूरदृष्टि ठेविली नाहीं, असेंच ह्मणावें लागतें. मानाजीविषयीं तरी पेशव्यांचा अनुकूल ग्रह नव्हता. नानासाहेब पेशव्यानें पुढें पुनः हा उद्योग हातीं घेऊन इंग्रजांच्या मदतीनें आंगऱ्यांस सर्वस्वी बुडविलें. त्याचा संदर्भ या वेळेपासून ध्यानांत ठेविला पाहिजे.[1]

बाजीरावानें ठरविलेली व्यवस्था मोडून दुसरी करून घेण्याकरितां आंगऱ्यांचा नकील सावाजी तुकाजी प्रभु ह्मणून होता तो साताऱ्यास शाहूकडे गेला. संभाजीचा कारभार अव्यवस्थित असल्यामुळें त्याच्या हातून कुलाब्याचें संरक्षण व्हावयाचें नाहीं अशी समजूत शाहूची होती. दरबारांत दोन पक्ष होते. गोविंदराव चिटणीस शाहूजवळ होता त्यानें प्रतिनिधीच्या व्यवस्थेस मदत केली. शाहूशीं वाटाघाट करून सावाजी तुकाजी कुलाब्यास परत गेला आंगऱ्यांचा पारसनीस माहादजी राम नागांवकर व त्याचे सुळगे विठ्ठल महादेव व त्रिंबक महादेव यांचा व सावाजी प्रभूचा उल्लेख वर मानाजीच्या पत्रांत आलाच आहे. त्रिंबक महादेव व सावाजी तुकाजी यांनीं संभाजीस साताऱ्यास आणिलें. तेथें सुवर्णदुर्ग व त्यापलीकडील मुलूख व सरखेलपदाचीं वस्त्रें शाहूनें संभाजीस दिलीं, आणि मानाजीस वजारतमाब हा किताब देऊन कुलाब्यास ठेविलें. कुलाबा आपणास मिळावा, मानाजीस मिळूं नये, अशी संभाजीनें पुष्कळ खटपट केली, पण ती सिद्धीस गेली नाहीं. पुढें मानाजी 'वजारत-माब' या पदाचीं वस्त्रें घ्यावयास साताऱ्यास गेला असतां, तोही स्वभावानें करारी व भाडशी असून त्याजबद्दल साताऱ्यास शाहूला चांगलाच

१ ब्र. स्वा.च.पृ ७०; का.सं.श पृ ६; खं. ८ १५१. का. सं. प. या. ले. ५८.

प्रत्यय आला. तरी ठरल्याप्रमाणें मानाजीस वस्त्रें शाहूकडून मिळालीं. त्या प्रसंगीं मानाजीनें साबाजी प्रभु, त्रिंबक महादेव, गोविंदराव चिटणीस इत्यादि मंडळींस गांव इनाम दिले. बाजीरावानेंही बराच मुलूख व राजमाची वगैरे किल्ले आपणाकडे घेतले. याप्रमाणें मानाजीस कुलाब्याचा कारभार स. १७३५ त मिळाला तो त्याजकडे, स. १७५८ त त्याचे मृत्यूपर्यंत चालला. मानाजी नेहमी पेशव्यांचे पक्षांत असून संभाजी व तुळाजी त्यांचे विरुद्ध असत. बाजीरावास मृत्यु आकस्मिक आला; तो कांहीं वर्षे जगता तर पश्चिम किनाऱ्यावरील कारभारास निराळें वळण लागण्याचा संभव होता. वसई काबीज होऊन मराठ्यांस त्या बाजूस जोर आला, त्याचा फायदा घेऊन आंगऱ्यांचे कारभाराची व्यवस्था झाली पाहिजे होती, परंतु बाजीरावाचे मृत्यूनें नवीन प्रकार उपस्थित झाले. या प्रसंगीं आंगरे घराण्याच्या हालचाली काय झाल्या हें पुढील संदर्भासाठीं येथेंच सांगितलें पाहिजे. ता. १० एप्रिल स. १७४० रोजीं चिमाजी आपा ब्रह्मेन्द्रस्वामींस लिहितो. ' तारीख २३ माहेरम, चैत्र वद्य १० मुक्काम किल्ले कोरिगड. औरंगाबादेहून पारनेर नजीक आलों. तेथें राजश्री संभाजी राजे सरखेल एकाएकीं अलीबागेंत उतरोन हिराकोट घेतला, सागरगड घेतला, चौलचा कोट घेतला, अलीबागेंत कुलाब्याचें पाणी बंद केलें, ये समयीं येऊन आपलें रक्षण करावें, ऐसें मानाजीचें पत्र नानाजवळ आलें. पत्र येतांच नानांनीं चारपांचशें राऊत, वासुदेव जोशी व विठ्ठल शिवदेव व अंताजी नारायण यां समागमें देऊन रवाना केले. आणि मानाजीचें पत्र होतें तें आम्हांकडे पाठविलें. पत्र मार्गी पावलें. तेच दिवशीं लांब मजल करून घोडनदीवर मुक्काम केला. तेथूनच मानाजीस आश्वासनाचें पत्र लिहून रवाना केलें दुसरे दिवशीं विसा कोसांची मजल करून लोहगांवास आलों. मानाजीचे कुमकेविषयीं इंग्रजांसही पत्रें पाठविलीं. तेच दिवशीं पुण्याहून चिरंजीव नानास रात्रीं बोलावून आणून त्यांसमागमें सारी फौज देऊन रवानगी केली. तेथून पांचवे रोजीं कुलाब्यास जाऊन पोंचले. मीही पुण्यास जाऊन, तीन दिवस तेथें राहून, मातुश्रीचें दर्शन व आज्ञा घेऊन स्वार होऊन काल येथें आलों. नाना तेथें पावले, तेच दिवशीं संभाजीजवळील चौकी बाहेर उभी

हिराकोटाजवळ आश्रयास होती, ते मारिली. पंचवीस तीस माणूस कापून काढिलें तुळाजी आंगऱ्या जखमी धरून आणिला आहे. इंग्रजांनींही अगोदर कुलाब्यास येऊन पाणी सामान जें पाहिजे तें कुलाब्यास पोंचविलें, आणि सांप्रत तो आरमारानशीं कुलाब्याजवळ आहे, तेथून तोफांचा मार दिला. त्यामुळें अलीबागेंतून सरोन हिराकोटचे उत्तरेस आश्रयानें मोर्चे बांधून राहिले आहेत. नाना सागरगडाखालून खाडीचे कडेनें गेले, तेथें पंचवीस माणूस संभाजीकडील आलें होत, त्यांत सरदार होता तो व पांच सात माणूस जिवें मारिले, व वरकड पळाले. सा सात जण धरून आणिले. जर संभाजी लवकर निकाल काढून जीव वांचवून निघोन गेला, तर उत्तमच झालें जर धीर धरून मोर्चे बंद करून राहिला, तर मोर्चे लावून, पारिपत्याचा विचार करणें तसा, स्वामींच्या आशीर्वादाचे बळे करीतच आहों. इंग्रजांस मार्ग देऊन जाऊं द्या ह्मणून संभाजीनें मांगून पाठविलें होतें. परंतु इंग्रजानें मान्य केलें नाहीं आह्मी औरंगाबाद प्रांतीं आहों, ये प्रांतीं ध्यान नाहीं, ऐसा समय पाहून संभाजी आले होते. मानाजीची स्थापना आह्मीं केली; परंतु त्यास स्मरण न राही ऐसें झालें. कित्येक प्रकारें वावगी वर्तणूक आम्हांशी केली त्याचा विस्तार लिहिल्यानें चित्तांत येणार नाहीं. जे समयीं आपलें पाय पाहूं तेव्हां विदित करूं. फिरंग्यांची उरण जागा, ते आपणच बळावली पैक्याविषयीं वारवार लिहिलें, परंतु ते गोष्ट चित्तांत न ये. आज पांचा वर्षांत एक पैसा आमचा देणें तो दिला नाहीं. बहुतच अमर्यादा मांडिली, यास्तव त्याचेही डोळे उघडावे, याकरितां तजविजेनें पाल व मिरगड दोनही जागे संभाजीच्या हातास जात होते, ते जागे घेऊन आपलीं निशाणें चढविलीं. उरण बळाविलें होतें तेंही घेतलें. आजच फत्ते झाल्याचें पत्र उरणाहून आलें. सारांश, त्याचे डोळे उघडिले आणि सर्व प्रकारें संभाजीचे हातीन जीवही ( मानाजीचा ) ये समयीं वांचविला असे. उद्यां परवां घांट उतरोनही कुलाब्यापावेतों जाणार आहें. तेथें न पावतां अगोदरच संभाजीचा निकाल लागला तर उत्तम आहे. होईल वृत तें लिहून पाठवूं. या पत्रानंतर पंधरा दिवसांनीं ता. २५–४–१७४० रोजीं बाजीराव वारला.

या पत्राचे उलट संभाजीचें ह्मणणें त्याच्या एका पत्रांत उपलब्ध असून तें पत्रही वरच्या नंतर दोनच दिवसांनीं ह्मणजे १२ एप्रिलास अलीबागेहून संभाजीनें

ब्रह्मेंद्रस्वामीसच लिहिलेलें आहे. ' आरमारसहवर्तमान साकरियाचे खाडींत शिरोन अलीबाग, हिराकोट थळचा कोट, राजकोट, सागरगड,हे जागे स्वामीच्या कृपेनें फत्ते जाहले. पालीस निशाण पाठविलें होतें; परंतु रा. बाजीराव प्रधान यांचा जमाव येऊन त्यांचें निशाण चढलें. राऊत व जमाव पालीखालीं आला आहे. मानाजीच्या कुमकेस अलीबागेस येऊन आह्माबरोबरी घसघस करणार. इंग्रजही आला आहे. हा समय अडचणीचा आहे. आह्मी येथून निघत नाहीं. राजश्री स्वामी येऊन सनाथ केलें तरी बरें. आपणास जें सुचेल व उचित दिसेल तसें करावें. राजश्री स्वामीजवळ आपण खासा जाऊन रा. चिमाजी आपास कागद व इंग्रजांस कागद व मानाजीस कागद देववावे. हें काम अगत्य करावें.[२] ब्रह्मेंद्रस्वामीच्या मार्फत शाहूकडे संधान लावून चिमाजीस परत बोलवावें अशी संभाजीची ही खटपट होती. परंतु राजकीय कारभारांत ब्रह्मेंद्रस्वामीस फारसें कोणी मोजीत नव्हतें. संभाजी व मानाजी यांचें अत्यंत वांकडें असून दोघेही स्वामींस पत्रें लिहीत आणि दोघांशीं स्वामी संधान ठेवी. मानाजी पेशव्यांच्या आज्ञेंत वागत नाहीं असा बोभाटा येतांच स्वामीनें त्यास पत्र लिहून धमकाविलें. त्यावर मानाजीनें दिलेलें उत्तर पाहतां, 'आपण पेशव्यांचे विरुद्ध बिलकूल वागत नाहीं, सर्वस्वी त्यांचे आज्ञेंत चालतों. असें असतां हा प्रवाद कां उत्पन्न झाला समजत नाहीं,' असें मानाजीनें स्वामींस लिहिलें. (खं. ३·२८४, ३१०,३४५.)

आंगऱ्यांचे घरांतील तंटा पेशवे किंवा शाहू यांस मिटवितां आला नाहीं हें राष्ट्राचें दुर्भाग्य होय. मुख्य सरकाराचें आंगऱ्यांस योग्य पाठबळ असतें तर, त्यांनीं इंग्रजांचा शिरकाव बऱ्हंशीं अटकाविला असता. दोनही पक्षांकडे याचा दोष येतो. बाळाजी विश्वनाथाच्या वेळेपासून आंगऱ्यांचा डोईजडपणा राज्य चालकांस नडत होता, आणि साधेल तितकें आंगऱ्यांस दुर्बल करावयाचें हा पेशव्यांचा अंतस्थ डाव होता. तीनही पेशव्यांचे वर्तनांत हा डाव उघड होतो. दाभाडे, आंगरे, नागपुरकर भोसले वगैरे प्रबल सरदारांची स्वतंत्र वागण्याची इच्छा व अेररावीचें वर्तन कारभार चालविणारांस पदोपदीं नडत होतें. सर्व मराठे सरदारांच्या ठिकाणीं ही फुटीची प्रवृत्ति थोड्या बहुत अंशानें नेहमींच कायम होती, आणि त्या प्रवृत्तीस दाबून टाकण्याचा प्रयत्न पेशवे करीत, त्याबद्दल त्यांस दोष देतां येत नाहीं. मात्र असा प्रयत्न करितांना, सरदारांस कायम

ठेवून त्यांची सुव्यवस्था लावून देण्याची इच्छा खरोखर पेशव्यांचे मनांतून होती किंवा नाहीं, हें निश्चित् सांगणें कठीण आहे. मराठ्यांचा इतिहास बहुतेक अशा फुटीच्या प्रकरणांनींच भरलेला आहे, हें येथवर चाललेल्या हकीकतीं-वरून उघड होईल. पेशव्यांचे ठिकाणी दुसरा कोणी असता तरी त्यासही सरदारांस नरम करण्याचा उद्योग करावाच लागता. तथापि मानाजीला हाताशीं धरल्यावर, त्याचेंही मन पेशव्यांशीं अनुरक्त राहिलें नाहीं, यावरून पेशव्यांचें वर्तन आंगऱ्यांस आंतून अतिशय जाचत होतें असें म्हणावें लागतें. शाहूनें मात्र आपल्या हयातींत सर्वांस ममतेनें व समदृष्टीनें वागवून, सर्वांचा शक्य तितका राज्याच्या कामीं उपयोग करून घेतला. प्रत्यक्ष शाहूच्या व्यवस्थे-बद्दल सरदारांनीं तक्रार केल्याचें उदाहरण नाहीं.

बाजीरावाच्या मृत्यूची बातमी कुलाब्यास नानासाहेबास समजताच त्यानें आंगऱ्यांचें भांडण कसें मिटविलें आणि आपण लगेच कसा निघून आला, त्याज-बद्दलचा खुलासा उपलब्ध नाहीं. संभाजी स. १७४१ ता १२ डिसेंबर रोजीं मरण पावला, आणि तुळाजीचें व पेशव्यांचें सडकून वैर जुंपलें. या वैरांतच इंग्रजांची मदत घेऊन पुढें नानासाहेब पेशव्यानें आंगऱ्याचें आरमार बुडविलें. मुंबईकर इंग्रजास आंगऱ्यांचा अतिशय जाच होता तो नाहींसा करण्यासाठीं, त्यांनीं मानाजीस हाताशीं धरून पेशव्यांकडे आपलें संधान चालूच ठेविलें. त्याचा परिणाम पुढें नानासाहेबाचे वेळेस घडून आला. एकंदरींत आंगऱ्याचे संबंधांत पेशव्याचें धोरण एकावर एक कडी करणारें होतें, हें लक्षांत ठेवणें जरूर आहे.

कोकणांतील व्यवहारांशीं व व्यक्तींशीं आणि पेशवे वगैरे अनेक राजमंडळींशीं ब्रह्मेंद्रस्वामीचा संबंध तीस चाळीस वर्षे अत्यंत निकट असल्यामुळें, आणि बऱ्याचशा राजकीय घडामोडींत त्याचें अंग हातें ह्मणून त्याची संक्षिप्त हकिकत व राजकारण येथेंच देणें जरूर आहे.

८ **ब्रह्मेंद्रस्वामी, जीवनचरित्र ( स. १६४९–१७४१ ).**–वऱ्हाडांत दुधेवाडी गांवीं महादेवभट नांवाचा एक ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण राहत असे. त्याच्या पत्नीचें नांव उमाबाई. त्यांना सन १६४९ च्या सुमारास एक मुलगा झाला, त्याचें नांव विष्णु. लहानपणीं बापाजवळ विष्णूनें वेदविद्येचा अभ्यास सुरू केला. त्याच्या बाराव्या वर्षी आईबाप निवर्तले. मूळपासून त्याचा ईश्वरभक्तीकडे

कल असून त्यानें राजुरी येथील गणपतीची आराधना सुरू केली, आणि प्रतिवर्षी श्रावण शुद्ध प्रतिपदेपासून भाद्रपद शुद्ध चतुर्थीपर्यंत एकांतांत समाधि लावून तपश्चर्या चालविली. पुढें सन १६६३ च्या सुमारास तो काशीस गेला. तेथें चतुर्थाश्रम स्वीकारून विष्णूनें ब्रह्मेंद्रस्वामी असें नांव धारण केलें. नंतर त्यानें हिमालयापासून रामेश्वरपर्यंत फिरून तीर्थयात्रा केली. फिरतां फिरतां तो महाराष्ट्रांत कृष्णातीरीं आला. तेथील देशस्थिति अवलोकन करून स्वामी सह्याद्रि उतरून चिपळुणाजवळ पेढें नामक गांवीं परशुरामाचें देवस्थान आहे तेथें गेला. त्या स्थानाच्या पश्चिमेस धामणी सोनगांवच्या रानांत एका रम्य ठिकाणीं त्यानें तपश्चर्या चालविली. ह्या रानांत बाळ गोळी नांवाचा इसम गुरें चारण्यास येत असे. तेथें स्वामीची व त्याची ओळख झाली, आणि त्याची स्वामीवर भक्ति जडली. परशुरामनजीक चिपळूण हें प्रसिद्ध बंदर त्या वेळीं हबशांच्या ताब्यांत होतें. तेथील मिठाच्या कामावर बाळाजी विश्वनाथ भट त्या वेळीं असून, बाळगोळ्याचे मार्फत बाळाजीची व स्वामीची ओळख झाली. स्वामीची कठोर तपश्चर्या पाहून बाळाजी विश्वनाथ त्याचे भजनीं लागला. इ. स. १६९८ सालीं पौष शुद्ध पौर्णिमेस श्रीपरशुरामीं स्वामी प्रगट झाले,असा उल्लेख सांपडतो. श्रावण मासीं एकांतांत समाधि लावून बसण्याचा क्रम स्वामीचा सदैव चालूच होता. हळूहळू स्वामीचें भक्तमंडळ वाढत गेलें; आणि त्याच्या ठिकाणीं अलौकिक सामर्थ्य आहे अशी लोकांत प्रसिद्धि झाली. परशुरामाचें देवालय जीर्ण झालें होतें, त्याचा उद्धार करण्यासाठीं भिक्षाद्रव्य मिळविण्याचा स्वामीनें उपक्रम सुरू केला (१७०७). ह्याच सुमारास शाहूची सुटका होऊन महाराष्ट्रांत अनेक धामधुमी झाल्या, आणि पुढें बाळाजी विश्वनाथ ह्यास पेशवाईचीं वस्त्रें प्राप्त झालीं. इकडे स्वामीनें जंजिरा येथील हबशापासून पेढें व आंबडस हे गांव परशुरामाच्या देवस्थानास इनाम म्हणून मिळविले, आणि देवस्थानाच्या इमारतीच्या कामावर बापूजीपंत व धोंडोपंत तांबे म्हणून कारकून नेमिले. बापूजीपंतांची बहीण राधाबाई व तिचा पुत्र चिमणाजी कृष्ण भागवत, राहणार सोनवडें हे स्वामीच्या सेवेस परशुराम येथें येऊन राहिले. चिमणाजीपंत, धोंडोपंत व बापूजीपंत हे स्वामीच्या सेवेंत तत्पर राहून त्याच्याच कामांत पुढें प्रसिद्धीस आले. बाळाजी विश्वनाथानें शाहूचा पक्ष स्वीकारण्यांत आणि पुढें त्यास पेशवाई मिळवून

देण्यांत ब्रह्मेंद्रस्वामीची अंतस्थ खटपट असावी असा संभव आहे. कोंकणांत परशुरामपंत प्रतिनिधि व कान्होजी आंग्रे ह्यांचाही अंमल असल्यामुळें त्यांचा व स्वामीचा परिचय झाला. परशुरामपंत प्रतिनिधीनें डोरलें व महाळुंगें हे दोन गांव परशुरामाच्या देवस्थानास इनाम दिले. बाळाजी विश्वनाथ व चिमणाजी दामोदर ह्यांचा स्वामीशीं पत्रव्यवहार असून पैशाची देवघेवही होती, असें दिसतें. द्रव्यसंचय झाल्यावर स्वामीनें व्याजबट्ट्याचा व्यापार सुरू केला, आणि अशा रीतीनें महाराष्ट्रांत सर्व प्रमुख मंडळींवर व शाहू छत्रपतीवर त्याची छाप बसत चालली. स्वामीचा स्वभाव कडक होता. केव्हां ममत्वाचा व केव्हां तपः--सामर्थ्याचा धाक दाखवून त्यानें लोकांवर आपलें वजन बसविलें प्रमुख मंडळींशीं सहवास घडल्यानें मराठेशाहींतील कारस्थानें त्यास कळून आलीं: तेणेंकरून आपलें व आपल्या भक्तांचें महत्त्व वाढविण्याचा त्यानें उपक्रम आरंभिला. बाळाजी विश्वनाथाची स्वामीवर निःसीम भक्ति होती, आणि हरएक प्रसंगीं स्वामीनेंही बाळाजीची बाजू उचलून धरिली. बाळाजीच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलांनातवांवरही स्वामींची कृपादृष्टि कायम होती. बाजीरावास वस्त्रें मिळणें आणि लगेच धावडशी गांव शाहूकडून स्वामींच्या देवालयास इनाम मिळणें, या गोष्टींचा कार्यकारण संबंध संभवनीय आहे. प्रतिनिधि, आंगरे, हबशी वगैरेंच्या साह्यानें परशुरामाच्या मंदिराचें भव्य काम लवकरच पुरें झालें: आणि मंदिराजवळ ब्राह्मणांची वसति, पूजा, उत्सव वगैरे थाटानें होऊं लागले. इनामी गांवांचा कारभार करण्यास स्वामीनें निरनिराळे इसम नेमून पैसा व कारखाना वाढविला. स्वामी बहुश्रुत व लिहिणारा बांका होता. गोरवून किंवा खोचून लिहिण्यांत तो कुशल असून त्यानें लिहिलेलीं व त्याजला आलेलीं पत्रें आज उपलब्ध आहेत तीं पाहिलीं म्हणजे स्वामीचा व्याप केवढा प्रचंड होता हे कळतें. अनेक सरदार व सत्पुरुष स्वामीच्या दर्शनास येत आणि त्याचा प्रसाद व आशीर्वाद भक्तिभावानें ग्रहण करीत.

भिक्षाटनाच्या निमित्तानें स्वामी वारंवार घांटावर जाऊं लागल्यामुळें त्याचें भक्तमंडळ वाढलें. सन १७२५ सालीं वीरमाडें व अनेवाडी हे आणखी दोन गांव शाहूनें स्वामीस इनाम दिले. स. १७२६ त स्वामीचे इनाम गांव आठ होते. याच सुमारास हत्तींच्या संबंधानें सीदीचा व स्वामीचा तंटा उपस्थित होऊन सीदीनें

परशुरामाचें देवालय लुटलें, वगैरे प्रकार सीदीच्या युद्धांत सांगितले आहेत. या प्रकरणावरून पुढें परशुरामाची व्यवस्था गणेश बल्लाळ तांबे याजकडे सांगून स. १७२८ च्या सुमारास कोंकण सोडून स्वामी वरघांटीं साताऱ्याजवळ धावडशीस येऊन राहूं लागला. तेथें त्यानें एक वाडा, एक तलाव व देवालय बांधून झाडें बागांचा वगैरे हळू हळू बराच पसारा वाढविला. छत्रपति शाहू व त्याच्या राण्या व सरदार स्वामींच्या दर्शनासाठीं मोठ्या भक्तिभावानें धावडशीस येऊं लागले. तेणेंकरून स्वामीचा बडेजाव वाढत गेला. शाहूमहाराज, बाजीराव व चिमाजी आपा हे तर स्वामीच्या अगदीं अध्यां वचनांत असत. इकडे मराठी राज्याची वृद्धि होत चालली ती स्वामीच्या आशीर्वादाचें फळ होय, अशी भावना लोकांत उत्पन्न झाली. धावडशीस आल्यावर स्वामीची कीर्ति सर्व महाराष्ट्रांत पसरून त्याचा लोकांस वेध लागला. कोंकणांत स्वामीचा ऐवज, वस्त्रपात्र वगैरे रसाळगडच्या अधिकारी संभाजी शिंदे याजपाशीं ठेवलेला होता, तो पुढें स्वामीनें धावडशीस आणिला.(पा. कृ. ब्र. च.)

शाहू व त्याच्या राण्या यांनीं स्वामीचा अगत्यवाद धरिल्यामुळें राजकारणांतही स्वामीचें वजन वाढत गेलें. ज्यास कांहीं आपलें कार्य करून घ्यावयाचें असे, तो स्वामीच्या मार्फत खटपट करूं लागला. स्वामीच्या शब्दानें लोकांचीं कामें होऊं लागलीं. स्वामीच्या ब्रह्मनिष्ठ बाण्यामुळें त्याच्या वचनाचा अव्हेर करण्यास कोणी धजत नसे. प्रमुख सरदार आपणास स्वामीचे दास म्हणवूं लागले. स. १७२८ पासून १७४५ पर्यंत मराठशाहींत जीं जीं कारस्थानें झालीं, त्यांत स्वामीचें प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष थोडेंबहुत तरी अंग होतें. स्वामीचा हा संबंध महत्त्वाच्या कारभारापेक्षां क्षुल्लक व्यवहारांत ज्यास्त असे. कारण महत्त्वाचे कारभार उलगडण्याचें सामर्थ्य स्वामींत नव्हतें. विशेषतः सराफीच्या व्यापारामुळें स्वामीची सर्वांस गरज लागे. त्या वेळच्या मोहिमा म्हणजे आंतबट्ट्याचा व्यापार असे. बरेचसे सरदार सदैव कर्जांत बुडालेले असत. त्या सर्वांत अग्रगण्य बाजीराव पेशवा होता. अडचणीच्या प्रसंगीं स्वामी त्यास पैशाची मदत करी, आणि त्याची फेड वेळेवर न झाल्यामुळें मागाहून तगादे लावी. पुरुषांप्रमाणें अनेक स्त्रियांची सुद्धां स्वामीचे ठायीं निष्ठा होती. राणी सगुणाबाई व सकवारबाई, तसेंच विरूबाई, राधाबाई पेशवे,

मथुराबाई व लक्ष्मीबाई आंग्रे, उमाबाई दाभाडे, राजसबाई निंबाळकर, गौतमाबाई होळकर, पिलाजी जाधवाची आई हंसाई, रघूजी भोसल्याची आई काशीबाई, इत्यादि बायांचा स्वामींशीं झालेला पत्रव्यवहार उपलब्ध आहे. साधु पुरुषांच्या ठिकाणीं अलौकिक सामर्थ्य असतें ही भावना हल्लींपेक्षां त्या वेळीं बलवत्तर होती. शिवाय प्रत्यक्ष व्यवहारांतही स्वामींच्या मध्यस्थीचा परिणाम होई म्हणून लोक त्याच्या भजनीं लागले. स्वामींला तरी या व्यवहारिक बडेजावापलीकडे दुसरें कांहीं साध्य नव्हतें. निरनिराळ्या सरदारांत वैमनस्यें सुरू असतां, शाहूपाशीं आपला पगडा कायम राखण्यास बाजीरावास स्वामींचा उपयोग विशेष झाला. 'राजश्रीजवळ तुमची फारशी शिफारस केली, कित्येक तुमच्या स्वहिताच्या गोष्टी सांगितल्या' असें स्वामी [illegible] १७३८ त बाजीरावास लिहितो. त्यावर बाजीरावाचें उत्तर, 'मायबाप देवधर्म स्वामींचे पाय. न्यूनपूर्ण सर्व आम्हीं स्वामींचे चरणांकित. सर्व चिंता स्वामींस आहे.' वगैरे. अशा अनेक उल्लेखांवरून स्वामींचा व बाजीरावाचा एकमेकांस कसा उपयोग होत असे तें दिसतें. भिक्षेच्या निमित्तानें सर्व सरदारां-पासून स्वामी द्रव्य घेत असे आणि त्याचे बदल्यांत सरदारांचें स्वामी अभीष्ट-चिंतन करी. या द्रव्यानें स्वामीनें ठिकठिकाणीं सार्वजनिक उपयोगाचीं कामें केलीं. हबशांच्या व वसईच्या प्रकरणांत सरदारांस उत्तेजन व कार्यसिद्धीचा आशीर्वाद देऊन स्वामीनें तत्कालीन राजकीय उद्योगास अप्रत्यक्षपणें बरेंच मदत केली असें ह्मणतां येईल.

दिल्लीकडील कारस्थानें, निजामाचें उच्चाटन, जंजिऱ्याची व वसईची मोहीम, अशा कित्येक प्रसंगांशीं स्वामींचा थोडा बहुत संबंध असून, स्वामींच्या विस्तृत पत्रव्यवहारावरून त्या त्या प्रसंगांच्या हकीकती हल्लीं बऱ्याच खुलासेवार कळून येतात. अनेक प्रसंगांत बाजीरावानें स्वामींची सल्ला विचारलेली आहे. वसईच्या मोहिमेनंतर लवकरच बाजीराव एकाएकीं मृत्यु पावला, त्यामुळें स्वामींस अपरिहार्य दुःख झालें. 'बाजीरावासारखा शिष्य गेला, याउपर मुलखांतून जावें किंवा प्राण सोडावा, काय करावें तें हिलिणें,' असें स्वामीनें चिमाजीस विचारिलें. चिमाजीनें खालील हिंमतीचें उत्तर लिहिलें, 'आजपावेतों कृपाकटाक्षें पाहत आहां, तैसेंच स्वस्थ चित्तें राहाल तर चि. रा. नानास

बाजीरायाची जागा आहे. स्वामींची कृपा मस्तकीं असलियावर, यांपेक्षां अधिकपणें, स्वामींच्या शिष्यत्वाचें नांव राखील. उमेद तों आमची या प्रकारची आहे. सर्व हिंमत स्वामींच्या आशीर्वादबळाची आहे. स्वामींनीं नानावर, आम्हांवर, सर्व बाळकांवर नजर देऊन संतोषरूप राहवें. आशीर्वाद असल्यावर काय न्यून होणार ! सर्व प्रकारचें ऊर्जितच होईल.' बाजीरावाचे पश्चात् नानासाहेबास पेशवाईचीं वस्त्रें मिळण्यांत स्वामींचें साह्य झालें असलें पाहिजे. याच सुमारास स्वामींचा मुख्य कारभारी चिमणाजी कृष्ण भागवत मृत्यु पावला; चिमाजी आपाही वारला, तेणेंकरून स्वामींनें शोकाकुल होऊन ऐहिक व्यवहारांतून आपलें चित्त बहुतेक काढिलें. त्यांचें वयही नव्वदांचे वर होतें. नानासाहेब व सदाशिवराव यांचें व स्वामींचें, बाजीरावासारखें रहस्य नव्हतें. शिफारसी वगैरे करून स्वामी राज्यकारभारांत ढवळाढवळ करी तो नानासाहेबास खपत नसावी. चिमणाजीपंत भागवतांचा मुलगा जगन्नाथपंत याजकडे संस्थानचा कारभार सांगून, आपले पश्चात् सर्व बंदोबस्त पूर्ववत् यथास्थित चालविण्याविषयीं स्वामींनें शाहूस विनंति केली; आपल्या सर्व परिवाराचें व सेवकजनाचें पालग्रहण करण्याविषयीं राणी सगुणाबाईचीं अभयपत्रें घेतलीं. स्वामींचें शरीर कृश झालेलें पाहून शाहू व त्याच्या राण्या वारंवार धावडशीस जाऊन त्याचा समाचार घेत. स. १७४५ च्या श्रावण महिन्यांत कृष्णातीरीं वार्षिक समाधीचें अनुष्ठान स्वामींनें चालविलें. नववे दिवशींच समाधि सोडून बाहेर येऊन दर्भासनावर मृगासन पसरून, रामनामोच्चार करीत शेवटची निद्रा केली. शाहूमहाराज व असंख्य लोक त्या ठिकाणीं धांवून आले. त्यांनीं स्वामींचें कलेवर पालखींत घालून धावडशीस आणिलें, आणि तेथें त्याचे अंत्योपचार केले. स्वामींच्या समाधीजवळच धावडशीस शाहूनें पुढें एक मोठें मंदिर बांधण्यास सुरुवात केली, तें मंदिर स. १७५८ त पुरें होऊन त्यास सुमारें एक लक्ष वीस हजार रुपये खर्च झाला. हें मंदिर प्रेक्षणीय आहे. तेथील कारभार जगन्नाथ चिमणाजी भागवत यांचे वंशज पाहतात.

ब्रह्मेंद्र स्वामीला वार्षिक भिक्षेची प्राप्ति सुमारें सोळा हजारांची असून त्याशिवाय उत्सवप्रसंगीं पुष्कळ पैसा व सामान जमा होई. देवालयाचा व संस्थानाचा थाट त्या वेळीं अपूर्व होता. मंदिरें, विहिरी, तलाव, घाट, पूल,

सडका वगैरे बांधण्यांत स्वामीनें पुष्कळ पैसा खर्च केला. यवतजवळ भुलेश्वरच्या डोंगरावर भुलेश्वर नांवाचें भव्य मंदिर त्यानें बांधिलें. अशा कामीं स्वामींचा एकंदर खर्च नऊ दहा लाख झालेला आहे. आपल्या देवाच्या नांवानें भार्गवपट्टी म्हणून एक कर मराठीराज्यांत गांवगन्ना बसविण्याचा स्वामीचा विचार होता.

९. **ब्रह्मेन्द्र स्वामींची योग्यता.**—स्वामींच्या राष्ट्रीय कामगिरीसंबंधानें महाराष्ट्रांत यापूर्वी पुष्कळ चर्चा झाली असून दोन विरुद्ध मतें व्यक्त झालेलीं आहेत. प्रथम धावडशी संस्थानाचा पत्रव्यवहार तपासून रा. ब. पारसनीस यांनीं स. १९०० त स्वामीचें एक सुसंबद्ध व विस्तृत चरित्र लिहून प्रसिद्ध केलें. त्यांतून विवेचनात्मक भाग वगळले, तरी स्वामींच्या संबंधाची उपलब्ध असलेली सर्व माहिती एकत्र ग्रथित करून तत्कालीन राज्यकारभारावर पुष्कळच नवीन प्रकाश पाडल्याबद्दल महाराष्ट्रानें पारसनिसांचे उपकार स्मरले पाहिजेत. ज्यास्त माहिती व चर्चा होऊन वरील प्रयत्नांतले दोष उघडकीस आले, म्हणून त्या पहिल्या प्रयत्नाची किंमत कमी होत नाहीं. त्यानंतर रा. राजवाडे यांनीं आपल्या तिसऱ्या खंडाच्या प्रस्तावनेंत विरुद्ध टीका करून, स्वामीचा व पारसनिसांचा भरपूर समाचार घेतला. पुढें दोन तीन वर्षेंपावेतों केसरी, ग्रंथमाला, वि. ज्ञा. विस्तार वगैरे ठिकाणीं या संबंधानें वेळोवेळीं पुष्कळ चर्चा या विषयाची झाली. त्यावरून निघणारा मथितार्थ या ठिकाणीं सांगितला म्हणजे बस आहे. स्वामींची तरफदारी करणाऱ्या पक्षाचें म्हणणें असें आहे कीं, शिवाजीच्या वेळेस जसा रामदास, तसाच बाजीरावाच्या वेळेस ब्रह्मेंद्रस्वामी परोपकारी व राष्ट्रास स्फूर्ति देणारा गुरु झाला. ह्यावर विरुद्ध पक्षाचें म्हणणें असें आहे कीं, ब्रह्मेंद्रस्वामी अत्यंत स्वार्थसाधु, व्याजबट्टे करणारा, कलागती लावणारा, नसतीं लफडीं उपस्थित करून मनाप्रमाणें झालें नाहीं म्हणजे शिव्याशाप देणारा, असा उपद्व्यापी होता. प्रथमच हें सांगितलें पाहिजे कीं, रामदासाची योग्यता ब्रह्मेंद्रस्वामीस नाहीं. मनुष्यस्वभावाचें व जगाचें ज्ञान व राष्ट्रोद्धारणास लागणारें साहित्य जसें रामदासास अवगत होतें तसें ब्रह्मेंद्रस्वामीस नव्हतें. रामदासासारखे निःस्वार्थी राष्ट्रपुरुष क्वचित् काळीं महद्भाग्यानें निर्माण होतात. तेव्हां त्यांजबरोबर ब्रह्मेंद्राची तुलना करणें व्यर्थ आहे. साधुपुरुषांचें माहात्म्य आज सुद्धां पाश्चात्य सुधारणेच्या काळांत जर आपण एवढें मोठें पाहतों, तर अठराव्या शतकांत तें अतोनात

होतें त्यांत संशय नाहीं. साधु पुरुष तपःसामर्थ्यानें अघटित कृत्यें करूं शकतात आणि त्यांच्या आशीर्वादाशिवाय आपलें चालावयाचें नाहीं, अशी भावना त्या वेळीं बहुतेक लहान थोर पुरुषांची होती. विशेषतः सर्व व्यक्तींना कोणी तरी गुरु हा असेच; आणि त्याच्या आज्ञेनें ते वर्तत. अशा सामान्य साधूंपैकींच ब्रह्मेंद्रस्वामी होता. त्यास राष्ट्राचा किंवा राजकारणाची जाणीव नव्हती. पण अशी जाणीव इतर व्यक्तींना सुद्धां फारच थोड्यांस असते. आपल्या शिष्यांचें कल्याण चिंतून त्यांजकडून महत्त्कृत्यें करवावीं, आणि त्यांत आपलाही ऐहिक मनोरथ साधून घ्यावा, अशी त्या साधूंची प्रवृत्ति असे. हा ऐहिक मनोरथ सर्वस्वीं आपलपोटेपणाचा होता असें नाहीं. मंदिरें बांधणें, विहिरी, तलाव, घाट, धर्मशाळा इत्यादि लोकोपयोगी कामें करणें, देवतांचे उत्सव करून अन्नदान करणें, ह्या गोष्टी पुण्यप्रद व लोकोपयोगी आहेत, असा समज त्या वेळीं होता व अद्यापिही आहे. हा कामें करण्यास पैसा पाहिजे आणि तो पैसा वशिल्यानें, धाकदपटशानें, व्यापारधंद्यानें, जसा मिळेल तसा मिळवावा, मात्र तो वरच्यासारखा सत्कृत्यांत खर्चिला म्हणजे झालें. तेणेंकरून पुण्य लागतें, आणि हें पुण्य परमेश्वराजवळ रुजू असतें, अशी यांची भावना असे. अशानें पुण्य लागतें कीं नाहीं हा प्रश्न वेगळा, पण यांची भावना मात्र खरी होती. अशा समजुतीनें पाहतां ब्रह्मेंद्रानें जगद्व्यतिरिक्त कांहीं अनुचित कर्म केलें असें नाहीं, किंवा असें अनुचित कर्म आपण करितों असें त्यास वाटत नव्हतें. सारांश, रामदासाची तुलना प्रथम मनांत आणून मागाहून ब्रह्मेंद्र रामदासाइतका थोर नसल्याबद्दल त्यास दोष देणें वाजवी नाहीं. आपणांस लोकांनीं भजावें, मोठमोठे लोक आपल्या शिष्यगणांत असावे, त्यांजकडून लोकांचीं व आपलीं अनेक कार्यें साधून घ्यावीं, अशी व्यावहारिक महत्त्वाकांक्षा ब्रह्मेंद्राची होती. अर्थात् त्याचें तेज व प्रभाव तितक्या मानानें कमीच होता; परंतु रामदासानें कोणत्याही प्रत्यक्ष व्यवहाराशीं किंवा व्यक्तीशीं आपला संबंध ठेविला नाहीं. तत्कालीन परिस्थिति ब्रह्मेंद्रास चांगली अवगत होती. त्यानें प्रवास केलेला होता. शिवाजीच्या वेळेपासून मराठीराज्याचा वर्तनक्रम त्यानें पाहिलेला होता. त्यावरून शिवाजीचे हेतु सिद्धीस नेण्यास पुढें काय केलें पाहिजे, याची त्यास समज पडली पाहिजे होती. परंतु एकाद्या व्यक्तीच्या उत्कर्षापलीकडे

समग्र राष्ट्राचें चिरंतन कल्याण कशांत आहे हें जाणण्याची पात्रताच त्यास नव्हती. त्याच्या एवढ्या मोठ्या पत्रव्यवहारांत अशी राष्ट्रीय भावना व्यक्त करणारें एकही वाक्य नाहीं. स्वतःच्या परशुराम-क्षेत्रास उपसर्ग झाला ह्मणून हबशाचा पाडाव करण्याची त्यास तळमळ लागली; पश्चिम किनारा सर्वस्वीं नाव्यांत घेऊन आपली राज्यमर्यादा निर्बाध करावी, हें शिवाजीचें धोरण त्यास कळलें नाहीं. वसईचा पाडाव कां व्हावा तर त्यांत आपले शिष्य पेशव्यांची बडेजाव होते म्हणून. बाकी पोर्तुगीझ, इंग्रज, व हबशी हे सर्व त्यास सारखे. त्यांचे राष्ट्रीय कावे स्वामीस समजले नाहींत. निजामाकडे किंवा हबशाकडे आपल्या वजनाचा उपयोग करून त्यास कांहीं कार्यभाग करतां आला, त्याचप्रमाणे मुंबईस इंग्रजां-कडे जाऊन त्यांजकडून आपण आपलें काम करून घेऊं असें त्यास वाटे. पुष्कळदां मराठ्यांच्या शत्रूंकडे पत्रव्यवहार करून व वशीले बांधून उत्पन्न व द्रव्य वगैरे मिळविण्यासही स्वामी कसूर करीत नसे. अशा दृष्टीनें स्वामीचें चरित्र तपासलें ह्मणजे त्याच्या वर्तनाची संगति जुळते. राजकारण किंवा मुत्सद्दी धोरण त्यास नव्हतें. अंगीं योग्यता नसून केवळ तपोबलाच्या सामर्थ्यावर तो धाकदपटशा दाखवी, त्यामुळें तो आपले हेतु मात्र करून घेई. प्रतिनिधि व पेशवे असे दोन तट राज्यांत असून त्याचा परिणाम विघातक होत होता, तो मिटविण्याचा प्रयत्न स्वामीनें केला नाहीं. उलट पेशव्यांची बाजू उचलून धरण्यांत त्यानें दुसऱ्या पक्षास थोडेंसें चिथविलेंच असावें. आंगऱ्यांचे घरांतील तंटा त्यास मिटवितां आला नाहीं. शाहूची त्याजवर भक्ति असल्यामुळें प्रतिनिधि पक्ष उघडपणें स्वामीवर कधींच तुटून पडला नाहीं. बाजीरावानें मात्र स्वामीचा उपयोग हवा तसा करून घेतला; स्वामी आपणास पेशव्यांचा जागला ह्मणे. गौरवयुक्त विशेषणें व गोडगोड पत्रें लिहून लहानथोर मंडळीस खूश करून आपलीं कामें करून घेण्याची कला स्वामीस चांगली येत होती. जेव्हां जेव्हां बाजीरावाबद्दल शाहूस संशय येऊन प्रकरण विकोपास जाई, तेव्हां स्वामी बाजीरावाची तरफदारी करून शाहूचे संशय दूर करी. शिवाय बाजीरावास वेळीं अवेळीं स्वामीकडून कर्ज वगैरे मिळे आणि त्याजविरुद्ध उठणाऱ्या लहान मोठ्या शत्रूंची परभारें निराशा होई. स्वामीचा उपयोग बाजीराव समजून उमजून करीत होता. 'चिरंजीव रघुपति'

'विजयीभव, रघुनाथजी' 'मन निर्मल--गंगाजल,' 'आचारें पुण्यशील भक्तराज,' 'रामसेवक हनुमंत,' 'भार्गवसेवक,' 'धीर रघुनाथाचा सेवक,' 'सत्यवक्ता,' 'एकवचनी' 'सहस्त्रायु,' 'चिरंजीव' अशा प्रकारचे, गौरवाचे मायने स्वामी बाजीराव व चिमाजी आपा यांस लिहीत असे. बाजीरावाचा मुलगा नानासाहेब ज्यास्त धूर्त असल्यामुळें स्वामींचें वर्तन व हेतु त्यास लौकरच कळत. आणि त्याच्या मनांत स्वामींविषयीं फारशी पूज्यबुद्धि राहिली नाहीं. सारांश, मुद्दाम जरी स्वामीनें राष्ट्राचें अकल्याण असें केलें नाहीं, तरी त्याच्या स्वार्थी वर्तनाचा परिणाम राज्यास थोडा बहुत अपायकारक झाला. आपसांतील संशय व द्वेष वाटले; आणि अधिकारयुक्त वाणीनें राज्यांतील दुही मोडण्याचा प्रयत्न त्यास करतां आला असता, तो त्याच्या हातून झाला नाहीं. उलटपक्षीं नानाप्रकारचे मतलबी लोक नसेर्ती लफडीं घेऊन त्याजकडे येत, त्यांजला हाताशीं धरल्यानें स्वामीला निष्कारण राज्यकारभारांत ढवळाढवळ करण्याचा प्रसंग येई, तें कोणासहीं खपत नसे. 'आपलें व्याज वसूल करण्यास सरकारी मामलेदारांचा उपयोग करणें, आपला रोष असलेल्या इसमास शिक्षा करविणें, आपल्या भक्त-मंडळीस गुन्ह्याबद्दल झालेल्या शिक्षा माफ करविणें, वतनें व नेमणुका यांच्या घालमेली करणें, भिक्षेच्या व दक्षणेच्या नांवाखालीं पैसा उकळणें, जकातीची माफी मागणें, अशीं कितीं तरी कृत्यें नियमित राज्यकारभाराशीं विरोध असलेलीं स्वामीकडून झालीं. स्वामीचा हा उपद्व्याप नानासाहेबास खपत नसे म्हणून त्याचें व स्वामीचें पटलें नाहीं, तरी बाजीरावाचे वेळचा प्रयोग नानासाहेबा-संबंधानेंही स्वामी करण्यास चुकत नसे. सदाशिवराव भाऊसुद्धां सौम्य शब्दांनीं जरब दाखवून स्वामीच्या मागण्या फेटाळून लावी, आणि स्वामीचा लकडा पाठीवर आलेला पाहून कंटाळून जाई. अशा स्थितींत आपला बोज राखण्या-साठीं स्वामीस मागच्या आठवणी देणेची जरूर पडे.[1] चिमाजीची निष्कपट भावना सदाशिवरावाचे ठिकाणीं नव्हती. केव्हां केव्हां तर शाहूला सुद्धां स्वामीच्या मागणीचा कंटाळा आलेला दिसतो. बाजीरावही प्रसंग विशेषीं स्वामीला हळूच चिमटे घेत असे.[2] सकवारबाई राणीनें त्यास चोख जबाब दिला आहे. पिलाजी जाधवाच्या द्रव्यसंचयावर स्वामीचा डोळा कसा होता हें ले. २९३ वरून दिसतें.[3]

१ ब्र. च. ले. २६७–२८०, ७७, ९५, १२३, १५१, १५७, ६९–७० १५९, १६०, १६३, १६४, १६५, २९१. १३३, १३४. २६४. ३८.९५, १४१

कर्जाच्या देवघेवीसंबंधानें बाजीरावाचीं व स्वामीचीं पत्रें वाचण्यालायक आहेत. प्रत्येकास आशीर्वाद द्यावा व त्याचें कार्य सिद्धीस गेलें म्हणजे श्रीभार्गवाच्या नांवानें त्याजकडून यथाशक्ति द्रव्य घ्यावें, हा स्वामीचा वर्तनक्रम होता. कोंकणांत असतांनाच आंगऱ्यांस स्वामीनें द्रव्य व साह्य केल्याचे उल्लेख आहेत. स्वामीचें कर्ज बहुतेक प्रमुख सरदारांकडे होतें. सालिना सहा हजार, आठ हजार, दहा हजार एवढ्या रकमा केवळ व्याजाच्याच होत असत. पेशव्यांकडे तर लाखों रुपये गुंतलेले होते. बाजीरावास स्वामीपुढें हृदयद्रावक विनवण्या कराव्या लागत ' आम्हांस कर्जानें बुडविलें, एवढे गोष्टीकरितां प्राण जाता तरी बरें होतें. विष खाऊन मरावें इतकेंच. किंवा स्वामीचे पाय धरून बसावें, इतकाच अर्थ उरला आहे. स्वामींस कृपा येईल तरी आम्ही कर्जापासून मुक्त होऊं. लोकांचे नरकवासापासून दूर होऊं तो पदार्थ करावा. तरीच मज बाळकावर पूर्ण कृपा आहे. नित्य उठोन कर्जदारांचे पायां पडावें, शिलेदारांचे पायां पडतां पडतां कपाळ छिनत चाललें. आतां ही सुखें आह्मांस नकोत. पैका पावता करूंच. आतां प्रस्तुत तो आमचा जीवच आहे. येथें येऊन घेणें, अगर तेथें बोलावशील तरी तेथें संग टाकून येतों. तुह्मी थोर देव. तुमचें झाड लाविलें तोडाल, तरी आतां तोडा. राखवाल तरी राखवा. मारशील तरी तूंच बावा मारशील. यांतही कीर्ति तुझीच आहे. आह्मां लेकरांचे लडिवाळ चालवून कीर्तिरूप होशील तरी तूंच होशील. कर्ज फिटत नाहीं. आतां वाचल्यानें सार्थक काय ? आपला जिवाचा त्याग करतों [१] ' अशा प्रकारचीं अनेक पत्रें आहेत. या कर्जासंबंधानें सदाशिवरावभाऊनेंही स्वामीस लिहिलेलें आहे.

स्वतःस कांहीच साध्य नसतां स्वामी जेव्हां जें दिसेल तें वाटेल त्याच्याकडे मागत सुटे, तेव्हां त्याजबद्दल, राजवाडे ह्मणतात त्याप्रमाणें, थोडा बहुत वीट उत्पन्न होतो यांत संशय नाहीं. अमुक एका पत्रांत त्यानें कोणाकडे कांहीं मागितलें नाहीं असें बहुधा व्हावयाचें नाहीं. पारसनिसांचे पुस्तकांत स्वामीच्या पत्रव्यवहाराचीं ३७५ पत्रें छापलीं आहेत, त्यांशिवाय राजवाड्यांचे तिसऱ्या खंडांत सुमारें १०० व का. सं. पत्रें यादींत सुमारें १०।२० असा एकंदर बराच मोठा संग्रह प्रसिद्ध झालेला वाचला. ह्मणजे स्वामीच्या एकंदर चरित्राची

१ ब्र. च. ले. १४६, १५५, २९०. ३०—३२.

चांगलीच उमज पडते. बऱ्याच पत्रांत पैशाचा व कर्जाचा विषय आहे. बाजीरावाकडून कर्जाची फेड होईना, तेव्हां स्वामीनें त्रागा आरंभिला. आम्ही गरीब गोसावी, आम्हांस कशाची जरूर नाहीं, असें तोंडानें म्हणून सर्वांकडे तो कांहींना कांहीं मागत सुटे. अशा मागणीचा उल्लेख बहुतेक पत्रांतून आहे. तुळया, वांसे, लांकडें, पानें, झाडें, घोडे व घोड्या, घंटा, चुना, लवंग, साखर, जायफळ, तूप, गूळ, मध, औषधि, हेमगर्भ, नारायण तेल, कृष्णागर, दुलया, दुपटा, पासोडी, मखमल, साड्या, सकलाद, शालजोड्या, किनखाब, पातळ, चांदणी, नीलवर्णी तापता, शालू, मोत्यें, हस्तिदंत, अपूर्ववस्त्र, नळे चंद्रज्योति, हंस, इत्यादि नानाप्रकारच्या असंख्य वस्तु हिंदुस्थानभर ठिकठिकाणीं होणाऱ्या त्या त्या मंडळीकडून स्वामीनें आणविल्या. या वस्तूंचा त्याजवळ मोठा संचय असून प्रसंगविशेषीं तो भेटीस येणाऱ्या मंडळीस त्या वस्तु देई. प्रत्येकानें कांहीं अपूर्व चीज पाठवावी अशी स्वामीची ताकीद असे. सारांश, भिक्षेवर सधन झालेलें व सर्व वस्तुजातीनें भरलेलें हें स्वामीचें संस्थान ऐहिक थाटास सर्वथैव शोभणारें होतें. मात्र स्वामीचें स्वतःचें आचरण निष्कलंक असून, वरील वस्तूंचा उपयोग केव्हांही असन्मार्गाकडे झालेला नाहीं, आणि स्वामीनें आपल्या पैशाचा अगर वजनाचा उपयोग अनीतीकडे केव्हांही केलेला नाहीं, हें नेहमीं ध्यानांत ठेविलें पाहिजे. युद्धप्रसंगीं स्वामी पेशव्यांस प्रासादिक पोषाख पाठवी. त्यास तो वज्रकवच म्हणे, आणि तें घालून लढाईस जावें, असें स्वामी सांगे.

स्वामीच्या योग्यतेसंबंधानें रा. राजवाड्यांचा अभिप्राय, कठोर शब्दयोजना वगळल्यास, सारांशानें निर्विकार मनास पटण्याजोगा आहे. ज्या पुरुषाविषयीं सर्व प्रमुख राष्ट्राची पूज्यबुद्धि होती, त्याची अप्रयोजक शब्दांनीं निर्भर्त्सना करणें योग्य नाहीं.[१] आज आपणास काय वाटतें यापेक्षां तत्कालीन लोकांस स्वामीबद्दल काय वाटत होतें तेंच जमेस धरिलें पाहिजे, असें रा. आठल्ये म्हणतात तें वास्तविक वावगें नाहीं. परंतु तत्कालीन समाजाची साधूंविषयीं भावना कशा प्रकारची होती याचें विवेचन वर केलेंच आहे. ब्रह्मेंद्रस्वामीच्या मृत्यूनंतर

---

१ असाच अभिप्राय या विषयावर रणकंदन माजलें तेव्हां मीं २४-९-१९०१ च्या सयाजीविजयांत प्रसिद्ध केला होता. रा. आठल्ये यांनीं स्वामींचीं तरफदारी, ता. ३, २४, व ३१ जानेवारी १९०५ च्या केसरीच्या अंकांत केली आहे.

चार पांच वर्षांनीं एक गोसावी ताराबाईच्या व भगवंतराव अमात्याच्या मदतीनें धावडशीची गादी बळकावूं पाहत होता. परंतु तो राजद्वारीं फजित पावला. स्वामीच्या पश्चात् आंगऱ्यांनीं स्वामीचे गांवास उपद्रव केलेला ऐकून तो ताबडतोब बंद करण्यासाठीं शाहूनें एक सणसणित आज्ञापत्र तुळाजी आंगऱ्यांस लिहिलें त्यावरून शाहूची स्वामीवरील निष्ठा चांगली व्यक्त होते. मानाजी आंगरेही स्वामीस चांगला मानीत होता. संभाजी आंगरे याचें मत तशाच प्रकारचें होतें. अशा अनेक व्यक्तींचा पूज्यभाव दाखविणारीं पुष्कळ पत्रें आहेत. बाजीरावाची तर स्वामीवर पूर्ण भक्ति होती. वसई काबीज करितांना स्वामीच्या प्रोत्साहनाचा आपणास केवढा पाठिंबा मिळाला, त्याचा उच्चार चिमाजी आपानें अनेकवार केलेला आहे. नानासाहेब पेशवेही स्वामीस वचकून होता. त्याचीं व स्वामीची वरील कित्येक पत्रें उपरोधिक[१] आहेत. त्यावरून त्यांच्या मनोभावनेचा अंदाज करितां येतो.

आंगऱ्यांच्या कुटुंबांत स्वामीनें कलह वाढविले, अगर उलटपक्षीं आपसांतील कलह मोडून राष्ट्रहिताच्या कामीं सर्वांनी एकजूट व्हावें असा स्वामीचा अव्याहत प्रयत्न होता, हे दोनही पक्ष सत्यास धरून नाहींत. राष्ट्रीय व्यवहारांची जाणीव स्वामीस नव्हती हें वर सांगितलेंच आहे. व्यावहारिक उलाढाल्या करून आपली व आपल्या शिष्यांची बडेजाव वाढविण्याचा स्वामीचा खटाटोप होता. अशा उलाढाल्या करितांना कांहीं प्रसंगीं भांडणें लागत, व कांहीं मिटत, पण तो स्वामीच्या बुद्धिपुरःसर खटाटोपाचा हेतु नव्हता. शाहूच्या दरबारांत दोन विरुद्ध पक्ष होते. त्यांपासून राज्याची हानि होते ही गोष्ट स्वामीस कळती तर, त्यानें आपल्या वजनाचा उपयोग ते मिटविण्याकडे केला असता. मुद्दाम कुटुंबांतील तंटे त्यानें वाढविले नाहींत; आणि असे तंटे मिटविण्याचे उपदेशपर समजुतीचे चार शब्द त्यानें लिहिले म्हणून तेवढ्यावरून राज्यांतील दुही मोडण्याचा त्यानें प्रयत्न केला असेंही होत नाहीं. आंगऱ्यांचे घराण्यावर स्वामीचा लोभ होता हें खरें. परंतु तसा लोभ पुष्कळांवर होता, आणि विनाकारण राज्याचे विरुद्ध

१ ब्र. च. पृ. १२३-१२४. व १२९; खं. ३-३२१, १२१, २७३, २७३, १२१, ६७; ब्र. ले. २८-३२. १५९, २९१, ५२, ८८, ७२, १५८, १६९, २९०, २९१, ६७.

जाण्याचें स्वामीस प्रयोजन नव्हतें.सर्वांशीं सारखें प्रेम ठेवितील तरच त्यांचें साधुत्व कायम राहील. स्वामीस पैशाचा लोभ होता तो केवळ तत्कालीन धर्मसमजुतीचा परिणाम होय. स्वतः असें त्यास कांहींच कर्तव्य नसतां त्यानें असा लोभ ठेविला हेंच आश्चर्य. ' स्वामी देवालयें, वापी, कूप, तडागें, झाड झाडोरा लावतात हे कीर्ति अक्षय करिजेती. यापेक्षां उत्तम काय आहे? आम्हांस या गोष्टीचा बहुतसा संतोष आहे,' असें शाहू लिहितो. त्यावरून स्वामी म्हणजे त्या वेळचें पब्लिक वर्क्स खातें असें मानण्यास हरकत नाहीं. हल्लीं धावडशी संस्थानाकडे खालील गांवें आहेत. साताऱ्याचे वायव्येस सहा मैलांवर धावडशी येथें स्वामींची समाधि व भार्गवरामाचें मंदिर असून तीन लहान तळीं आहेत. अनेवाडी व वीरमाडें हे दोन गांव साताऱ्याचे उत्तरेस दहा बारा मैलांवर कृष्णेच्या नजिक आहेत. वीरमाडें येथें कृष्णेस घाट असून त्या घाटावर गुहेंत स्वामी समाधि लावी.याच ठिकाणीं त्याचें देहावसान झालें. पुरंदर तालुक्यांत राजेवाडी स्टेशनापासून ईशान्येस आठ मैलांवर माळशिरस म्हणून गांव आहे, तेथील घाटमाथ्यावर श्रीभुलेश्वरानें हेमाडपंती मंदिर स्वामीनें बांधिलेलें आहे. जवळच पिंपरी गांवीं स्वामींचें वाघेश्वर मंदिर आहे. शिवाय फलटण संस्थानांत रावडी, रत्नागिरि जिल्ह्यांत देवाचें गोठणें, डोरलें व महाळुंगे, हे गांव धावडशी संस्थानाकडे चालतात.'

भुलेश्वर मंदिरास माळशिरस गाव शाहूनें दिला. हें मंदिर स्वामीनें स. १७३७ त बांधिलें. तुकोजी होळकरानें या देवालयाचा जीर्णोद्धार केला देवालयाच्या बांधणीचा वृत्तान्त स्वामीचा पत्रव्यवहार ले. १३३ यांत चिमाजी आपानें दिला आहे. ब्रह्मेन्द्रस्वामीस निरनिराळे लोक प्रौढ विशेषणांनीं युक्त असे मायने लिहीत त्याचे मासले पाहण्यालायक आहेत राष्ट्रीय दृष्टीनें स्वामींच्या उद्योगाचा मराठशाहीशीं निकटसंबंध येत असून वीस वर्षे स्वामीच्या योग्यतेसंबंधानें मोठा वाद महाराष्ट्रांत माजलेला असल्यामुळें, त्याची वरील हकीकत राष्ट्रीय इतिहासांत मुद्दाम एवढ्या विस्तारानें द्यावी लागली आहे

१ ब्र. च. पृ. ६३, व ले. ३२५, १, २००–२०२.

# प्रकरण अकरावें.

## वसईचा अपूर्व संग्राम.

### मार्च १७३७–मे १७३९.

१. भूगोलिक व राजकीय परिस्थिति. २. युद्धाचीं कारणें.
३. पहिली मोहीम, ठाणें व साष्टी कावीज ( मार्च–जून १७३७ ).
४. दुसरी मोहीम ( नोव्हेंबर १७३८–जून १७३९ ).
माहीमचा घोर संग्राम, तारापुरचा हल्ला.
५. वसईचा पाडाव, ( १३ मे १७३९ ). ६. तहाचीं कलमें.
७. पोर्तुगीज युद्धांत इंग्रजांचें वर्तन. ८. जेम्स इंचवर्डची वकिलात.
९. गोर्डनची साताऱ्यास वकिलात, ( १२ मे–१४ जुलई १७३९ ).
१०. शाहू छत्रपतींची मिरजेवर स्वारी ( सन १७३७–३९ ).

कोंकणांतील व्यवहारांशींच पोर्तुगीझ युद्धाचा संबंध आहे. तेव्हां बाजीरावाच्या उत्तरेकडील मोहिमांस आरंभ करण्यापूर्वी कोंकणांतील व्यवहार संपविणें सोयीचें दिसल्यामुळें या वसईच्या प्रकरणाचीच हकीकत अगोदर देण्यांत येत आहे.

**१. भूगोलिक व राजकीय परिस्थिति.**—पश्चिम किनाऱ्यावरील कोंकणचा भाग शिवाजीच्या स्वराज्याचा केवळ पाया होता. गोब्राह्मणप्रतिपालनाचें ब्रीद धारण करून शिवाजीनें स्वधर्माची व स्वराज्याची स्थापना केली; आणि तेंच उद्देश तडीस नेण्याचें काम शाहूनें व त्याच्या पेशव्यांनीं हातीं घेतलें, हा प्रकार वारंवार स्पष्ट करण्यांत आलाच आहे. पोर्तुगीझ लोकनीं पश्चिम किनाऱ्यावर धर्मसंबंधांत कसा जुलूम चालविला होता, त्याचेंही वर्णन पूर्वी मराठी रियासतींत व ब्रिटिश रियासतींत ठिकठिकाणीं आलें आहे. सावंतवाडीकर भोसले, आंग्रे, प्रतिनिधि, कोल्हापुरचे अमात्य वगैरे अनेक सत्ताधीशांचा संबंध कोंकणाचे कारभारांत येत होता. ब्रह्मेंद्रस्वामीकडून सीदीचा व पोर्तुगीझांचा पाडाव करण्याविषयीं शाहूच्या व सरदारांच्या मागें कशी टोंचणी होती, हें सीदीच्या युद्धांत सांगितलेंच आहे. जंजिऱ्यावरील मोहिमेनें थोडाबहुत कार्यभाग झाला; त्या पुढचा कांहीं थोड्याबहुत अंशानें कार्यभाग चिमाजी आपानें स. १७३९ त

वसई काबीज करून सिद्धीस नेला. मराठशाहीच्या राज्यप्रकरणांत शौर्य, स्वराष्ट्र-प्रेम, संघशक्ति इत्यादि उदात्त गुणांचें निदर्शन करणारे जे कांहीं प्रसंग घडलेले आहेत, त्यांत वसईच्या युद्धाची प्रामुख्यानें गणना असून,त्याचीं वर्णनें पुष्कळांस अवगत असल्यामुळें येथें सर्व वृत्तान्त सायंत देण्याची जरुर नाहीं. रा. ब. पारसनिसांनीं ब्रह्मेंद्रस्वामीच्या चरित्रांत या युद्धाचें वर्णन विस्तारानें दिलें आहे.[1]

स. १७२५ ऑक्टोबर तारीख १९ पासून स. १७३२ च्या जानेवारी ता. २३ पर्यंत साल्दाना द गामा व स.१७३२ एप्रिल ता. २६ पासून स.१७४१ पावेतों पीड्रो मास्करीना कोंट ड सांडो मिल, हे दोघे हिंदुस्थानांतील पोर्तुगीझांचे मुख्य प्रतिनिधि होते. त्यांत पश्चिम किनाऱ्यावरील सर्व मोठमोठीं स्थळें हातचीं घालविण्याचें दुर्दैव दुसऱ्याचे बांट्यास आलें.[2]

या युद्धास वसईच्या संग्रामानें महत्त्व आलें असलें, तरी त्यांत अनेक निकराचे प्रसंग वडून आले,आणि ते कैक वर्षें चालू होते. खरें ह्मटलें तर स. १७३१तच मराठे पोर्तुगीझांचा वैरभाव सुरू झाला आणि तो स. १७४१ त संपला. परंतु स. १७३७ पावेतों त्याची तीव्रता अल्प प्रमाणावर असून, मधून मधून सलू-

---

१ आधार.—मुख्य का. सं. साष्टींची ब; पे. ब. खं. ४; खं. ६.१०१, १०२; का. सं. शा. म. ब.; तीन शकावल्या; पा. कृ. ब्र. स्वा. च. व पत्रें ले. ३७, ३९,४०,४७, ४९–५१, ५३, ५४, ५८, ११९, १२०; रा. खं. ३ ले. २७, १६७–१६९; का. सं प. या. ले. ४५,५५–५६ व ४३९, शेवटचें महत्त्वाचें; खरे कृ. ऐ. ले. सं भा. १ ले. १; ग्रँट् डफ्; डॉ कुन्हाचें ऑरिजिन ऑफ् बॉम्बे; फॉरेस्टचे निवडक कागद; डॅन्व्हर्सचा पोर्तुगीझ इतिहास व अंडरसनचें इंग्लिश; ठाणें गझेटियर; पे. द. पृ. १९६, इ.

२ या दरम्यान खालील इसम वसईस किल्लेदार असून त्यांजकडे साष्टी वगैरे प्रांताच्या बंदोबस्ताचें काम होतें:—लुई बोतेलो-ता. ८.५.१७३४ पासून; आंटोनियो कार्डिम २३-१-१७३७; पीड्रो ड मेलो मे १७३८, ठाण्याचे हल्ल्यांत मृत्यु ता. ८.१२.१७३८ रोजीं, सिल्व्हेरा मेनेझीस, नेमणूक ४.१२.१७३८, वसईचे हल्ल्यांत मृत्यु. डिसोझा परीरा, मे सन १७३९, यानें चिमाजीआपास शरण जाऊन तह केला.

खाचें बोलणें चालू होतें. स. १७३७ च्या मार्चांत मराठे लोकांनीं अचानक छापा घालून ठाण्याचा किल्ला काबीज केला, तेव्हां उभय पक्षांचें युद्ध निकरानें चालू झालें, आणि स. १७३७ ची एक व स. १७३९ ची दुसरी, अशा दोन दांडग्या मोहिमा होऊन साष्टीकडील सर्व प्रदेश हस्तगत झाल्यावर निकालाच्या तहानें प्रकरण मिटलें.

भूगोलिक परिस्थितीची फोड केल्याशिवाय पुढील मोहिमा व हालचाली समजणार नाहींत. विशेषतः पूर्वींचे जलमार्ग व पादपथ आगगाड्या, पूल वगैरेंनीं आतां सर्वस्वीं बदलून गेले आहेत. हल्लींच्या रियासर्तींत नवीन पूरण घातल्यानें बेटें व खाड्या यांचें पूर्वस्वरूप सर्वथा पालटून गेलें आहे. सबब चौलपासून दमणपर्यंतच्या जेवढ्या जल-भू-प्रदेशांत युद्ध चाललें, त्यांतील त्या वेळचीं बेटें, खाड्या, किल्ले, माऱ्याच्या जागा, व हमरस्ते दृष्टीसमोर असल्याशिवाय त्या वेळचीं वर्णनें चांगलीं समजत नाहींत. पश्चिम किनाऱ्याचा मोठासा नकाशा समोर ठेवल्यास कांहीं अल्प बोध होईल. अलीबागचा किल्ला कुलाबा व त्यापुढील खांदेरी व उंदेरी बेटें सोडून, उत्तरेकडे येऊं लागलें म्हणजे, मुंबईच्या जवळ अनेक लहान मोठीं बेटें लागतात. खाड्या व समुद्र यांच्या योगानें यांस बेटांचें स्वरूप आलें आहे. पहिलें मोठें बेट मुंबई. त्याच्या थेट पूर्वेस करंजें. करंजाचे उत्तरेस प्रथम लहानसें घारापुरी बेट लागतें, तें सोडून पुढें जातांना हल्लींचें ट्राँबे म्ह. तुरंबें बेट आहे. मुंबईस लागूनच उत्तरेस वांद्रा बेट होतें. वांद्र्याजवळून एक भली मोठी रुंद खाडी पूर्वेस जाऊन ठाण्याच्या खाडीस मिळते. ही ठाण्याची खाडी म्हणजेच मुंबईचें उत्कृष्ट बंदर होय. वांद्रें सोडल्यावर साष्टी बेट लागतें, त्यांत सासष्ट गांव असल्यामुळें त्यास साष्टी हें नांव पडलें. हें बेट दक्षिणेस चिंचोळें असून उत्तरेस रुंद व वसईच्या खाडीनें मर्यादित आहे. ही खाडी वसईपासून वर जाऊं लागल्यास थोडी बहुत वर्तुलाकार होऊन ठाण्यावर येते. ठाण्याचे उत्तरेस या खाडीला एक फांटा फुटून कल्याणावर जातो, तीच कल्याणची खाडी होय. ठाणें हेंच त्या वेळचें साष्टींतलें मुख्य ठिकाण. कल्याणचीच खाडी भिवंडीवर जाते; आणि खाडीच्या पलीकडे कांबें म्हणून ठिकाण लागतें. तुरंब्याच्या पूर्वेस पनवेल खाडीच्या मुखाशीं बेलापुर येथें नाक्यावर किल्ला होता. ठाण्याजवळ खाडीच्या पलीकडे अणजूर, कळवें वगैरे गांव असून, याच गांवच्या पाठारे नाइकांनीं पोर्तुगीझांच्या जुलमास कंटाळून पेशव्यांकडे दाद मागितली. वांद्र्या

पुढें पार्ल्याच्या पूर्वेस मरोळचें ठाणें त्या वेळीं मजबूद होतें. अंधेरीपासून वसई-पावेतोंच्या पश्चिम किनाऱ्यानें लहान मोठीं अनेक बेटें आहेत. गोरेगांवच्या पश्चिमेस वेसाव्याचा किल्ला होता. त्याचे पुढें मालाड. मालाडचे इनामदार सरदेसाई अंताजी रघुनाथ व रामचंद्र रघुनाथ या दोघां बंधूंनीं पोर्तुगीझांविरुद्ध बाजीराव व चिमाजी आपाकडे अतिशय खटपट केली. बोरिवलीच्या पश्चिमेस व वसईच्या तोंडाशीं समोर एक लांब चिंचोळें बेट असून त्यांत धारावी हें तटबंदीचें स्थळ होतें. खाडीच्या उत्तर टोंकावर वसई आहे. खाडीपासून पलीकडे वसई तालुका व त्याचे पुढें माहीम, डाहाणु व उंबरगांव हे हल्लींचे तालुके अनुक्रमें लागतात. वसईच्या उत्तरेस किनाऱ्यावर आगाशी हें गांव असून, त्याचे शेजारीं आरनाळा किल्ला आहे. त्यापुढें किनाऱ्यानेंच उत्तरेस गेल्यावर माहीम व केळवें हीं दोन ठिकाणें व त्यांच्या पूर्वेस आंत तांदुळवाडी व ईशान्येस मनोर व अशेरगड हे किल्ले त्या वेळीं मजबूद होते. आणखी किनाऱ्यानें उत्तरेस गेल्यावर शिरगांव, तारापुर व चिंचणी हीं बंदरें लागतात. त्यांचेपुढें डाहाणु व उंबरगांव हीं दोन बंदरें, उंबरगांव खाडीचे उत्तरभागीं नारगोळें व खतलवाड हे गांव, वसईच्या युद्धांत ध्यानांत ठेवावे लागतात. त्याचे पुढें दमण बंदर हें अद्यापि पोर्तुगीझांचेच ताब्यांत आहे. वसईच्या पूर्वभागीं कामणगड व त्याचे नजीकच राजावळी, गोखरवें, आचोळें, चिंचोटी, टकमक, मांडवी या गांवांचा उल्लेख ठिकठिकाणीं येतो. वसईजवळच खाडीवर दक्षिण बाजूस घोडबंदर म्हणून ठिकाण आहे. त्या वेळच्या हकीकती वाचतांना वरील स्थळें मुख्यतः प्रसंगानुरोधानें येतात.

तीन वर्षांच्या या युद्धांत अनेक लढाया होऊन सगळाच प्रांत मराठ्यांनीं जिंकिला. त्या सर्वांत ठाणें, माहीम, तारापुर व वसई येथील संग्राम केवळ घनघोर झाले. मराठ्यांचे सर्व मोठे सरदार दुसऱ्या मोहिमेंत सामील असून, त्यांनीं व त्यांच्या हाताखालील शिपायांनीं केलेल्या मर्दुमकी वाचून मराठ्यांच्या शौर्याचें व धाडसाचें सप्रेम कौतुक वाटूं लागतें. वास्तविक या युद्धाची निराळी हकीकत लिहिण्याऐवजीं त्या वेळचीं पत्रें व तेवढीं वाचलीं म्हणजे पुरे आहेत. सर्व स्वारी नेटानें सिद्धीस नेण्याचें श्रेय चिमाजीआपाकडे असून, 'निदान माझें धड तरी तोफेच्या गोळ्यानें वसईच्या किल्ल्यांत उडवून द्या,' हे त्याचे निर्वाणीचे शब्द आख्यायिकेंत सांगतात ते वस्तुस्थितीचे निदर्शक समजावे. एक ठाण्यावर व एक वसईंत असे पोर्तुगीझांचे दोन मोठे सेनापति या युद्धांत मारले गेले.

**२. युद्धाचीं कारणें.**—गंगाजी नाईक अणजूरकर हा या युद्धाचा उत्पादक आहे. त्यानें नानातऱ्हेची खटपट व साह्य करून साष्टींतील पुढारी लोकांस मराठ्यांचे बाजूस वळवून आणिलें. सन १७२०त रामचंद्र महादेव जोशी चासकर, बाजीराव पेशव्याचा मेहुणा, यानें कल्याण प्रांत जिंकून तेथें पेशव्यांचें ठाणें बसविलें. गंगाजी व त्याचे साथीदार यांनीं माऱ्याच्या जागा व गुप्त वाटा वगैरे पेशव्यांचे लोकांस चांगल्या दाखवून दिल्या. पुढें मालाडचा जमीनदार अंताजी रघुनाथ कावळे या खटपटात सामील झाला. त्याचा व बाजीरावाचा पत्रव्यवहार झालेला उपलब्ध आहे.

**अंताजी रघुनाथ** हा मालाड येथील सरदेसाई व इनामदार असून तो मोठा शूर, तसाच धर्मशील व हिंदुधर्माचा कट्टा अभिमानी होता. साष्टी प्रांतांत हिंदूंनीं आपलीं धर्मकृत्यें प्रगिद्धपणें करूं नयेत, असा फिरंग्यांनीं हुकूम काढिला होता. अंताजी रघुनाथानें हा हुकूम आपल्या प्रांतांत अमलांत न आणितां, इतरांसही तो तोडण्यास उत्तेजन दिलें; आणि या जुलुमासंबंधानें बाजीरावाकडे फिर्याद नेली. त्यावरून फिरंग्यांनीं अंताजी रघुनाथाचें इनाम जप्त केलें, आणि त्यास पकडून गोव्याच्या धर्मशासना ( इन्क्विझिशन ) पुढें नेण्याचा हुकूम केला. अंताजीनें पुण्यास पळून जाऊन घडलेला वृत्तान्त बाजीरावास कळविला. तेथें वाटाघाट होऊन स. १७३१ च्या सुमारास पेशव्यांनीं छापा घालून ठाण्याचा किल्ला फिरंग्यांपासून घेण्याचा पहिल्यानें प्रयत्न केला; परंतु तो सफल झाला नाहीं. या प्रसंगा इंग्रजांनीं फिरंग्यांच्या मदतीस ३०० लोक पाठविले होते नंतर अंताजी मुंबईस येऊन राहिला. त्याच्या खटपटीनें कोंकणची मसलत कैक वर्षे चालू होती. शाहूच्या दरबारा याचा खल झाला; आणि पिलाजी जाधव व कृष्णराव महादेव जोशी यांस बाजीरावानें कोंकणांत रवाना केलें. स. १७३० त रामचंद्र महादेव मरण पावला, तेव्हां त्याचा भाऊ कृष्णराव यास कल्याणची सुभेदारी मिळाली. पिलाजी जाधव व कृष्णराव यांनीं गंगाजी नाईक व कृष्णाजी रघुनाथ यांच्या मदतीनें भिवंडीच्या खाडीपलीकडे कांबें म्हणून ठिकाण होतें, तेथें पोर्तुगीझांशीं झुंजून त्यांचा पराभव केला. सन १७३१ त मनोर येथें मराठ्यांना पोर्तुगीझांस पुनः जिंकिलें. तेव्हां पुढें कांहीं दिवस युद्ध थांबून तहाचें बोलणें चाललें. तथापि पोर्तुगीझांचा तहाचा प्रयत्न केवळ तात्पुरता असून,

बाजीरावाची चढती कळा पाहून मराठ्यांशीं जोराचा झगडा करण्याची त्यांनीं तयारी चालविली. नवीन जहाजें वगैरे बांधिलीं; लोकांवर जास्त कर बसवून जुलूम केले. स. १७३४ त त्यांनीं ठाण्यास मोठा कोट बांधण्यास सुरुवात केली. वर्ष सहा महिन्यांत तें काम संपविण्याचा त्यांचा विचार होता, परंतु स. १७३७ पावेतों ही कोट सर्व पुरा झाला नाहीं. इकडे त्यांना हिंदूंचा छळ निकरानें सुरू केल्यानें साष्टींतील लोक बरोबर मराठ्यांस सामील होऊं लागले. त्यांनीं हिंदूंचा केलेला छळ हेंच पुढील युद्धाचें कारण होय.

नंतर ता. २ मे १७३ रोजीं बाजीरावानें मुंबईच्या गव्हर्नर जॉन हॉर्न यास पत्र लिहिलें, आणि अंताजी रघुनाथाचें इनाम जें फिरंग्यांनीं अन्यायानें जप्त केलें त्याची चौकशी करून तें परत देवविण्याची तजवीज करा, असें सांगितलें. आम्हांस या प्रकरणांत पडतां येत नाहीं, असा मुंबईचे गव्हर्नरानें बाजीरावास जबाब पाठविला. यानंतर बाजीराव व अंताजी हे फिरंग्यांवर स्वारी करण्याच्या खटपटीस लागले. बाजीरावानें ता. २७ मे १७३४ रोजीं अंताजीस लिहिलें कीं, ' तुम्हीं लिहिला मनसुबा बहुत उत्तम. तरी तुम्हीं बहुत बहुत जलदीनें पळाचाही विलंब न लावतां हुजूर येणें. विचार करून टाकोटाक तेच क्षणीं तुमची रवानगी करूं. ' चिमाजीआप्पा एका पत्रांत अंताजीस लिहितो, ' तुम्ही फिरंगी यांचे परम शत्रु आहां हें फिरंग्यांस फारच असह्य. यास्तव त्यांचे हद्दीपासून चार पांच कोसांवर दूर राहणें. बेलापुरचें राजकारणही राखून ठेवणें.' ता. २३·१·१७३५ रोजीं बाजीराव लिहितो, ' अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री अंताजी रघुनाथ गोसावी यांसी, सेवक बाजीराव बल्लाळ प्रधान नमस्कार. सु. खमस सल्लासीन मया व आलफ. तुम्हीं पत्र पाठविलें तें पावलें. कार्याचा मजकूर व सेनासमुदाय पाहिजे, त्याचा अर्थ विस्तारें लिहिला तो कळला; व कित्येक अर्थ राजश्री केशव लिंगोजी यांनीं विदित केला. ऐशियास कार्य करावें हें अत्यावश्यकच आहे. जागां जागां जमाव गुंतला आहे, तो मोकळा करून आणावयास पौर्णिमेची संधि अनुकूल पडत नाहीं. या करितां जमाव करून अमावास्येस कार्यभाग निश्चयरूप ठरावाच. जमाव व फौज तयार करीत असों. तुम्ही लागभाग, वाटा तिटा, हलेलागे, दोरेसोरे, राजश्री वासुदेव जोशी यांचे निदर्शनास आणून देणें. अतःपर कार्यकर्तव्यच, दुसरा विचार नाहीं.'

अंताजीच्या खटपटीस मदत ह्मणून बाजीरावानें लिहिलेलीं पत्रें स. १७३५ चीं ता. २३·५·१९०५ च्या केसरींत व खं. ६·१०१–१०२ चीं पाहवीं.

इतक्यांत आंगऱ्यांचे कुटुंबांत कलह लागून मानाजी व संभाजी यांचें युद्ध जुंपलें. त्यांत पेशव्यांनीं मानाजीचा पक्ष धरून संभाजीनें पोर्तुगीझांची मदत घेतली. बाजीरावानें खंडोजी माणकर खरवलीकर व शंकराजी केशव फडके यांस मानाजीच्या मदतीस पाठविलें. गंगाजी नायकाप्रमाणेंच या दोघांचा संबंध साष्टीच्या युद्धाशीं विशेष आहे.

३. **पहिली मोहीम, ठाणें व साष्टी काबीज** (मार्च-जून १७३७).—संभाजी आंगऱ्यास मदत करून पोर्तुगीझांनीं मानाजीचा पाडाव आरंभिला, येणेंकरून गंगाजी नाईक व अंताजी रघुनाथ यांच्या खटपटीस पुण्याचे दरबारीं जोर आला. स. १७३४ पासून ठाण्याचा कोट पोर्तुगीझ बांधीत होते. तें काम अलीकडे त्यांनीं नेटानें पुरें करण्याचा उद्योग आरंभिला. सबब कोट पुरा होण्यापूर्वींच ठाण्यावर स्वारी करून साष्टी बेट जिंकून घ्यावें असा बेत बाजीरावानें ठरविला, आणि स. १७३७ च्या उन्हाळ्यांत ही मोहीम करावी असें बापूजी श्रीपत, वासुदेव जोशी व मोरशेट यांच्या सल्ल्यानें चिमाजीनें ठरविलें; तयारी करण्यास शंकराजी केशव फडके यास हुकूम केला, आणि पुण्यास भवानीचा गोंधळ घालून तेथें लोक जमवून निरनिराळीं कामें त्यांस वांटून दिलीं. शंकराजीपंत मुख्य, गंगाजी नाईक वसईकडे, खंडोजी माणकर साष्टीकडे, असे सरदार नेमण्यांत आले. पुढें रामचंद्र हरि पटवर्धन व रामचंद्र महादेव बिवलकर व खंडोजी माणकर यांनीं एक हजार लोक कल्याणास जमविले. त्यांस नारायण जोशी, रामचंद्र जोशी, अंताजी रघुनाथ वगैरे आणखी आपापल्या लोकांसह सामील झाले. या सर्वांनीं रात्रीचे गुप्त छापे घालून ता. २७ मार्च १७३७ रोजीं ठाण्याचा किल्ला काबीज केला. चिमाजी आपानें बदलापुरचे मुक्कामीं ठाण्याच्या तोफा ऐकिल्या. लगेच धांवत येऊन पाहतां सर्व लोकांनीं खाडीपलीकडे जाऊन बुरूज काबीज केल्याचें वर्तमान त्यास समजलें. त्यावरून त्या बुरुजाचें नांव फत्तेबुरूज असें ठेविलें. नंतर शंकराजी केशव, मोरोजी शिंदे, चिमणाजी भिवराव वगैरे सरदार चिमाजी आपास येऊन मिळाले, आणि चिमाजीनें साष्टींत

प्रवेश केला. नारायण जोशी यानें पारसिक घेतलें व बेलापुरास मोर्चे लाविले. नारायणजी व गोपाळजी नाइकांनीं धारावीचें ठिकाण हस्तगत केलें. नंतर वसईला मोर्चे लावून तो किल्ला हस्तगत करावा असा विचार चालला; परंतु तो बेत सोडून उत्तरेस आगाशीजवळ वैतरणेच्या मुखाजवळ आरनाळ्याचा[१] किल्ला आहे, तो अंताजी रघुनाथाच्या सूचनेवरून शंकराजी केशव, चिमणाजी भीवराव व गंगाजी नाईक यांनी काबीज केला. इतक्यांत इकडे मांडवी ( वसई तालुक्यांत ), तांदुळवाडी, टकमक, वेसावें, काळदुर्ग ( ता. माहीम ), मनोर व बेलापुर इतकीं ठिकाणें पहिलेच वर्षी साष्टीबरोबर मराठ्यांकडे आलीं. वसईवरही हल्ला चढविला असता तर तेंही ठिकाण अनायासें या वेळीं त्यांच्या हस्तगत झालें असतें, वसईचा बंदोबस्त त्या वेळीं कांहींच नव्हता, असें पोर्तुगीझांच्या लेखांत आहे. परंतु वसईच्या आंतील स्थितीचा अंदाज मराठ्यांस मुळींच न लागल्यामुळें त्यांनीं तो प्रयत्न या वेळीं केला नाहीं. पर्जन्यकाळ आला, तेव्हां शंकराजीपंत मोरोजी शिंदे व गंगाजी नाईक यांस वसईवर, खंडोजी माणकर, रामाजीपंत, यांस ठाण्यास, नारायण जोशी यास बेलापुरास व विठ्ठलपंतास ( विठ्ठल शिवदेवास? ) मनोर येथें, याप्रमाणें बंदोबस्तास मंडळी ठेवून चिमाजी ता. १ जुलै १७३७ रोजीं पुण्यास आला.

पावसाळ्यांतच वसईवर चढण्याचा शंकराजीपंत व गंगाजी नाईक यांनीं उद्योग केला. बाजी भीवराव व रामचंद्र हरि पुण्याहून आले. परंतु तो प्रयत्न सिद्धीस गेला नाहीं. त्यानंतर सुमारें दीड वर्षपावेतों कोंकणच्या कार्यभागाकडे मराठ्यांस जोरानें लक्ष घालतां आलें नाहीं. स. १७३७ च्या अखेरीस व पुढील वर्षाच्या आरंभीं पोर्तुगीझांनीं ज्यास्त तयारी करून मराठ्यांशीं झुंज आरंभिलें. केळवे माहिमास शंकराजी केशव फडके होता, त्यानें तीं ठिकाणें सोडून सुद्धां दिलीं, हें वर्तमान बाजीरावास समजतांच त्यास फडक्याच्या नामर्दपणाचा त्वेष

---

१ ता. २३-५-१७३७ रोजीं हा जंजिरा किल्ला बाजीरावानें फिरून बांधिला, त्याविषयीं दगडावर लेख कोरलेला आहे तो असाः—बाजीराव अमात्य मुख्य सुमतीं आज्ञापिलें शंकरा । पाश्चात्यांस वधूनि सिंधुउदरीं बांधा त्वरें जंजिरा ॥ अर्नाळा जलदुर्ग चिंतुनि मनीं बाजी तुळाजी सुता । शिल्पज्ञें दृढ शौर्य जाणुनि तया दुर्गासि संस्थापिता ॥ वा. इ. वृ. १८३८ पृ. १२९.

आला, आणि रामचंद्र हरि पटवर्धन यास फौज देऊन त्यानें कोंकणांत पाठविलें. यासंबंधानें ता. ९ नोव्हेंबर स. १७३७ रोजीं बाजीरावानें रामचंद्र हरीस लिहिलें कीं, ' फिरंग्यांचें आरमार खांदेरीच्या वाऱ्यावर आलें ही खबर अणजूरकरांनीं शंकराजी केशव यांस लिहिली. त्यावरून त्यांनीं सलावत खाऊन, केळवें माहीम येथील लोक उठवून माघारे नेले, गनीमाची सलाबत वाढविली. [illegible] वसई, आरनाळा आदिकरून लोकांचें सामान जसें तसें नाहीं नामांकित माणूस किती! आणि गनीमाची सलाबत खातात! यावरून त्यांचे व त्यांजवळील लोकांचे सदुभावाची [illegible] काय करावी! असो न व्हावें तें जालें. अतःपर गनीमाचें [illegible] ठेवून केळवें माहीम स्थळें जबरदस्तीनें घ्यावीं, परंतु त्या लोकांची न सरदारांची [illegible]. [illegible] खाऊन [illegible]. तुम्हांस रवाना करावें तें जाणून रवाना केलें. साडे बत्तीससें माणूस केळवें माहीमच्या कार्यभागास तुम्हांकडे नेमिलें आहे. सरदारही [illegible] रवाना केले आहेत. रा. महादाजी केशव यांनीं शंकराजीपंताजवळ जावें. वरकड सरदारांनीं तुमचे आज्ञेप्रमाणें चालावें, ऐसें कित्येक शंकराजी केशव यांस फर्जात करून लिहिलें आहे. तरी तुम्ही सदरहू साडेबत्तीससें माणसांनिशीं लगट करून केळवेंमाहीम हस्तगत करणें. झुंज भांडणाचे प्रसंगीं कित्येक माणूस सलावत खाऊन पळून जातात, ऐशास लाखों खर्चून लोकांस द्यावे आणि प्रसंगीं पळ काढतील त्या पाजींचा मुलाहिजा काय! साहेबकाम करतील त्यांचें ऊर्जित करीतच आहों. ज्या ज्या वाटा पळून जावयाच्या आहेत तेथें चौक्या ठेवून पळतील त्यांस धरून परिच्छिन्न डोचकीं मारणें. सरदार प्यादा न ह्मणणें. विना एखाद दुसरा सरदार, अगर परदेशी कानडे मारल्याविना माणूस भय धरून वर्तणार नाहीं. यास्तव हेच परवानगी जाणून पळ्यांचें पारपत्य करणें. फिरंग्यांच्या लोकांनीं वारें घेतलें आहे. तुम्हांवरही तोंड टाकतील. त्यांस जपून एक वेळ कापून काढणें, म्हणजे बलखुद राहतील. जाणिजे.'

**४. दुसरी मोहीम, (स. १७३८ नोव्हेंबर—जून, १७३९ ).**—तथापि एवढ्या तयारीनें काम भागलें नाहीं. स. १७३८ त मराठ्यांनां विशेष पराक्रम केल्याचें आढळत नाहीं. यावरून त्या सालीं पोर्तुगीझांचीच बहुतेक सरशी होती. शिवाय त्या वेळीं सर्व सरदार व मराठ्यांच्या फौजा भोपाळचे मोहिमेंत निजा-

मावर गुंतल्या होत्या. सन १७३८ च्या पावसाळ्यांत बाजीराव साताऱ्यास आल्यावर पोर्तुगीझांवर जंगी मोहीम करण्याचें सर्वानुमतें ठरून मोठमोठे सरदार तिकडे पाठविण्यांत आले, आणि पावसाळा संपल्यावर १७३८ च्या नोव्हेंबरांत जोराची मोहीम सुरू झाली. या मोहिमेचें आधिपत्य चिमाजीआप्पानें स्वीकारिलें, आणि सहा महिने सारखा फिरत राहून, आणि लोकांकडून व्यवस्थित कामें घेऊन, मोठ्या नेटानें व निश्चयानें त्यानें हें काम शेवटास नेलें. दमणपासून तों दीवपावेतों तमाम किनाऱ्यावर व मध्यभागीं निरनिराळ्या नाक्यांवर फौजा ठेवून जेथें शत्रु असतील, तेथें त्यांचा नाश करावयाचा उद्योग चिमाजीनें केला. सर्वांवर नजर ठेवीत तो ठिकठिकाणीं स्वतः फिरत होता. तिकडे याच वेळेस गोमांतक बाजूकडून फिरंग्यांकडून रसद व कुमक वसईस जात होती, ते बंद करावयाकारितां इचलकरंजीकर व्यंकटराव घोरपडे यांस पाठविलें. त्यांनीं सरकार आज्ञेप्रमाणें चाकरी केली. घोरपडे याची स्वारी गेली, तेणेंकरून पोर्तुगीझांचा अगदीं नाइलाज झाला आणि वसईकडे त्यांस मदत पाठवितां आली नाहीं.

**माहीमचा घोर संग्राम.**—प्रथम माहीमवर मोहीम सुरू झाली. तेथील हल्ल्यांत ज्या मर्दुमकी मराठ्यांनीं गाजविल्या, त्यांचें वर्णन ता. १३ डिसेंबर १७३८ च्या पत्रांत वासुदेव जोशी व रघुनाथ हरी यांनीं चिमाजीआपास लिहिलेलें आहे तें असें. 'रामचंद्र हरि व महादाजी केशव यांनीं माहिमास मोर्चे लाविले होते. गनीम इंग्रज, फिरंगी, व हबशी ऐसे एकत्र होऊन दोन तीन दिवसांत शंभर गलबतें भरून, दक्षिणेकडे केळवें अंग मोकळें होतें, तिकडून गनीम कोटामध्यें जात. त्यास केळव्याकडील तर्फेस सात आठशें माणूस घेऊन ता. १० रोजीं रामचंद्रपंत चालोन गेले. गनीमाचे २५।३० माणूस मारिले. इकडील एक राऊत पडला, एक दोन घोडीं जखमी झालीं. त्याउपरी काल गनीमानें संधि पाहून दीड दोन हजार माणूस मोर्च्यांवर चालून घेतलें एकच वेळेस तिहीं मोर्च्यांवर हल्ला केला. कोटावरून तोफांचा मार जबरदस्त केला. मोर्चे जळावयास लागले. लोकांस बाहेर निघोन हत्यार करावयास जागा नाहीं. तेव्हां रामचंद्रपंत, अमरसिंग शिर्के वगैरे दहा पंधरा राउतांनीं घोडीं घालून गनीमाचे दहा पंधरा माणूस मारिले. रामचंद्रपंतांनीं खुद्द दोघे ठार केले आणि गनीम फिरविला. ते समयीं रामचंद्रपंताचे उजव्या हातास गोळी लागली. हातची

तलवार सुटून गुडघ्यास लागली आहे. ऐसें होतांच मशारनिल्हे फिरले, त्याबरोबर गनीमानें मोर्चे काबीज केले. आमचे लोकांचा धीर सुटोन निघाले. महादाजी केशव, वाघोजी खानवीलकर, राजबाराव बुरोडकर, चिंतो शिवदेव, जनार्दन हरि व गणेश हरि कारकून दि॥ महादाजी केशव, व धोंडोपंत, विठ्ठल शिवदेव याचा भाचेजांवई, वगैरे लोक मोर्चांत होते, त्यांस निघावयास फुरसत न होऊन तेथेंच झुंजोन कामास आले. अजमासें दोनशें माणूस कामास आलें व जखमी शंभरापर्यंत.' बाजीरावाची निर्भर्त्सना सहन न होऊन लढनांना ही मंडळी कामास आली. 'लोकांनीं धीर सोडला आहे, गनीम हांवभरू झाला आहे, ऐसें असोन अवघ्यांस दील दिलासा देऊन, मोर्चे कायम करून, गनीमास बरासा नतीजा द्यावा, हे उमेद धरोन राहिलों आहों. अर्नाळा व बहादरपुर येथील खबरदारी शंकराजी केशवास, धारावी ठाण्याची खंडोजी माणकरास, अशेरीची दत्ताजी मोरेश्वरास, बेलापुरची नारायण जोशी यास, व कल्याणभिंवडीची बरवोजी तापकीर यास, येणेंप्रमाणें खबरदारी घेण्यास सत्वर लिहून पाठविणें. जागोजाग आपले लोकांनीं दहशत खादली आहे, त्यास स्वामींकडून उपराळा जाल्याविना लोकांस अवसान चढोन गनीमास नतीजा पोंचत नाहीं. तरी स्वामींनीं सहस्र कामें टाकून जरूर जाणोन राऊत पाठवून तेथील स्थलांचा उपराळा होय ते गोष्ट केली पाहिजे. दमण प्रांतीं आजपर्यंत आमची स्वारी गेली नाहीं, तरी त्या प्रांतीं स्वारी पाठवून, मुलूख मारून ताराज करून गुरें ढोरें कुळें बाळें धरून आणावीं, तेणेंकरून शह बसोन गनीमाचा ओढा तिकडे पडेल. इतक्या गोष्टी स्वामींचें येणें नासिक प्रांतीं जालिया होतील. सबब अगत्य नासिक प्रांतीं आलें पाहिजे. मुलकाचा सत्यानाश दमण प्रांतीं करावा. एखादे जागां गनीम गांठून कापून काढावा, ह्मणजे आपली सलाबत वाढेल. ही विज्ञापना' पुढें त्याच महिन्यांत माहीम काबीज झालें.

हें पत्र चिमाजीस खानदेशांत पोंचलें. त्यावरून बाजीरावास सोडून चिमाजी ताबडतोब साष्टींत उतरला त्यापूर्वीच होळकर, शिंदे वगैरे मोठमोठ्या सरदारांस त्यानें कोकणांत पाठविलें होतें. इकडे वासुदेव जोशी माहिमास वरील पत्र लिहीत असतांच जनरल पेड्रो मेलो यानें ता. ६-१२-१७३८ रोजीं ठाण्यावर अचानक हल्ला केला. त्या वेळीं मल्हारराव होळकर तेथें होता. हल्ला यशस्वी न होतां स्वतःच

पेड्रो मेलो मारला गेला. तेणेंकरून कच खाऊन पोर्तुगीझ वसईस माघारे गेले. तेथें जनरल मेनेझीसनें पोर्तुगीझ फौजेचें आधिपत्य धारण केलें, आणि त्याच संधीस मराठ्यांची नवीन फौज जंगी तयारीनें कोकणांत घुसल्यानें, पोर्तुगीझांचा धीर सुटला; आणि चौल, वसई व दमण, एवढ्यांचा बचाव करून बाकीचीं ठिकाणें सोडून देण्याचा त्यांनीं निश्चय केला. परंतु सोडून देण्याची गोष्टच नव्हती. मराठ्यांनीं ताबडतोब सर्व ठिकाणें लढून काबीज केलीं. मराठ्यांचे बहुतेक नामांकित सरदार या वेळीं युद्धास आले होते.

**तारापुरचा हल्ला.**—जानेवारीच्या १५ तारखेनंतर संग्राम सर्वत्र सुरू झाला. दोन आठवड्यांचे आंत माहीम, केळवें, शिरगांव, तारापुर, डाहाणू, नारगोळ, खतलवाड व अशेरी हीं ठिकाणें मराठ्यांनीं काबीज केलीं. तारापुरचा संग्राम फार शिताफीचा झाला. त्याचें वर्णन चिमाजीनें ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलें आहे.' चार पांच सुरुंग मल्हाररावाकडून तयार झाले. तसेच हुजरातच्या सुरुंगाचे तीन फांटे एकाचे एक कुसाखालीं नेले. तसेंच यशवंतराव पवार यांजकडील एक तयार झाला. राणबाकडील तयार झाला नाहीं. सारे लष्करचे लहान थोर माणूस रात्रीचेच खाडीतून उतरोन मोर्च्याचे पाठीमागें जमा बसविले होते. सुरुंग एकामागें एक अंतर करून उडाले. सरकारच्या सुरुंगांचें खिंडारें मोठें पडलें, उजव्या हाताकडे दुसरीं थोडीं बहुत खिंडारें पडलीं. त्याच्या उजवीकडे हबशांच्या लोकांनीं कोटासच शिडी टेंकून वरते चढले. पुढें धारकरी होता तो वर चढल्यावर, बरी गोळी लागून खालीं भुईवर पडला. त्याचेमागें दुसरा चढला, तोही पडला. फिरोन लोकांनीं लगट करून वरती चढले. मारामारीची शर्थ केली. हुजरातचे निशाणाजवळ बाजी भीवराव व रामचंद्र हरि होते ते व सारे नामांकित लोक तितके बरे वजेनें चालोन गेले. गुतेकर व बाळोजी चंद्रराव होते. उजवेकडे मल्हाररावाचीं व राणोजी भोसल्याचीं निशाणें होतीं. त्यांणींही शर्थ करावयाची तैसी केली. खंदक सात आठ हात खोल व सात आठ हात रुंद होता. तो खंदक उतरोन कोटावरी चढावयासी बहुतां प्रकारची अडचण होती. शेवट पावेतों फिरंगी यांनीं हिंमत सोडिली नाहीं. तोफांचा व बरकंदाजांचा मार सिमेपरता. खाडीमध्यें माडी आहे तेथें आम्ही होतों. मल्हाररावाचे पायास कैरट झाल्यामुळें तेही एकटे आम्हांपाशीं होते. सारें झुंज नजरेस पडलें. आमच्या व मल्हारबाच्या

लोकांमध्यें आंगरे यांचेही लोक होते. राणोजी भोसले यांणीं बरे बजेनें बांकोन घेतलें. बाजी भीवराव यांणींही सीसेपरतें निशाण चालविलें. त्याचे मर्दुमीची सीमा लिहावी ऐसें नाहीं. गुजरातच्या मोर्च्यांच्या डाव्या हातें गोविंद हरि होते त्यांनी [illegible]. त्यांचे पलीकडे यशवंतराव होते. त्यापलीकडे तुकोजी पवार, [illegible] नायक, [illegible], माणूसही सामपरतें जायां झालें. स्वामीचा पुण्यप्रताप थोर, तेणेंकरून जागा फत्ते झाली असे. [illegible] युद्धांत बाजी भीवराव ता. ८·१·३९ रोजीं तोफेचा गोळी लागून पडला, त्यासंबंधानें सांत्वनाचें पत्र बाजीरावानें [illegible] लिहिलेलें वाचण्यालायक आहे. येणेंप्रमाणें १७३९ च्या जानेवारींत [illegible] माहिम, तारापूर, डहाणू व शिरगाव हीं स्थळें हस्तगत झालीं.

[illegible] वसईच्या [illegible], ता. १[illegible] मे १७३९ ).--इतर ठिकाणीं [illegible] चालू असतांना चिमाजी आपानें वसईवर हल्ला चढविला. माघ शु १० पासून वैशाख शु. [illegible] पावेतो तीन महिने वसईचा संग्राम चालून शेवटीं अत्यंत दीर्घ प्रयासानें ता. १३ मे १७३९ रोजीं किल्ला मराठ्यांचे कबजांत आला. दुसरीं ठिकाणें कारबाज होतांच निकडील मराठ्यांची फौज वसईच्या हल्ल्याचे मदतीस आली. फेब्रुवारीमार्चांत वांद्रा, वेसावें व धारावी, हीं स्थळें खंडोजी माणक वगैरेनीं हस्तगत केलीं. संग्रामाच्या अनेक हकीकती उपलब्ध आहेत. साष्टीची व इतर बखरी यांतून हकीकती आहेत.परंतु सर्वांत चिमाजी आपाचीं पत्रें सरस व प्रत्यक्ष माहितीचीं असून तीं राजवाडे खं. ३ ले. २७ व ब्र. च. ले ५२ चीं व का. सं. प. या. ले. ४३९ वाचण्यालायक आहेत. वसईच्या संग्रामाचें वर्णन कोणी तरी लिहिलेलें बाणेदार आहे तें असें:—

'त्यांत बुदले भरून छ३सफरीं (१-५·१७३९)कुल अवघी सिद्धता करून,लोकांस सुरुंग उडतांच हल्ला करण्याविशीं ताकीद केली. छ ४रोजीं सुरुंगास बत्या दिल्या. राजश्री राणबाकडील पांच सुरुंग उडाले, त्यांत चार उडाले, एक उडावयाचा होता, तोंच लोकांनीं तांतड करून हल्ला केला. तों पांचवा सुरुंग उडाला. तेणें करून लोक बहुत करून दगडांनीं दडपले. तैसेच हल्लेस हशमाचे लोक चढले होते तेही उडाले, व फिरंगी यानें हुक्के व गरनाळा, दारूचीं मडकीं, बरखंदाजी, रंजगिरी येणेंप्रमाणें अतिशय मार दिला. यामुळें ते दिवशीं लोक चकमोहरे जाले. काम कारेगार जालें नाहीं. दुसरे दिवशीं दोन सुरुंग उडतां राहिले होते त्यांचा

शोध करून, बत्या ठीक करून, साऱ्या लोकांची निवड करून, हल्लेविशीं ताकीद केली; आणि सुरुंगास बत्ती दिली. त्यानें निम्मे बुरूज उडाला. लोकांनीं जीवित्वाकडे दृष्टि न देतां चालोन गेले. फिरंगी यांणीं आंतून मेढा घालून बळ धरिलें होतें. हल्ला करितांच हुक्के व गरनाळा, दारूचीं मडकीं, राळ, माशांचें, तेल, बरखंदाजी, ऐसा सीमेपरता मार दिला. परंतु लोकांनीं, मेला तो मेला, जळाला तो जळाला, त्याजवर दृष्टि न देतां ज्या जागीं गेले त्या जागांच कायम राहून फिरंगी यांसही मार दिला. त्यांनीं तों जे जे जागां खिंडारें पडलीं होतीं त्या जागां, दारूचीं मडकीं व राळ टाकून होमच मांडिले. तैसेंच लोकांनीं सोसून कायम राहिले. फिरंगी यांणीं तों हिमतीची व मर्दुमीची सीमा केली. तथापि बाहेरील मार बहुत जाला. आंतील चांगलेंच माणूस रेणोळ व ढोणे व मोठे मोठे फिरंगी मेले. त्यामुळें व बाहेरील मारामुळें बेऔसान होऊन, कौल मागावयास माणूस पाठविलें, त्याजवरून कौल देऊन त्यांजकडील तिघे भले माणूस आणिले. त्यांजपाशीं करार करून तहनामा देऊन आंत पाठविलें. हत्यार व कबिले सामान सुद्धां सोडावे ऐसा करार केला. सहा दिवसांची मुदत दिली. जागाजागीं गलबतें आणावयास माणसें पाठविलीं आहेत व जमाही झालीं आहेत. सत्वर जाऊन किल्ल्यावर निशाण चढेल ऐसें विस्तारें वृत्त लिहिलें. श्रवणें बहुत आनंद झाला. त्याचा विस्तार लिहितां विस्तार आहे. वसई ( ह्मणजे तेथें ) एक्या तोंडानें झुंजावें. कोट बिलंद, गची रुंद, मोर्चा अथवा सुरुंग चालवीन ह्मटल्यास पाणी लागतें. फिरंगीयांसारखे झुंजणार, असें असोन अप्रतिम तूर्तद करून उघडे सुरुंग चालविले. त्यांनीं ही प्रत्योपकार यथाविधि केला, तथापि स्वामींचें पुण्य व पराक्रम अप्रतिम. तन्मूलें त्यांजवर सलाबत बसून ईश्वरावर तवकल केली. दक्षिणची फौज ह्मणजे मऊ लागलें बेजरब घेणार, कठीण लागलें ह्मणजे फिरोन पाहणें नाहीं. ऐसी पूर्वापार या राज्यांतील तऱ्हा. ऐसें कर्म सरदारांस जालें नाहीं, पुढेंही होणें नाहीं. स्वामी केवळ ईश्वरी अवतार, तन्मूलें या फौजेस या हिंमती जाहल्या. ज्या प्रकारें वानरांकरवीं लंका घेवविली, त्या प्रकारें हे गोष्ट जाली. दक्षिणी फौजेस उपाय करून व छातीचा कोट करून झुजावें, हे हिंमत पूर्वी कोणी ऐकिलीही नव्हती. आह्मी मानवी लोक, नानाविध मनाचे प्रकार, निश्चय होत नाहीं. सारांश, एतदर्थी पर्याय मनांत आणितां चित्तांत

अंत येत नाहीं. सर्व गोष्टी ईश्वरावतारासारख्या आहेत. जे सेवक हे पराक्रम पाहत असतील, त्यांचे जन्म धन्य आहेत. जे कामास आले त्यांनीं तों हा लोक व परलोक साधिला. ज्यापासून ईश्वराची सेवा जितकी घडावयाची असते, त्याप्रमाणें घडते. सारांश, हे तर्दूद, हे मर्दुमी, या समयांत हे हिंमत, हे गोष्ट मनींही कल्पवत नाहीं. हीं कर्मे ईश्वरासमान आहेत. सेवेशीं श्रुत होय ही विनंति.'

८. तहाचीं कलमें.—वसईचा किल्ला खालीं करून देतों, असें कबूल करून, पांढरें निशाण घेऊन पोर्तुगीझांचे वकील चिमाजीकडे ता. ५ मे सन १७३९ रोजीं आले; आणि तहाच्या शर्ती ठरून ता. १२ मे रोजीं पोर्तुगीझांनीं किल्ला खालीं केला, आणि १३ मेला मराठ्यांनीं आंत प्रवेश केला. पोर्तुगीझ इतिहासांत १२ दिवसांचा फरक पडतो तो त्या वेळच्या कालगणनेचा आहे. तहाच्या शर्ती बारा ठरल्या त्यांचा मतलब येणेंप्रमाणेः—

१. पोर्तुगीज फौज व बुणगे यांस सर्व हत्यारांसह, बॅन्ड वाजवीत व निशाण उभारून, सुरक्षितपणें किल्याबाहेर मराठ्यांनीं जाऊं द्यावें. २ वसई येथें राहत असलेलीं किरस्ती, हिंदी किंवा मुसलमानी कुटुंबें किंवा लोक वसई सोडून जाण्यास इच्छितील, त्या सर्वांस आपापली मालमत्ता घेऊन चिमाजीआपानें सुरक्षित जाऊं द्यावें. ३ वसईच्या बंदरांत जहाजें असतील त्यांसही आपापला दारूगोळा व तोफखाना घेऊन सुरक्षितपणें बंदरांतून जाऊं द्यावें. ४ कलम २ प्रमाणें लोकांस निघून जाण्यास गलबतांची वगैरे जरूर लागल्यास तीं गलबतें मराठ्यांनीं पुरवावा, आणि हे लोक आपापल्या स्थळीं पोंचे पावेतों रस्त्यांत आंग्रे वगैरे कडून त्यांस त्रास न होईल अशी तजवीज चिमाजीआपानें ठेवावी. ५ क्रिस्ती पाद्र्यांसही आपापली मालमत्ता घेऊन सुरक्षित जाऊं द्यावें. ६ पोर्तुगीझ लोकांचा दारूगोळा व दाणागोटा वसईंत आहे तो सर्व बरोबर घेऊन जाण्याची त्यांस मोकळीक असावी. ( हें कलम चिमाजीनें कबूल केलें नाहीं. सर्व सामान त्यानें विकत घेतलें ). ७ जे क्रिस्ती लोक आपखुषीनें वसईच्या हद्दींत राहतील त्यांस आपलें धर्माचरण करण्यास मराठ्यांनीं हरकत करूं नये, किंवा त्यांच्या जिंदगीचा अपहार करूं नये. हें कलम मुसलमान व हिंदूंसही लागू असावें. ८ एकमेकांनीं पकडलेले कैदी ज्याचे त्यास परत करावे. ९ किल्ला खालीं करून निघून जाते वेळीं पोर्तुगीझांस कोणताही त्रास होऊं नये ह्मणून चिमाजीनें आपली फौज दूर

अंतरावर मद्रापुरास न्यावी, पोर्तुगीझ लोक जहाजांत बसून तोफेच्या टप्याच्या बाहेर जाईपावेतों मराठी फौजेनें किल्ल्यांत प्रवेश करूं नये. १० वसईतील कोणताही माल किंवा सामान योग्य किंमत दिल्याशिवाय मराठ्यांनीं घेऊं नये. ११ वसई शहरांत तीन क्रिस्ती देवळें आहेत, तीं तशींच राहूं द्यावीं, त्यांतील मूर्तीस व दागिन्यांस मराठ्यांनीं धक्का लावूं नये. १२ या तहावर सही झाल्यानंतर त्याप्रमाणें वर्तन राहण्यासाठीं चिमाजीनें आपला एक अंमलदार पोर्तुगीझ जहाजावर ठेवून द्यावा, आणि पोर्तुगीझांचा एक अंमलदार मराठ्यांचे ताब्यांत राहवा.' लगेच चिमाजीनें तहावर सही करून दिली. मराठ्यांनीं तो तंतोतंत पाळिला. या तहांतील कलमांवरून अलीकडच्या सुधारलेल्या पाश्चात्य युद्धनीतीशीं मराठ्यांची त्या वेळची शत्रूंशीं वागण्याची पद्धत ताडून पाहण्याजोगी आहे.

वसईबरोबरच गोव्यावर मराठ्यांचा हल्ला झाला, त्याची हकीकत अशी. गोव्याजवळच्या बेटासही साष्टी असेंच नांव आहे. त्या साष्टींत व्यंकटराव घोरपडे यानें ता. २३·१·१७३९ रोजीं प्रवेश करून ता. २६ रोजीं मडगांवचें ठाणें हस्तगत केलें. व्यंकटरावाबरोबर सुमारें सात हजार स्वार व तितकेंच पायदळ होतें. आतां दुसरीं ठाणीं सुद्धां हातचीं जाणार असें पाहून पो. गव्हर्नरानें तहाचें बोलणें लाविलें. 'पोर्तुगीज लोकांस साफ उखडून काढण्याचा बाजीरावाचा विचार असून, वसई घेतल्यावर त्याचें विजयी सैन्य गोव्याकडे वळणार,' असें व्यंकटरावानें पो. वकिलांस कळविलें. मराठी फौजांत फितुर करण्याचाही पोर्तुगीझांनीं प्रयत्न केला, तो सिद्धीस न जातां ता. २७·४·१७३९ रोजीं उभतांचा तह ठरला, कीं साष्टी व बारदेश या दोन प्रांतांच्या वसुलाचा शेंकडा चाळीस भाग दरसाल पोर्तुगीझांनीं मराठ्यांस द्यावा.' चिमाजी आपानें वसईचा भाग पुरा केला, तसाच व्यंकटरावानें गोव्याचा भागही याच वेळीं पुरा केला.[1]

•या युद्धांत पोर्तुगीझांचा सुमारें पाऊणशें मैल लांबीचा प्रदेश मराठ्यांस मिळाला. या टापूंत ३४० गांव होते. शिवाय आठ शहरें, वीस किल्ले, दोन तटबंदीचे डोंगर, आणि वसई व ठाणें हीं दोन मोठीं ठिकाणें, इतकी मराठ्यांचे हातीं पडली. शत्रूंचा पंचवीस लाख रुपयांचा दारूगोळा व जहाजें वगैरे सामान, लहान मोठ्या ५९३ तोफा इतकें फुकट जाऊन, आणखी २३ लाख रुपये लढाईचा

१ ही माहिती प्रो. पां स. पिसुर्लेकर रा. गोवा यांनीं दिली. फब्रु. १९२५.

खर्च पोर्तुगीझांस आला. साष्टी बेट फार उत्पन्नाचें होतें. त्यांत धान्याची व मिठाची उपज मोठी असून, अनेक खाड्यांनीं जहाजांच्या हालचाली सुलभ होऊन त्या योगानें थोड्या खर्चांत देशसंरक्षण सिद्धीस जाऊन व्यापारही मोठा वाढलेला होता. यामुळें आजपावेतों सर्व सत्ताधीशांच्या उड्या या बेटावर पडत आल्या. याच कारणास्तव त्याबद्दल इंग्रजांनीं पुढें खटाटोप केला. मराठी अंमलाची खूण म्हणून वसई शहरांत हल्लीं एक बाजीपुरा आहे. साष्टींतील संग्राम स. १७३९ त जोरानें चालू असतां, मार्च महिन्यांत संभाजी आंगऱ्यानें करंजा बेटास वेढा घालून तें काबीज केलें. पुढें याच सहा महिने पावेतों संभाजी आंगऱ्यानें रेवदंडा व चौलास वेढा घालून तें काबीज करण्याचा प्रयत्न केला. सेप्टेंबरांत पोर्तुगीझांची मदत चौलास आली; आणि संभाजी वेढा उठवून परत गेला. परंतु चौलचें संरक्षण करणें पोर्तुगीझांस उत्तरोत्तर अवघड वाटून स. १७४० च्या सेप्टेंबरांत नानासाहेब पेशव्याशीं कॅ. इंचबर्डच्या मार्फत तह होऊन चौल मराठ्यांचे ताब्यांत आलें. तेव्हांपासून पुढें या किनाऱ्यावर दंमण हें एकच पोर्तुगीझ ठिकाण राहिलें आहे. त्यापुढें मराठ्यांचे व पोर्तुगीझांचे फारसे संबंध आले नाहींत. वाडीकर सांवतांचा व त्यांचा तंटा कांहीं काळ चालला; आणि स. १७४१ पासून १७५० च्या दरम्यान गोव्याच्या आसपासचा बराच प्रदेश पोर्तुगीझांनीं जिंकून तेथें आपली व्यवस्था लाविली

**७. पोर्तुगीझ युद्धांत इंग्रजांचें वर्तन.**—पोर्तुगीझांच्या युद्धासंबंधानें फॉरेस्टच्या पुस्तकांतील कांहीं माहिती लक्षांत ठेवण्याजोगी आहे. वसई काबीज करण्यासाठीं मराठ्यांना मुंबईच्या इंग्रजांच्या नाना प्रकारें विनवण्या करून त्यांची मदत मागितली. परंतु ती इंग्रजांनीं दिली नाहीं, त्याजबद्दल पोर्तुगीझांस फार राग आला. त्यासंबंधाचें त्यांचें पत्र ता. १-१-१७३९ चें इंग्रजांस आलें, त्यांत असा मजकूर होता कीं, ' मराठे सर्व युरोपियनांचे शत्रु, त्यांस तुम्ही दारू गोळा पुरवितां, युरोपांत तुमचा स्नेह असतां हिंदुस्थानांत असा प्रकार घडावा हें तुम्हांस मोठें लांछन आहे. आज साष्टी घेतली, उद्यां ते तुमची मुंबई घेण्यास चुकणार नाहींत. ' मुंबईच्या प्रेसिडेंटानें वरील पत्रास ता. २७-१-१७३९ रोजीं उत्तर लिहिलें, कीं ' वसई घेतल्यावर मराठे आमच्यावर चालून येतील. सर्व युरोपियनांची सत्ता हुसकून देण्याचा त्यांचा विचार आहे, इ०. ' इंग्रजांना

पोर्तुगीझांस दारूगोळा पुरविल्याचा उल्लेख २०·२·३९ च्या पत्रांत आहे. ता. २४ मार्च १७३९ रोजीं वसईच्या अधिकाऱ्यानें इंग्रजांस पत्र लिहून कळविलें, कीं, ' आह्मी अतिशय संकटांत आहों, खर्चास नाहीं, गोव्याहून मदत येऊं शकत नाहीं देवळांतील चांदी सोनेंही आटवून संपलें, तर कसेंही करून आह्मांस एक लाख रुपये कर्ज द्या, आणण्यास मनुष्य पाठविला आहे.' परंतु इंग्रजांनीं रकम दिली नाहीं. रकम देण्यास आह्मांस अधिकार नाहीं, असा जबाब कळविला परंतु पैसा व दारूगोळा देण्याविषयीं पोर्तुगीजांकडून अत्यंत निकडीच्या मागण्या येऊं लागल्या, तेव्हां इंग्रजांनीं गहाण जिन्नस घेऊन ता १७-४-३९ रोजीं पंधरा हजार रुपये कर्ज दिले; आणि कांहीं कारागीर वगैरे लोक पाठविण्याचें कबूल केलें. त्यानंतर २८-४-३९ चें पत्र आलें त्यांत वसईच्या बचावाची आशा सुटली, असें लिहिलेलें आहे.

ता. १६-५-३९ रोजीं तह ठरून वसईचा किल्ला हातांत आला. मराठ्यांनीं आपला कबुलात तंतोतंत पाळून शत्रूंस मोठ्या सन्मानानें वागावलें, असे प्रत्यक्ष पोर्तुगीझांचे उद्गार आहेत सुमारें आठशें पोर्तुगीझ लोक वसई किल्ला खालीं करून दिल्यावर पावसाळ्यांत मुंबईस येऊन राहिले, ते ऑक्टोबर अखेर पर्यंत तेथें होते. दरम्यान त्यांच्या व इंग्रजांच्या पुष्कळ तक्रारी झाल्या. त्यांच्या खर्चासाठीं दरमहा चार हजार रुपये मुंबईचे इंग्रज कर्ज म्हणून देत असत. गलबतांची वगैरे दुरुस्ती व्हावयाची होती. चवदा हजार रुपये दिल्यावर जास्त कर्ज इंग्रज देईनात; तेव्हां पोर्तुगीझ फौज अन्नाशिवाय मरूं लागली. शेवटीं ते कसेबसे मुंबई सोडून गेले.

कितीहीं संकटें आलीं तरी त्यांस न जुमानतां व पिच्छा न सोडतां, उद्योग केला म्हणजे यशःप्राप्ति झाल्याशिवाय राहत नाहीं, याचें उदाहरण वसईचा पाडाव होय. याच गुणांवर इंग्रजांनीं आपली राज्यवृद्धि केली आहे. मराठ्यांचे अंगीं इतकी चिकाटी नाहीं, असा पोर्तुगीझ इंग्रजांचा समज होता. पूर्वी अनेक वेळां थोड्याश्या लष्करानें मराठ्यांस पळवून लाविल्याचा अनुभव असल्यामुळें पोर्तुगीझांनीं युरोपांतून ज्यास्त फौज मागितली नाहीं. पण त्यांचा भ्रम चिमाजी-आपानें घालविला, ही गोष्ट पोर्तुगीझांनींच नमूद करून ठेविली आहे. स. १७३९ च्या ऑक्टोबरांत वाडीकर सावंतानें गोव्याच्या नाक्यावरचें बार्देश बेट काबीज करून गोव्याची नाकेबंदी केली, तेव्हां चौल ह्म० रेवदंडा व मरोळ हीं दोनही

ठिकाणें सोडून देऊन तेथील फौज गोव्यास आणावी, असा व्हाइसरॉयानें निश्चय केला. मराठ्यांना हीं ठिकाणें विकून पैसा मिळवावा अशीही त्यांची इच्छा होती. हीं ठिकाणें सीदीला किंवा डच सरकारला द्यावीं असें त्यांच्या मनांत प्रथम होतें. परंतु सीदीकडून त्यांचें संरक्षण होऊं शकणार नाहीं असें वाटून ती इंग्रजांना देण्याचें ठरविलें होतें; परंतु इंग्रजांचा व्यापार या वेळीं निकृष्ट स्थितींत असून मुंबईचेंच संरक्षण कसें होतें याची चिंता मराठ्यांच्या अलीकडील चढाईनें इंग्रजांस उत्पन्न झाली होती. म्हणून नारोराम शेणवी याचे मार्फत शाहूचे दरदारीं चौल बंदरासंबंधानें पोर्तुगीझांनीं खटपट चालविली. इतक्यांत मानाजी आंगऱ्यानें चौलास वेढा घातला आणि तें त्याच्या हातीं पडणाच्या बेतांत आलें असें पाहून, पो० नीं इंग्रजांस मुंबईस कळविलें कीं, चौल कोणाचे स्वाधीन करावयाचें व कसें, याचा निकाल तुह्मीच करा. त्यावरून बाजीराव किंवा चिमाजीआपा यांचे स्वाधीन आपण होऊन चौल करावें, असा इंग्रजांनीं ठराव केला. कारण बाजीरावाची इभ्रत या वेळा मोठी वाढली असून त्याचेच तंत्रानें शाहू सर्वस्वी वागत होता. म्हणून चौलसंबंधानें शाहूशीं वाटाघाट करण्यांत हांशील नाहीं, आंगऱ्यांशीं अगर सीदीशीं वाटाघाट केली तर बाजीरावास राग येईल, सबब आपण होऊन चौल बाजीरावास द्यावें, म्हणजे आपल्याबद्दल त्याच्या मनांतला वहीम दूर होऊन, मुंबईचें संरक्षण होईल, असा ठराव ता. २०-११-१७३९ रोजीं मुंबईच्या काउन्सिलनें केला. या वेळीं इंग्रजांनीं पोर्तुगीझांस कळविलें, कीं शाहू व बाजीराव यांजमध्यें फूट पडण्याचा संभवही नाहीं; आणि बाजीराव आतां सगळा किनारा काबीज केल्याशिवाय राहणार नाहीं. चौल व मरोळ हे दोन मोठे किल्ले आम्हांस पचणार नाहींत. म्हणून दमण व त्याचे जवळचा थोडा प्रदेश पोर्तुगीझांनीं आपल्याकडेस ठेवून बाकीचा सर्व किनारा मराठ्यांचे स्वाधीन करावा.

८. **कॅ० जेम्स् इंचबर्डची वकिलात,** ( जून १७३९ ).—कोंकणांतील व इतर ठिकाणाच्या मोहिमांनीं बाजीरावाची चलती पाहून, त्याच्याशीं दोस्ती ठेवण्यास इंग्रज किती आतुर असत हें स. १७३४ त कॅप्टिन सँडी धास त्यांनीं पुण्यास पाठविलें त्या वेळच्या पत्रावरून दिसून येतें. पुढें साष्टी व वसई येथें युद्ध चालू असतां मुंबईकर इंग्रजांस मोठी दहशत पडली होती. वसई पडल्यानें तर

ती द्विगुणित झाली. या वेळचें इंग्रजांचें दुटप्पी वर्तन चिमाजीआपाचे चांगलेंच निदर्शनास आलें होतें; आणि मागें पुढें हे आपल्यास त्रास देतील अशी भीति वाटून, आपण होऊनच बाजीराव व चिमाजीशीं गोडी करून त्यांचा लोभ संपादन करावा, आणि आपल्याबद्दलचा त्यांच्या मनांतील किंतु काढून टाकावा, अशी इंग्रजांस इच्छा होऊन त्यांनीं कॅ. इंचबर्ड यास सन १७३९ च्या जून महिन्यांत वसई येथें चिमाजीकडे पाठविलें. सर्व गोष्टी गोडीनें बोलून त्याच्या मनांतील संशय दूर करावा आणि व्यापारवृद्धीची योजना करावी, अशी या वकिलास ताकीद होती. मराठे कर्ज मागतील तर आम्हांस धन्याचा हुकूम नाहीं, खंडणी मागतील तर आमचा व्यापार अगदीं बसला आहे, अशीं उत्तरें वकिलानें देण्याविषयीं त्यास पढवणूक मिळाली होती. त्याप्रमाणें इंचबर्ड चिमाजीस वसई येथें भेटला. तेथें तह करण्याची बरीच वाटाघाट झाली. ' इंग्रजांनीं पोर्तुगीझांस दारूगोळा पुरविला, मग आम्हांस कां पुरवीत नाहींत?' असें चिमाजीनें विचारिलें, त्यावर दारूगोळा देण्याजोगा नाहीं असें वकिलानें चिमाजीस सांगितलें. तुम्ही परभारें शाहूस जाऊन भेटतां, आम्ही व शाहू यांजमध्यें फूट पाडतां, याजबद्दल चिमाजीनें इंग्रजांचा पुष्कळ निषेध केला. याप्रमाणें बरीच बोलाचाली होऊन तहाच्या १५ शर्ती ठरवून इंचबर्डनें मुंबईस कळविल्या; परंतु त्यांचें पुढें काय झालें तें लिहिलेलें नाहीं. ग्रँट् डफ् म्हणतो, जुलई १७३९ त असा तह उभयतांत घडून आला. (ए. टि. २·३७ ग. हॉर्न.)

**९ कॅ. गोर्डनची साताऱ्यास वकिलात** (१२ मे–१०-७-१७३९).—मुंबईच्या शेजारीं मराठ्यांचें ठाणें बसलेलें पाहून इंग्रजांस मोठी चिंता उत्पन्न झाली. कुलाब्यास आंग्रे व ठाण्यास बाजीरावासारखा पराक्रमी पेशवा, या दोघांच्यामध्यें आपला चुराडा सहज उडणार, याचा कांहीं तरी प्रतीकार करावा, या उद्देशानें मुंबईच्या कौन्सिलनें गोर्डन नांवाचा आपला एक वकील साताऱ्यास शाहू महाराजांकडे पाठविला; आणि त्याच दिवशीं त्यांचा दुसरा वकील इंचबर्ड चिमाजीकडे वसईस गेला. गोर्डनबरोबर छत्रपतीस व दरबारी मंडळीस देण्याकरितां पत्रें व नजराणे दिलेले होते. बरोबर भिकाजीपंत नांवाचा एक दुभाष्या होता. गोर्डन यास खालील बाबतींचा तपास करण्याचा हुकूम होता.

( १ ) शाहूचा राज्यकारभार कसा चालला आहे ? कोणाच्या तंत्रानें कारभार चालतो ? दरबारांत लोक व पक्ष कोण कसे आहेत ?

( २ ) बाजीरावाचे शत्रु साताऱ्यास कोण आहेत? ते शत्रु वजनदार आहेत असें दिसल्यास त्यांस थोडेंसें बाजीरावाविरुद्ध चिथवून द्यावें कारण पोर्तगीझांचा उच्छेद झाला, तसा आमचाही होण्याचा संभव आहे म्हणून बाजीरावाचें प्रस्थ वाढूं देणें राज्यास अपायकारक आहे, अशी समजूत तेथें पसरून द्यावी. मात्र बाजीरावाचें वजन एवढें मोठें आहे कीं, विशेष अंगावर येईल अशा थरास खटपट येऊं देऊं नये. उलट आम्ही इकडून बाजीरावास सलुखाचें व वसई काबीज केल्याबद्दल अभिनंदनाचें पत्र पाठवित आहोंच.

( ३ ) इंग्रजांसंबंधानें सातारा दरबारानें निर्धास्त असावें, अशी त्यांची खात्री करून, व्यापारी मतलबाचा तह घडवून आणण्याची खटपट करावा.

कॅप्टन गोर्डन ता. १२ मे १७३९ रोजीं मुंबई सोडून निघाला. ता. ८ जून रोजीं त्याची व शाहूची भेट होऊन ता. ३० जून रोजीं तो परत निघाला आणि १४ जुलैस परत मुंबईस दाखल झाला. नंतर त्यानें आपल्या प्रवासाची व कामगिरीची हकीकत ता. २१ जुलई रोजीं कौन्सिलास लेखी सादर केली. तिच्यांत खालील तात्पर्यार्थ आहे. गोर्डन लिहितो. ' १२ मे रोजीं आम्हीं मुंबई बंदर सोडून ता. १३ रोजीं दंडाराजपुरीस पोंचलों. तेथें सीदीकडून आमचा सत्कार झाला. ता. १४ रोजीं गलबतांत बसून सीदीचे वकिलाबरोबर श्रीपतरावाकडे निघालों रस्त्यांत ता. १५ रोजीं मराठ्यांनीं आम्हांस कैद केलें; आणि बाजीरावाचा किंवा चिमाजीचा परवाना ते मागूं लागले. आमच्या जवळचीं पत्रें पाहून त्यांनीं आम्हांस सोडलें; आणि त्यांचाच जाबता घेऊन आम्ही पुढें निघालों पुढें ठिकठिकाणीं आंगऱ्यांच्या चौक्या लागल्या. ता. १९ रोजीं संभाजी आंगऱ्याचे लोक आपणास पकडणार होते, परंतु थोडक्यांत निभावलें. ता. २० रोजीं पारघाटानें डोंगर चढलों. चढण्यास फार कठिण. ता. २२ रोजीं चांगला सपाट देश लागला. ता. २३ रोजीं साताऱ्याचे जवळ आलों. बाहेर धर्मशाळेंत मुक्काम केला. ता. २५ रोजीं श्रीपतरावाचा कारभारी अंताजीपंत याची भेट घेतली त्यानें आम्हांस पोषाख दिला, मी त्यास आंगठी दिली. शाहू महाराज साताऱ्याहून पांच मुक्कामावर आहेत असें कळलें. तेथें जाण्यास निघालों. ता. २९ रोजीं मुक्काम रहिमतपुर. ता. ३१ रोजीं अमरापुरास आलों. ता. १ जून १७३९ रोजीं Adjure Buuall येथें शाहूच्या मुक्कामावर आलों ता. २ रोजीं श्रीपतरावाची भेट व्हाव-

याची पण झाली नाहीं. ती ता. ३ रोजीं झाली. श्रीपतरावानें मुंबईच्या तटबंदीची व बंदोबस्ताची कच्ची हकीकत विचारून घेतली. 'आह्मीं कां आलों, बाजीरावाच्या भीतीनें आलों कीं काय?' असें श्रीपतरावानें विचारलें. 'नवीन गव्हर्नर आल्यानें स्नेह जोडण्याकरितां आलों' असें मीं सांगितलें. ता. ७ रोजीं महादाजी पंतानें (पुरंदरे) बाजीरावाकडून आलेली पत्रें शाहूस दाखवून त्याची भेट घेतली, त्या वेळीं विचार चालला, कीं 'इंग्रजांशीं स्नेह करावा कीं नाहीं?' त्याजबद्दल बाजीरावास वैषम्य वाटेल कीं काय?

ता. ८ रोजीं आमची व शाहूची भेट झाली. शाहू त्या वेळीं तंबूंत राहत असून लढाईवर होता. भेटीची जागा अगदीं घाणेरडी होती. भेट चांगली झाली. परंतु श्रीपतराव व अंताजी (शिवदेव?) पंत यांचे मार्फत भेटीस आलों ही चूक झाली असें वाटलें. विरूबाई आह्मांस भेटली नाहीं. तिचीं पत्रें व नजराणे तिला पाठवून दिले. नंतर नारोरामची भेट घेतली. त्यानें आह्मांस बाजीरावाचा मुलगा नानासाहेब याची भेट घेण्यास सांगितलें. इतक्यांत बाजीरावाकडचीं पत्रें आलीं नादीरशहा मराठ्यांवर चालून येतो अशी बातमी आली, तेव्हां शाहू राजा डोक्यावरचें पागोटें काढून म्हणाला, 'वसई काबीज करण्यास माझे बावीस हजार शूर लोक पडले, त्यांचा मोबदला वसई देईल काय?' नंतर आम्ही नानासाहेबाची गांठ घेतली. 'भेटीस येण्याचें कारण काय?' असें नानानें विचारिलें आमचें उत्तर त्यास समर्पक वाटलें नाहीं. आह्मी शाहूचे भेटीस आलों हें त्यास आवडलें नाहीं. ता. १० जून रोजीं यशवंतराव (महादेव फोननीस), जिवाजी खंडेराव चिटणीस व फत्तेसिंग भोसले यांच्या भेटी घेतल्या. ता. १४ जून रोजीं नादीरशहा परत गेल्याची खबर आली. मराठ्यांस भिऊन तो पळून गेला याबद्दल शाहूनें दरबार भरवून बक्षिसें वांटलीं. ता. १९ रोजीं व्यंकटराव घोरपडे गोव्याचे स्वारीहून परत आला शाहूची व त्याची भेट झाली. पोर्तुगीझांनीं त्यास दंड भरून तह करून घेतला असें कळतें. मराठे दिल्लीवर चाल करून जाणार अशी खबर आली.

आह्मांस परत जाण्यास रजा द्या, ह्मणून वारंवार विनंति केल्यावर ता. २५ जूनला शाहूनें पुनः आमची भेट घेऊन आम्हांस निरोप दिला. आपले दोस्त मुंबईचे गव्हर्नर यांना सांगा, 'मोठ्या बदकांच्या आठ माद्या, दोन टर्की, बस-

त्याचीं खबुतरें, आणि दुसरे कांहीं चमत्कारिक पक्षी असें आम्हांस पाठवून द्या.' माझ्याजवळ तरवार होती ती शाहू महाराजांस फार आवडली म्हणून मीं ती त्यांस दिली. याप्रमाणें शाहूची रजा घेऊन ता. २६ रोजीं सर्व मोठमोठ्या अंमलदारांच्या व बाळाजी बाजीरावाच्या निरोपाच्या भेटी घेतल्या. ता. २७ रोजीं आमच्या बरोबरच्या एका गृहस्थास शाहू महाराजांनीं बोलावून, आणखी कांहीं वस्तु आमच्याजवळ नजर देण्याजोग्या आहेत किंवा काय, याचा तपास केला. त्याजवळ महाराज ह्मणाले ' तुह्मी सालस लोक आहां. व्यापाराशिवाय तुमचा दुसरा हेतु नाहीं. धर्मसंबंधांत तुह्मी कोणास जाच करीत नाहीं. सबब वसईकडील नवीन जिंकिलेल्या प्रदेशांत आह्मांस इंग्रजांचा उपयोग चांगला होईल. परंतु हा सर्व व्यवहार आह्मीं बाजीरावावर सोंपिला आहे; आह्मी त्यांत पडत नाहीं. पण तुह्मांस जर असे शांत भावानें दिवस काढावयाचे ह्मणतां, तर आमचे नोकर जे आंग्रे त्यांच्याशीं कलह करण्याचें तुम्हांस प्रयोजन काय ?' हें बोलणें, गोर्डन ह्मणतो, मला कळल्यावर मी पुनः त्या इसमास महाराजांकडे पाठवून सांगितलें, कीं 'आंगऱ्यांशीं भांडण उपस्थित करण्याची आमची बिलकूल इच्छा नाहीं. केवळ आमच्या व्यापाराच्या संरक्षणासाठीं आम्हांस एवढी मोठी फौज बाळगावी लागत आहे. पोर्तुगीझ तरी आमचे स्नेही व शेजारी ह्मणून त्यांस मदत करणें आह्मांस भाग पडलें. आतां आपणांस जय मिळालाच आहे, तेव्हां आपल्याशींही आह्मी स्नेहभावानेंच वागणार ! '

पत्रांचे जबाब महाराजांकडून ता. ३० जून रोजीं माझ्या हातीं पडले आणि आह्मी परत निघालों, ते प्रथम पुण्यास आलों. पुण्याकडील प्रदेश मला फारच सुपीक दिसला. पुण्यास तोफा व गोळे करण्याचा कारखाना आहे तो पाहिला हें सामान ते चांगलें करितात असें कळलें. तेरा इंची गोळ्यांचा साचा होता. लोखंड सुद्धां येथें तयार करितात. बाजीरावाकडून कोष्टी लोकांना चांगलें उत्तेजन मिळतें; आणि नानाप्रकारचें उंची कापड येथून मुंबई वगैरे ठिकाणीं बाहेर जाऊन विकतें. प्रदेश चांगला लोकवस्तीनें गजबजलेला असून इतर प्रांतांच्या मानानें येथें रयतेवरील सारा माफक आहे.

ता. १३ जुलई रोजीं आह्मी ठाण्यास पोंचलों. तेथील अधिकाऱ्यानें आमचा बरदास्त चांगली ठेविली. ता. १४ रोजीं आह्मी मुंबईस पोंचलों.

गोर्डन म्हणतो, एकंदर माहितीवरून मला असें कळलें, कीं ठाणें, साष्टी, वसई वगैरे ठिकाणें काबीज केल्याबद्दल शाहू महाराजांना मोठा आनंद झाला. वसई सर करण्यास महाराजांची परवानगी घेतलेली नव्हती. पोर्तुगीझ लोकांस समूळ काढून लावणें माहाराजांस पसंत नव्हतें. परंतु बाजीराव कोणासच जुमानीत नसल्यामुळें बाहेरून त्याच्याशीं गोडी दाखविणें महाराजांस भाग पडतें. बाजीरावाचे अंतस्थ हेतु काय आहेत ते मला कळले. पण लोकांचा सामान्य समज आहे, कीं मुंबईवर बाजीरावाचा डोळा नाहीं. नवीन जिंकलेल्या प्रदेशाच्या सुधारणेसाठीं इंग्रजांची त्यांस जरूर आहे एकंदरींत मराठयांच्या दरबारांत इंग्रजांसंबंधानें कोणाची द्वेषबुद्धि असलेली आढळून आली नाहीं पुष्कळांचा समज असा आहे, कीं छत्रपतीपासून आपण स्वतंत्र व्हावें असा बाजीरावाचा रोख दिसतो. मोगलांच्या राज्यांतून पुष्कळसा पैसा मिळवून मोठी फौज तयार करावी अशी बाजीरावाची निकड चालू आहे. अंतोबा नाईक भिडे ( ? Bira ) नांवाचा एक पुण्याचा प्रसिद्ध व्यापारी बाजीरावाच्या मर्जीतला असून त्याची इच्छा आपला एक मुनीम मुंबईस ठेवावा अशी आहे.

मला असें आढळून आलें कीं, लोक लढाईस गेल्यामुळें पुष्कळ शहरें ओस पडलीं आहेत; आणि कित्येक ठिकाणीं मोठमोठया फौजा तयार आहेत. शाहू महाराजांजवळच स्वतःची अशी वीस हजार फौजा असून शिवाय कारागीर, दुकानदार वगैरे पुष्कळच आहेत. बाजीरावाची फौज चाळीस हजार आहे; पण त्यापैकीं गोव्याचे बाजूस किती व या बाजूस किती याचा अंदाज मला लागला नाहीं. मराठे सरदार मोठमोठया फौजा तेव्हांच तयार करूं शकतात. बाजीरावाचे बेत बाहेर कोणासही कळत नाहींत.हुकूम होईल त्याप्रमाणें लोक निमूटपणें वागतात. सारांश, सर्व सत्ता बाजीरावाच्या हातांत आहे.परभारें शाहूमहाराजांकडे आपण खटपट केली तर ती बाजीरावास आवडणार नाहीं. नुसत्या आलेकम सलामीचा व्यवहार परभारें करण्यास हरकत नाहीं. शाहू महाराजांची दरम्यानगिरी नसेल तर सातही प्रधानांस बाजूस ठेवून आपला हुकूम अंमलांत आणण्याचें सामर्थ्य बाजीरावास आहे. येथून नेलेल्या सर्व जिनसा मीं वांटून दिल्या. तेथून मला नजर मिळालेल्या जिनसांची किंमत सुमारें दोनशें चाळीस रुपये आहे.'

उघड आहे, इंग्रजांचे वकिलास पाहुणा म्हणून बोलावलेलें नव्हतें; आणि त्या

वेळीं इंग्रज कांहीं सत्ताधीश नव्हते, सामान्य व्यापारी होते. इंग्रजांशीं स्नेह ठेवण्याविषयीं शाहूनें गोर्डनजवळ बाजीरावास पत्रें दिलीं होतीं.

त्या वेळची परस्थांनीं लिहिलेली वरील हकीकत अनेक दृष्टींनीं बोधप्रद आहे. बाजीरावाचा पराक्रम व दरारा तींत व्यक्त होतो. गोर्डनच्या वकिलातीनंतर दहा महिन्यांचे आंत बाजीराव मरण पावला; आणि तितक्या पुरती इंग्रजांना पडलेली धास्ती हलकी झाली.

**१०. शाहूछत्रपतीची मिरजेची स्वारी, (१७३७-१७३९अखेर):**— शाहूची कारकीर्द जरी स. १७०८ त सुरू झाली, तरी संभाजीचा वध होऊन शाहू व त्याची आई मोगल बादशहाच्या कबजांत गेल्यापासूनच शाहूविषयीं महाराष्ट्रास अभिमान वाटूं लागला, तेव्हांपासून सुमारें साठ वर्षेपर्यंत एकंदर महाराष्ट्राचा शाहू हा राष्ट्रीय आत्मा बनला होता. एवढें मोठें आयुष्य राष्ट्रकार्यार्थ खर्च झाल्यामुळें त्यास पुढें पुढें अवतारी पुरुष असें लोक समजूं लागले. स. १७०८–१० च्या पुढें प्रत्यक्ष रणभूमीवर शाहूनें पाय ठेविला नाहीं. महाराज स्वतः कधीं स्वारी वगैरे करीत नाहींत, त्याबद्दल चर्चाही त्या वेळीं होत असून ती शाहूच्या कानींही गेली असावी. लहान लहान बंडखोरांवर अगर निजामासारख्यांवर स्वतः स्वारी काय करावी, बादशहासारखा बरोबरीचा शत्रु असेल तरच त्याजवर स्वतः स्वारी करणें योग्य; अशी जवळची मंडळी शाहूची समजूत घालीत. शेवटी स्वतः स्वारी करण्याची शाहूस मोठी इच्छा होऊन सन १७३७ पासून दोन तीन वर्षें शाहूनें सातारा सोडून मोठया समारंभानिशीं स्वारी काढून प्रथम उंबरजेवर तळ दिला; ता. १५-६-१७३७ पूर्वी त्याचा मुक्काम पंढरपुरावर होता; आणि तेथून कांहीं दिवसांनीं मिरजेवर जाऊन तें ठाणें काबीज केलें. सामान्य उल्लेखांवरून सन १७३६ च्या विजयादशमीपासून स. १७३९ च्या अखेरीपावेतों म्हणजे सुमारें तीन वर्षे ही मिरजेची स्वारी झाली असावी असें दिसतें.

'शके १६५८ सब्बासल्लासीन मया व आलफ् या वर्षी जाऊन दोन वर्षे छावणी उंब्रजेवर झाली. नंतर चार सहा महिने मिरजेवर गेले असे उल्लेख आहेत. 'स्वारींत बाळाजी बाजीराव शाहूबरोबर मिरजेस होता.' (जून १७३९) 'बाळाजी बाजीरावाचें पत्र मिरजेहून आलें,' मिरजेच्या मुक्कामीं वैशाख व

ज्येष्ठ मासीं जाऊन ' राजश्री स्वामी मिरजेचे मुक्कामींहून श्रीपंढरीचे यात्रेस गेले. राणोजी शिंदेही गेले. तेथून तुळजापुरास गेले. ' ही बहुधा स. १७३९ ची आषाढी एकादशी ता. ५ जुलई असावी. श्रावण मासांत गोरोर्जी गुरव राजश्री स्वामीपाशीं मिरजेचे मुक्कामीं फिर्यादीस गेला. ' ' मिरजेचा मोगल कौलास आला. आश्विन शु० १२ स ता. ३ आक्टोबर रोजीं निशाणें चढलीं. कार्तिक शु० १५ म्ह० ४ नोव्हेंबर रविवारीं सायंकाळीं रा. बाळाजीपंतनाना मिरजेहून राजश्री पासून पुण्यास आले. राजश्री बाळाजी बाजीराव शिरोळ मुक्कामाहून राजश्रींचा निरोप घेऊन फाल्गुन शु ९ रविवारीं २४ फेब्रुवारीस पुण्यास आले.' या उताऱ्यां वरून स १७४० चे फाल्गुनांत शाहू महाराजांची स्वारी मिरजेहून साताऱ्यास परत आली असें दिसते[१].

शाहूच्या या स्वारीची हकीकत त्या वेळच्या त्याच्या ऐश्वर्याची व मानसिक भावनेची निदर्शक आहे. अलीकडच्या व्हिक्टोरिया राणीच्या कारकिर्दीप्रमाणें, शाहूच्या सरदारास सर्व हिंदुस्थानभर विजय मिळत गेले आणि त्याच्या भाग्यशालित्वाची छाप देशात बसली. हें भाग्यशालित्व शाहूच्या या स्वारीवरून दृग्गोचर होतें. वास्तविक विजयादशमीच्या सीमोल्लंघनांतलाच हा प्रकार होता असें ह्मटलें तरी चालेल

' कूच करणें तें दोन तीन कोसांचें करावें ऐसें केलें, आणि सुमुहूर्तें डेरे दाखल झाले पागा हुजरात सर्व तयारी करून उतरले. तोफखाना तयारी होऊन काढिला; व सर्व सरदारांस आपले तालुके व मसलतीचे बंदोबस्त राखून पांच, चार, दोन, हजार फौजेनिशीं ज्याचे त्याप्रमाणें बरोबर यावें, असें नेमून दिल्याप्रमाणें येऊन उतरले त्यांस मिसलीस राहण्याचे व स्वारी चालण्याचे निबंध नेमून दिले. सेनाधुरंधर व सेनासाहेब सुभा भोसले यांस आघाडीस नेमिलें. प्रतिनिधि व मुख्यप्रधान व अमात्य, सचिव, मंत्री यांची उजवेबाजूस मिसल नेमिली; पंडितराव, सुमंत व न्यायाधीश, यांस डावे बाजूस नेमून दिलें. चिटणीस, पोतनीस वगैरे कारकून मंडळी जामदारखान्यालगत उजवे बाजूस नेमिले. फडणीस व दप्तरकोठी वगैरे डावेबाजूस नेमिले. सोयरे लोक, मानकरी

१ रं. रो. खं. ६ पृ. ९, ११, १४, १८, २६ व १०७; शा. रो. ३४९,७०, ७२; शा . ब पृ. ५९.

व फत्तेसिंग भोसले उजवे बाजूस नेमिले. पिछाडीस सरलष्कर व त्यांचे निसबतींचे सरंजामी हे नेमिले. हुजूरपागा डेऱ्यापुढें व शागीर्दपेशा लोक वगैरे जिकडील तिकडे मिसली नेमून दिल्या. सर्वांनीं स्वारींत आपापले मिसलींत चालावें, गलबला कांहीं एक होऊं नये. पादशाही स्वारींत महाराज होते त्याअन्वयें सर्व मातबर मुत्सद्दी प्रधान व सरदार यांनीं अंबाऱ्यांत बसोन, सरकारचे पाठी-मागें जनानखाना, त्यामागें चाळीस पंनास अंबाऱ्या चालाव्या. पुढें तोफखाना, त्यापुढें ढाला व निशाणें, व त्यापाशीं गारद व करोल व पागा चालावी सर्वांपुढें बिनीवाले सेनाधुरंधर यांनीं चालावें. निशाणांमागें आघाडीचे सरदार यांचे लोक चालावे. त्यामागें जिलीब, नानाप्रकारचीं रणवाद्यें, त्यामागें जिलबीचे हत्ती, घोडे, रथ, सांडणी यांणीं चालावें. त्यामागें नगारखाना, शहाजानें, त्यामागें वाजंत्री व धाडी व त्यामागें चोपदार भालदार चालावे. वाटेनें सके ( पाणी शिंपणारे ) व पखाला यांनीं पुढें शिडकाव करीत असावा. याप्रमाणें दोन तीन कोस चालून डेरेपर्यंत कौरबंदीचे लोक म्ह० सलामीचे स्वार यांचे मुजरे घेत जावें. याप्रमाणें मजला करून उंबरज मुक्कामा आले. पुढें कर्नाटक प्रांतीं जावयाचें, त्याप तिकडे सरदार रवाना केले आणि उंब्रजेवर छावणी केली. प्रधान व सरदारसह-वर्तमान शिकारीस जावें श्रीपतराव प्रतिनिधींना आज्ञेप्रमाणें उदाजी चव्हाणावर जाऊन त्यास जरब दिली, व चव्हाणास घेऊन महाराजांपाशी आले दुसरे वर्षी तोफखाना व सामान देऊन, मिरजेचें ठाणें मोगलांकडे होतें तें घ्यावें ह्मणोन त्यांस रवाना केलें. बहिरोपंत पिंगळ्यांचे चिरंजीव आपाजीराव पेशवाई काढली ह्मणोन उद्विग्नता वागवीत होते, त्यांची परीक्षा पाहणें जाणून संताजी डुबल यास बरोबर देऊन तीस हजार फौजेसहित रवाना केले. त्यांनीं जाऊन किल्यास शह दिला. परंतु किल्ला लांबणींत आणि बांधणींत मजबूद, इलाज न चाले. यामुळें प्रतिनिधीस आज्ञा केली कीं उद्यां हल्ला चढवून किल्ला घ्यावा. दुसरे दिवशीं हल्ला केला ईशान्येकडील बुरूज तोफा लावून ढळला. निशाण लावून किल्ला घेतला. शेंपन्नास मेले, पांच पन्नास जखमी झाले. ते जाऊन मोर्चेबंदी करून तोफा लावून मारगिरी केली. यावरून किल्ला तहास येऊन ता. ३ ऑक्टोबर स. १७२९ रोजीं दिला. यावरी महाराजांची स्वारी किल्ला पहाण्यास गेली.

धूळगांवचा बाळोजी बिन शिवाजी साळुंके ऊ. डुबल पटवर्धनाचे पदरीं होता, त्याजकडे मिरजेचें ठाणें देऊन किल्याचा व प्रांताचा बंदोबस्त करवून स्वारी परत आली. हा डुबल सकवारबाईचा आप्त व प्रतिनिधींचा पक्षपाती असल्यामुळें त्याजकडे हा महत्त्वाचा किल्ला ठेवणें धोक्याचें वाटून पुढें भाऊसाहेबानें सांगोल्याचे स्वारींत तो डुबलकडून काढून शिवाजी बल्लाळ जोशी याजकडे दिला. या शिवाजी बल्लाळाची मुलगी रमाबाई पुढें माधवरावास केली. ह्यानंतर स. १७६०त नानासाहिबानें तो पटवर्धनांस दिला. त्यानंतरच्या मिरजेच्या भानगडी पुढें सांगण्यांत येतील.

शाहूनें समारंभानें स्वारी बाहेर काढून उंब्रजेवर तळ दिला आणि तेथून अनेक सरदार ठिकठिकाणीं वेळोवेळीं रवाना केले, त्यांतील कांहींच्या हकीकती प्रसंगोपात उपलब्ध आहेत. ‘ चंद्रसेन जाधव उदाजी चव्हाणास बरोबर घेऊन बीडाकडे आले आहेत. विरापा वगैरे टाळेटोळे जमा होऊन मुलखांत धूम मांडिली आहे ह्मणोन लिहिलें, त्यास गनीमांस नतीजा देण्याकरितां स्वामींनीं चिरंजीव फत्तेसिंग भोसले, राजश्री रघोजी भोसले व रा. शभुसिंग जाधवराव व आपाजी सोमवंशी सरष्कर यांसीं फौजेनिशीं आज्ञा देऊन रवाना केले आहेत. चतुर्वर्ग सत्वरींच त्या प्रांतीं येतील. तरी तुह्मी चिरंजीवांस सामील होऊन स्वामिसेवा करून दाखविणें, ’ ह्मणून ता. २५ जानेवारी १७३९ चें पत्र शाहूनें हैबतराव बांडगर अमीरुलुमराव यास लिहिलें. त्यानंतर युद्धप्रसंग होऊन वीरापा धरिला, फौज मोडून तारांगण केलें, याबद्दल शाहूस संतोष होऊन त्यानें ता. २४ मार्च १७३९ रोजीं अनेक लहान मोठ्या सरदारांस प्रशंसापर पत्रें लिहिलीं. दोन वर्षे छावणी उंब्रजवर होती. त्यानंतर सुमारें एक वर्ष मिरजेवर होती. नंतर श्रीचाफळीं जाऊन श्रीचें दर्शन करून, पूजा ब्राह्मणभोजन करून, १७४०च्या फाल्गुनांत सातारीं आले. शहरचे देवांच्या पूजा करविल्या. शहरांत गुढ्या उभ्या केल्या. रस्त्यांत सडे रांगोळ्या घालून, सर्व नगर अलंकृत केलें. सर्व लोक पुढें सामोरा नजरा घेऊन आले. रस्त्यांत घरोघरीं स्त्रिया आरत्या घेऊन उभ्या राहिल्या. समारंभेंकरून वाड्यांत प्रवेश केला.’ याशिवाय, पुणें, जेजुरी, शंभु महादेव, प्रतापगड, इत्यादि ठिकाणीं प्रसंगानुसार शाहूचें जाणें वारंवार होत असे.

# प्रकरण बारावें.

## माळवा व बुंदेलखंड काबीज.

### स. १७१९-३१.

१. माळव्यांतील उद्योगाचा आरंभ.

२. राजा गिरिधर बहादुर ( स. १७२२-२४. ).

३. चौधरी राव नंदलाल मंडलोई.

४. सारंगपुरची लढाई, गिरिधरचा पाडाव ( स. १७२४ ).

५. तिरलाची लढाई, दयाबहादुरचा पाडाव ( १२-१०-३१ ).

६. माळव्याची व्यवस्था. ७. मल्हारराव होळकर (१६९३-१७६६ मे).

८. राणोजी शिंदे ( मृ. जुलई १७४५ ).

९. उदाजी पवार, धार. १०. छत्रसालास मदत, महंमद बंगशाचा पाडाव.

११. गोविंदपंत बुंदेले. १२. माळवा बुंदेलखंडकडील राजकारण.

**१. माळव्यांतील उद्योगाचा आरंभ.**[१] —हिंदुपदपातशाहीची कल्पना नर्मदा ओलांडल्यावर सार्थ होऊं लागते. सातपुड्याच्या दक्षिण उतरणीवर तापी नदी असून, विंध्याद्रीच्या दक्षिण उतरणीवर नर्मदा नदी आहे. नर्मदेच्या

१. या प्रकरणाची कांहीं हकीकत माल्कमच्या पुस्तकांत सांपडते. ग्रँट डफ फारसा विश्वसनीय नाहीं. रजपुतांच्या संबंधानें टॉडच्या हकीकती पाहव्या लागतात पारसनीसकृत बुंदेलखंड प्रकरण, व ब्र स्वा. चें चरित्र ( ले ४३, ४४ ), पुणें दप्तरांतील रोजनिशी, राजवाडे खं. ३ ले. १४, खं ६ ले ५८३ –६२४, व शिवाय मंडलोईच्या दप्तरांतील कित्येक पत्रें रा श्री. वि. आठल्ये व रा भा. रा भालेराव ( ग्वालेर ) यांजकडून मिळालेलीं; का. सं होळकरांची कैफियत; व तीन शकावल्या, अर्व्हिन भा. १-२, वगैरेंचा पडताळा पाहून पुढील हकीकत चांचपडत बनविली आहे.

पलीकडे माळव्याची हद्द लागते. त्या प्रांतांत प्रवेश करण्यास त्या वेळीं नर्मदेच्या पलीकडे तांडा, भैरव, नालछा वगैरे अनेक घांट होते. हे घांट कबजांत घेणें म्हणजेच माळव्याचीं प्रवेशद्वारें हस्तगत केल्या सारखें होतें. हें काम होळकर, पवार वगैरे सरदारांनीं केलें. विंध्याद्रि चढून गेल्यावर उत्तरेच्या बाजूस बेटवा, चंबल, सिंधु, माही, पार्वती वगैरे नद्या माळव्यांतून उत्तरेकडे वाहत जातात. मराठशाहीचा उत्तरेकडील हा फैलाव समजून घेण्यास तिकडील भूप्रदेशाची रचना मनांत ठसविली पाहिजे.

माल्कम म्हणतो, औरंगजेबाशीं युद्ध सुरू असतांच बादशाहास शह देण्याच्या उद्देशानें मराठ्यांनीं माळव्यावर हल्ले सुरू केले. स. १६९० च्या एका कागदांत मराठ्यांच्या हल्ल्यामुळे त्या सालीं माळव्याच्या उत्पन्नांत तूट आली, असा उल्लेख आहे. औरंगजेबाचें रजपुतांशीं वैर उत्पन्न झालें तेव्हांपासून बादशहाच्या शत्रूंस रजपूत राजे मदत करूं लागले; आणि रजपुतांच्याच साह्यानें मराठ्यांनीं माळव्यांत प्रवेश केला. सन १६९८ त उदाजी पवारानें माळव्यांत शिरून मांडवगडास तळ दिला. तथापि तेथें कायमचें वास्तव्य करण्यास उदाजीस त्या वेळीं सवड झाली नाहीं. सवाई जयसिंग, शंकराजी मल्हार व बाळाजी विश्वनाथ यांनीं जो नवीन उपक्रम सुरू केला त्याचें माळवा हें आदिस्थान होतें. मराठ्यांचा व जयसिंगाचा स्नेह होता म्हणूनच जयसिंगाच्या मार्फत माळव्यांतील जमीनदार व बुंदेले रजपूत, औरंगजेबानें केलेला छळ स्मरून, मराठ्यांस अनुकूल झाले. बाजीरावाचा पराक्रम पाहून आपणास हा नवीन हिंदु पुढारी मिळाला, अशी तिकडील लोकांची भावना झाली; आणि बाजीरावाचे साह्यकारी शिंदे, होळकर व पवार यांच्या धाडशी व युक्तिबाज उद्योगानें माळवा प्रांत जिंकण्याचें काम सुलभ झालें. या कामाची सुरुवात दावलजी सोमवंशी यानें केली, असा उल्लेख १७१५ च्या एका पत्रांत आहे.

स्वतः बाजीराव माळव्यांत प्रथम केव्हां उतरला तें नक्की कळत नाहीं. स. १७२२-२३ व १७२३-२४ सालांत तो माळवा व बाघेलखंडपावेतों गेल्याचा उल्लेख रोजनिशींतल मुक्कामांत आढळतो. तेव्हां पिलाजी जाधव त्याजबरोबर होता. सरदार खंडेराव हरि भालेराव याचा आजा रामाजी बाबाजी व चुलता मल्हार रामाजी हे माळव्यांत लढत असतां स.१७२५त मारले गेले, असें भालेरावांच्या

कागदांवरून समजतें. तथापि आरंभीं साताऱ्याच्या दरबारांतील भानगडींमुळें बाहेरचा उद्योग मनमुराद हातीं घेण्यास बाजीराव मोकळा नव्हता. स.१७२८त निजामावरील स्वारींत त्याचा पराक्रम सिद्ध होण्यापूर्वी, बाहेरच्या त्याच्या उद्योगास दरबारांतून बहुधा विरोधच होत असे. स. १७२८ नंतर उत्तरेकडे त्याचा अनिरुद्ध संचार सुरू झाला. स. १७२९ त बुंदेलखंडांत छत्रसालास मदत, स. १७३०त संभाजीचें प्रकरण, १७३१ त दाभाडे प्रकरण, १७३३ त हबशावरील स्वारी, ह्या गोष्टी नजरेपुढें ठेवून माळव्याच्या उद्योगाची संगति जुळविली पाहिजे. निजामुल्मुल्क स १७२३ त दक्षिणेंत येऊन स्वतंत्र झाल्यावर माळव्याच्या सुभ्यावर राजा गिरिधर याची नेमणूक बादशहानें केली.त्याजबरोबर मराठ्यांचा झगडा होऊन त्यांत इंदूरचे चौधरी रावमंडलोई यांच्या मदतीनें मराठ्यांनीं प्रथम राजा गिरिधरचा व मागून त्याचे जागीं आलेला दयाबहादूर याचा पाडाव केला. सबब प्रथम ह्या इसमांचा परिचय करून घेतला पाहिजे.

२. राजा गिरिधर बहादुर, ( स. १७२२–२४ ).–राजा गिरिधरचें नांव दिल्लीच्या कारभारांत पूर्वी आलेंच आहे. उत्तर मोगल शाहींत जे थोडे हिंदु कामदार स्वपराक्रमानें प्रसिद्धीस आले त्यांत राजा गिरिधरचे कुटुंबाची गणना आहे. हे नागर ब्राह्मण अलाहाबादेकडे राहत होते. राजा गिरिधरचा बाप दयाराम ऊर्फ दयाबहादूर व चुलता छबिलाराम हे बहादुरशहाचा दुसरा मुलगा अजीमुश्शान याच्या पदरीं होते. ते शूर व मुत्सद्दी असून त्यांनीं आपल्या धन्याची सेवा उत्कृष्ट रीतीनें बजाविली. अजीमुश्शान पुष्कळ वर्षे बंगालच्या सुभ्यावर असतां त्यास व त्याचा मुलगा फरुखसेयर यास दयारामाच्या कुटुंबाची होती. लाहोर येथें बहादुरशहा स १७१२ त वारला, तेव्हां त्याच्या मुलांत गादीविषयीं लढाया झाल्या. या लढायांत दयाराम नागर आपल्या धन्यासाठीं लढून समरांगणीं मरण पावला. राजा मुहकमसिंग खत्री व त्याचा भाऊ केशरसिंग, किसनगडचा राजा राजसिंग बहादुर, व पृथ्वीराज बुंदेला, हे सरदार व दयाराम, एक मतानें वागून, अजीमुशानचा पक्ष उचलून धरीत होते; परंतु अजीमुशान मारला गेला आणि दयारामाचा भाऊ छबिलाराम जहांदरशहाचे पक्षास मिळाला. त्यास जहांदरशहानें करा माणिकपुरचा फौजदार नेमिलें. त्याजवळच दयारामाचा मुलगा राजागिरिधर हाही कामास असे. छबिलाराम व

गिरिधर यांनीं करा माणिकपुर येथें असतां, द्रव्यसंचय करून फौज वाढविली. जहांदरशहानें वर्ष सहा महिने गादीचा उपभोग घेतला नाहीं तोंच अजीमुश्शानचा मुलगा फर्रुख्सेयर बंगाल्यांतून बंड करून, सय्यदबंधूंची मदत घेऊन, आगऱ्यावर चालून आला, तेव्हां छबिलाराम व गिरिधर त्यास जाऊन मिळाले. त्यांनीं त्यास, पुष्कळसा पैसा कर्जाऊ दिला व फौजेचीही मदत चांगली केली. ता. १० जानेवारी स. १७१३ रोजीं आग्रा येथें निकराची लढाई झाली तींत छबिलारामानें स्वतः मोठा पराक्रम करून जिवावर उदार होऊन लढण्याची शिकस्त केली, ह्मणूनच फर्रुख्सेयर यास त्या दिवशीं जय मिळाला या कामगिरीबद्दल फर्रुख्सेयरनें त्यास प्रथम खालसा दिवाणाचें ह्मणजे वसुलाचें काम देऊन पुढें त्यास आगऱ्याच्या सुभ्यावर नेमिलें. आग्रा येथें असतां त्यानें चूडामण जाठास वठणीस आणिलें. नंतर कांहीं दिवसांनीं त्याची बदली अलाहाबादच्या सुभ्यावर झाली. जयसिंग व छबिलाराम यांचें संगनमत असून सय्यदांचें व बादशहाचें वांकडें आलें तेव्हां या दोघांची सय्यदांस मोठी धास्ती होती. शेवटीं सय्यदांचा कारस्थानें सिद्धीस जाऊन फर्रुख्सेयर पदच्युत झाला त्यामुळें छबिलारामाची पुष्कळ नाउमेद झाली. तरी प्रसंगास पाठ देऊन त्यानें सय्यदांस चिडविलें नाहीं. लवकरच सय्यदांनीं त्याजवर शस्त्र धरिलें. प्रथम त्यांनीं गिरिधर बहादुर यास दिल्लीस बोलावून आणिलें. तेथें त्यास सय्यदाचा बेत समजतांच तो पळून अलाहबादेस चुलता छबिलाराम यास जाऊन मिळाला. तेव्हां सय्यदांनीं त्या दोघांवर फौज रवाना केली इतक्यांत छबिलाराम अर्धांगवायु होऊन नोव्हेंबर १७१९ त मरण पावला, आणि गिरिधर बहादुरास त्यांनीं शहर येण्याविषयीं पाचारण केलें; परंतु चुलत्याच्या उत्तरक्रियेची सबब सांगून तो एक वर्ष प्रयागास राहिला, आणि त्या अवधींत त्यानें तेथील किल्ल्याचा वगैरे चांगला बंदोबस्त केला. या वेळीं बुंदेले रजपूतही बादशहाशीं लढत असून त्यांचा राजा भगवंतसिंग हा गिरिधर बहादुरास अलाहबाद येथें सामील झाला सय्यदांनीं त्यांजवर मोठी फौज रवाना केली. या फौजेवर महंमदखान बंगश वगैरे सरदार मुख्य होते. गिरिधरसारखा पराक्रमी, अनुभवी व शूर सरदार आणि अलाहबादसारखा महत्वाचा किल्ला जोंपर्यंत आपल्या कबजांत नाहींत तोपर्यंत सय्यदांस चैन पडत नव्हतें. किल्ला कबजांत येईना, तेव्हां सय्यदांनीं

आगऱ्याहून आपल्या भरंवशाचा सरदार रतनचंद यास गिरिधरवर पाठविलें. रतनचंदानें गिरिधरची खासगी रीतीनें भेट घेऊन त्याज· बरोबर सल्ला ठरविला. राजा गिरिधरनें तीस लाख रुपये व अयोध्येचा सुभा घ्यावा आणि अलाहबादचें ठाणें सोडून द्यावें, असा तह ठरून, राजा गिरिधर अयोध्येस गेला आणि रतनचंद सय्यदांकडे आगऱ्यास मे स.१७२०त परत आला. त्या वेळीं महंमदखान बंगशचा भाऊ अहंमदखान याची नेमणूक सय्यदांनीं अलाहबादच्या सुभ्यावर केली. पुढें सय्यदांचा पाडाव झाला. आणि अयोध्येच्या सुभ्यावर बादशहानें सादतखानास नेमिलें. तेव्हां तेथून गिरिधर बहादुराची बदली माळव्यावर बहुधा स. १७२१ त झाली, परंतु निजामही तेथें हक्क सांगत होता. ( Irvine vol. 2 p. 242-248 )

राजा गिरिधरचा वंश.

- दयाराम
  - राजा गिरिधर बहादुर
    - राजाभवानीराम ऊ० चिमणा बहादुर
- छबिलाराम
  - दयाबहादुर

३. चौधरी राव नंदलाल मंडलोई.—इंदूरचे जमीनदार मंडलोई हे गौड ब्राह्मण भारद्वाज गोत्री नर्मदेच्या उत्तर तीरावर मोठे वजनदार असून त्यांच्याच मदतीनें मराठ्यांचा प्रवेश माळव्यांत झाला. यांचें मूळ ठिकाण इंदूर पासून १८ मैलांवर कंपेल नांवाचें गांव असून तें उज्जेन सरकारांत मोडत असे. स. १७२४ च्या सुमारास कंपेल परगणा मोडून इंदुर परगणा झाला इंदुर शहर या मंडलोईनीं प्रथम वसविलें. तेजकरणपुरा, नंदलालपुरा, निहालपुरा, रावजी बाजार, वगैरे इंदुरांतील पुऱ्यांचीं नांवें मंडलोई घराण्यांतल्या पुरुषांवरून पडलीं आहेत. यांनीं इदुरं शहरास तट घातला होता त्याचा अवशेष अद्यापि नदीच्या कांठीं दिसतो.

वंशावळींतील गिरासिया ठाकूर जितसिंग यानें स. १६६२ त बळरामाचा खून केला. त्या वेळीं त्याची बायको गौतमाबाई गरोदर असून बापाकडे पळून गेली. तिला मुलगा झाला तो चूडामण. त्यानें पूर्वीचें गलेलें वतन बादशहाकडून पुनः संपादन केलें. चूडामणचा मुलगा रावनंदलाल हाच पहिला मोठा पराक्रमी पुरुष. माळवा व नेमाड हे दोन प्रांत याजकडे होते, त्याजबद्दल रु. २५००० चा सालाचा वसूल तो बादशहास देत असे तो पुढें हाच वसूल बाजीराव व जयसिं...ले. ...राम व

यांस देऊं लागला. नंदलाल यास बादशहाकडून मिळालेली तलवार अद्यापि त्यांचे घरीं संभाळून ठेविलेली आहे. तेजकर्णाचे वेळेस माळव्यावर मराठ्यांचें स्वामित्व पूर्ण झालें.[1]

मोगल बादशाहीच्या पडत्या काळांत निरनिराळ्या प्रांतांतील वजनदार गृहस्थ कोणत्या ना कोणत्या उपायांनीं स्वतंत्र होऊं लागले, त्या झोंबाझोंबीचा फायदा बाजीराव व त्याचे सल्लागार यांनीं चाणाक्षपणें करून घेतला. गिरिधर बहादुर व दयाबहादुर यांचाही उद्देश स्वतंत्र राज्य संपादण्याचा होता. परंतु रजपूत किंवा मराठे यांपैकीं कोणाचाच स्नेह त्यांनीं ठेविला नाहीं, ह्मणून त्यांचा पाडाव झाला. रजपूत राजे व विशेषतः जयसिंग यांचें संगनमत अगोदरपासूनच मराठ्यांशीं होतें. बादशहाची सत्ता झुगारून देण्याच्या इराद्यानें त्यांनीं मराठ्यांस मुद्दाम माळव्यांत आणिलें. त्या गडबडींत मंडलोईसारखे जमीनदार निरनिराळ्या अधिकाऱ्यांपुढें हैराण होऊन कोणासच वसूल देईनातसे झाले. दयाबहादुरानें तर मंडलोईस इतकें सतविलें, कीं त्याला मराठ्यांचीच कांस धरावी लागली.

**चौधरी राव मंडलोईची वंशावळ.**

१ गणेशदास, कंपेलचा चौधरी स. १६६२.
|
२ बळराम चौधरी—बायको गौतमाबाई.
| मृ. १६६२.
३ चूडामण मृ. १७०१.
|
४ रावनंदलाल मृ. १७३१.
| बायको मेदा बहूजी.
५ रावतेजकर्ण १ला, ज. १७१८.
| मृ. १७५४. बायको फुंडा बहूजी.
६ निहाल कर्ण, जेतकर्ण
| बालकर्ण=बा. भागाबाई
७ रावदुलेराव मृ. १८१५.
८ राव माधवराव. भगवंतराव.
|
९ राव तेजकर्ण दुसरा, स. १८१३–६५.
|
१० निहालकर्ण दुसरा. १८४०–१८७१
| बायको गोजरा बहूजी (हयात)
११ रावछत्रकर्ण ज. १८७१, हयात १९२३.

---

१. ही माहिती रा. भालेराव यांनीं दिली, आणि मंडलोईचीं सुमारें ६२ पत्रें मला पाहण्यास दिलीं तीं अस्सल दिसतात. माळव्यांत मराठ्यांचा जम कसा बसला हें समजण्यास या पत्रांचा उपयोग चांगला होईलसें वाटल्यावरून त्यांतील कांहीं पत्रें व मुद्याचे उतारे पुढें मुद्दाम दिले आहेत. हीं पत्रें दुसरीकडे प्रसिद्ध झालेलीं नसल्यामुळें थोडा विस्तार सहन करूनही पुढें घेतलीं आहेत. हीं सर्व पत्रें बुना-

हेतु इतकाच, कीं वसूल देण्याची फरज पडूं नये. परंतु शेवटीं मराठ्यांनींही त्यांना चेपलेंच. नर्मदेचे उतार मंडलोईच्या ताब्यांत होते, त्यांचा उपयोग त्यानें मराठ्यांस करून दिला. या मंडलोईस वश करण्याचें काम मल्हारराव होळकर व उदाजी पवार यांनीं केलें. नंदलाल व जयसिंग यांचा स्नेह होता. होळकराचा नंदलालशीं झालेला पत्रव्यवहार स.१७२० पासूनचा उपलब्ध आहे, त्यावरून माळवा प्रांत जिंकण्याचा उद्योग बाळाजी विश्वनाथाचे हयातींतच होळकरानें सुरू केला असें दिसतें. स. १७२३–२४ चे दरम्यान मल्हाररावानें इंदुरास ठाणें दिलें, व उदाजी पवारानें धारचा कबजा घेतला. रघूजी व कान्होजी भोसल्यांचा डोळा माळव्यावर होता, त्यास बाजीरावानें जरब देऊन ठेविलें. ' हल्लीं नंदलाल मंडलोई मरण पावले, ' असा उल्लेख ३·११·१७३१ च्या पत्रांत आहे. त्या प्रसंगीं त्याच्या पुत्रांचें समाधान करून बाजीराव व चिमाजी आपा यांनीं त्यांचें पुढें यथायोग्य चालविण्याविषयीं अभिवचन दिलें आहे. मल्हारराव होळकरानें तेजकर्णास बहुमान पालखी देऊन त्याच्या नेमणुकीबद्दल सालाचे रु. ७०० द्यावे असा ता. १३·८·१७४९ रोजीं कमाविसदारास हुकूम काढिला. तसेंच मंडलोईचा वाडा मराठ्यांच्या कमाविसदारांनीं आपल्या वास्तव्यास घेतला होता, तो त्यांस परत देऊन, त्यांचें निरंतर यथास्थित चालविण्याचें अभिवचनही मल्हाररावानें लिहून दिलेलें आहे. स. १७२० पासून मल्हाररावाबरोबर नारोशंकराचें नांवही माळव्याचे उद्योगांत आढळतें. नारोशंकर प्रथम उदाजी पवाराचे दिमतीस असून, स. १७३० पासून त्याची दिंमत होळकराकडे झाली. यावरून त्याच सालीं बाजीरावानें उदाजीस बडतर्फ केलें हें उघड होतें. नारोशंकरानें लोकांस हैराण केल्यावरून, त्यास कारभारावरून दूर केल्याचा उल्लेख ६·११·१७३२ च्या पत्रांत आहे. नारोशंकराचे जागीं बाबूजी नाईक याची नेमणूक कांहीं काळ झाली होती. मुलूखगिरीचीं क्षेत्रें शाहूनें निरनिराळ्या सरदारांस वांटून दिलीं, त्यांत माळवा प्रांत बाजीरावाकडे होता. माळव्यांत तुम्हीं वसूल वगैरे घेऊं नये, अशा सक्त ताकिदी शाहूनें दाभाडे व कंठाजी कदम यांस दिलेल्या आहेत. स. १७२९ त नंदलाल मंडलोईस बाजीरावानें चांगली जरब

---

बट आहेत असे आक्षेप आहेत, ते मला पटत नाहींत. कांहीं पत्रें रा. श्री. वि. आठल्ये यांजकडूनही मिळालीं आहेत.

दिली आहे. त्याच सालापासून राणोजी शिंद्याचेंही नांव तिकडील उद्योगांत आढळतें. सन १७३१ नंतर होळकर व शिंदे या दोघांसच बाजीरावानें उद्योगावर ठेवून इतरांस तेथून काढिलें. स.१७५८चें पत्र पाहतां माळवा प्रांत स्वराज्यादाखल मराठ्यांचे कबजांत आला होता असें दिसतें (खं.६-५८३-६२४.)

नंदलाल मंडलोईप्रमाणेंच बढवाणीचा ठाकूर अनूपसिंग मराठ्यांस सामिल झाला होता. त्याची व बाजीरावाची भेट स. १७२३ च्या जानेवारींत झाली. त्याच्या मुलखास उपद्रव देऊं नये असें आज्ञापत्र शाहूनें सन १७३५ त उदाजी पवार व मल्हारराव होळकर यांस काढिलेलें आहे. (शा. रो. २०२ व २४१.)

४. सारंगपुरची लढाई,राजा गिरिधरचा पाडाव, (सर१७२४?). युद्ध व कारस्थान या दोनही मार्गांनीं बाजीरावाचा उपक्रम माळव्यांत चालू होता. निजामास अडविण्याच्या हेतूनें राजा गिरिधरची नेमणूक बादशहानें माळव्यावर केली असून, त्यास बहुधा जयसिंग व अजितसिंग यांचें साह्य होतें. वास्तविक आग्रा व माळवा ह्या दोनही सुभ्यांची व्यवस्था बादशहानें जयसिंगाचे हवालीं केली होती. पैकीं आग्रा प्रांत जयपुरास लागून असल्यामुळें तो जयसिंगानें आपल्याकडे घेतला, आणि माळव्यावर राजा गिरिधर यास आणिलें. ( आर्व्हिन ). परंतु गिरिधर जयसिंगाचे विरुद्ध वागूं लागला, तेव्हां त्यानें मंडलोई वगैरेंच्या मार्फत मराठ्यांशीं बोलणें करून, त्यांजकरवीं माळव्यावर स्वारी करविली. जयसिंगाचें पाठबळ नसतें तर मराठ्यांचा रिघाव तेथें सुलभ रीतीनें झाला नसता. जयसिंगाचे मार्फत माळव्याची चौथाई संपादन करावी असा बाजीरावाचा घाट होता, तो सिद्धीस जाण्यास पुष्कळ अवधि लागला. स. १७२५ त माळव्याचा विभाग करण्यांत आला. मंडलोईच्या मार्फत मराठ्यांची फौज माळव्यांत येऊं लागली, तेव्हां त्यांचा व राजा गिरिधर ह्यांचा सामना जुंपला. यांत चिमाजी आपा व मल्हारराव होळकर प्रमुख होते. देवासच्या ईशान्येस सुमारें पन्नास मैलांवर पार्वती नदीचे कांठीं सारंगपुर ठिकाणीं हल्लीं देवास संस्थानचा एक तालुका आहे, तेथें राजा गिरिधरचें वास्तव्य होतें. चिमाजी आपानें त्याजवर अचानक हल्ला करून त्यास ठार मारिलें. ही सारंगपुरची लढाई स. १७२४ त झाली असावी. तींत मराठ्यांकडे उदाजी पवार व चिमणाजी दामोदर हजर होते. उज्जन येथें तट आहे त्यास राजा गिरिधरचें

नांव चाललें. लगेच बादशहानें त्याचे जागीं प्रथम त्याचा मुलगा भवानीराम व नंतर त्याचा चुलत भाऊ दयाबहादुर यांची नेमणूक केली.*

**५. तिरलाची लढाई दयाबहादुराचा पाडाव, ( १२-१०-१७३१ ).** राजागिरिधर पडल्यावर दोन वर्षेंपावेतों स्वतः बाजीरावास निजामाशीं झगडावें लागल्यामुळें माळव्याकडे लक्ष देण्यास फावलें नाहीं. शिंदे, होळकर, पवार हे तिकडे वावरतच होते. स. १७२८-२९ त पुनः तिकडचा उद्योग हातीं घेण्यांत आला. स. १७२८चे ऑक्टोबरांत चिमाजी आपानें माळव्यांत स्वारी करून दयाबहादुरास ठार मारल्याचे उल्लेख शकावलींतून आहेत. चिमाजीनें माळव्यावर अनेक स्वाऱ्या लागोपाठ केल्या असाव्या.दयाबहादुर १२-१०-१७३१रोजीं मारला गेला असें पुढें एका पत्रांत स्पष्ट आहे. ' दयाबहादुरचा पराभव करून आजच पुण्यास आलों, ' असें चिमाजी आपा २४-४-१७३० रोजीं लिहितो. तेव्हां चिमाजीनें त्याजवर स. १७३० त व ३१ त अशा दोन स्वाऱ्या केल्या हें उघड होतें. दयाबहादुर सुभा झाल्यावर त्यानें मंडलोई वगैरे मंडळीस आपल्या बाजूस वळविण्याचे काय काय प्रयत्न केले, मराठ्यांचे बाजूस होळकर, बाजीराव वगैरेंचीं कारस्थानें कशीं चाललीं होतीं, आणि जयसिंगाचे साह्यामुळेंच शेवटीं मराठ्यांस जय कसा मिळाला, हे प्रकार अस्सल पत्रांनींच स्पष्ट दिसतात.

नंदलाल मंडलोईस उदाजी पवाराचें पत्र. प्र॥ भा॥ अंमलदार जाऊन दीड दोन महिने जाले;अद्याप अंमल चालत नाहीं व कांहीं देखरेख करीत नाहीं ह्मणोन विदित जालें. तरी ते गोष्ट तुह्मां योग्य आहे ऐसें नाहीं. माळवे प्रांतांत हरएक-विशीं भरंवसा तुमचा असतां अद्याप अंमल चालत नाहीं, हें उत्तम नाहीं. तुमचा आमचा स्नेह आहे याजकरितां ल्याहावें लागतें. नाहीं तरी अंमल हरप्रकारें चालेल, राहतो ऐसें नाहीं. तुह्मी ह्मणाल कीं अवांतर पां॥ अंमल

* ' राजासाहेब गिरिधर बहादुरोनें पातशहाके मदतगार होकर हमारे भाई चिमणाजी आपासे लडे, ये शके १६४६ के सालमें सारंगपुर मुकामपर रणमें जूझ गये '. असा बाजीरावाचा उल्लेख जयसिंगाचे एका पत्रांत आहे. पुरुषोत्तम-कृत अहल्याबाईचे चरित्रांत स १७२४ हें लढाईचें साल तपासून दिलें आहे असें दिसतें. बाजीरावाचे पत्रांतला उतारा लेखक देत असल्यामुळें शक आहे तोच बरोबर आहे. संवत् असण्याचें कारण नाहीं. (शा. रो. १०५.)

नाहीं. तरी तेथेंही अंमल बसविला जाईल. मालवाप्रांत आपला आहे. येथेंही अंमल न चाले ऐसें काय आहे ? सख्यत्वेंकरून अंमल दिल्हा तरी उत्तमच आहे. हरकोणी सुप्रवर्तोन वर्तेल त्याचें ऊर्जित होईल, नाहीं तरी विचार कळतच आहे. तुह्मी तों सर्व गोष्टींनें सुज्ञ आहां, ल्याहावें ऐसें नाहीं. तरी राजश्री नारोशंकर यांस अंमल कुलबाब कुलकानू सुरळीत देणें. उजूर एकंदर न करणें. जाणिजे. छ २९ मोहेरम सल्लासैन मयातअलफ. येविशीं तुम्हांस दोन तीन पत्रें पाठविलीं परंतु एकही उत्तर न आलें. तरी या पत्राचें उत्तर पाठवून देणें. जाणिजे. ( ता. १४–८–१७२९ ).

नंदलाल मंडलोई यांसी–बाजीराव बल्लाळ प्रधान. सु॥ सल्लासीन मया व आलफ रा. कुसाजी गणेश हुजूर आले. त्यांणीं कितेक अर्थ निवेदन केला, त्यावरून सविस्तर कळलें. ऐशियासी आमची स्वारी ते प्रांतें सत्वरीच आहे. माळवियाच्या बंदोबस्ताचा अर्थ रा. लाला हरनाराण यांणीं लिहिला व जबानी सांगोन पाठविला होता. त्यास प्रांतम॥ चा बंदोबस्त जालियां रयत निरुपद्रवी राहून दुतर्फा किफायतच आहे. एतद्विषयीं येथून उज्जनच्या सुभ्यास व लाला हरनारायेण यास कितेक अर्थ लेख करून पत्रें पाठविलीं व जबानी म॥रानिल्हे सांगतील. तरी तुह्मी त्यांस विचाराच्या चार गोष्टी सांगोन मुल्काचा तह करून दुतर्फा कमावीस सुरळीत चालविणें. जरी हे गोष्टी त्याचे विचारास न ये, तरी आह्मी ते प्रांतें येतच आहों. आमची फौज तिकडे आलियावर मुलूख सप्रयुक्त राहातोसा नाहीं. खराब होईल. वरकड कितेक अर्थ म॥रानिल्हे तुह्मांस सांगतील त्याजवरून कळेल. सारांश, तुह्मी मातबर कार्यकर्ते एकनिष्ठ आहां. हरएक विचारास चुकतां असें नाहीं. तुमचें सर्व प्रकारें अगत्य आहे, तदनुरूप बलाइस होणें तें होईल. आपला खातरजमा असों देणें. आमची स्वारी रेवातीरास येतांच तुह्मी मातबर मनुष्य हुजूर पाठवून देणें; व त्यांजकडील मातबर मनुष्य ब॥ घेऊन तुह्मीच रेवातीरीं भेटीस येणें. जाणिजे छ १९ रबिलावल. ( ३·१०·१७२९ ).

सिदेश्री १०८ महाराज धर्ममूर्ति रावनंदलालजी प्रमुख्य मुख्य सरदार प्रांत माळवा सवस्थान इंदोर, जोग श्री अवंतिकासे लेखक दयाबहादुरकृत श्री प्रमाण पोंचे. विनंति है के. मालवाका राजा महाराज श्रीगिरिधर बहादुरके खानदीनमें प्राचीन राज्य चला आया. ये सन ११३२ में मालवी सालमें दखनके

मराठे सरदार माळवामें आये, और जंग हुवा, लडाईयां ली, परमेश्वरकृपासे, सारंगपुर मुकामपर परमधाम गये. पीछे उसी जगे आप हो, ऐसा हम समझकर, दखनवालेसे बदला लेना इस वास्ते मैं दिल्ली जाकर पातशासाबसे अरजकर सुभेका अधिकार ले आया हूं. मेरे सुननेमें आया है कि आप मेरेसे बहुत नाराज होकर सवाइ जेसिंग महाराजासे सला करते हो के मराठे सरदारको मालवेमें लाकर प्रमुख करना, और निजाम साबको जेर करना, एसा विचार करते हो, तो ये कैसा होगा ! पातशाकी पुन्याई क्या कम है नहीं. मैं आपकी मरजी के माफीक सब बंदोबस्त करनेवाला हूं. दखनवालेसे वैर लेनेमें आवेगा. आप दाना सरदार हो इसवास्ते, कानुनगो नरहरदासजी व मयारामजी जोसी वकीलकू यां बुलाकर, ये सब मजकुर कहेकर समझा दिये है. आपको कहेंगे, और पत्र वांचनेसेभी मालूम होगा. सब ध्यानमें लाकर उत्तर मेहेरबानीसें लिखें. १५ जमादिल अवल सल्लासीनमया व आलफ. ( २६·१०·१७२९ ).

ता. २३·३·१७३१ चें दया बहादुरचें चौधरी नंदलाल यांसपत्र. सन साल गुदस्त ता. १५ जमादिलावल का खत नरहरदासजी मयारामजी जोसी वकील इनोके हाथ भेजा वो पोंचा, जुबानी सब मजकूर आपकू कह्या, फेर बी आपके दिलमें जो आटी हमारे निसबत है, उसकी सफाई न की, और किसी तरे आप दुशमनो को लानेके वास्ते दखन पत्रव्यवहार कर रहे हो,और कुलमालवेके सरदारोंका दिल आपने आपनी मुठीमें लेकर,बादशाहा गारद होना,ये सल्ला विचारी तो, ये बात आप दाना सरदारके लायक नहीं. आपके मरजी माफीक सब सरदारोंका बंदोबस्त, आप जैसा चाहोगे वैसाही होगा, पर आप बेरीओंसे सलुक मत करो. और हम सुनते है की आप मालवे के नाके घाटे बंद कर, पचास हजार फौजका जमाव करते हो, तो इसका क्या कारन ? आपसे मे मिलनेकी इच्छा करताहूं. आप उज्जेन पधारो, या में इंदोर जाऊं. छ २५ रमजान. इहिदे सल्लासीन मया व आलफ.

ता. ६·४·१७३१ चें पत्र दयाबहादुरकडून चौधरी नंदलाल यास. ता. २५ रमजान सन गुदस्तका आपके तरफ पत्र भेजा और मिलनेकी इच्छा की, परंतु उसका जबाब न भेजनेसे मिलना भी हुवा नहीं, इससे आपके दिलको मतलब नहिं मालुम पडता. और आप पत्रसेभी नहीं मालुम

करते, इससे मेरे दिलमें बहोतसे शक पैदा होते है. पहेले तो मेरेपर इतराजी, दुसरे मराठेको लडनेका मालूम होता है, और इस लिये आप जमाव कर रहे हो. एसी आपकू क्या भीड की दुशमानोंसे सल्ला करना ! ये सब नरहरदासजी कानुंगो आपकू समझाकर कहेंगे, वो ध्यानमें लाकर ये जलदी मालवेमेंसे गलबा उठा लो ऐसी मेरी विनंती है. छ९ माहे सवाल,इहिदे सलासीन मया व आलफ.

ता. २५ माहे जिल्हेज इसने सलासीन मयाव आलफ.(ता.२०.६.१७३१)चें रावनंदलालजी यांचे नांवें पत्र. आपला पत्र सवाई जैसिंगमहाराज यांचें घेऊन मयाराम जोशी वकील बऱ्हाणपुर येथें भेटले. सर्व मजकूर मदतीचे कळवून, नालछा व मांडव मुक्कामीं जमाव मदतीचे आहेत, दयाबहादुरच्या जुलमामुळें जमीदार व प्रजा नाराज, म्हणोन आमची खात्री केली. त्यास आम्ही निघून रेवातीरीं आलों आहों. नेमाड इलाख्यांतील चौधरी, कानुंगो, पांच हजार जमाव आपलेकडील मदतीचा आल्यानें मोठी खुशी जाहली. जाणिजे.

ता. १०.१०.१७३१ चें पत्र दयाबहादुराकडून नंदलालजीस. तिरलासे दयाबदुर मुभाके प्रणाम पोंचे. ता. १८ के पत्र मुकाम मांडवेसे आया. लिखा है, की रावसाहेबके सरदार भाई बेटेनें मरेठी फौज निकाल कर दुसरे घाट चढाली, और ये लोग सामनेमें रहे, इस्से इनके सरदार और भाइ बेटे अच्छे बहोतसे घाटपर मारे गये, इनकी तपसीलभी लिखी आयी हैं, सो, आपको लिखने हे की, ऐसा आपको क्या अडा है, मेरेठेको बचाना, और आपने भाइ बेटे सरदार मारवाना, और दुशमानोंको मुलूख दिलवाना, ये क्या बात और क्या बिचारमें फरक आया है ? अवये भाई बेटेकी हानी हुवी इसका ओर मालकके घरमें निमकहरामी हुई, कोण बिचार करेंगा, ऐसा सब सोच कर, पांच आपके सरदारोंसे सला मिला कर, आपना मालवदेश दुसरेके हाथमें मत दो. इश्वर करेंगा, तो महाराजा साहेब गिरधर बहादुरकी फिर गादी स्थापित हो जावेगी, बंश कुछ डुबा नहीं है. आपके उन्हके स्थाइक प्रधान हो, पर वैरी दुश्मनो लानेसे, ओर आप सवाई जेसिंग महाराजकी एसी सल्ला होनेसे, कुछ न होगा, ओर आप इनको मदत मत करो, ये मेरी आखीर बिनंति है. ता.०१९ रबिलाखर, सुरुसन इसन्नेसल्लासीन मया व आलफ.

ता.२६-१०-१७३१चें जयसिंगाचें नंदलाल मंडलोईस पत्र.मालवेकी हकीकत आपकी तरफसु लिखी आईथी वो सब मालूम हुवी. और ता. २९ रबिलाखरका पत्र राजश्री बाजीराव बल्लाल पेशवा प्रधान दखनसु लिख्यो की, आपके संकल्पके माफिक ता. २१ के रोज ( १२-१०-१७३१ ) मालवेमें फत्ते हुई, ओर दया बहादुर सुबा रणमें काम आया. इसमें रावसाहेबजी व ठाकर नरहरदासजी व मयारामजी वकील, इनमें आपने तनमनधनसे भाई बेटे सरदार सुदामत दी,परंतु मांडव घाटपर पादशाका सुबाने ऐसा बंदोबस्त करा था,की रस्तेमें तीन सुरंग लगाई थी, ओर फोज पचीस हजार तयार थी, घाट चढते मेरेठी फौज बहोतसी मरने लगी, ओर जरासे कदम उपर चढे तो मांडववाले सुरंग दागें, तो कुल फोज गारद होवे. ऐसे मोकेपर रावसाहेबनें खबर दी, ओर मांडव घाटका रस्ता बदला कर, दूसरे रस्ते भेरों घाटसे फौज चढा ली, ओर अपने भाई बेटे व सरदारोंको घाटपर सुरंगमें उडाये, ओर मुकाबलमें कट गये. बहोतसी मदत करी के उसका हाल लिख नहीं सकता. ऐसा लिखा आया सो आपकुं लिखते हैं, कि ये बात आपने तपसीलवार लिखी नहीं. हजार शाबास है के फकत हमारे कोलके ऊपर आप सब मालवे सरदार रेहेकर, अपना धर्मका कल्यान होना, ओर मालवेमें धरमकी वृद्धि होना, ये बात बिचारकर मालवेमेंसे मुसलमानोंकू नापद किये, ओर धर्म कायम रखा, हमारा मनोरथ आपने पुरा किया, इसबद्दल हमने पेशवाकों लिखा है की, आपके मरजीके माफीक मालवेके सब सरदारोंका बंदोबस्त अच्छा होगा, जेसा तुम इनकूं बहादरीसे लाये हो, इसी माफक उनका मालवेमें जमाव डालना, ऐसा न हो की इनके पाव पहिले सरीके उठ जावें, तीन वखत मालवेमें आन कर पीछे गये कुछ मिला नहीं, सो इसका पूरा बिचार, ओर दूरंदेश बिचार समजना, जादा आपकु लिखनेमें आता नहीं. आप दाना सरदार हो तारीख ५ जमादिल अव्वल, सन इसने सलसीन मया व आलफ.

ता. ६-८-१७३२चें पत्र. महाराव भाईनंदलालजी प्रधान व ठाकर नरहरदासजी कानुनगो सवस्थान इंदोर. योगश्री जेपुरसे श्रीमहाराजा सवाई जेसिंगजीकृत प्रमाण बंचना. अत्रकुशल, श्रीजीकी कृपासे चाहिजेजी. औपरंच हकीकत ऐसीके. ता. ५ जमादिल आवल सन गुदस्तका पत्र आपकु लिखाथा की जैसे आप मल्हारराव्जी होळकर व राणोजी सिंदे कुल दखनसे वकील भेजकर

बुलाये, और आपने भाई बेटे सरदार हजारों आदमी कटाकर इनकू मालवेमें स्थापित किये, ओर हमारे लिखनेपर इनकूं पुरी मदत देकर टांकेंदारोंसे और महालोंसे वसूल पोला सुरू करा दिया. ये खबर दिल्लीके दरबारमें पोहोंचनेसे बादशा सलामत हमसे बहोत नाराज होकर लिखी है की, रावसाहेबने कुल मालवेके सरदारोंका दिल आपने हातमें लेकर आप उनसे मिले, इससे हमारा सुभा गारद करवाया, और, मुल्क दुश्मनोंको दिलवाकर, तोजी करा दी, तो कुछ फिकर नहीं, इसका बदला सबको मिलेगा, और मरेठे तीन दफे मालवेमें आये, ओर मारकर निकाल दिये. एसा फिर उसीमाफिक सजा होकर निकाले जाते हैं. समालो, यहांसे चढाईकी तारीख मुकर्रर है. एसा लिखा आया सो हमने प्रधान बाजीरावजीको लिखा. उसपरसे बाजीरावजी पेशवा लिखते हैं की ये सब मालवेमें हमारा जमाव डालना, ये काम प्रधान रावनंदलालजी ठाकोर नरहरदासजी ओर उनके सरदारोंका है. इन्होंका मालवेमें हक, प्रधानी, चोधरात, व चोथान कानुनगोई, व भाईबेटे हकदार जो, मालवेमें हैं, उनके सवस्थानोंका हक महाराजा गिरिधर बहादुरके खानदानसे मिला हुवा चला आया, वो निर्वेध हम चलाके जास्ती परवरसी करेंगे. दुसरे रावसाहेबसे एसा कोल है की, राजासाहेब गिरिधर बहादुर ये मालवेके मालवीराजा, इनोंनें पादशाके मदतगार होकर हमारे भाई चिमाजी आपासे लडे, ये शके १६४६ के सालमें सारंगपुर मुकामपर रणमें जूझ गये, इनके वंशमें मालवेका जो उत्पन्न आताथा, उसका हिसाब हमनें देखा. उनकी गादी कायम करके वेसाही बंदोबस्त चलावेंगे, एसा श्रीनर्मदाके तीरपर कोल है, ऐसा लिखा आया. सो आपको लिखते हैं की बादशाने चढाई की है,तो कुछ चिंता नाहीं.श्रीपरमात्मा पार लगावेगा. बाजीरावजी पेशवासे हमनें आपके निसबत धर्मकर्म कोल वचन कर लिया है. अब किसी तरेका शक न रखते, इनका जमाव मालवेमें अच्छी तरेसे डालना मालवेका बंदोबस्त सब आपके भरोसे है. ता. २५ सफर, सल्लास सलासीन मया व आलफ.[१]

---

१ हें पत्र ६·८·१७३२ चें नंदलालांस जयसिंगानें लिहिलेलें आहे. नंदलाल ३·११·१७३१ चे पूर्वी वारला, त्याची खबर जयसिंगास नसावी हें संभवनीय नाहीं. परंतु तेवढ्यावरून पत्र बनावट म्हणतां येत नाहीं. नकलकाराची कांहीं

ता.२६-१०.१७३१चें जयसिंगाचें नंदलाल मंडलोईस पत्र.मालवेकी हकीकत आपकी तरफसु लिखी आईथी वो सब मालूम हुवी. और ता. २९ रबिलाखरका पत्र राजश्री बाजीराव बल्लाल पेशवा प्रधान दखनसु लिख्यो की, आपके संकल्पके माफिक ता. २१ के रोज ( १२.१०.१७३१ ) मालवेमें फत्ते हुई, ओर दया बहादुर सुबा रणमें काम आया. इसमें रावसाहेबजी व ठाकर नरहरदासजी व मयारामजी वकील, इनमें आपने तनमनधनसे भाई बेटे सरदार सुदामत दी,परंतु मांडव घाटपर पादशाका सुबाने ऐसा बंदोबस्त करा था,की रस्तेमें तीन सुरंग लगाई थी, ओर फोज पचीस हजार तयार थी, घाट चढते मेरेठी फौज बहोतसी मरने लगी, ओर जरासो कदम उपर चढे तो मांडववाले सुरंग दागें, तो कुल फोज गारद होवे. ऐसे मोकेपर रावसाहेबनें खबर दी, ओर मांडव घाटका रस्ता बदला कर, दूसरे रस्ते भेरों घाटसे फौज चढा ली, ओर अपने भाई बेटे व सरदारोंको घाटपर सुरंगमें उडाये, ओर मुकाबलमें कट गये. बहोतसी मदत करी के उसका हाल लिख नहीं सकता. ऐसा लिखा आया सो आपकुं लिखते हैं, कि ये बात आपने तपसीलवार लिखी नहीं. हजार शाबास है के फकत हमारे कोलके ऊपर आप सब मालवे सरदार रेहेकर, अपना धर्मका कल्यान होना, ओर मालवेमें धरमकी वृद्धि होना, ये बात बिचारकर मालवेमेंसे मुसलमानोंकू नापद किये, ओर धर्म कायम रखा, हमारा मनोरथ आपने पुरा किया, इसबद्दल हमने पेशवाकों लिखा है की, आपके मरजीके माफीक मालवेके सब सरदारोंका बंदोबस्त अच्छा होगा, जेसा तुम इनकूं बहादरीसे लाये हो, इसी माफक उनका मालवेमें जमाव डालना, ऐसा न हो की इनके पाव पहिले सरीके उठ जावें, तीन वखत मालवेमें आन कर पीछे गये कुछ मिला नहीं, सो इसका पूरा बिचार, ओर दूरंदेश बिचार समजना, जादा आपकु लिखनेमें आता नहीं. आप दाना सरदार हो तारीख ५ जमादिल अव्वल, सन इसन्ने सलसीन मया व आलफ.

ता. ६.८.१७३२चें पत्र. महाराव भाईनंदलालजी प्रधान व ठाकर नरहरदासजी कानुनगो सवस्थान इंदोर. योगश्री जेपुरसे श्रीमहाराजा सवाई जेसिंगजीकृत प्रमाण बंचना. अत्रकुशल, श्रीजीकी कृपासे चाहिजेजी. ओपरंच हकीकत ऐसीके. ता. ५ जमादिल आवल सन गुदस्तका पत्र आपकु लिखाथा की जेसे आप मल्हारराबजी होळकर व राणोजी सिंदे कुल दखनसे वकील भेजकर

बुलाये, और आपने भाई बेटे सरदार हजारों आदमी कटाकर इनकू मालवेमें स्थापित किये, ओर हमारे लिखनेपर इनकूं पुरी मदत देकर टांकेंदारोंसे और महालोंसे वसूल पोत्ता सुरू करा दिया. ये खबर दिल्लीके दरबारमें पोहोंचनेसे बादशा सलामत हमसे बहोत नाराज होकर लिखी है की, रावसाहेबने कुल मालवेके सरदारोंका दिल आपने हातमें लेकर आप उनसे मिले, इससे हमारा सुभा गारद करवाया, और, मुल्लक दुश्मनोंको दिलवाकर, तोजी करा दी, तो कुछ फिकर नहीं, इसका बदला सबको मिलेगा, और मरेठे तीन दफे मालवेमें आये, ओर मारकर निकाल दिये. एसा फिर उसीमाफिक सजा होकर निकाले जाते हैं. समालो, यहांसे चढाईकी तारीख मुकर्रर है. एसा लिखा आया सो हमने प्रधान बाजीरावजीको लिखा उसपरसे बाजीरावजी पेशवा लिखते हैं की ये सब मालवेमें हमारा जमाव डालना, ये काम प्रधान रावनंदलालजी ठाकोर नरहरदासजी ओर उनके सरदारोंका है. इन्होंका मालवेमें हक, प्रधानी, चोधरात, व चोथान कानुनगोई, व भाईबेटे हकदार जो, मालवेमें हैं, उनके सवस्थानोंका हक महाराजा गिरिधर बहादुरके खानदानसे मिला हुवा चला आया, वो निर्वेध हम चलाके जास्ती परवरसी करेंगे. दुसरे रावसाहेबसे एसा कोल है की, राजासाहेब गिरिधर बहादुर ये मालवेके मालवीराजा, इनोनें पादशाके मदतगार होकर हमारे भाई चिमाजी आपासे लडे, ये शके १६४६ के सालमें सारंगपुर मुकामपर रणमें जूझ गये, इनके वंशमें मालवेका जो उत्पन्न आताथा, उसका हिसाब हमनें देखा. उनकी गादी कायम करके वेसाही बंदोबस्त चलावेंगे, एसा श्रीनर्मदाके तीरपर कोल है, ऐसा लिखा आया. सो आपको लिखते हैं की बादशाने चढाई की है,तो कुछ चिंता नाहीं.श्रीपरमात्मा पार लगावेगा. बाजीरावजी पेशवासे हमनें आपके निसबत धर्मकर्म कोल वचन कर लिया है. अब किसी तरेका शक न रखते, इनका जमाव मालवेमें अच्छी तरेसे डालना मालवेका बंदोबस्त सब आपके भरोसे है. ता. २५ सफर, सल्लास सलासीन मया व आलफ.[१]

१ हें पत्र ६.८.१७३२ चें नंदलालांस जयसिंगानें लिहिलेलें आहे. नंदलाल ३.११.१७३१ चे पूर्वी वारला, त्याची खबर जयसिंगास नसावी हें संभवनीय नाहीं. परंतु तेवढ्यावरून पत्र बनावट म्हणतां येत नाहीं. नकलकाराची कांहीं

ह्या युद्धांत होळकराचा सरदार बोळे ऊर्फ बुळे यानें विशेष पराक्रम केल्यामुळे तो पुढें इंदुरास प्रसिद्धीस आला. 'रजपूत रजवाडे यांचा इरादा कसेंही करून सर्वांनी एक दिल बादशाहीस धक्का द्यावा; सवाई जयसिंगास पुढें करून दक्षण घोडींवाले यांस बगलेंत घेऊन देवदर्शनाचे मिसें उज्जनीस आले. तुह्मी जुवांमर्दीने इरादा धरला आहे, त्यापक्षीं तुम्हांस तमाम राजे रजवाडे लहान मोठे सामील करून देऊं. दयाबहादूर सुभा उज्जन पातशाई आहेत, त्याचें पारिपत्य करून धारा उज्जन येथें अंमल तुमचा होऊन पुढें चाल चालू झाली, म्हणजे एक समयावच्छिन्न लहान मोठे रजवाड्यांचे वकील तुम्हापाशीं आणितों. अशी मसलत करून इंदुरचे जमीदार मल्हारजीकडे पाठविले. मल्हारजी व बाजीराव यांनीं मसलत करून बाजीरावास माघारे पुण्यास रवाना करून, आपण सर्व घोडा राऊत मर्दाना उतरावयाचे उद्देशांत, तों नंदलाल मंडलोई दोनशें स्वार निशीं येऊन दाखल झाले. भेटी जाल्या. सवाई जयसिंगानीं रवानगी करतेसमयी जे पर्याय बोलण्यांत आले ते सर्व बोलून आशा दुराशाही विशेष दाखविली, त्या मल्हारजींनीं आज्ञा केली, आह्मांस घांटातील वाट निटोप्याची दाखवावी. दोन प्रहरचे संधीस आम्हांस त्यांजवर नेऊन सोडावें. इकडे दयाबहादुर धार मुक्कामीं येऊन घाटाचा बंदोबस्त करून होते. परंतु इंदूरकर जमीदार बढवार्णाकर या उभयतांनीं अनोळखी घाटवाट काढून, सुभ्याकडील बंदोबस्त जागचे जागींच राहून, नर्मदा उतरून, सूर्योदयापूर्वी घांट चढोन गेले. उदाजी पवारही त्याच वाटेनें उतरून घांटावर होळकरास सामील झाले. उन्हाळ्यांत चैत्राचे दिवस. अदकोशावरून हरहर महादेव करून घोडे घातले. बाहेर बाहेर एकसद्दा कत्तल केली. तोफखाना आपलासा केला. पायबळ कडब्यासारखे कापलें. दयाबहादुर पांच हजार स्वार घेऊन आला, ते नाहींसे करून, दयाबहादुराचें डोकें हत्तीवर कापलें. विठोजी बुळे याजपाशीं दोन हजार स्वार मागें ठेवून मल्हारराव आठ हजार स्वारांनिशीं उज्जनीस येऊन अंमल चालू केला. कांहीं एक अवघड पडलें नाहीं. एवढा सुभा छाप्यांत बुडविला. ह्या दक्षण्यांचा बेत काळ श्रीमंतांचीं प्रताप मल्हारजीच्या तलवारीचा. तों रजवाड्यांचे वकील आले'

चूक असेल. मुसलमानांचा पाडाव करण्यांत मराठे रजपुतांचें धार्मिक ऐक्य किती होतें हें वरील पत्रांवरून स्पष्ट दिसून येतें.

येथें वकिलांचीं बोलणीं होऊन बाजीराव यांजला समागमें घेऊन माळव्यांत आले. सवाई जयसिंगाचे विचारें दिल्लीचे आसपास धुमाकूळ उडविला. जाळपोळ अशी केली कीं दिल्लीचे बाहेर चाळीस कोस ना दिवा ना बत्ती. कुंजपुरा लुटला. फौजेंत सुवर्णाचा संग्रह झाला. बादशाही हालवून माघारे फिरले. सवाई जयसिंग, बाजीराव व होळकर यांच्या भेटी झाल्या. जयसिंगाजवळून तीस लाख रु. घेतले. तेथून निघोन देशांत आले."[१]

नंदलाल मंडलोईच्या वंशजांकडून माल्कमसाहेबास माहिती मिळाली ती अशी, कीं महंमदशहाच्या कारकीर्दीत मुलखांत फार अंदाधुंदी माजली. दयाबहादूर माळव्याचा सुभेदार होता. राज्यकारभारांत अव्यवस्था झाल्याबरोबर शेतकरी रयतेची मोठी आबाळ होऊं लागली. पाहिजे त्यानें यावें आणि रयतेकडून पैसा उकळावा असा प्रकार चालू झाला. दयाबहादूर व त्याच्या हाताखालचे मुनीम यांनीं रयतेस इतकें पिळून काढिलें, कीं माळव्यांतील ठाकूर व जमीनदार हे बादशहाकडे दाद मागून मागून थकले. सरकारांत आपली दाद लागत नाहीं असें पाहून, ते जयपूरचा राजा सवाई जयसिंग यास शरण गेले. जयसिंग मोठा पराक्रमी व धूर्त होता. इतर रजपुत राजांप्रमाणें तो बादशहाविरुद्ध उघडपणें उठला नव्हता. परंतु दरबारांत त्याची चहा होत नसल्यामुळें त्यानें बाजीराव पेशव्याशीं स्नेह जोडला. त्यानें माळव्यांतील ठाकरांस अशी सल्ला दिली, कीं तुम्ही मराठ्यांना बोलवा, म्हणजे ते तुमची दाद घेतील. माळव्यांतील ठाकरांत इंदूरचा जमीनदार राव नंदलाल चौधरी हा प्रमुख व मातबर सरदार असून, त्याजपाशीं दोन हजार फौज चांगली तयार होती. त्याजकडेसच नर्मदेवरील उतारांचा बंदोबस्त ठेवण्याचें काम होतें. जयसिंगाच्या सल्ल्यानें नंदलालानें बाजीरावाशीं बोलणें सुरू केलें. बाजीरावाची फौज बऱ्हाणपुर नजीक छावणी देऊन राहिलेली होती. तिच्या आघाडीबर मल्हारराव होळकर बारा हजार फौजेनिशीं जय्यद तयारीनें होता. राव नंदलाल यानें मल्हारराव होळकर याजकडे आपला वकील पाठविला, आणि त्यास नर्मदा उतरून माळव्यांत बोलाविलें. "नर्मदेवरील उतारांचा व पलीकडच्या डोंगरांतील घाटांचा उपयोग तुम्हांस

१. हो. कै. पृ. ९·१० यांत दयाबहादुरची लढाई चैत्रांत झाल्याचा उल्लेख असून मागील पत्रांत ती ता. १२-१०-१७३१ रोजीं झाली असें आहे.

चांगला करून देऊं," असें अभिवचन मिळाल्यावरून मंडलोईच्या मदतीनें धरमपुरी आणि महेश्वर यांच्या दरम्यान अकबरपुर म्हणून नर्मदेवर एक गांव आहे त्या ठिकाणीं नर्मदा उतरून मल्हारराव माळव्यांत आला. दयाबहादुरास ही खबर लागतांच तांडा येथील घाटांत तो मल्हाररावास अडविण्याकरितां गेला. परंतु मल्हाररावास माळव्यांतील मंडलोई वगैरे लोकांनीं आगाऊ इशारत दिल्यामुळें तो तांडा घाटानें न येतां मांडवगडच्या पूर्वेकडील भैरव घाटानें माळव्यांत आला. मल्हाररावाची व दयाबहादुराची गांठ धारनजीक तिरला गांवीं पडली लढाई होऊन दयाबहादूर मारला गेला. याप्रमाणें माळवा प्रांत मराठ्यांच्या हस्तगत झाला. प्रांताच्या वसुलाची व्यवस्था लावतांना मराठ्यांनीं पूर्वींचे बादशाही धारे कायम ठेविले; आणि दुसऱ्या कोणापासून रयतेस इजा न पोंचावी अशी तजवीज केली. पूर्वींचे मोगल अंमलदार त्यांनीं काढून टाकिले, आणि आपले दक्षणी अंमलदार नेमिले. कांहीं रजपूत जहागीरदारांनीं मराठ्यांना जुमानिलें नाहीं, त्यांच्या जमिनी मराठ्यांनीं खालसा केल्या, आणि त्यांच्या जागीं आपले नवीन जमीनदार नेमिले. या वेळीं रयतेला संतुष्ट ठेविण्याची खबरदारी मराठ्यांनीं चांगलीच ठेविली होती. (Malcolm's Central India II p. 82).

नंदलाल मंडलोईच्या मृत्युसंबंधानें बाजीराव तेजकर्णास लिहितो. 'तुम्हीं विनंतिपत्र पाठविलें तें पावोन सविस्तर कळलें. नदलाल मंडलोई यांस देवाज्ञा जाली, चांगले प्रकारें चालवावें, ह्मणोन कितेक निष्ठापुरस्कर लिहिलें तें कळलें. ऐशियास माळवा प्रांतींचा येखतियार रा. मल्हारजी होळकर व रा. राणोजी शिंदे यांस देऊन पाठावेले आहेत. यांस तुमचा गौर करावयाविसीं कितेक आज्ञा केली आहे. उभयतां म॥ रनिल्हे आज्ञेप्रमाणें तुमचा गौर करतील. तुह्मी त्यांस भेटोन कामकाज करीत जाणें. तुमचा सर्व प्रकारें आह्मांस अभिमान आहे, तदनुरूप निर्वाह होईल. आपलें वर्तमान वरचेवर लिहीत जाणें. जाणिजे. छ. २ जमादिलावल, इसन्ने सल्लासीन,(२३-१०-१७३१.)याचसंबधानें मल्हारजी होळकरास चिमणाजी बल्लाळ लिहितो, नंदलाल मंडलोई हे पहिलेपासून निष्ठेनें वर्तत आहेत. हल्लीं ते मृत्यु पावले गेले. त्यांचे पुत्र मंडलोई राव तेजकर्ण व कुंवर न्यहालकर्ण हेही त्यांजप्रमाणें निष्ठेनें वर्ततात. ऐशीयास त्याप्रांतें प्र॥ इंदूर बनीद आपली आहे. त्यांचेमागें त्यांचे पुत्रांचें चालवावें हें उचित

आहे, आणि आपले कामाचे गोष्ट आहे. यास्तव तुह्मांस हें पत्र लिहिलें असे. तरी म॥रनिल्हेवरी हरएकविशीं साल मजकुरीं साल गुदस्तास रयात करून अगत्यवादें करून सर्वश्वें चालवणें, येविशीं आह्मांसही अगत्य आहे. तुह्मी लक्ष प्रकारें यांजवरी सालगुदस्तांत खंडणीस रुपये पांच हजार सोडून बाकी साल म॥रीं घेऊन रियात करणें. हरएकविशीं आजार न देणें. माळवे प्रांतीं हे आपले कार्याचे माणूस आहेत. त्यांचें लिहिलेप्रमाणें चालवावयास अंतर न करणें. जाणिजे. छ ११ माहे जमादिलाखर इसन्ने सल्लासीन, (३०.११.१७३१.) असेंच पत्र याच तारखेचें राणोजी सिंदे यास आहे.

६. मुलखाची व्यवस्था.—याप्रमाणें दयाबहादुरास बुडविल्याची बातमी आल्यावर बाजीराव लगेच नर्मदा उतरून माळव्यांत गेला, आणि तेथल्या मुलुखाची व कारभाराची हळूहळू व्यवस्था त्यानें लाविली. ' निमें स्वराज्याचा अंमल पेशव्यांचे मार्फत हुजूर सरकारांत यावा, निमेंत फौजेचा खर्च करून, पेषकशी ( नजराणा ) येईल ते हुजूर यावी ऐसे तह करून दिले. शिंदे होळकर व यशवंतराव पवार, या सर्वांशीं तह केला, कीं जो मुलूख सरकारांत येईल त्याचे हिस्से करून फौज जमा करून एक विचारें चालावें. हिस्से केले त्यांत शेंकडा ३१ रु. सरकार एक हिस्सा, शिंदे रु. ३० एकहिस्सा, होळकर रु. ३० एक हिस्सा, पवार रुपये ९. याप्रमाणें करार करून फौजा ठेवून दिल्लीस जयसिंग राजासुद्धां जाऊन पादशहाचे दौलतीविषयीं चाकरींत उणें पडों देऊं नये.[१] येणेंप्रमाणें ठराव केला. या ठरावांत निरनिराळ्या वेळीं फेरफार झालेले आहेत, तरी त्यांतील मूळ तत्त्व कायम आहे. पुढें या उत्पन्नाचे हिस्से थोडे निराळे झाले. म्हणजे मुख्य सरकार ४५, सिंदे २२॥, होळकर २२॥, व पवार १०; असे हिस्से ठरवून महालांचे वसूल सर्वांनीं मिळून करावे असें ठरलें. हे ठराव नक्की एकदांच झालें असें नाहीं. स. १७२९ पासून पुढें कैक वर्षे पुनः पुनः वाटाघाट होऊन ते हळू हळू बनत गेले. त्याचा तपशील पे. द पृ. २०३, २०८ व १२७ वर आहे तो अवश्य पाहवा. माधवराव पेशव्याचे वेळचें २४-२-१७६८ चें वांटणीपत्र पाहण्याजोगें आहे. त्याचाच अंमल नानाफडणीसापर्यंत पुढें होत असे.

---

१ का. सं. प. या. पृ. ५३५; तह व करारमदार पृ. १५२.

माळव्याच्या व उत्तर हिंदुस्थानांतील स्वाऱ्यांत आरंभीं ज्या सरदारांनीं कामें केलीं, त्यांपैकीं एका मोठ्या सरदाराचें स्मारक तिकडे कांहींच राहिलें नाहीं. तो सरदार पिलाजी जाधव होय. माळव्याच्या आरंभींच्या उद्योगांत पिलाजीच प्रमुख होता. परंतु स. १७३० च्या सुमारास कांहीं आगळिकी करून बाजीरावानें त्याचा सरंजाम काढून तो राणोजी शिंद्यास दिला. परंतु पुढें लवकरच तडजोड होऊन पिलाजीचा सरंजाम पहिल्या सारखा करून देण्यांत आली.[1] पिलाजीचा उद्योग तिकडील स्वाऱ्यांत वाखाणण्याजोगा होता. खं. ६.४९.

प्रथम वारंवार स्वाऱ्या करून एक एक प्रांत जिंकावयाचा, नंतर त्यांतून सालोसाल चौथाई वगैरे हक्क वसूल करावयाचे आणि असा क्रम कांहीं वर्षे चालल्यावर, मग त्या चौथाइच्या सनदा बादशहाकडून राजरोस मागावयाच्या, असा मराठ्यांच्या उद्योगाचा क्रम प्रथम दक्षणच्या सहा सुभांवर, नंतर गुजराथेंत, व पुढें माळव्यांत उघडकीस येतो. याच क्रमानें ते दिल्लीवर व पुढें पंजाबांतही गेले. तो भाग सागण्यापूर्वी प्रथम होळकर, सिंदे व पवार ह्या घराण्याच्या पूर्वपीठिका येथेंच देणें जरूर आहे.

७. **मल्हारराव होळकर**, (१६.३.१६९३–२०.५.१७६६). होळकरांचें घराणें महाराष्ट्रांत पुष्कळ ठिकाणीं पसरलेलें आहे. इंदूरच्या हल्लींच्या राजघराण्याचे पूर्वज प्रथम पुण्याजवळ वाफगावीं राहत असून, नंतर ते फलटण परगण्यांत पुण्यापासून ४० मैलांवर नीरा नदीचे कांठीं होळ म्हणून एक खेडें आहे तेथें आले. त्यांचें पहिलें नांव वीरकर असून, पुढें होळ या गांवावरून होळकर असें पडलें. होळ येथें खंडूजी नांवाचा धनगर जातीचा एक वजनदार चौगुला म्हणजे ग्रामाधिकारी राहत होता, त्यास एक मुलगा चैत्र शु. ९ संवत् १७५०, ता. १५।१६ मार्च १६९३ रोजीं झाला. त्याचें नांव मल्हारि. तो तीन वर्षांचा असतांच खंडूजी वारला; तेव्हा भाईबंदांनीं त्रास दिल्यामुळें खंडूजीची बायको जिवाई ही मुलास घेऊन खानदेशांत तळोदे गांवीं आपला भाऊ भोजराज बारगळ चौगुला याजकडे गेली. हा भोजराज कंठाजी कदम बांडे याच्या पागेंत पंचवीस स्वारांचा मुख्य होता. ' शिवजीसुत भोजराज बारगळ,' असें त्याचें शिक्क्यांत नांव आहे. मल्हारी हा भोजराजाचे घरीं वाढला. त्यास भोजराजानें आपल्या पथकांत नोकरी दिली; आणि त्याची हुशारी पाहून पुढें

त्यास आपली मुलगी गौतमाबाई ही देऊन त्याचें लग्न केलें. प्रथम लहान लहान लढायांत शौर्याचीं कामें केल्यावरून तो लवकरच प्रसिद्धीस आला. मराठ्यांचें व निजामाचें सन १७२० त बाळापुरास युद्ध झालें त्यांत मल्हाररावानें चांगलाच पराक्रम केला. कदम बांडे व बाजीराव यांच्या फौजांची एकदां कलागत लागली असतां, ती मल्हाररावानें मिटविली, त्यावरून बाजीरावानें त्यास बांड्यापासून १७२० च्या पुढें आपणाकडे मागून घेतलें. तेव्हांपासून त्याच्या भाग्योदयास प्रारंभ झाला. सन १७२५ त बाजीरावानें ५०० स्वारांची मनसब त्यास दिली. पूर्वीच त्यानें माळव्यांत शिरून तिकडे मुलूख जिंकण्याचा उद्योग सुरू केला असून भोजराज बारगळही त्याबरोबरच खपत होता. यापुढची मल्हाररावाची हकीकत पुढें ठिकठिकाणीं येईल.

८. राणोजी सिंदे, ( मृत्यु जुलई १७४५ ).—प्राचीन काळीं सेंद्रक नांवाचें क्षत्रिय घराणें होतें, त्यावरून सिंदे हें आडनांव पडलें असावें. त्यांचीं कित्येक घराणीं बहामिनी राज्यांत उदयास आलीं. सातार्‍यापासून सहा कोशांवर कोरेगांव तालुक्यांत कण्हेरखेड म्हणून गांव आहे, तेथें एक सिंद्यांचें घराणें पाटिलकी करून होतें. याच घराण्यांतील मुलगी अंबिकाबाई शाहूस दिलेली होती, ती शाहू कैदेंत असतांच वारली. तिचा बाप औरंगजेबाचे नौकरींत होता, तो बहुधा आग्रा येथें अजीमशहाच्या मदतीस असतां मारला गेला. त्याच्याच घराण्यांत राणोजी सिंदे हा पुढें प्रसिद्धीस आला. घरची गरिबी असल्यामुळें त्यानें प्रथम बाळाजी विश्वनाथाच्या पागेंत बारगिराची नोकरी पत्करिली.लवकरच त्याजवर पेशव्याची मर्जी बसली. राणोजी सिंदे, उदाजी पवार व मल्हारराव होळकर हे आरंभीं बाजीरावाबरोबर खेळगडी म्हणून एकत्र वाढले, असा समज आहे. निजामावरील वगैरे मोहिमांत राणोजीची निष्ठा व शौर्य हे गुण पाहून बाजीरावानें त्यास इतर सरदारांबरोबर माळवा व हिंदुस्थान येथील कामगिरीवर पाठविलें. तिकडे पराक्रम करून तो लवकर उदयास आला. अशा या सरदारांच्या अनेक आख्यायिका प्रसिद्ध आहेत; परंतु त्यांतील ऐतिहासिक अंश निश्चित नाहीं. ' सिंदे व होळकर हे उभयतां सरदार सलाबतीचे दिवसें दिवस आक्रम करीत चालले,' या बखरींतील वाक्यांत तत्कालीन समज चांगला व्यक्त झाला आहे. राणोजी स्पष्टवक्ता व धन्याची भीडभाड ठेवणारा नव्हता. अशा स्पष्टोक्तीचें

एक पत्र त्याचें आहे.[१] पुण्याजळच्या अनेक भानगडींत व गांवकीच्या कारभारांत राणोजीचें प्राधान्य होतें. ही गोष्ट पुरंदरे रोजनिशींतील अनेक उल्लेखांवरून व्यक्त होते. सिंद्यांचे घराण्याचा मराठशाहीच्या पुढील इतिहासाशीं निकट संबंध आहे; इतकेंच नव्हे तर पाऊण शतकाचा मराठशाहीचा इतिहास बराचसा ह्या एका घराण्यानें बनविलेला आहे असें म्हणण्यास चिंता नाहीं. नुसती या घराण्याची वंशावळ नजरेखालीं घातली तरी राष्ट्रकार्यांत जीव देणाऱ्या पुरुषांची एवढी मोठी संख्या पाहून आश्चर्य वाटतें. हा प्रकार उत्तरोत्तर व्यक्त होईल.

९. **उदाजी पवार**, धारचे.—ह्या घराण्याची हकीकत पुढें स्वतंत्र देण्यांत येईल. उदाजीनें स. १७२४ त धार येथें आपलें ठाणें बसविलें. माळवा व गुजराथ ह्या ठिकाणीं आरंभा मराठ्यांचा जम बसविणार मुख्य इसम उदाजी होय. याची साक्ष शाहूनें स. १७२६-२७ त त्यास ठरवून दिलेला खालील तह रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून मिळालेला पाहवा. "तहनामा राजश्री उदाजी पवार सु॥ सबाअशरीन मया व आलफ, तह प्रांत गुजराथ व माळवा.

१ प्रांत मजकूर चौथाई व सरदेशमुखीचा अखत्यार रुवें तुम्हांवर दिल्हा असे. हुजरून रा. बाजी भीवराव तुम्हांसमागमें दिल्हे आहेत, शिक्का, रोखा, कुच, मुक्काम त्यांचा; परंतु जें करणें तें तुमच्या अखत्यारें करावें. मुलखीं तह रह त्यांनीं तुम्हीं करावा. तुम्हां खेरीज त्यांस हरएक विच्यार करावयास प्रयोजन नाहीं. अखत्यार तुम्हांवर. कलम १.

२ प्रांत मजकुरीं जो आकार जमा होईल त्यांत सरदेशमुखी व बाबती चौथाई शिरस्तेप्रमाणें काढावी. उरला ऐवज दामाशाही गणतीप्रमाणें घ्यावा. शिबंदी, तोफखाना व भांडियांचा ऐवज सदरहु उरल्या ऐवजावरी मोघम काढून उरला ऐवज गणतीप्रमाणें दामाशाही घ्यावा. मोकाशी कोणाही न म्हणावा. सारे जमेचा तह येणें प्रमाणें करावा. ( भांडें म्ह तोफा ).

३ दिवाण रु० एक लक्ष बाबती सरदेशमुखीच्या ऐवजीं आधीं वारावें.

४ फौज हुजरून येईल त्यास दामाशाही ज्यास्ती आधीं दिवाणाचा ऐवज वारावा. उरेल ऐवज त्याची दामाशाही द्यावी व तुम्हीं घ्यावी.

५ जेथें मुकाशाचीं ठाणीं बसलीं असतील तेथें बाबती व सरदेशमुखी काढून उरला ऐवज ठाण्यांचे बेगमीस द्यावा.

---

१ ऐ. टि. २-३५.

६ चौथाई व सरदेशमुखी दिवाणाचा ऐवज काढावा, त्यांत राजश्रींचें देणें वारून बाकी ऐवज राहील त्यापैकीं एक तक्षीम तुम्हांस सरदारीस दिल्हा, घेणें. दोन तक्षिमा आमचे सरदारीस द्यावे. कलम १.

हीं कलमें सारीं लिहिलीं आहेत. येणेंप्रमाणें वर्तावें. पैका कदाचित् थोडा मिळाला तरी आधीं दिवाण वारावें. उरेल तें सर्वांनीं समजावें. दिवाणाचा ऐवज नये तोंवरी रुपये कोणीं शिबंदी व रोजमरा व दारूगोळाशिवाय घेऊं नये." यासंबंधानें बाजीरावानें छत्रपतीशीं ता. १७-१०-१७२९ रोजीं केलेला करार पे. द. पृ. १२७ वर आहे.

कांहीं काळानें बाजीरावाचें व उदाजीचें वांकडें येऊन, पेशव्यानें त्याचा भाऊ आनंदराव यास धारेस नेमून उदाजीस कैदेंत ठेविलें. ही गोष्ट स. १७२९ ता. १ नोव्हेंबरचें खालील पत्र बाजीरावानें आनंदरावास लिहिलें त्यापूर्वीची असावी. ' रा. आनंदराव पवार गोसावी यांस. स्ने० बाजीराव बल्लाळ प्रधान आशीर्वाद. सुरूसन सल्लासीन मया व आलफ. तुम्हांकडे हवालियाबाबत रुपये येणें, त्या रुपायांविशीं तुम्हांस लिहिलें होतें. त्यास रुपये पाठवितों म्हणून तुमचें उत्तरही आलें. त्यावरून त्याऐवजीं तुम्हांकडे गावड्याची व संताजी मोरे यांच्या निसबतीच्या लोकांची चिठी पाठविली. हे गोष्ट तुह्मीं उचित न केली. हवाल्याबाबद सावकारी निशेचे रुपये तुह्मांकडे. त्याहीमध्यें तुमचा पतीचा धंदा; पवार प्रामाणिक, एकवचनी, वचनाचे सच्चे, पतीचे थोर, यास्तव हवाला घेतला. त्यास मुदती अगोदर माणसें पाठविलीं ह्मणावीं, तरी तेंही न केलें. तुमची मुदतही जाहली असतां, तुह्मीं माणसें फिरावलींत. येणेंकरून तुमचे पतीस शब्द लागला. आमचाही इतबार त्या लोकांजवळ गेला. ऐशियास वचनास व पतीस अंतर केल्यानें पुढें तरी पत कशी राहील? तो ऐवज त्यांस पावला पाहिजे. यास्तव तुह्मांकडे मुजरद माणसें पाठविलीं आहेत.तरी पत्र पावेल ते क्षणीं त्यांचे पदरीं ऐवज घालणें.ऐवज त्यांच्या पदरीं घातल्याविना भोजन कराल तरी आमची आण असे. बिनाकसूर, पत्र पावतांच हवाल्याबाबत रुपये त्यांचे पदरीं घालून पावलियाचें कबेज घेऊन पाठविणें. जाणिजे. छ २० रबिलाखर लेखनसीमा.' उदाजीचा शेवट केव्हां व कसा झाला तें कळत नाहीं. आनंदराव पवार स. १७३६ चे सुमारास मरण

पावला. बाजीराव पेशव्यानें माळवा प्रांतांतील देशमुख देशपांड्यांस ६.८.१७३६ चें आज्ञापत्र काढिलें, त्यांत हा उल्लेख आहे. 'परगणे मजकूरच्या मुकासा देखील बाबती व सरदेशमुखी व जकात आनंदराव पवार यांस होता, त्यास ते मृत्यु पावले, याजकरितां त्यांचे पुत्र रा. यशवंतराव पवार दि॥ चिमणाजी बल्लाळ यांस साल मजकूर मुकासा बाबती व सरदेशमुखी व जकात दिल्हा असे जाणिजे. छ ९ रबिलाखर सबां सल्लासीन मया व आलफ. आज्ञाप्रमाण.' यशवंतराव पवार हा पुढें मोठा बाणेदार निघाला. तो शरीरानें काटकोळ व उंच असून त्याचे डोळे फार मोठे होते. त्याची मुद्रा क्रूर व शिपाईबाण्याची होती. त्याचा थाट राजासारखा असून तो कधीं कोणाशीं नमून वागत नसे. अपमान यत्किंचित सहन करणारा नो नमून त्याचा दरारा प्रसिद्धच होता. एका अपमान करणाऱ्या हुजऱ्यास त्यानें तलवारीनें छाटल्यामुळें, पेशव्यांच्या घरचे नोकरही त्यास थरथर कांपत अशा प्रकारचें त्याचें वर्णन आढळतें.[1]

**१०. छत्रसालास मदत, महंमदखान बंगशाचा पाडाव[2] (१७२९).**– मराठ्यांचें व रजपुतांचें ऐक्य होऊन माळवा प्रांत बादशहाचे हातचा गेला, आणि पुढें मराठे दिल्लीच्या बाजूस चाल करूं लागले, हा प्रकार पाहून दिल्लीचे दरबारांत मोठी धास्ती उत्पन्न झाली. रजपूत राजे उघडपणें मराठ्यांस सामील होऊन बादशाही बुडवूं लागले. बुंदेलखंडचा राजा छत्रसाल प्रबळ होऊन त्यानें पन्ना येथें राजधानी करून आपल्या राज्याची वृद्धि केली. त्याचें व मराठ्यांचें शिवाजीच्या वेळेपासूनच सख्य होतें. तेव्हां ह्या प्रकरणाचा जोरानें प्रतिकार न केल्यास मराठे दिल्लीसुद्धां काबीज करण्यास चुकणार नाहींत, अशी आणीबाणीची वेळ आलेली पाहून, बादशहानें अलाहबादचा सुभेदार महंमदखान बंगश पठाण हा पराक्रमी पुरुष होता, त्यास माळव्याचे मदतीस नेमून, मराठे व छत्रसाल व इतर रजपूत राजे यांचें पारिपत्य करण्याचा त्यास हुकूम दिला. छत्रसालाची हकीकत मुसलमानी रियासतींत दिली आहे.

१ रा. श्री. वि. आठल्ये यांजकडून वरच्यासारखें एक पत्र मंडलेई दप्तरांतील मिळालें, त्यांत आनंदरावाचे मृत्यूचा काळ स. १७३६ दाखल आहे.
२ पासरनीस ■. बुंदेलखंड प्रकरण; बुंदेल्यांची कै. भा. व. १; Irvines, Bangash Nawabs of Ferrukhabad; Pogson's Bundellas

महंमदखान बंगश गझन फर्जंग हा अफगाणिस्तानांतील कोहुत प्रांतापैकीं बंगश खोऱ्यांतला राहणारा पठाण असून, त्याचा बाप औरंगजेबाचे वेळेस हिंदुस्तानांत आला. महंमदखानानें बादशाही फौजेंत नोकरी करून नशीब काढिलें. तो गंगेच्या कांठीं शम्शाबाद परगण्यांत मऊ येथें राहत असून पांच चार हजार अफगाण लोक नोकरीस ठेवून, जरूर त्या पक्षास मदत करीत असे. फर्रुखसेयरच्या कारकीर्दीत सय्यदांस मदत केल्यानें त्यास मोठमोठ्या जहागिरी मिळाल्या. त्यानें बादशहाच्या नांवानें फर्रुखाबाद शहर स्थापून तेथें वास्तव्य केलें. फर्रुखाबादच्या नबाबांस बंगश नवाब म्हणतात. हे पठाण व दुसरे रोहिले उत्तर हिंदुस्थानांत मराठ्यांचे नेहमींचेच शत्रु होते, ही गोष्ट पुढील इतिहासांत ध्यानांत ठेविली पाहिजे. महंमदखान पुढें सय्यदांचे विरुद्ध उठला; आणि त्यांचा पाडाव झाल्यावर सन १७२१ त महंमदशहानें त्यास अलाहबादची सुभेदारी दिली. त्या योगानें बुंदेलखंड, आग्रा व अलाहबाद या टापूंत त्याचा संचार सुरू झाला, आणि बुंदेलखंडचा छत्रसाल व इतर रजपुतांस यांस जिंकण्याचा उद्योग त्यानें सुरू केला. त्यास मिळालेल्या जहागिरी बुंदेलखंडांत असल्यामुळें लढून अंमल बसविल्याशिवाय त्याचें चालण्याजोगें नव्हतें. हा अंमल बसवितांना त्याचा मुलगा पीरखान यास बुंदेल्यांनीं ठार मारून त्याच्या फौजेचा फडशा उडविला, तेव्हां महंमदखानानें आपला मुलगा काइमखान व सरदार दलेलखान यांस बुंदेल्यांवर पाठविलें. छत्रसालानें त्यांचाही पराभव करून दलेलखानास ठार मारिलें. तेव्हां महंमदखान बंगश चवताळून मोठ्या तयारीनिशीं बुंदेलखंडांत शिरला. दिल्लीचा बादशहा व वजीर खानडौरान यांनीं त्यास भरपूर मदत दिली. माळवा व अलाहाबाद ह्या दोहोंच्या मध्यें असलेल्या बुंदेले राजांस आपण सहज चिरडून टाकूं अशी त्याची भावना होती. त्यावरून छत्रसाल व त्याचे तिघे मुलगे यांचें व महंमदखानाचें निकराचें युद्ध चालू झालें. बंगशची फौज मोठी व खंबीर असल्यामुळें बुंदेल्यांची पिछेहाट होऊं लागली. उभय फौजांची रीवाचा दक्षिणेस वीस मैलांवर जैतपुर नजीक मोठी निकराची लढाई झाली. वृद्ध छत्रसाल अग्रभागीं असतां घायाळ झाला, तेव्हां त्याचे लोक पराभव पावले.

या गोष्टींचा काळ दिलेला नाहीं. तत्रापि हें वर्ष स. १७२८–२९ असावें. कारण याच वेळीं बाजीराव फौजेनिशीं माळव्यावर चाललेला असल्यामुळें त्यास

छत्रसालानें या अडचणींत मोठ्या विनवणीचें पत्र पाठवून आपल्या मदतीस बोलाविलें. त्याबरोबर बाजीराव स. १७२९ च्या फेब्रुवारींत माळव्यांतून बंगसावर चालून गेला. माळव्यांत लष्कर होतें तें आपल्या स्वाधीन करून घेऊन, चिमाजीआपास परत पाठवून कोंकण प्रांतांतील बंदोबस्त त्यास सांगून, बाजीरावानें ता. १३ मार्च १७२९ रोजीं मु० धामोरा नजीक महोबा येथें छत्रसालाची भेट घेतली. नंतर उभयतां बंगशावर निघाले. ३० मार्च रोजीं जैतपुर मुक्कामीं लढाई होऊन त्यास बाजीरावानें बुंदेलखंडांतून पार घालवून दिलें. या उपकाराबद्दल छत्रसालानें प्रथम एक किल्ला व झांशी नजीक दोन अडीच लक्षांचा मुलूख बाजीरावास दिला. त्या सालच्या जूनपावेतों बाजीरावाचा मुक्काम त्या बाजूस होता. पुढें स. १७३३ त छत्रसाल मरण पावला, त्या वेळीं त्यानें आपले दोन पुत्र हिरदेसा व जगत्राज आणि बाजीराव तिसरा असे, समजून राज्याचा तिसरा हिस्सा बाजीरावास दिला.या वेळीं मिळालेल्या प्रांताच्या व्यवस्थेकरितां बाजीरावानें गोविंद बल्लाळ खेर याची नेमणूक केली. (स.१७३३-३४).

बाजीराव व बंगश यांची जैतपूर येथें झालेली लढाई ता. ३० मार्च १७२९ पासून पुढें कित्येक दिवस निकरानें चालू होती. महंमदखानाच्या मदतीस मागाहून त्याचा मुलगा कायमखान हा आणखी फौज घेऊन आला. जैतपुर ऊर्फ जैतगडचा किल्ला मजबूद होता, त्यास मराठ्यांनीं वेढा घातला. मल्हारराव होळकर, विठ्ठल शिवदेव विंचुरकर, पिलाजी जाधव, व दावलजी सोमवंशी हे सरदार बाजीरावाचे हाताखालीं होते. स्वतः बाजीराव घोड्यावरून सर्व हुकूम देत फिरत होता. किल्ल्यांतील अन्न संपून मुसलमानांनीं गुरें सुद्धां कापून खाल्लीं. शेवटीं महंदखान पळून गेला व किल्ला मराठ्यांचे हातीं आला. (३०-४-१७२९). *नंतर छत्रसालानें बाजीरावास पन्ना येथें आपल्या राजधानींत नेऊन त्याचा* मोठा गौरव केला. या लढाईचें वर्णन पिलाजी जाधवानें त्याच तारखेच्या पत्रांत इंदूरच्या आपल्या वकिलास लिहिलेलें आहे तें असें:—

' महंमदखान बंगश प्रयागचा सुभा, छत्रसाल राजस्थान, बुंदेलखंड, यांजवर मसलत करोन चालोन आला होता. त्यास आम्ही व ते ( छत्रसाल ) एकत्र होऊन वेढा घालून बसलों होतों. इतक्यांत बंगसाचा लेक कायमखा तीस हजार फौजेनिशीं छ ९ म्ह. २९-३-१७२९ रोजीं आह्मांवर चालून आला;

त्याशीं लढाई झाली. ईश्वर इच्छेनें फौजेनिशीं हा बुडविला. तीन हजार घोडे व तेरा हत्ती पाडाव केले. अंताजी माणकेश्वर व दावलजी सोमवंशी सरलष्कर यांजकडे दोन हत्ती आले. वरकड आमच्या लष्करांतील सुखरूप आहेत. झुंजांत ठार झाले त्यांची यादी लिहिली आहे, त्याप्रमाणें ज्याच्या त्याच्या घरीं वर्तमान पावतें करणें. आह्मीही दरमजल येतों.' ( खं. ३-१४ ).

बाजीराव छत्रसालाच्या मदतीस धावून गेला या प्रकरणास गजेंद्रमोक्षाची उपमा देऊन लोकप्रवादानें ऐतिहासिक संगतीचा लोप केला आहे. मागें सांगितलेंच आहे कीं, राजा गिरिधर व दयाबहादूर यांस मारून, मराठे व रजपुत यांनीं धर्माच्या नांवाखालीं एकमतानें बादशाहीवर युद्ध पुकारलें होतें. माळवा, बुंदेलखंड, रजपुताना वगैरे ठिकाणचे बहुतेक प्रमुख रजपूत राजे या मसलतींत असून, मल्हारराव होळकराचे मार्फत बाजीरावानें या कार्याचा अंगीकार केला होता. कदाचित् शाहूच्या नजरेस हा प्रकार उघडपणें आल्यास, बादशहाशीं युद्ध करण्यास त्याचें अनुमोदन मिळणार नाहीं, ह्मणून या केवळ हक्क वसूल करण्याच्या स्वाऱ्या आहेत, असें त्यास बाजीरावानें भासविलें असावें; आणि त्याचकरितां तो स्वतः आरंभीं माळव्यांत आला नसेल. शिवाय, याच वेळेस कोंकणांत ब्रह्मेंद्रस्वामीचा उच्छेद होऊन, जंजिऱ्याचे हबशावर मोहीम ठरत होती. सबब बाजीरावास मोठ्या फौजेनिशीं दूर पाठविण्यास शाहू उत्सुक नव्हता. ह्मणूनच बाजीरावानें माळव्यांत आपण फौजेचें आधिपत्य स्वीकारून, चिमाजीस ताबडतोबीनें साताऱ्यास पाठविलें. शाहूस दूर दूरच्या प्रांतांतील राजकारणें व परिस्थिति कळत नव्हती, असें विधान मागें केलें आहे, त्याचा प्रत्यय या छत्रसालाचे उदाहरणांत चांगला येतो. बाजीरावाची भावना निराळी होती; आणि तदनुरूप त्याचा वर्तनक्रम होता. सवाई जयसिंग व प्रमुख रजपूत राजे, अंतर्यामीं बाजीरावास अनुकूल होते. अर्थात् जैतपुरची लढाई व छत्रसालास मदत, या गोष्टी एका मुख्य प्रकरणाचीं अंगें होत.

बाजीरावानें येऊन आपला बचाव केला हा उपकार तर खराच. परंतु सभोंवार शत्रू असून पुढेंही बाजीरावामार्फत प्रबळ मराठ्यांची मदत आपल्या मुलांस कायमची असावी, अशा हेतूनें हा राज्याचा हिस्सा ह्मणजे आपल्या बचावाची किंमत छत्रसालानें बाजीरावास दिली. बाजीरावाची त्याजबद्दल मागणी

होती, आणि बाजीरावाचे हातांत जोर असल्यामुळें नाहीं देत ह्मणण्याचेंही सामर्थ्य बुंदेल्यांत नव्हतें. सारांश, स. १७३३ च्या सुमारास पुष्कळसा मुलूख बुंदेलखंडांत बाजीरावास मिळाला, त्यांत काल्पी, हटा, सागर, झांशी, शिरोंज, कुंच, गडकोटा आणि हरदेनगर वगैरे प्रांत होते. मुलूख देतांना बाजीरावाशीं तह झाला त्यांत छत्रसालाचे दोन मुलगे व बाजीराव यांनीं बंधूप्रमाणें वागून नेहमीं एकमेकांस मदत करावी असा ठराव झालेला होता. बाजीराव व छत्रसालाचे मुलगे यांच्यांत झालेला करार ता.१०-७-१७३९चा त.क.पृ.९वर आहे, त्यांत बाजीरावानें लिहून दिल्हें, कीं 'तुमचा व्यवहार, बढाई, मरातीब आहे तो कधीं कम होणार नाहीं. तुमचे किल्ल्यांची व जागांची रदबदल करणार नाहीं. तुह्मांस गैरराजी होतील त्यांस आह्मी ठेवणार नाहीं.आमची फौज तुमचे मलखांतून गेल्यास तिचा खर्च आह्मी भोगवूं. पातशाही फौज तुमचेवर चढाई करून आल्यास तुमचे राज्याचें संरक्षण करूं; आणि आह्मावर आल्यास तुह्मीं मदत करावी. तुह्मीं पांच लाखांची जहागीर आह्मांस दिली आहे त्याशिवाय जास्त रुपयांची किंवा गांवाची रजबदली करणार नाहीं. यास दरम्यान चिमाजी आपा, नाना, पिलाजी जाधव, मल्हारराव, राणोजी व यशवंतराव पवार व जानोजी समशेर आहेत.' बाजीरावानें व त्याच्या सरदारांनीं पुढें आग्रा, दिल्ली, दुआबकडे स्वाऱ्या केल्या, त्यांत बुंदेलखंडांतील प्रदेशाचा त्यांस चांगला उपयोग झाला. कारण, स्वतःच्या मालकीच्या मुलखांत मुख्य ठाणें ठेवून उद्योग वाढविण्याची त्यांस सोय झाली. माळव्याच्या पुढेंच हा प्रदेश असल्यामुळें माळव्यावरही माराठ्यांचा शह बसला. बाजीरावानें बुंदेलखंडांत कायमचें ठाणें दिलें, व बुंदेले रजपुतांशीं तह जोडून बादशाहीच्या नाशाची जोराची तयारी केली, म्हणूच पुढें त्याचा बादशहाशींच झगडा उपस्थित झाला. बुंदेलखंडांतील ही जहागीर बाजीराव व त्याचे अनुगामी केवळ स्वतःच्या मालकीची समजत; समाईक राज्यांत ती सामील झाली नाहीं. त्या मुलखाची व्यवस्था करण्यास गोविंदपंत बुंदेले यास पेशव्यांनीं नेमिलें, तो केवळ पेशव्यांचा कारभारी ह्मणूनच होय. याच कारणास्तव पुढें पानपतावर सदाशिवरावानें गोविंदपंतास रगडून धरिलें. पांच लाख उत्पन्न निव्वळ दरसाल हातीं पडेल एवढी ही जहागीर म्हणजे तिचा एकंदर वसूल ३३ लाख होता असें बखरींत नमूद आहे, तें बरोबर दिसतें. खास पेशव्यांचे

मालकीची सर्वांत जुनी जहागीर ही बुंदेलखंडची होय. या पुढील कारभारांत गोविंदपंताचें अंग विशेष आहे.

**११ गोविंदपंत बुंदेले.**—गोविंदपंताचें मूळ गांव रत्नागिरीजवळचें नेवरें होय. गोविंदपंत १३।१४ वर्षांचा असतां त्याचा बाप बाळाजीपंत वारला, आणि नेवऱ्याच्या कुळकर्णाची व्यवस्था त्याजकडे आली. तो हूड व खेळाडू असल्यामुळें त्याच्या हातून ही व्यवस्था न होतां भाईबंदांनीं त्यास सर्वस्वीं नागविलें. तेव्हां बर्वे वगैरेंचें उदाहरण पाहून, गोविंदपंत कोंकण सोडून देशावर आला. नोकरी साठीं हिंडतांना त्यानें बाजीरावापाशीं शागीर्दीची जागा पत्करिली. बाजीरावाकडूनच तो कांहीं दिवस मल्हारराव होळकराजवळ कामकरीत असावा. स. १७३२त मल्हारावाचा कारभारी त्यास पुण्यहून लिहितो, "गोविंदबल्लाळ यांजविशीं, आपण येथें आले होते तेव्हां श्री. रा. आपांस विनंति केली होती. त्याप्रमाणें

गोविंदपंताचे घराण्याची वंशावळ.

गोविंदपंत (पारसनीस कृत बुं.प्र.)

बाळाजी
|
( १७३१–६१ ) **गोविंदपंत द.**
|
बाळाजी १७६१–१८०० | गंगाधर १७६१–१८०२

रघुनाथराव आबासा. १८००-०२ | गोविंदराव १८०२-२२
|
बळवंतराव बाबा सा. | बाळाजी १८२२-३२
|
रघुनाथरावराव. | गोविंदराव १८३२–४२

१ सागर घराणें. २ जालवण घराणें.

दुसरें घराणें नरसिंहपंत यांस मुलगे ६, गोविंद, अंताजी, रामाजी, विठ्ठल, काशीपंत व बाबूराव; पैकीं गोविंदपंत दत्तक गेला.

यांपैकीं बाबूरावाचें वास्तव्य गुलसराईस झालें, तो गुलसराईचा वंश होय.

३ गुलसराई वंश.

बाबूराव
|
१७७४–१८८३ दिनकरराव अण्णा.
|
१८३३–१८८१ केशवराव राजेबहादूर.

हल्लीं त्यांस ( आपांस ) पुसोन आपल्या नांवें सनद पाठविली आहे, त्याप्रमाणें आपण त्यांचें विल्हेस लाविलें पाहिजे ( खं. ६-८४ )." गोविंदपंताचे गुण नजरेस येऊन स. १७३३ त बुंदेलखंडाचा जो भाग बाजीरावास प्राप्त झाला, त्याची व्यवस्था पाहण्यास त्यानें गोविंदपंताची नेमणूक केली. शौर्यानें व धूर्ततेनें वागून उत्तरेंत गोविंदपंतानें आपला जम चांगला बसविला, आणि लवकरच उत्तरेंतील मराठे सरदारांमध्यें त्याची गणना प्रमुखपणें होऊं लागली. हळू हळू त्यानें नवीन किल्ले बांधिले, आणि नवीन ठाणीं हस्तगत केलीं. कुरईच्या नबाबाकडून त्यानें कांहीं प्रांत हस्तगत केला, त्यांत सागर म्हणून एक प्रचंड तलाव होता. या तलावाच्या कांठीं 'सागर' नांवाचें नवीन शहर वसवून तेथें गोविंदपंतानें आपलें वास्तव्य कायम केलें. सागरची स्थापना स. १७३६-३७ चे सुमारास झाली असावी. यापुढील बुंदेलखंड प्रकरणाची हकीकत नानासाहेब पेशव्याचे वेळेस येईल.

१२. **माळवा व बुंदेलखंडकडील राजकारण.**—या प्रांतांतील मोहिमा स. १७२४ पासून आठ नऊ वर्षे सारख्या चालल्या होत्या. बाजीराव किंवा चिमाजीआपा हे शिंदे, होळकर वगैरे सरदारांस पुढें पाठवून तिकडील प्रकरणाची सिद्धता करवीत. स्वतः बाजीराव नर्मदेअलीकडे तळ देऊन सरदारांकडून मागणी येई,त्याप्रमाणें फौजेचा वगैरे पाठपुरावा करीत असे दक्षिणेंत शाहूचें संधान राखून बाजीरावास या बाहेरच्या प्रकरणांची उस्तवारी करावी लागे. म्हणून एक बंधु दक्षिणेंतील कारस्थानांवर नजर ठेवून, दुसरा बाहेरच्या उद्योगास जाई. राजागिरिधर व दयाबहादुर यांचे पाडाव अनुक्रमें स. १७२४ व १७३१ या सालीं चिमाजीआपानें केले. बंगसाचा पाडाव स. १७२९ त बाजीरावानें केला. 'कसेंही करून जयसिंगाचें मनोधारण करावें. मांडवगड सुद्धां त्यास द्यावा' अशीं कळकळीचीं पत्रें शाहूनें १७३० त चिमाजीस व सरदारांस लिहिलीं. स. १७३१ च्या उन्हाळ्यांत चिमाजीआपा ग्वालेरीजवळ होता व त्या साळच्या पावसाळ्यांत सातान्यास जेव्हां ह्या प्रकरणांची विल्हेवाट लागण्यांत आली, तेव्हांचा दरबारचा रंग, दहा वर्षांपूर्वींच्या भावनेहून अगदीं वेगळा व अत्यंत आशाजनक होता. बाळाजी विश्वनाथानें उपक्रमिलेला कार्यभाग बाजीरावानें पुष्कळ तडीस नेल्यानें त्याची कर्तबगारी सिद्ध होऊन, त्याचे हात पुढील

उद्योगास मोकळे झाले. माळवा व बुंदेलखंड हा मुख्य पाया झाल्यानें तेथून बादशाहींत हात घालण्याचें काम सुलभ झालें. यावरून बाजीरावाच्या आयुष्य-क्रमांत स. १७३१ हें साल महत्त्वाचें समजलें पाहिजे. पुढें लवकरच हबशाची मोहीम स.१७३३त बाजीरावानें अंगावर घेतली, त्याच सालीं छत्रसाल वारला; आणि बुंदेलखंडचा मोठा भाग त्याचे कबजांत आला. (शा.रो.१९८,ब्र.ले.४४.).

हा राज्याचा फैलाव एकंदर व्यवहारांचें अनुसंधान ठेवून ध्यानांत आणावा लागतो. बाळाजी विश्वनाथाचे वेळेस मातुःश्री व मंडळी यांस सोडवून दक्षिणेची सनद घेणें एवढाच हेतु होता. परंतु बाजीराव बाहेर संचार करूं लागतांच त्यास निजामुल्मुल्क, बंगश, सरबुलंदखान इत्यादि प्रांतिक अधिकाऱ्यांचे व बादशहाच्या सल्लागारांचे डाव कळून आले. त्यांत हात घालून मराठशाहीचा फैलाव करण्याचा त्याचे मनाचा निश्चय झाला. या कामीं उपयोगी पडणारे योग्य इसम त्यानें हाताशीं घेतले. सर्वांचे ठिकाणीं या उपक्रमाची योग्य धमक त्यानें उत्पन्न केली. परंतु हें राजकारण शांतिब्रह्म शाहूस घरीं बसल्या कळण्या-जोगें नव्हतें. बादशाहीवर आघात करूं नये एवढेंच अशक्य सूत्र तो जाणत होता. अठराव्या शतकांत इंग्लंडांत राहणाऱ्या ईस्ट इंडिया कंपनीचे चालकां-सारखी शाहूची मनोवृत्ति होती. व्यापार करावा, राजकारणांत पडून लढाईचीं वगैरे नसतीं लफडीं उपस्थित करूं नयेत, असें कंपनीचे चालक हिंदुस्थानांत वापरणाऱ्या आपल्या हस्तकांस जीव तोडून सांगत, परंतु त्यांचा तो उपदेश धाब्यावर बसवूनच येथील अधिकाऱ्यांनीं राज्याची स्थापना केली. तशांतलाच थोडाबहुत प्रकार शाहू व पेशवे यांचा दिसून येतो. लष्करी दृष्टीनेंही शाहूचा समज अशक्य कोटींतला होता. चौथाई वगैरेचे हक्क प्रांतिक सुभेदारांनीं लिहून दिले किंवा बादशहानें कबूल केले म्हणजे ते लागलेच कायम होऊन पदरांत पडले असें शाहूस वाटे. परंतु तसा प्रकार बिलकूल नव्हता. सालोसाल फौजा जमवून स्वाऱ्या कराव्या लागत, त्यांत उपस्थित होणाऱ्या युद्ध प्रसंगांस तोंड द्यावें लागे, आणि इतकें करून मुलखांत शांतता प्रस्थापित करावी, तेव्हांच खंडणीचा वगैरे पैसा पदरांत पडे. हा सर्व प्रकार किती जोखमेचा व त्रास-दायक होता याची कल्पना शाहूस नव्हती. सरदारांचे विजय ऐकून खुशी दाख-विण्याचेंच काम बहुधा शाहू करी; पुढें पुढें त्यानें बाहेरचा सर्वच व्याप पेशव्यां-कडे सोंपून दिला.

मराठ्यांचा बंदोबस्त करण्यासाठीं बादशहानें महंमदखान बंगसाची नेमणूक केली, तेव्हां बुंदेलखंडाप्रमाणें माळव्यांतही त्यानें मराठ्यांचा उच्छेद आरंभिला. बढवाणीच्या उत्तरेस चिखलदा नांवाचें ठाणें उदाजी पवाराच्या ताब्यांत होतें, तें त्यानें ता. १०-४-१७३१ रोजीं काबीज केलें. या वेळीं दाभाड्याशीं झगडण्यांत बाजीरावाचें सर्व लक्ष गुंतलेलें असल्यामुळें बंगसास माळव्यांत बराच मोकळा हात सांपडला. लगेच तो मल्हाररावावर मंडलेश्वराकडे चालून गेला, परंतु मल्हारराव त्यास चुकवून जयपुराकडे निघून गेला ता. १९.५. १७३१ रोजीं बंगस उज्जनीस आला आणि तेथून जून महिन्यांत अंताजी माणकेश्वराचा पराभव करून त्यानें आपली छावणी पावसाळ्यांत सिरोंज येथें नेली.[1] इकडे त्यानें शाहूशीं पत्रव्यवहार करून, माळव्यांतून आपल्या सरदारांस परत बोलवा, अशी खटपट सुरू केली. परंतु शाहूनें एकच निक्षून जबाब त्यास दिला कीं, ' आम्हीं सर्व कारभाराची मुखत्यारी बाजीरावाकडे दिली आहे, त्यांच्याशींच तुम्हीं काय तें बोलणें करा.' पुढें स. १७३१–३२ त बंगसाच्या मराठे सरदारांशीं अनेक चकमकी झडल्या. परंतु ते आपणास आटपत नाहींत असा अंदाज बांधून, होळकर वगैरे कित्येकांस गौरवून आणून त्यांच्याशीं कांहीं करार ठरविले. स. १७३२ च्या पावसाळ्यांत त्यानें पुनः सिरोंज येथें छावणी केली आणि बादशहास निकरानें कळविलें, कीं ताबडतोब मोठी फौज पाठवा, नाहीं तर सर्व प्रांत हातचा गेला आणि पुढें प्रत्यक्ष दिल्लीवरही घाला येणार, असें समजा. दोन वर्षांत बंगसाकडून वसूल तर कांहीं आलाच नाहीं, उलट त्याजबद्दल सर्व जमीनदारांकडून नाहीं नाहीं त्या कागाळ्या मात्र बादशहाकडे पोंचल्या होत्या. शिवाय निजामाशीं संगनमत करून बंगसच आपल्याशीं बंडखोरी करीत आहे, अशी बादशहाची भावना झाली. वजीर कमरुद्दीनखान व मीरबक्षी खान डौरान हे दोघेही बंगसाचे विरुद्धच होते. खान डौरानचें जयसिंगाशीं सख्य होतें. त्यानें जयसिंगाचीच नेमणूक माळव्यावर करावी, दुसऱ्याचे हातून मराठ्यांचा बंदोबस्त होऊं शकणार नाहीं, असा बादशहास आग्रह केला. तो मान्य करून बादशहानें बंगसास परत बोलाविलें. तेव्हां बंगस कारभार सोडून ता. १६-१२-१७३२ रोजीं परत आगऱ्यास पोंचला.त्यापुढें तीन चार वर्षें माळव्याचा

---

१ आर्व्हिन २ पृ. २५४.५५.

कारभार जयसिंगाकडे होता. त्या अवधींत काय प्रकार घडले ते पुढें दिसून येतीलच. जयसिंगाशीं शाहूनें व सरदारांनीं नेहमींच सख्य राखिलें होतें. सिंदे, होळकर व पवार हे तीन मराठे सरदार माळव्यांत कायमचें ठाणें देऊन बसले होते. राणोजी सिंदे उज्जन येथें राहिला. होळकरानें व उदाजी पवारानें १७२९ चे अखेरीस मांडवगड काबीज केला. अशा स्थितींत माळव्यांतून मराठ्यांस घालवून देणें अशक्य होतें; आणि तसा प्रयत्नही जयसिंगानें केला नाहीं.स.१७३२च्या नोव्हेंबरांत चिमाजी आपा माळव्याकडे असतां त्यास सावध राहण्याविषयीं शाहूनें स्वदस्तुरचें पत्र लिहिलें. ( शा.रो.५७ . परंतु मराठ्यांवर चाल न करतां उलट त्यांसच माळव्याची सुभेगिरी द्यावी, अशी जयसिंगानें बादशहाकडे खटपट चालविली होती.जयसिंगाची मनधरणी करून त्याचा स्नेह राखावा,मांडवगड सुद्धां पाहिजे तर त्यास द्यावा, असें शाहूनें चिमाजीआपा, होळकर व पवार यांस मुद्दाम लिहून पाठविलें होतें (रो.१९८). मराठ्यांस माळव्याची सुभेगिरी देण्याची योजना दिल्लीच्या दरबारांत पसंत पडली नाहीं. जयसिंग मराठ्यांस सामील आहे अशी त्याजबद्दल दरबारांत शंका येत होती. मराठयांस माळव्याची सुभेगिरी मिळावी अशी खटपट दरबारांत मराठ्यांचा वकील महादेवभट हिंगणे करीत होता. मराठ्यांनीं माळव्यांत कारभार केला, त्यासंबंधानें माल्कमनें आदरोद्गार काढिले आहेत. मोगलाईंतील दुर्बल कारभारापेक्षां मराठ्यांचा माळव्यांतील कारभार लोकांस फारच मृदु व संतोषकारक वाटला. बाजीरावानें पुढील राज्यविस्ताराचा पाया माळव्यांत घातला. माळव्यांत राहून त्यानें बुंदेलखंड जिंकिलें, आणि उत्तरेकडच्या मुलखांतून वसूल घेण्याचा सपाटा चालविला. सारांश, प्रतिनिधीशीं वाद करतांना शाहूचे दरबारांत केलेली प्रतिज्ञा बाजीरावानें खरी करून दाखविली. बाळाजी विश्वनाथाचा उद्योग नर्मदेस भिडला,तर बाजीरावाचा चंबळपर्यंत पोंचला असें ह्मणतां येईल. या सर्व उद्योगाचें मुख्य श्रेय, सिंदे व होळकर या दोन सरदारांस आहे. हे दोन सरदार सर्व माहिती मिळवून, मसलती व घाट रचून, सिद्धता करीत, आणि बाजीरावाचें अनुमोदन घेऊन नंतर तो उद्योग सिद्धीस नेत. कित्येक प्रसंगीं त्यांनीं उपस्थित कलेले डाव अंगावर येऊन त्यांचा निस्तारही पेशव्यांस करावा लागे, हें उत्तरोत्तर स्पष्ट होईल.

# प्रकरण तेरावें.

## मराठ्यांची दिल्लीवर चढाई.[1]

स. १७३४–४०.

१. चौथाईची मागणी व बाजीरावाचें कर्ज. २. कमरुद्दीनखानाचा पाडाव.
३. चौथाईच्या सनदांची प्राप्ति. ४. बाजीरावाचा दिल्लीवर हल्ला.
५. बादशहाची त्रेधा व शाहूची कळकळ. ६. भोपाळावर निजामाचा पाडाव
७. भोपाळच्या संग्रामाची चिकित्सा. ८. नादीरशहाची स्वारी.
९. मराठे वकीलांनीं केलेलें या प्रळयाचें निदान. १० स्वारीच्या वेळची परिस्थिति.
११ नासिरजंगावरील स्वारी व बाजीरावाचा मृत्यु, (२७·४·१७४०.)

**१. चौथाईची मागणी व बाजीरावाचें कर्ज.**—स. १७३४ पावेतों दिल्लीकडील कारस्थानांत स्वतः हजर राहून भाग घेण्यास बाजीरावास सवड आली नाहीं हें मागें सांगितलेंच आहे. स. १७३१ त दयाबहादुर पडल्यावर, माळव्याचा सुभा जयसिंगास मिळून, त्यानें मराठ्यांची बाजू उचलून धरिली. माळव्याचा कारभार बहुधा मराठेच करूं लागले; आणि उघडपणें माळव्याचा सुभा बाजीरावाचे हवालीं करावा, अशी दरबारांत खटपट चालू झाली. या वेळीं वजिरीवर कमरुद्दीनखान असून शम्सामुद्दौला खानडौरान मीरबक्षी हाच मुखत्यारीनें कारभार पाहत होता, मराठ्यांशीं सख्य ठेवून कार्यभाग उरकण्याचा त्याचा इरादा होता. परंतु दरबारांतील दुसऱ्या अनेक प्रबल मंडळीस मराठ्यांची ही चढाई पसंत पडत नव्हती. बाजीराव स्वतः कोंकणांत गुंतला असतां त्यानें शिंदे होळकरांस दिल्लीचे बाजूस धामधूम उडवून पैसे आणण्यास पाठविलें. बाजीरावास पैशाची मोठी अडचण असून, ती मिटविण्याचा त्याचा या दोन सरदारांस मोठा तगादा होता. तदनुसार स. १७३३ व ३४ या दोन सालांत आग्रादिल्लीपावेतों निरनिराळ्या ठिकाणीं स्वाऱ्या करून त्यांनीं बराच पैसा वसूल केला. कंठाजी कदम पूर्वी गुजराथेंत मुलूखगिरी करीत असे, त्यास दमाजी गायकवाडानें स. १७३३ त त्या प्रांतांतून काढून दिलें, तेव्हां तो जाऊन होळ-

१ बादशाही हालचालीं संबंधानें अर्व्हिननें दिलेल्या माहितीचा उपयोग केला आहे.

करास मिळाला. १७३४ त त्या दोघांनीं माळव्यांतून गुजराथच्या उत्तरभागीं उतरून,पालनपुर, अहंमदाबाद, ईडर या ठिकाणांतून मोठी लूट संपादन केली.

खानडौरान स्वभावानें उपद्व्यापी नसल्यामुळें मराठ्यांचे उद्योग बरेच दिवस अविच्छिन्न चालले. माळव्यांतही मराठ्यांचें वर्चस्व बसण्यास या वजिराचा नेभळा कारभारच कांहीं अंशीं कारण झाला. याचें मूळचें नांव ख्वाजा आसीम, व बापाचें नांव ख्वाजा कासम. आसीमचा जन्म स. १६७२–७३ त झाला. मोठा झाल्यावर त्यानें बंगाल्यांत अर्जीमुश्शानची नोकरी पत्करिली. पुढें फरुखसियरबरोबर राहून त्यानें सय्यदांची मेहेरबानी संपादिली, आणि त्यांच्याच वशिल्यानें दरबारांत त्याचें वजन वाढून, खान डौरान बहादुर मनसूरजंग हे भव्य किताब त्यास मिळाले. निजाम दक्षिणेंत आल्यावर महंमदशहानें त्यास मीरबक्षीचें काम दिलें, तें स. १७२३ हासून ३९ पावेतों त्यानें केलें. त्या सालीं नादीरशहाच्या हल्ल्यांत तो मारला गेला. मराठ्यांचे कागदांत ‘ खानडौरा ’ असा त्याचा उल्लेख आहे, दरबारांत कोणाशींही अतिप्रसंग करावयाचा नाहीं, होतां होईल तों सर्वांस खूष ठेवून आपला कार्यभाग साधावयाचा,अशा वृत्तीनें त्यानें महंमदशहाचा कारभार पुष्कळ वर्षे बरेपणें निभावला. त्याच्या अंगीं विशेष कौशल्य किंवा कर्तृत्व नव्हतें, परंतु गोड भाषण व रुआबदार वर्तन यांमुळें त्याचे दोष झांकले जात. अतिप्रसंग किंवा निकराच्या भानगडी अंगावर न घेतल्यामुळें महंमदशहाची कारकीर्द एकंदरींत लांब व शांततेंत गेली. मात्र मराठे, रजपूत व जाठ यांचा जोर वाढत जाऊन बादशाही कमकुवत झाली.

माळव्याचा सुभा जयसिंगास, किंवा गुजराथचा सुभा अभयसिंगास बादशहानें दिला, त्याचप्रमाणें दक्षिणचा सुभाही तो मराठ्यांस देईल अशी निजामास मोठी भीति होती, म्हणून मुंगीशेवगांवच्या तहानंतर त्यानें मराठ्यांशीं विकोप न करितां सामदामाचेंच धोरण ठेविलें,आणि अंतस्थ रीतीनें दरबारांत मराठ्यांचे विरोधकांस उत्तेजन देण्याचा डाव चालविला. स. १७३३–३५ त सिंदे होळकरांनीं थेट दिल्लीपावेतों जेव्हां मोठी धामधूम सुरू केली, तेव्हां बादशहा व खानडौरान यांनी त्यांच्याशीं लढण्याचें ठरवून, दक्षिणेंतून निजामासही मदतीस बोलाविलें. परंतु आपल्याशिवाय बादशाहीचें संरक्षण होत नाहीं, अशी आणी-

बाणीची वेळ आल्याशिवाय आपण त्या कामांत पडावयाचें नाहीं, असा निजामाचा बेत होता, म्हणून या वेळीं त्यानें मराठ्यांशीं बिघाड केला नाहीं.

बाजीरावास पैशाची मोठी अडचण पडलेली होती. वास्तविक स. १७३४-३६ या तीन सालांत ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेल्या ले. ३०,३१,३२ पत्रांवरून कर्जानें तो अगदीं गांजून गेला होता असें दिसतें. एकसारख्या स्वाऱ्या चालू राहिल्यानें त्यास जबरदस्त कर्ज झालें. जिंकलेल्या मुलखाची आबादानी होऊन बसूल येण्याची तजवीज झाली नव्हती. वसूल करण्यासाठीं त्यास पुनः सालोसाल स्वाऱ्या कराव्या लागत. साताऱ्याहून पैशाची मदत होत नसे. घरांतून पैसे नेऊन स्वाऱ्या करायच्या कीं, स्वाऱ्या करून घरीं पैसे आणायचे, असा कोटिक्रम दरबारांत चाले. या वेळीं निजामही पुढील धोरण ओळखून मोठमोठ्या फौजा तयार करीत होता. तेव्हां निजामापेक्षां बाजीरावास ज्यास्त खर्च लागूं लागला. सिंदे व होळकर हे त्याचे विश्वासु सरदार थोडी बहुत मदत करीत, ह्मणून बाजीरावाचें कसें तरी चाले. सावकारांपुढें नाक घासतां घासतां कपाळास घट्टे पडले, असें बाजीराव ब्रह्मेंद्र स्वामीस लिहितो. एवढ्या शूर पुरुषाची ही केविलवाणी स्थिति पाहून विस्मय वाटतो, आणि पैशाची व्यवस्था करतां न येणें, ह्मणजे राज्य चालविण्याचें धोरण त्याचे अंगीं असावें तितकें नव्हतें, असें ह्मणावें लागतें. स. १७३५-३६ त बाजीरावानें हिंदुस्थानांत स्वारी केल्यावेळचीं हीं पत्रें बहुधा आहेत. ‘ आह्मास कर्जानें बुडविलें. प्राण जाता तरी बरें होतें. विष खाऊन मरावें इतकेंच. आतां प्रस्तुत साताऱ्यास जात नाहीं. तेथें जाऊन काय करावें! आमचे उरावर पाय देऊन कार्य करतील. ज्या स्त्रीस पुरुष नाहीं, तिची गत होते तैशी, तुह्मी असतां, आमची गत साऱ्यांनीं मांडली आहे. चित्तांत येईल तरी आपलें ब्रीद रक्षावें. माझे विचारें हे सर्व रंग सोडून एखादेकडे जावें. पुनः तोंड खांवदांस अगर लोकांस दाखवावें असें नाहीं. कर्ज फिटत नाहीं. आतां वांचल्याचें सार्थक काय ? आपल्या जिवाचा त्याग करितों आज दाभाडे, गायकवाड, बांडे कोटि रुपये खाजिने; आणि मी तुझे पायांशीं व धन्याचे पायाशीं निष्ठेनें वर्ततों तो अन्नास महाग झालों. आह्मी जोड इतकीच केली कीं वीस लाख रुपये कर्जदार झालों.’ अशीं हीं पत्रें त्या वेळच्या स्थितीचीं निदर्शक आहेत.

मल्हारराव होळकर, राणोजी सिंदे, पिलाजी व सटवोजी जाधव, दाभाडे व पवार कुटुंब, नागपुरकर भोसलें, कदम बांडे, गोविंदपंत बुंदेले, हिंगणे, अंताजी माणकेश्वर वगैरे आणखी अनेक सरदार हिंदुस्थानच्या निरनिराळया भागांत संचीर करून सडकून द्रव्य संपादीत होते.वरील सर्व मोठमोठया मंडळींनीं कोट्यावधि संपत्ति पैदा केली. कित्यकांनीं आपल्या घोड्यांस सोन्याचे नाल बसविले. कोटि रु. ह्मणजे कांहीं नाहीं अशा रीतीनें ते सहज फेकून देत असत. असें असतां त्यांचा पुरस्कर्ता बाजीराव सदैव कर्जांत बुडालेला, कर्जापायीं त्यांचा दास बनलेला पाहून विलक्षण आश्चर्य वाटतें. सरदार लूट करितात, त्याचें अपेश मात्र बाजीरावाचे डोक्यावर, आणि फायदा हे सरदार घेत. या संपत्तीची लालूच सरदारांस लागलेली होती, यामुळें आपापाले प्रांत सोडून यत्किंचित् दूर जाण्यास ते नेहमीं नाखूष असत. इतकें असूनही बाजीरावाचें कर्ज तरी त्याच्याच शद्बानीं वीस लाख होतें, तें कोणाही लहानशा सरदारास सहज देतां आलें असतें. अशा अव्यवस्थेच्या कारभारामुळें बाजीरावाच्या कर्तबगारीसंबंधानें आपला आदर बराचसा कमी होतो.

माळवा, गुजराथ व बुंदेलखंड या तीनही प्रांतांत मराठ्यांचें प्राबल्य झालेलें पाहून बादशहास मोठी धास्ती पडली. वजीर, खानडौरान व बंगस या सर्वांस त्यांजवर चालून जाण्याचे वारंवार हुकूम होत; आणि तेही पोकळ धामधूम दाखवून पावसाळा लागतांच परत येत. या हालचाली मराठ्यांस कळत असल्यामुळें त्यांस ज्यास्तच जोर चढे. अशा पेंचांत बादशहा असतां तो स्वतः मराठ्यांवर चालून जाण्याचा आव आणी, परंतु राजवाड्यांतील ऐषआराम सोडून बाहेर पडण्याचें त्याच्या जिवावर येई. खानडौरानचा भाऊ मुजफरखान फार वर्षे अजमीरच्या कारभारावर होता, त्यास मराठ्यांवर चालून जाण्याचा तारीख २८·६·१७३३ चा, हुकूम सुटला. पण ता. २०·२·१७३४ रोजीं मुजफरखानाचे तंबू कोठारांतून बाहेर आले; आणि पहिलें सहा मैलांचें कूच त्याचें ३·३·१७३४ रोजीं केलें. इतक्यांत मराठे आगऱ्याजवळून परत जातात अशी बातमी आली. आतां पुढें चाल केल्यास आपण पोंचण्यापूर्वीच ते नर्मदापार होऊन परत जातील; मग पुढें जाण्याचा उपयोग काय, असें ह्मणून मुजफरखान परत दिल्लीस गेला. तेथें जूनचे अखेरीस त्यानें बादशहाची भेट घेतल

स. १७३३ च्या डिसेंबरांत भोपाळचा पीरमहंमदखान व मल्हारराव यांच्या कांहीं चकमकी झडल्याचा उल्लेख आहे.स.१७३४च्या आरंभीं त्यांनीं आगऱ्याच्या पूर्वेकडील भदावर प्रांत लुटला. फेब्रुवारींत पिलाजी मकडाई येथें होता. जयसिंग त्याचा प्रतीकार करील असें वाटलें होतें, परंतु त्यानेंही तोंडपाटिलकीपलीकडे कांहीं हालचाल केली नाहीं जयसिंगाजवळ तीस हजार फौज असून दिल्लीपासून नर्मदेपावेतोंच्या प्रदेशावर त्याची हुकमत होती. परंतु बादशहापासून लाखों रुपयांच्या रकमा घेऊन, त्यांतल्या निम्म्या आपण ठेवून निम्म्या मराठ्यांस भरण्यापलीकडे जयसिंगानें कांहीं केलें नाहीं. खानडौरा तर जयसिंगाचीच पाठ राखीत असे. या देण्यासंबंधीं राणोजी शिंदे महादेवभट्ट हिंगण्यास ता. ३०·६·१७३४ रोजीं लिहितो. ' रावसाहेब पेशवे देशास गेले. आह्मीं, मल्हारबा व पवार त्रिवर्ग माळव्यांत छावणी करितों. याउपरी खर्चाची पोख्ती बेगमी करून जलदीनें पाठविणें. पंचविसांच्या सनदा व सुभ्याची सनद घेणें. ते ह्मणतील मुख्य भेटतील तेव्हां देऊं, तर ते व आह्मी कांहीं दोन नाहीं. कोणे गोष्टीची बाकी न ठेवणें. ठेवतील तरी त्यांसा भारी पडेल.' तारीख १४·७·१७३४ रोजीं पुनः त्यास राणोजी लिहितो. ' आह्मी व मल्हारबा, व पवारत्रिवर्ग (यशवंतराव, जिवाजी व उरीख) फौजेनिशीं राहिलों. तमाम गिरासियांचा बंदोबस्त केला. पठारीस ठाणें बसविलें, लालगडवाला लुटिला; चोर देशांतरांत गेले. रयतीस कौल दिल्हा. प्रस्तुत आग्रे परगण्यांत आहों. कराराप्रमाणें सनदा, खर्च व सुभ्याची सनद या सर्व गोष्टी करून देतील तरी सत्वरीं करणें, नाहीं तरी उठोन येणें. हा कालवरी। पातशाही चाकरींत आहों. पातशाहीमध्यें खबर आहे कीं नाहीं न कळे जरी बनत असलें तरी सांगावें. नाहीं तरी त्यास सांगून प्रयोजन काय आहे ! याददास्तीप्रमाणें फर्मान करार झाला. तूर्त एक लाख रुपये दिले. वरकड पुढें देणार ह्मणोन पत्र पाठविलें तें पावलें, ऐशास दोन महिने झाले. त्यांस इतबार अजून न येच ( बादशहांस आमचा भरंवसा अजून येत नाहीं. ) धातुपोषणच करतात (थापा देऊन दिवस काढतात.)असला सलूख काय कामाचा ! अवघा पक्का बोलीप्रमाणें घेणें. पुढें फौजाही जमा होतील. मोठें एखादें पातशाही कामकाज अवघे मिळोन तडीस नेल्यानें सर्व गोष्टी अमलांत येतील. सनदांविषयीं बोलणें चालू असून बाजीरावाचे सवाल जबाब जात येत होते.(खं. ६·९१–९९)

२. कमरुद्दीनखानाचा पाडाव, (फेब्रुवारी १७३५).—स. १७३४च्या पावसाळ्यानंतर फिरून बादशहानें वजीर व खानडौरान यांस दोन भिन्न दिशांनीं जाऊन मराठ्यांस हांकून देण्याची आज्ञा केली. पैकीं कमरुद्दीनखान ता. २०·११·१७३४ रोजीं मोठी फौज व तोफखाना घेऊन आगऱ्याहून निघाला. सटवोजी जाधव, राणोजी भोसले, व्यंकटराव नारायण वगैरे कित्येक सरदार माळवा बुंदेलखंडांत खंडण्या वसूल करीत होते. दिल्लीहून मोठ्या फौजा चालून येतात अशा बातम्या तावडतोब दक्षिणेंत पोंचून शाहू किती घाबरा होत असे, हें खालील पत्रांत दिसून येतें. ' दिल्लीहून फौजा येत आहेत ह्मणून वार्ता दाट आली आहे. प्रसंग कैसा पडेल न कळे, तरी एक महिनापर्यंत दूर प्रांतें न जातां फत्तेपुरामाजींच[१] राहणें.' अशीं खास दस्तखतें शाहूनें १४-१२-३४ रोजीं सरदारांस पाठविलीं. नरवर, ओर्छा वगैरे ठिकाणीं वजीर व मराठे यांची धावपळीची झोंबाझोंबी फेब्रुवारींत झाली, तिचें वर्णन खालील दोन पत्रांत आहे.

' रा. पंतप्रधान तथा चिमणाजी पंत आपा स्वामी गोसावी यांस. पोष्य व्यंकटराव नारायण. छ २ सवाल ( १५-२-१७३५ ) मु. हटेगांव प्रांत वोडसें विशेष नवाब कमरुद्दीनखान पाठीस लागून आला. याकरितां बुंदेलखंडांत बुनगे ठेवावया येऊन राहिलीस पाठविल्याचें व युद्धप्रसंग झाल्याचें वर्तमान आबाजी जासूद व कासीदजोडी रा. धोंडो महादेव यांजकडील आली होती, त्यांबरोबर पत्रीं लिहून दोन पत्रें पाठविलीं आहेत, तीं प्रविष्ट होऊन वर्तमान विदित जाहलेंच असेल. त्याअलीकडे ३० रमजानीं ( १३-२-१७३५ ) चालते मजलीस युद्ध जालें. कमरग्यामध्यें फौजेनें घालून शें सवारी उंट आणिले. झुंज होत होत मोगल उदतसिंगाच्या तळयावरी मुक्कामास जाऊन मुक्काम केला. आमचेही मुक्काम आदकोसावरी जाहले, दुसरे दिवशीं छ १ सवालीं मोगलांची ईद होती, परंतु मुक्काम न करितां, नगारा न होतां, मुकाट्यानें कूच पहांटे करून चालिला. आह्मीं बातमीस राऊत ठेविले होते, ते खबर घेऊन येतांच, कुलफौजेनशीं चालून जाऊन, मोगलांसभोंवते घेरट्या घेऊन, करोल पुढें घालून, मोगलांशीं युद्ध जाहलें. हुजरात व रा. सटवोजी जाधव, गोविंद हरि, व राणोजी व भिकाजी सिंदे, व संताजी मोरे व शिवाजी घालवडे, व येशाजी सतकर, व

१ शा. रो. ६५. फत्तेपुर दमोच्या उत्तरेस २५ मैल.

अर्जुनजी भोसले यांनीं व समस्त लोकांनीं बरीशी मेहनत करून कमरुद्दीनखाना-सारिखा वजीर खटा करून बोडशामध्यें घातला, आणि फौजनशीं वेत्रवती उतरोन जाटवाडा व भदावर ग्वालेरीकडे गेलों. याउपरी मोगल आमचे पाठी-वरी फिरोन यावयाची उमेद तों नाहीं. कदाचित् आला तरी हिसाब धरीत नाहीं. जो मोगल आमचे पाठीवरी चालोन येत होता, त्या मोगलाचे पाठीवरी स्वामींची फौज लागोन, आडा करून वोडशांत घातला, हे सलाबत कांहीं सामान्य जाहली असें नाहीं. सारांश, स्वामीच्या पुण्याचा अगाध महिमा आहे, तदनुरूप योग घडून आला. स्वामींनीं आम्हांकडील कोण्हेविशीं फिकीर करावी ऐसें नाहीं. सविस्तर वृत्त रा. जाधवराव यांचे पत्रीं लिहिलें आहे, त्यावरून विदित होईल.'

'सकलगुणालंकरण अखंडित लक्ष्मी आलंकृत राजमान्य राजश्री चिमणाजी-पंत आपा स्वामी गोसावी, पोष्य व्यंकटराव नारायण, साष्टांग नमस्कार विनंति उपरी, येथील कुशल, ता॥ छ १० सवाल ( २५-२-१७३५ ) जाणून स्वकीय कुशल लेखन करावया आज्ञा केली पाहिजे. विशेष. आपण पत्र छ. ९ रमजानचें पाठविलें तें पावलें. राजश्री पिलाजी जाधवराव यांस लिहिलें आहे, त्याप्रमाणें जो जो कर्तव्य तो करून वर्तमान लिही ( फाटलें ). ऐशियास (फाटलें) जाणून प्रसंगोपात मनसुबा करावया अंतर करितात ऐसें नाहीं. कमरुद्दीनखान याच्या शहामुळें टक्या पैक्याचें काम चाललें नाहीं, व ताम्राचे युद्धप्रसंग जाल्याचें वर्तमान पेशजी एक दोन पत्रें पाठविलीं त्यांत व हल्लीं तपशिलें लिहिलें आहे त्यावरून विदित होईल. सारांश, आपल्या पुण्यप्रभावें कमरुद्दीखानासारिखा वजीर असतां, तंबी पोहंचऊन यश संपादिलें व इकडून लौकिक बरासा जाहला. समस्त लोकांनीं मेहनत सामान्य केली आहे ऐसें नाहीं. कळलें पाहिजे. राजश्री आनंदराव पंडित सुमंत यांचें पत्र आलें होतें. त्यांचीं व राजश्री मल्हारजी होळकर व राजश्री राणाजी शिंदे यांचीं पत्रें आलीं त्यांच्या नकला करून पाठ-विल्या आहेत, यांवरून कळों येईल. आम्ही येथून पत्रें चिरंजिवांकडे नांदणीस पाठवावया कारणें पाठविलीं आहेत, तरी स्वामींनीं जासूद नांदणीस पाठवून पत्रें पावतीं केलीं पाहिजेत. त्यांचीं उत्तरें आलिया इकडे आपले कासीद येतील त्यांबरोबर पत्रें येतील तीं पाठविलीं पाहिजेत. बहुत काय लिहिणें कृपा

असों दीजे हे विनंति.* या भागांत उन्हाळा सुरू होऊन बाजीरावाच्या हुकमानें मराठे नर्मदा उतरून परत आले, आणि वजिराचें काम भागलें. ता. २१-५-१७३५ रोजीं तो परत दिल्लीस पोंचला.

वजिराबरोबरच खानडौरान व जयसिंग हे दिल्लीहून नोव्हेंबर १७३४त निघून अजमीरच्या बाजूस मल्हारराव होळकर होता, त्याजवर चालून आले. होळकरानें सांबरची लूट केली होती. जयसिंगाच्या मध्यस्थीनें खानडौराननें होळकराशीं तडजोड चालविली. चौथाईबद्दल बावीस लाख रुपये देण्याचा ठराव मराठ्यांचा वकील महादेव भट हिंगणे याचे मार्फत होळकराशीं करून, बुंदी-कोट्यावरून परत फिरून खानडौरान मे महिन्यातच दिल्लीस पोंचला.

३. **चौथाईच्या सनदांची प्राप्ति** (जुलई १७३६).—स. १७३५ च्या पावसाळ्यानंतर मराठ्यांनीं एकदम मोठी जोराची उचल केली. चौथाईच्या सनदा व त्याजबद्दलचा सालोसालचा वसूल सुरळितपणें हातीं येईपर्यंत बादशाही मुलखास व त्यांच्या ताब्यांतील संस्थानिकांस पूर्णपणें त्रासवून सोडण्याचा शिंदे होळकर वगैरे सरदारांचा उपक्रम होता. ते सर्व माळव्यांत छावणी देऊन बसल्यामुळें मोठमोठे बैठे खर्च परभारें भागविण्याचीही त्यांस निकड होती. म्हणून वकिलामार्फत दरबारांतून आपल्या मागण्यांचा निकाल झाला नाहीं हें पाहून, बाजीरावाच्या हुकुमानें या सरदारांनीं पावसाळा संपतांच रजपुतान्यावर चाल केली, आणि उदेपुर, मेडता, नागोर, अजमीर व त्या जवळचें रूपनगर इत्यादि शहरांवर हल्ले करून त्यांनीं चापून रकमा गोळा केल्या. ही बातमी दिल्लीस पोंचतांच बादशहानें पुनरपि पहिल्या वर्षाप्रमाणें वजीर व खानडौरान यांस दोन दिशांनीं रवाना केलें; आणि अयोध्येचा सुभेदार सादतखान यासही वजिरास मदत करण्याचा हुकूम पाठविला. या तयाऱ्या होण्यापूर्वीं पिलाजी जाधव, चिमाजी आपा वगैरे बुंदेलखंडांतून उत्तरेस चालून आले. यमुना उतरून दुआबांतील इटावा प्रदेशांतून त्यांनीं कानपुर परगण्यांत जाऊन तेथील अनेक ठिकाणें लुटून खंडण्या घेतल्या. ग्वाल्हेरकडचा प्रदेश तर त्यांनीं अगोदरच नागविला होता. ता. २५-९-१७३५ रोजीं खेचिवाड्यांतून पिलाजी जाधव आपल्या मुलास लिहितो. 'दसरा झाल्यावर खेचीचे मुलखांत आलों. बोली-

*वरील दोन पत्रें रा. बा. वि. जोशी सातारा यांजकडून मिळालीं.

चालीचा निर्णय जाहला. सवाईजीकडील राजामल आले. याचे भिडेनें दुप्पट जाहालें. महादेवभट दिल्लीहून आला. पातशाही फर्मान हत्ती व घोडे दोन अडाव घेऊन आले. वजिराचा मुनशी शिवनाथ आला आहे. पूर्वेकडे जावें ऐसा मुद्दा त्याचा आहे. कांही मदतखर्च कबूल केल्यास फाल्गुन मासीं जाणें होईल. येथून आहिरवाड्यांत जाणें होईल. वोडसें, दतिया वगैरे अवघे वकील जमा जाहले आहेत. ( खं. ६-१७. या पत्राची ता. २५ सेप्टेंबर १७३५ पाहिजे.)

मराठे ग्वाल्हेर घेऊन आगऱ्यावर येणार असें पाहून बादशहानें महंमदखान बंगसास आगऱ्याचे बंदोबस्तास पाठविलें. त्यानें जानेवारी २४ स. १७३६ रोजीं चंबळवर येऊन मराठ्यांचा रस्ता अडवून धरिला; आणि कमरुद्दीनखानानें पुढें येऊन नरवराहून पिलाजीवर चाल केली ओर्छाचे पूर्वेस त्यांची गांठ पडली. एके दिवशी एक चकमक उडून मराठे पळून गेले; आणि फिरून ते माळव्यांत येणार नाहींत असें वाटून, फेब्रुवारीनंतर वजीर परत दिल्लीस गेला.

इकडे खानडौरान पश्चिम बाजूनें मराठ्यांवर चालून आला. राजपुतान्यांत उतरून त्यानें व जयसिंगानें होळकरावर चाल केली. परंतु एक दोन प्रसंगीं मोगल फौजेस होळकरानें चांगलाच हात दाखविला. मराठ्यांचे या वेळचें धोरण विशेष निकराचें होतें. स. १७३५ च्या पावसाळ्यांत पुढील उद्योगाची वाटाघाट सातान्यास करून दसऱ्यानंतर बाजीराव उत्तरेंत गेला. माळव्यांत गेल्यावर त्यानें जगसिंगाच्या मार्फत चौथाईच्या सनदांची, व सरबुलंदखानानें गुजराथचा तह ठरविला तो मंजूर करून देण्याची, मागणी बादशहाकडे ठांसून केली. बाजीरावाचा हा जोर पाहून त्याच्या मागण्या कबूल कराव्या अशीच जयसिंग व खानडौरान यांनी बादशहास सल्ला दिली. परंतु वजीर वगैरे तुराणी पक्षाचा यास मोठा विरोध होता. ता. ५-३-१७३६ रोजीं जयसिंग व बाजीराव यांची गांठ जयपुराजवळ मनोहरपुर येथें पडून परस्परें सन्मान व आदरपुरःसर स्नेहाभिवृद्धि जाहली. नंतर खानडौरा यांचे बंधु मुजफरखान भेटीस येणार, आल्यानंतर काय तो विचार होईल, असें बाजीरावानें दक्षिणेंत भावास लिहून पाठविलें. वरील भेटीच्या प्रसंगीं बाजीरावाबरोबर त्याचा मुलगा जनार्दनपंत व सिंदे, होळकर, पवार इत्यादि सरदार होते. सनदांची ही वाटाघाट दिल्ली दरबारांत कैक महिने चालली. जयसिंगानें तर निक्षून

कळविलें, कीं माळव्याच्या सुभ्यावर बाजीरावाचीच नेमणूक करावी. त्याशिवाय मराठ्यांच्या स्वाऱ्यांचा सालोसाल होणारा त्रास मिटणार नाहीं. वास्तविक सुभेगिरी देण्यासंबंधानें जयसिंग किंवा बाजीराव यांजवर तरी बादशहाचा विश्वास कां नसावा ! नानाप्रकारची चर्चा होऊन शेवटीं ही गोष्ट बादशहास पटली. त्यानें चौथाई सरदेशमुखीच्या सनदा सहीशिक्यानिशीं पुऱ्या करून त्या जयसिंग व बाजीराव यांजकडे पाठविल्या; आणि त्या संबंधानें बोलणें करण्यासाठीं यादगारखान काश्मिरी, नसबतअलीखान व कृपाराम यांस १८-६-१७३६ रोजीं दिल्लीहून रवाना केलें. या मंडळींची व जयसिंग बाजीरावांची भेट ता. १६-७-१७३६ रोजीं धोलपुर येथें झाली. शक्य तितकें बोलाचालीनें काम भागवून बाजीरावाची समजूत करावी, आणि अस्सल सनदा बाजीरावास देऊं नयेत, अशी यादगारखानास वजिराची ताकीद होती. परंतु पेशव्याचा वकील धोंडो मल्हार पुरंदरे दिल्लीस होता, त्यास या सनदांची माहिती लागून ती त्यानें लगेच बाजीरावास कळविली. त्यावरून यादगारखान येताच बाजीरावानें त्याजबरोबर अत्यंत चढाईचें खालील बोलणें सुरू केलें. 'सर्व माळवा आम्हांस जहागीर द्या; रोहिले लोक त्यांत येऊन राहिले आहेत त्यास घालवून द्या; मांडू, धार व रायसीन हे किल्ले आमच्या हवालीं करा, पन्नास लाख रक्कम एकदम रोख द्या, तसेंच प्रयाग, काशी, गया व मथुरा हीं तीर्थस्थळें आमच्या हवालीं करा, आणि दक्षिणच्या सहा सुभ्यांवर सरदेशपांडे म्हणून नवीन शेकडा दोन टक्क्यांचा हक्क द्या.' इकडे त्यानें फौजेच्या जोरावर मुलुखगिरी चालूच ठेविली होती. बाजीरावाची ही चढेलगिरी पाहून व हा आतां प्रत्यक्ष दिल्ली सुद्धां घशांत टाकील अशी खात्री झाल्यावर, त्याजबरोबर तह करून राज्य जोडण्याचा विचार दिल्ली दरबारानें कायमचा सोडून दिला मात्र शेवटची सरदेशपांडेगिरीची मागणी कबूल केली. यांत बादशहाचा उद्देश इतकाच होता, कीं दक्षिणच्या मुलुखावर हक्क मिळाल्यानें बाजीराव तिकडे निघून जाईल, आणि निजाम परभारें त्याचा पाडाव करील. पहिला उद्देश तडीस गेला नाहीं, कारण मराठ्यांस लालूच लागून ते ज्यास्तच चवताळून बादशाही मुलखावर ताव मारूं लागले. निजामानें मात्र बाजीरावाशीं टक्कर मारण्याची चांगलीच तयारी चालविली. पूर्वी स्वतः स्वातंत्र्य धारण करितांना बादशाही सत्ता कमी

करण्याचा निजामाचा उद्योग होता, तो आतां सफल होऊन, उलट हल्लीं बादशहा दुर्बल झाल्यामुळें, मराठ्यांची खोड मोडण्यासाठीं, निजामानें बादशहास मदत करून, दोघांनीं मिळून मुसलमानी सत्ता कायम ठेवण्याचा उद्योग जोरानें सुरू केला. मोगल मराठ्यांचा हा शेवटचा निकराचा झगडा होय.

४. **बाजीरावाचा दिल्लीवर हल्ला**, ( २९-३-१७३७ ).—खरें म्हटलें तर बादशहा काय किंवा त्याचे अंमलदार काय, स्वतः पुढें होऊन नेटानें मोहिम करण्याची इच्छा कोणासच नव्हती. धनी गर्भगळित झाला, म्हणजे त्याच्या अंमलदारांत जोर कितीसा राहणार ! बादशहानें कमरुद्दीनखान, खानडौरान मुज्फरखान, मीरहुसेनखान कोका, शिवसिंग, अयोध्येचा सुभेदार सादतखान वगैरे सर्वांस मराठ्यांवर चालून जाण्याचे हुकूम सोडिले. दक्षिणेंतून निजामासही त्याच्या फौजेसह निकडीनें बोलाविलें. परंतु बाजीराव व सरदार चंबळवर येऊन थडकतपर्यंत दिल्लीच्या फौजा तयार झाल्या नाहींत रजपूत राजेही बादशहास मदत करण्यास खुषी नव्हते. विशेषतः जयसिंग तर मराठ्यांशीं लढण्याचा प्रसंग न आणितां त्यांची समजूत काढण्याची सल्ला देत होता. बुंदीचा बुधसिंग उघड उघड मोगलांचे विरुद्ध मराठ्यांस सामील झाला निजामास मराठ्यांनीं दक्षिणेंतच त्रास दिल्यामुळें तो एकदम उत्तरेंत जाऊं शकला नाहीं.

सनदा मिळण्याचा योग व युद्धाची तयारी या दोन पेचांतून पुढील विचार ठरविण्यासाठीं बाजीराव सरदारांसह स. १७३६ च्या ऑगस्टांत दक्षिणेंत आला. मागून महादेव भट हिंगणे व धोंडो मल्हार हे वकील सर्व बातम्या त्यास वेळेवर लिहून कळवीत असत. दोन वर्षे केवळ पोकळ बोलाचालींत गेलीं. मागे मनगटाचा जोर असल्याशिवाय राजकारण सिद्धीस जात नाहीं हें पक्कें जाणून, मुसलमानांनीं केलेलें आव्हान स्वीकारण्याची सिद्धता बाजीरावानें लगोलग केली. सन १७३६ च्या दसऱ्यानंतर सिंदे होळकरांस साताऱ्यास नेऊन त्यानें महाराजांस भेटविलें. हिंदुस्तानांत वावरणाऱ्या ताज्या दमाच्या या सरदारांच्या भेटीनें तिकडील उद्योगाची योग्य कल्पना महाराजांस व त्याचे दरबारास पटली असली पाहिजे. नोव्हेंबरांत बाजीराव स्वारीस निघाला, तेव्हांपासून १७३८ च्या वरसातीपावेतों दीड वर्ष ही स्वारी चालली. दक्षिणेंत निजाम व उत्तरेंत मोगल अशांच्या सामर्थ्यवान फौजांशीं टक्कर देण्याची तयारी बाजीरावानें केली.

एकंदर फौज ८०००० जमा झाली. मराठे मुसलमानांचें भांडण कैक वर्षे हळू-हळू रंगून आतां निकराच्या सामन्याची वेळ आली. दिल्लीकडे ज्या मोठ्या स्वाऱ्या मराठ्यांच्या झाल्या, त्यांपैकीं ही पहिली स्वारी होय.

ता. ४-१२-१७३६ रोजीं भेलसा येथें सिंदे–होळकरांस भेटून बाजीरावानें मोहिमेची व्यवस्था ठरविली. इतक्यांत मोगलांच्या जंगी तयारीची बातमी आल्यावरून त्यानें बुंदेलखंडांतच जड सामान छत्रसालाचा मुलगा जगत्राज याचे हमालीं केलें; आणि मुलगा जनार्दनपंत यास मागें हलक्या कामांत ठेवून, स्वतः बाजीराव सिंदे होळकरांसह सड्या स्वारीनें त्वरेनें यमुनेच्या बाजूस बादशाही मुलखांत शिरला. ग्वाल्हेरच्या ईशान्येस ५० मैलांवर चंबळचे कांठीं अटेर येथें मोगल फौज व भदावरचा राजा अनुराधसिंग त्यास आडवे आले. त्या राजाचा एक भाऊ बाजीरावास सामील होता, त्याच्या साह्यानें बाजीरावानें अनुराधाचा पराभव करून त्याजकडून २० लाख रुपये खंडणी व १० हत्ती घेतले. अटेरची ही लढाई ता. १८-२-३७ रोजीं झाली. इतक्यांत अयोध्येंतून सादतखान चालून येत आहे असें कळल्यावरून, त्याचे मुकाबल्यास बाजीरावानें पिलाजी जाधव, मल्हारराव होळकर व विठोजी बुळे यांस यमुनेपलीकडे दुआबांत पाठविलें. विशेष युद्धप्रसंगास न पडतां केवळ दबावाखालीं मुसलमानांस जेरीस आणून चौथाईच्या व माळवा सुभ्याच्या सनदा कायम करून घेण्याचा बाजीरावाचा इरादा होता. बादशहास न दुखवितां त्याचा बोज कायम ठेवून आपलें काम साधवयाचें अशीच योजना शाहूपाशीं ठरलेली होती. यापुढें २०-२५ वर्षांनीं केलेल्या रघुनाथराव व सदाशिवराव यांच्या स्वाऱ्यांतही हीच भावना कायम होती. बादशहास अजीबात काढून टाकण्यांत मराठ्यांस सर्व हिंदुस्तानचें वैर संपादन करावें लागलें असतें.

बाजीराव भदावर प्रांतांतून आगऱ्याकडे येतोसें पाहून मोगल अधिकारी ता. ८-३-१७३७ रोजीं त्यास अडविण्यासाठीं गडबडीनें पुढें चालून आले. येथेंच त्यांस जयसिंग जयपुराहून निघाल्याची व बुंदीचा बुधसिंग मराठ्यांस सामील झाल्याची खबर आली.

निरनिराळ्या मोगल सरदारांच्या फौजा एकत्र होऊं न देतां त्यांस वेगवेगळे गांठण्याचा बाजीरावानें विचार ठरवून मल्हारराव होळकरास यमुनेच्या पलीकडे

सादतखानाचे मुकाबल्यास दुआबांत पाठविलें. मल्हाररावानें यमुनापार जाऊन शुकोहाबादेस वेढा घातला.तेथील किल्लेदार लालजी खत्री यानें दीडलाख रुपये व हत्ती मल्हाररावास देऊन आपला बचाव केला. तेथून मल्हारराव लुटालूट करीत फिरोजाबादेवर व तेथून कोलजळेश्वरास जात असतां, एके दिवशीं सकाळीं सादतखानाची फौज एकदम त्याजवर चालून आली. सादतखानाचा पुतण्या अबूल मनसूरखान सफ्दरजंग आघाडीच्या बाराहजार फौजेवर मुख्य होता. ही फौज अगदीं लहान असेल असें समजून मल्हाररावानें त्यास घेरण्याचा यत्न केला. त्यांत सफ्दरजंग हळूहळू मागें सरत सादतखानाच्या मुख्य पंनास हजार फौजेस येऊन मिळाला. त्यांनीं एकदम अशा निकरानें होळकरावर हल्ला केला कीं मराठे वाट फुटेल तिकडे पळत सुटले. इतिमादपुराजवळ एक हजार मराठे शत्रूंनीं पकडले. बाकीचे पडत झडत जीव बचावीत यमुनेअलीकडे ता. २३-३-१७३७रोजीं येऊन बाजीरावास कोटिला येथें मिळाले. मल्हाररावास दुआबांतून घालवून दिल्यावर सादतखान पश्चिमेस जाऊन एप्रिलचे अरंभी मथुरेजवळ खानडौरान यास जाऊन मिळाला. महंमदखान बंगश-ही त्यांतच होता. एके दिवशीं रात्रीं हे तिघे सरदार भोजनास बसले असतां बातमी आली, कीं फत्तेपुरसिक्री व दीग यांचे दरम्यान मोगल फौजांचे मधून त्यांस चुकवून बाजीराव एकदम दिल्लीवर चालून गेला आहे. या बातमीनें ते सर्व गर्भगळित झाले सादतखानानें बादशहास गर्वोक्तीनें कळविलें होतें,कीं आपण मराठ्यांचा संपूर्ण पराजय केला आहे. त्यावरून बादशहानें आनंद करून मराठ्यांचे वकिलास दरबारांतून घालवून दिलें. ही बातमी बाजीरावास कळतांच, आपण अजून जिवंत आहों हें बादशहास प्रत्यक्ष दाखविण्यासाठींच बाजीराव दहा दिवसांचा प्रवास दोन अहोरात्रींत गांठून रामनवमीचे दिवशीं म्हणजे २९ मार्च रोजीं दिल्ली पुढें येऊन ठेपला. त्या वेळीं शहराच्या दक्षिणेस काळका देवीची जत्रा चालू होती. त्या जत्रेंतील कांहीं हत्ती व दुकानें मराठ्यांनीं लुटून घेतलीं. ही बातमी विजेसारखी शहरांत व बादशहास पोंचली. त्या वेळीं जो गोंधळ सर्वत्र उडाला, त्याचें वर्णन देण्यास पुरेसें स्थल येथें नाहीं. जाळपोळ केली असतां काम बिघडेल जाईल असें वाटून, बाजीराव ताल कटोरा ऊर्फ झील तलावाचे नजीक मालचा गांवीं झाडींत तळ देऊन राहिला. तेथून त्यानें बाद-

शहास पत्रें लिहून पुढील बेत कळविला. जत्रेंतलि लुटीनें घाबरलेले लोकांनीं शहरांत जाऊन भलभलत्या कंड्या पिकविल्या.बादशहाला हें प्रथम खरेंच बाटलें नाहीं. दोन फौजा समोर असतां बाजीराव इतक्यांत इकडे येणें शक्य नाहीं, कोणी तरी मेवाती चोर जत्रेंत घुसले असतलि, व्यापाऱ्यांनीं असा मोलवान माल उघड्या मैदानावर न्यावा कशाला ! असेंच बादशहा म्हणाला; आणि त्यानें भरंवशाचे लोक ताल कटोरा येथें पाठवून बातमी आणिली तों खरेंच. तेव्हां मात्र त्याची घाबरगुंडी उडून अहोरात्र नानातऱ्हेचे विचार व बेत चालू झाले. पळून जाण्यासाठीं मागच्या बाजूस यमुनेंत त्यानें सर्व नांवा जमविल्या. समोर जाऊन लढावें, तर पराभव झाल्यास मग तरणोपाय नाहीं शिवाय अशा भुरट्या चोरांचे अंगावर चालून जाणें बादशहास शोभत नाहीं.असे नाना विचार चाळून अमीरखान नांवाचा एक अनुभवी गृहस्थ बादशहाच्या मर्जीतला होता, त्यानें राजधानींत असलेली फौज बारा हजार स्वार, वीस हजार पायदळ व तोफखाना अशी बरोबर घेऊन बाजीरावावर चाल केली.राजा शिवसिंग व अजमेरीसिंग हे दोन खासपागेचे रजपूत सरदार व आणखीहि कांहीं नामांकित इसम लढाईवर गेले शहरांत सर्वांनीं सावध राहवें अशा ताकिदी मिळाल्या. अमीरखान आपल्या फौजेसह शहराचे बाहेर मराठ्यांची वाट पाहत बंदोबस्तानें राहिला परंतु मीरहसनखान कोका नांवाचा एक तरुण गृहस्थ लढाईंत नांव गाजविण्याविषयीं अत्यंत उत्सुक असा बादशहाचे जवळ होता, त्यास नुसता बचाव करीत बसण्याचा विचार आवडला नाहीं. तो जवळचे कांहीं लोक घेऊन बादशहास सोडून बिन हुकमानें येऊन अमीरखानास भेटला; आणि कांहीं लोकांनशीं बाजीरावाचे अंगावर चालून आला. त्यांस पाहून बाजीरावानेंही त्यांची नीट टेहळणी करून, हे लढाईस अनवाकब आहेत असें ठरविलें, आणि थोडा वेळ भ्याल्यासारखें दाखवून मागें सरून त्यांस पूर्णपणें आपल्या अंगावर येऊं दिलें. अमीरखानाची मुख्य फौज पुष्कळ मागें टाकून हे बरेच पुढें आलले पाहतांच, सटवोजी जाधव, मल्हाराव होळकर व राणोजी शिंदे या दडलेल्या वागांनीं त्यांजवर एकदम वळून बहुतेकांस हातोहात तलवारीनें कापून काढिलें. मीरहसन खान, राजा शिवसिंग वगैरे अनेक गृहस्थ मारले गेले; आणि कांहीं जीव घेऊन पळून शहरांत लपून बसले. जखमी झालेल्यांच्या झुंडी शहरांत शिरल्यावर

शहरवासीयांची बोबडीच वळली. बाजीरावानें मनांत आणिलें असतें तर दिल्ली शहर हस्तगत केलें असतें. परंतु बादशहास किंवा लोकांस त्रास देण्याचा त्याचा बिलकूल विचार नव्हता. लोकांचीं मनें शांत करण्याकरितां तो मुद्दाम झील तलाव सोडून दिल्लीहून सात कोसांवर सराई आला बिर्दीखान येथें दूर जाऊन राहिला. आणि तेथें जातांच वजीर व गाजीउद्दीन आपल्यावर चालून येतात, असें ऐकून बाजीराव त्वरेने दक्षिणेस कोटपुतळीस ९३ मैल येऊन पोंचला. वाटेंत त्याजवर वजिराच्या एका तुकडीनें हल्ला केला, परंतु बाजीरावाचें ह्मणण्यासारखें नुकसान झालें नाहीं मराठ्यांची धाड निघून गेलेली ऐकून दिल्लींत जो आनंद झाला तो काय वर्णावा ! खानडौरान, सादतखान वगैरे दुसरे सरदारही हळू हळू येऊन दिल्लीजवळ वजिरास सामील झाले. बाजीरावाचा आतां पाठलाग करणें तर शक्य नव्हतेंच. तो तसाच अजमीरवरून ग्वालेरीस गेला आणि तेथून पुनः दुआबांत जाण्याचा विचार करीत असतां, निजाम उत्तरेंत चालून येत आहे अशी बातमी आल्यावरून त्वरेनें परत सातान्यास गेला.

**५. बादशहाची त्रेधा व शाहूची कळकळ.**—दिल्लीच्या या स्वारीची हकीकत मोठी मनोरंजक असून ती स्वतःच बाजीरावानें आपल्या बंधूस ता. ५ एप्रिल स. १७३७ च्या पत्रांत जयपुराहून लिहून पाठविली ती अशी[१]:—

"श्रियामह चि० रा० आप्पा यांसी, बाजीराव बल्लाळ आशीर्वाद उपरी, येथील कुशल तागाईत छ० १५ जिल्हेज मु. नजीक सवाई जयनगर. विशेष. बुंदेलखंडचा राजा जगतराज याचे हवालीं बुनगे बुंदेलखंडांत रवाना करून आम्ही सडे जाहलों. याचें वृत्त सादतखानाचें युद्ध होऊन सरदार आल्याचें वर्तमान विस्तारें लेखन चतुर्भुज कासिदाबरोबर पत्रें पाठविलीं, तीं पावून सविस्तर कळलेंच असेल सादतखान यमुना उतरोन आगरीयासीं आला. त्यासी गांठ घालावी तरी तो आगरियाचा आश्रय असता मोडे न मोडे गंभीरयमुनेच्या संगमीं थोर धरून राहवें तरी ते जागीं जाऊन कोतरखळ्या फार; खानडवरा

१ ब्र ले.२७ या पत्राची ता.१५ जिल्हेज ह्मणजे चैत्र व॥ २,एप्रिल ५स.१७३७ पाहिजे. रामनवमीस बाजीराव दिल्लीस पोंचला, आणि प्रकरण आटोपल्यावर परत जातांना वाटेंतून चैत्र व॥ २ रोजीं हें पत्र लिहिलें. सेयर मुताखरीनची या मितीस पुष्टि आहे.

व महंमदखान बंगस वगैरे दिल्लीहून आगरियास येत होते ते, व सादतखान एक झालिया मनसबा भारी पडेल. याजकरितां संगमीं राहणें उत्तम नव्हे. दुसरें, सादतखानांनीं बादशहास व अमिरांस लिहून पाठविलें कीं, मराठयांची फौज यमुना उतरोन आली होती ते बुडविली. दोन हजार स्वार मारिले व दोन हजार नदींत बुडाले. मल्हारजी होळकर व विठोबा बुळे कामास आले. बाजीरावाची धाड आली होती तिची गत हे जाहली. आह्मी यमुना उतरोन मराठे बुडवून चमेलीपार करितों. म्हणून कित्येक गप्पा लिहून पाठविल्या. पातशहांनीं खुशाली कळवून सादतखानास वस्त्रें व मोत्यांची माळ व हत्ती व शिरपाव पाठविला; व वकीलासही शिरपाव दिला. सादतखानांनां आपली त्राजू गेर करून घेतली. वरकड अमीरांसही कित्येक प्रकारें धिक्कारून लिहिलें. हें वृत्त रा. धोंडो गोविंद यांनीं वरचेवर लिहून पाठविलें. तात्पर्यार्थ आमचे फौजेत जाव नाहीं केवळ निर्जीव,बुडवून नेस्त नाबूद केली असें लिहीन ऊपंडात्र करून दाखावले. मोगली कारभार, आपण ऐकत जाणतच आहेत. करावें थोडें, लिहावें फार. पातशहास सत्य भासलें, तें मिथ्या केलें पाहिजे. त्याचे विचार दोन एक सादतखांस बुडवावें, किंवा दिल्लीस जाऊन दिल्लीचें पूर जाळावें तेव्हां मिथ्या होईल त्यास, सादतखान आगर सोडीनासे देखोन. आह्मी दिल्लीस जावयाचा निश्चय केला. पूर जाळावें व मराठे आहेत असे पातशहास अवलोकन करवावें, ऐसा विचार करून, २६ जिल्कादीं (१८-३-१७३७) कूच करून पातशाही रस्ता सोडून लांब मजला करून दमनसिंग चूडामण जाठाचे मुलखांतून नेवातयाचे सरहद्द डोंगर किनाऱ्यानें चालिलों. खानदौरा व बंगस आगरियास गेले. यांची व सादतखानाची भेट २ जिल्हेजीं (२३-३-१७३७) झाली. (पेशव्यांचा वकील) धोंडोपंत खानदौरापाशीं होते. सादतखानानें खानदौरास सांगून पाठविलें, कीं ‘बाजीराव याची फौज आपण मोडली. बुनगे जाळले. ते खासाही चमेल उतरोन गेले. अद्याप तुह्मी त्याची खुशामत करितां ! वकील ठेवून घेतला आहे हें कोण्या विचारें ? वकिलास निरोप देणें.’ त्यावरून धोंडो गोविंद वकील यासीं निरोप दिल्हा. आह्मांजवळ आले. कमरुद्दीनखान, अजीमुल्लाखान वगैरे आले. आह्मीं त्यांजसीं गांठ न घातली. सातां कोसांवर उजवे बाजूस आमचे हातें त्यांस टाकून, लांबलांब मजली वीस कोसांच्या करून दोन मजलींनीं ७ जिल्हेजीं

( २८ मार्च ) दिल्लीस बारापुला व कालिकेचें देऊळ उजवे हातें टाकून जाऊन कुशबंदी नजीक शहर येथें मुक्काम केला. पुऱ्यास आगी देऊन शहर खाक करावें, त्यास दिल्ली महास्थळ, पातशहा बरबात जालियांत फायदा नाहीं. दुसरें, पातशहाचे व खानदौराचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोगल यांस सलूख करूं देत नाहींत. अमर्यादा केल्यास राजकारणाचा दोरा तुटतो. याकरितां आगी लावायाचें महकूब करून, पातशहास व राजे बखतमल्ल यांसीं पत्रें पाठविलीं.शहरांतून दोन हत्ती व घोडीं उंटें आलीं होतीं तीं सांपडलीं. लष्करचे लोकांनीं शहरचे लोक भवानीचे यात्रेस बाहेर आले होते, त्यांस झांबडाझांबड केलें. दुसरे दिवशीं बुधवारीं ( ३० मार्च ) पातशहाचे आज्ञेनें बखतमल्ल यांनीं उत्तर पाठविलें कीं, धोंडोपंतास पाठविणें. त्यावरून मशारनिल्हेस पाठवावें तरी, आह्मीं शहराजवळ आलों, यामुळें दिल्लींत गलबला झाला, यामुळें पाठविले नाहींत 'भला मजुरा व स्वार पाठवून देणें. मशारनिल्हेस पाठवून देतों, आह्मीं शहरानजीक राहिल्यानें, शहरास उपसर्ग लागेल, याकरितां कुच करून झीलच्या तलावावर जातों.' ह्मणून उत्तर पाठवून आह्मीं कूच केलें. शहराजवळून येत असतां, पातशहानीं नबाब मीर हसनखान कोका दरोगा खास चौकी, नबाब अमीरखान, व नोजे रोजअफजूखान, राजे शिवसिंग जमातदार रिसाले अमीर, व मुजफरखान, नायब बक्षीगिरी आहादी व नबाब मुजफरखान, खानी दौराचे बंधु. सात आठ हजार फौजेनिशीं शहराबाहेर रिकाबगंजाजवळ आले. राजश्री सटवाजी जाधव पुढें गेले होते. त्यांची व मोगलांची गांठ पडली. झटपटी होत होती. मशारनिल्हेनीं आह्मांस सांगोन पाठविलें त्यावरून रा. मल्हारजी होळकर. व.राणोजी शिंदे व तुकोजी पवार व यशवंतराव पवार, व मानाजी पायगुडे व गोविंद हरि पाठविले. त्यांचें यांचें झुंज होऊन मोगल मोडिले. राजे शिवसिंग वगैरे दहा बारा दरबारी ठार झाले. नबाब मीरहसनखानकोका जखमी झाला. दिगरवादे चौकी पातशहाचे अडीच तीनशें मेले. चारशें माणूस जखमी जाले. रोजअफजूखान व अमीरखान व मुज्फरखान वगैरे शहरांत पळोन गेले. रा. राणोजी शिंदे याजकडील इंद्राजी कदम यांसी बोटास गोळी लागोन दोन बोटें उडोन गेलीं. वरकड नामांकित माणूस कोणी ठार झालें नाहीं. थोडे माणूस जखमी झाले.

तदनंतर आम्हीं झीलच्या तलावावर[1] मुक्काम केला. संध्याकाळच्या चार घटका दिवस बाकी राहिला, तों कमरुद्दीनखान पातशहापुरावरून आल्याची खबर आली. तेच क्षणीं आम्ही तयार होऊन गेलों. त्यांचे आमचे फौजेचें युद्ध झालें. बारांत गेलेला एक हत्ती रा. यशवंतराव पवार यांणीं घेतला घोडीं उंटें लष्करांत आलीं त्यास दिवस अस्तमानास गेला. रात्रीचा दम धरून चौगीर्द मोगल वेढून बुडवावा, तरी झीलचा तलाव सोळा कोस लांब, उजवीकडे कमरुद्दीनखान, पुढें शहर. दुसरें, आम्ही दिल्लीस गेल्याचें वर्तमान नबाब खानदौरा व सादतखान व महंमदखान बंगस यांसी ७ जिल्हेज ( २८ मार्च ) मंगळवारीं राधाकुंडाचे मुक्कामीं कळतांच सडसड होऊन पंचवीस तीस हजार फौजेनें बडलास बत्तीस कोस येऊन मुक्काम केला. दुसरे दिवशीं ( बुधवारीं ) अलावर्दीच्या नाल्यावर पंचवीस कोस मुक्काम केला. गुरुवारीं प्रातःकाळीं खानदौरा, सादतखान, बंगस व कमरुद्दीनखान सारे एक होणार. एक झाल्यावर सोसणार नाहीं, व शहर समीप. यास्तव मोगलांस टाकून चहूं कोसांवर मुक्काम केला. आम्हांकडील फिरंगाजी पाटणकरास गोळी लागोन ठार झाला. वरकडही दहा पांच माणूस व घोडीं जखमी आलीं. मोगलांकडील दहापांच ठार झाले. दहावीस जखमी झाले. गुरुवारीं सादतखान व खानदौरा व बंगस सारे कमरुद्दीनखानाजवळ आले. अलाबर्दीपासून झीलच्या तलावापर्यंत मुक्काम करून आहेत. आह्मी मोगल पाठीवर घेऊन दाबांत आणून बुडवावे, या विचारें कूच करून रेवाद, कोटपुतळी, मनोहरपुरावरून आलों. अद्याप सारे मोगल अलावर्दी व झीलच्या तलावावरी आहेत ह्मणोन बातमी वर्तमान आलें. खानदौराची पत्रांवरी पत्रें सवाई जयसिंगजीस गेलीं. त्यांवरून ते पंधरा सोळा हजार फौज व तोफखाना देखील स्वार होऊन बासव्यावर[2] गेले आहेत. भेटीस जातात. सवाईजींचीं पत्रें ममतायुक्त आपला मुलूख रक्षावा ह्मणून येतात. आह्मांकडील व्यंकाजीराम त्यांजपाशीं आहेत, त्यांजपासून लिहवीत असतात. आह्मी त्यांचे मुलखाचे वाटेस जात नाहीं. वाटेनें दाणादुणा देतील. अभयसिंग जोधपुरास आहेत. आह्मी आतां ग्वालेर प्रांतें बाकीसाकी राहिली आहे. ती वसूल

१ दिल्लीचे दक्षिणेस तीन मैल. झील म्हणजे सखलजमीन. २ जयपुर हद्दींतलें एक गांव, जयपुरचे ईशान्येस ३० मैल.

करून, मोगल मागें मागें आले तरी त्यांस हैरान करून, पायींची धांपा घेऊन, धावतां धावतांच खराब होत तेंच करून, दाबांत आणून, गांठ घालून, राजश्री स्वामींचे पुण्यें, व वडिलांचे आशीर्वादें बुडवितों. आमची चिंता न करणें. मुख्य गोष्टी खानडौराचे व पातशहाचे चित्तांत सलूख करावयाचें आहे. मोगल यांणीं हिंमत धरिली आहे. त्यांतें शीरोपस्थ सादतखान आहे. त्याचा गर्व श्रीसंकल्पें हत जालियास, सर्व मनोदयानुरूप होईल. मनोदयानुरूप सलूख जालिया करूं, नाहीं तरी सलूख करीत नाहीं. दिल्लीभवता मुलूख खालसा केला. पुढें सोनपतपानपत यमुनापार मुलूख राहिला, तोहीं ताराज करून मोगल अन्नास महाग होत ऐसेंच केलें जाईल. होईल तें वृत्त मागाहून तुह्मांस लिहून पाठवूं. कदाचित् मोगल दिल्लीस राहिले, तरी आगरियास जाऊन, अंतर्वेदींत उतरून कुल मुलूख ताराज करितों. नबाब निजामुल्मुल्क यांनीं गडबड केली, रेवा उतरले, तरी तुह्मीं मागें शह देणें. पेशजी लिहिलें आहे त्याप्रमाणें करणें. मारून ताराज करणें. इकडेस सक नाहीं. तिकडेसहो नाहींसा करणें. निजामास पायबंद असलिया उत्तम आहे.लोभ असों दीजे हे आशीर्वाद.'' बाजीरावाचा मुलगा जनार्दनपंत मागें बुंदेलखंडांत लढत होता त्यास बाजीरावानें आपल्याकडे बोलाविलें असतां जनार्दनपंतानें २५-४-१७२७ चें उत्तर लिहिलें, (ऐ.टि. २·३८). एप्रिल २१ रोजीं बाजीराव लिहितो, ' मोगल ठायींचें ठायीं आहेत.' ह्मणजे मोंल तलावाचे प्रसंगानंतर पुढें चालून आले नाहींत.

बादशहास कबजांत आणण्याचा हा पहिला उपक्रम बाजीरावानें केला. त्या पुढच्या स्वाऱ्या व पानिपतचा संग्राम इत्यादि प्रकरणें याच उद्योगाचीं पुढील अंगें असून, त्याची पूर्तता पन्नास वर्षांनीं महादजी सिंद्यानें केला. हिंदुपदपातशहीसाठीं उत्तरकालीन मराठशाहीचा हा उद्योग किती नेटानें व अव्याहत चालला होता, हें नेहमीं दृष्टीपुढें ठेवल्यानेंच त्यांच्या हालचालींची ऐतिहासिक संगति कळून येते. मराठ्यांनीं दिल्लीस हात घालणें, त्यांजविरुद्ध मुसलमानांनीं कट करून लढाईस येणें, मराठ्यांनीं निकरानें त्यांचा समाचार घेणें, अशा कृत्यांची पुनरावृत्ति कितीकदां तरी झालेली यापुढें दृष्टीस पडेल.

प्रस्तुतच्या कारस्थानांत बादशहाचे तर्फे सादतखान झटून काम करून मराठ्यांस मागें हटवीत होता. परंतु त्याच्या युक्त्यांस बाजीराव पुरा

पडला. बादशहा व त्याचा वजीर खानडौरा हे दोन दगडींवर हात ठेवून कसाबसा आपला निभाव लावीत होते. शाहू व जयसिंगही त्याच कोटींतले होत. नुसत्या जरबेनें किंवा सलुखानें काम भागेल तर मुद्दाम लढाईचा प्रसंग आणण्याची बाजीरावाची इच्छा नव्हती. परंतु त्याची हिंमत व तयारी परिपूर्ण होती. हाताखालीं जिवास जीव देणारे साह्यकर्ते होते. त्यांनीं बादशाही फौजेशीं कसे निकराचे सामने केले, आणि मोठमोठ्या सरदारांस कसें ठार मारिलें, हें वरील पत्रांत सांगितलें आहे. जरूर तेव्हां समोर सामाना करणें, इत्यादि कसबांत बाजीरावाची निपुणता फार चांगली दिसून येते. वरील पत्र बाजीरावानें जयपुर हद्दींतून लिहिलेलें असून, त्या वेळीं निजाम मोठी फौज व तोफखाना घेऊन उत्तरेंत येत होता, त्यास तिकडेच अडविण्याविषयीं बाजीरावानें आपल्या बंधूस ताकीद दिली आहे. शाहूनें या स्वारीवर केवढी मिस्त ठेविली होती, आणि बाजीरावावर त्याचा केवढा लोभ होता हें दाखविणारें शाहूचें पत्र येणेंप्रमाणें:—

राजमान्य राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांस आज्ञा केली ऐसीजे. प्रस्तुत तुह्मांकडून विनंतिपत्र येऊन वर्तमान कळत नाहीं. कोठें आहां, काय विचार, पुढें कोठपर्यंत जाणार, मुख्य अमीरसहवर्तमान काय करीत आहेत, हें सविस्तर दिनप्रतिदिन लिहीत जाणें. सांप्रत आगरेयानजीक गेलेच असाल. पलीकडील भेटीचा विचार घडणार ह्मणून परस्पर ऐकिजेतें. ऐशियास मोगली मनसुबा, इमान देऊन आपला मतलब साधितील. त्यांचा विश्वास मानावा ऐसा अर्थ नाहीं. याजकरितां शहरांत जाऊन भेट घ्यावयाचा मनसुबा करीत असाल तरी सर्वथा न करणें. भेट न घेतां दुरूनच ज्याचे हातें तुमचें राजकराण असेल त्यापासून आपले मतलब साधावयाचे ते साधणें. हावभरी होऊन त्याचे विश्वासावरी जाल याजकरितां लिहिलें आहे. तुह्मी बुधमंत कार्यकर्ते, यशस्वी सेवक आहांत. विचारास चुकणार नाहीं हा स्वामीस निशा आहे. तरी बहुत विचारें करून जें करणें तें करून आपली बाजू सर होऊन येई तें करणें. पलीकडील अमीर तुह्मांसीं विवेकावरी आहेत, आणि नबाब निजामुन्मुल्क इकडून फारच वळवळ करून त्या प्रांतें येत आहेत. त्याचा विचार कांहीं कळत नाहीं तरी बहुत सावधपणें मनसुबा करणें. मोगली विचार तुह्मांस न कळेसा कार्य आहे ! आपला नक्ष राहून, योजिला मनसुबा सिद्धीस पावे, ते गोष्ट करणें. जो विचार करीत असाल व घडोन येत असेल, तो बरचेवरी हुजूर

लेहून पाठवीत जाणें. वरकड सविस्तर रा. महादाजी अंबाजी लिहितील त्याज॰ वरून कळों येईल. × आन वृत्त दिनचर्येचें वरचेवर लिहिन. फुड मनसुबा काय

पो छ. २२ मोहोरम. एप्रिल स. १७३७.

---

× येथून स्वतःचें अक्षर. बाजीराव जानेवारी १७३७ पासून जुलई १७३८ पावेतों दिल्लीचे स्वारींत होता. स. १७३७ चा २२ मोहोरम १२ मेला येतो, त्यादिवशीं पत्र पोंचलें. रा. वि. ल. भावे यांजकडून हें पत्र मिळालें.

व बोली काय मुद्याची तेंही लिहिन. फुड कोठवर जान तेहीं लिहिन. त्याची मुखभान (?) आहे यावर न जान. त्याचे वाटे कदाचित् भेटीचा प्रसंग पडला तर लिहिन.मुख्याचे जर भेटीचा प्रसंग पडला तर बळकटी करन आन लिहिन. बहुत काय लिहिन, सुदन असा.'

६. **भोपाळावर निजामाचा पाडाव** (१३डिसें.—८ जाने.१७३८). औरंगजेब बादशहानें मराठे व रजपूत या दोघांचें शत्रुत्व संपादन करून ठेविलें, तेंच त्याच्या वंशास पूर्णपणें भोवलें. बाजीरावानें महिना पंधरा दिवसांच्या अवधींत बादशहाची त्रेधा उडवून दिली, यामुळें सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. मराठ्यांच्या या मगरमिठींतून जर कोणी बादशहास सोडविण्यास समर्थ असेल तर ता निजाम होय, अशी सर्व अमीर उमरावांनीं एकवाक्यतेनें बादशहाची खात्री केली आजपर्यंत निजामास दूर ठेवण्यास मुख्य कारण खानडौरान होता. वजिरी जरी कमरुद्दीनखानाकडे होती, तरी निजामाविषयीं त्याचा द्वेषभाव नव्हता. पूर्वी असा समज होता, कीं दक्षिणेंत बादशहानें आपल्या वाटेस जाऊं नये ह्मणून, निजामानेंच मराठ्यांस उत्तरेंत जाण्याची भर दिली. परंतु दिल्लीच्या वरील स्वारीनें खानडौरानचे सुद्धां डोळे उघडले. बादशहाकरवीं त्यानें निजामास निकडीची बोलावणीं विनवण्या करून पाठविलीं. बादशहाची वजिरी पत्करून मराठ्यांस एकवार कायमचे ठिकाणीं बसवावें. अशी आकांक्षा निजामासही फार दिवस होतीच. स. १७३७ च्या आरंभीच त्यानें बऱ्हाणपुरास येऊन दिल्लीकडे निघण्याची तयारी केली. परंतु त्यास इकडेच पायबंद द्यावा असें बाजीरावानें कळविल्यावरून एक मराठ्यांची टोळी वऱ्हाडांत घुसली. त्यांजबरोबर झगडण्यास निजामानें सय्यद जमालखान यास पाठविलें. त्यानें मराठ्यांस घालवून दिल्यावर निजाम १७-४-१७३७ रोजीं बऱ्हाणपुराहून निघून सिरोंजला आला. इतक्यांत पिलाजी जाधव दक्षिणेंत परत येत होता त्यानें निजामाची गांठ घेऊन स्नेहभाव व्यक्त केला. ग्वाल्हेर, आगरा करीत १२-७ रोजीं दिल्लीसमीप येऊन निजाम उतरला.कमरुद्दीनखान वजीर निजामाचा चुलत बंधु असून त्याची मुलगी निजामाचा वडील मुलगा गाजीउद्दीन यास नुकतीच देऊन लग्न झालें होतें. तेरा चौदा वर्षांनीं बाप लेकांची भेट या समयीं झाली. कमरुद्दीनखान आपल्या सर्व जनानखान्यासह पंनास मैल पुढें सामोरा येऊन निजामास भेटला.

त्या वेळीं एवढ्या थाटाची स्वारी सर्वांची निघाली, आणि जनानखान्याच्या दागदागिन्यांचा शृंगार एवढा समृद्ध झाला, कीं त्या वेळच्या धामधुमींत सुद्धां सरदारांच्या या संपत्तीचें प्रदर्शन आश्चर्यकारक वाटतें. बादशहानें निजामास वाद्यें वाजवीत येण्याची परवानगी दिली; वाटेनें ठिकठिकाणीं त्यास बादशहानें पोषाख व सामान पाठवून सत्कार केला. निजामाच्या स्वारीचा हा थाट पाहण्यास लोकांची गरदी इतकी झाली कीं मुंगीच्या पायांनीं चालण्या इतकीच गति हत्तींस होती. किल्ल्याच्या दिल्लीदरवाजाजवळ हत्तीवरून उतरून निजाम व वजीर पालखींत बसले; आणि नगारखान्या जवळ पालखींतून उतरून उभयतां हातांत हात घालून व जमिनीकडे दृष्टि लावून, दिवाणीखासमध्यें बादशहास भेटले. निजामानें सत्कार केला; आणि बादशहानें स्वतःचा झगा व चरकाब आपल्या हातानें निजामास देऊन, 'आसफजा' असा सर्वांत उच्च किताब दिला. तसेंच दिल्लींतील सर्वोत्कृष्ट मकान ह्मणजे सादुल्लाखानाचा वाडा त्यास राहवयास देऊन भोजनासाठीं आपल्या मुदपाक खान्यांतून भरलेलीं ताटें पाठविण्याचा क्रम ठेविला. ( आर्विन २-३०० ).

असा सुमारें एक महिना गेल्यावर बादशहानें जयसिंगाचा आग्रा सुभा व बाजीरावाचा माळवा सुभा काढून, दोहोंवर निजामाचा मुलगा गाजीउद्दीन फिरूजजंग याची नेमणूक केली; आणि त्यास एकच अट घातली कीं, निजामानें माळव्यांत जाऊन मराठ्यांस घालवून द्यावें. पावसाळा संपतांच निजामानें सर्वाधिकार आणि तीस हजार स्वार व उत्कृष्ट तोफखाना घेऊन माळव्यावर चाल केली. चंबळ उतरून ग्वाल्हेर वरून जाण्यास वाटेच्या अनेक अडचणी असल्यामुळें, निजामाची फौज आग्र्याचे खालीं यमुना उतरून दुआबांत गेली, आणि तेथून पुनः काल्पीजवळ यमुने अलीकडे येऊन बुंदेलखंडांतून माळव्यांत आली. निजामानें दक्षिणेंत नासिरंगास कळविलें, कीं बाजीरावास तिकडेच गुंतवून ठेवा. परंतु हें काम नासिरजंगास साधलें नाहीं. त्याजकडे मराठे सरदार होते ते फितुर झाले; उलट यशवंतराव दाभाडे व रघुजी भोसले बाजीरावाच्या मदतीस आले नाहींत. तरी त्याजवळ ऐशीं हजार फौज जमली. नेमाडांत खर्गोण जवळ नर्मदा उतरून बाजीराव माळव्यांत आला. उभय सामनेवाल्यांची गांठ डिसेंबर स. १७३७त भोपाळच्या जवळ पडली. तथापि निजामानें एकदम मराठ्यांवर

चाल केली नाहीं. भोपाळचा तट व तलाव यांचे आश्रयानें बंदोबस्त करून मराठ्यांचा हल्ला येण्याची वाट तो कांहीं वेळ पाहत बसला, ही त्याची चूक झाली. शाहूनें रघूजी भोसल्यास आज्ञा केली कीं, ' दक्षिणची फौज नबाबास सामील होऊं न द्यावी, यास्तव चिमणाजी बल्लाळ खानदेश प्रांतीं राहिले आहेत, त्यांस फौजेनशीं जाऊन सामील होणें. बाजीरावाची व निजामाची गांठ पडली. निजाम भूपाळगडचे आश्रयास गेला. पंडित चौगीर्द चौक्या देऊन बसले आहेत दक्षणी फौजेस लवकर येऊन पोहोंचणें म्हणून पत्रावरी पत्रें नबाबांनीं पाठिविलीं, त्यावरून औरंगाबादची फौज नबाबाकडे जाऊं लागेल, याकरितां ताकीटाक फौजेनिशीं जाऊन चिमाजीस सामील होणें. एक क्षणाचा उजूर न करणें.' अशा प्रकारचीं आज्ञापत्रें बाजीरावाचें साह्य करण्याविषयीं शाहूनें काढिलेलीं असून त्यांवरून या मोहिमेस शाहूचें पूर्ण पाठबळ होतें या विषयीं संशय राहत नाहीं. नोव्हेंबरांत बाजीराव नर्मदा उतरला, तेव्हां निजाम सिरोंजजवळ होता.स.१७३७डिसेंबर १९ रोजीं चिमाजीआपा लिहितो[१]:-

' निजामाबरोबर त्याचा पुत्र गाजीउद्दीन, बोंडसें व दतियाचे राजे व जयसिंगाचा पुत्र व अहीर व रोहिला देखील पन्नास हजार फौज जमा आहे. सादतखानाचा भाचा व कोट्याचा राजा दुर्जनसाल वीस हजार फौज आणिक आणणार आहेत. माळव्याच्या सुभ्यांत रायांस उतरूं न द्यावें ऐसें पातशाहाशीं मान्य करून आले आहेत. सांप्रत आम्ही तापीतीरीं आहों. औरंगाबादेस सुलतानजी व जानोजी निंबाळकर रावरंभा वगैरे मोगली फौज दहा हजार जमा आहे.' छत्रसालाचा नातू सभासिंग व सवाई जयसिंगाचा पुत्र हे निजामानें जबरदस्तीनें आणलेले दिसतात.

आरंभींच राणोजी सिंदे, पिलाजी जाधव व सयाजी गुजर यांनीं निजामावर जोरानें हल्ला केला, तेव्हां निजामाकडील ५०० रजपूत व ७०० घोडे पडले. परंतु त्याच्या तोफांनीं मराठ्यांचेंही नुकसान पुष्कळ झालें. स्वतः बाजीराव अगदीं जवळ जाऊन खुद्द निजामावर झडप घालण्याची वाट पाहत होता. परंतु निजाम बंदोबस्तीच्या जागेवरून हालला नाहीं, यामुळें या पहिल्या लढाईचा निकाली परिणाम झाला नाहीं. नंतर निजामानें लढाई न चालवितां भोपाळच्या

१ ब्र. ले. ३३–३६, १३२, १३४, १३५; खं ६. १०७, ११७.

तटाच्या आंत आपले सगळे लोक घेतले. तेव्हां मराठ्यांनीं त्यास सर्व बाजूंनीं घेरून त्याचा कोंडमारा केला. सफ्दरजंग व कोटाचा राजा यांनीं बाहेरून निजामास मदत आणिली; परंतु त्यांचा मल्हारराव होळकर व यशवंतराव पवार यांनीं चांगलाच समाचार घेऊन १५०० लोक मारून काढिले. तेव्हां सफ्दरजंग निघून गेला. त्यामुळें निजामास कांहींच आशा न राहतां त्याची हैराणगत झाली. समोरासमोर मोठी लढाई झालीच नाहीं.

मराठ्यांच्या इतिहासांतल्या कित्येक प्रसिद्ध लढायांमध्यें भोपाळच्या या लढाईची गणना आहे. ता. १ रमजानपासून २७ रमजानपावेतों म्हणजे १३ डिसेंबर १७३७ पासून ८ जानेवारी १७३८ पावेतों लढाई चालू होती. या लढाईचें वर्णन बाजीरावानें चिमाजी आपास लिहिलेल्या पत्रांत दाखल आहे.

प्रथम राणोजी सिंदे, पिलाजी जाधव, सयाजी गुजर यांनीं निजामाकडील रजपूत फौजेवर सडकून मारा केला. नवाबाच्या गोठापासून दोन बाणांच्या टप्प्यावर मराठ्यांची खडी फौज होती. मराठ्यांचा मारा पाहून निजामानें आपली फौज व साहित्य भोपाळाचे किल्ल्यांत घातलें. मराठ्यांनीं त्यांची नाकेबंदी केली. आपणास दिल्लीची मदत येईल अशी निजामास मोठी आशा होती. परंतु खानडौरानचें व निजामाचें बरें नसल्यामुळें ती फौज येऊं शकली नाहीं! दक्षिणेंतून मात्र नासिरजंगाकडून निजाम वारंवार मदत मागवीत होता. ही मदत येऊं नये असें बाजीराव चिमाजी आपास बजावीत होता. 'ते फौज येऊन सामील झाली तर नबाब भारी होतील, याकरितां फौजांस अटकाव होय तें करणें. तुम्हांस जे फौज मिळेल ते जमा करून भारी राहणें; दाभाडे, बांडे आम्हांकडे आले नसले तरी तुम्हीं आपणाजवळ बोलावून सामील करणें. रा. स्वामीसि विनंति करून फत्तेसिंगबावा, शंभुसिंग जाधवराव व सरलष्कर व जाधव आणवणें. राजश्री स्वामीजवळ जो आपला जमाव आहे तो आपणाजवळ आणणें. त्याखेरीज मिळतील ते लोक जमा करणें. नबाब ठिकाणीं राहिल्यावर अवघी दक्षीण निर्वेध होईल. या समयीं अवघ्यांनीं या कामांत चित्त घालावें. राणोजी भोसले आम्हांकडे आले तरी बरें, नाहीं तर तुम्हीं त्यास गांठणें. वडलांचे व खावदांचे पुण्यानें नबाबास घेतच आहों. जें होणें तें धन्याचें प्राक्तन व वडिलांचे पुण्येंकरून उत्तमच होईल.

आपल्या कडील लोक सारे सुखरूप आहेत. पुढें नबाबास भोपाळ येथें राहणें दुःसह होऊन तो फौजेचा कंपू करून निघून जाऊं लागला, परंतु नाकेबंदीमुळें दाणा महर्घ झाला. गवत तों न मिळे सारखें झालें. मराठेही त्याची नाकेबंदी न सोडतां तसेच चालूं लागले. हा प्रवास रोज एक दोन कोसांपक्षां जास्त होईना. असें करीत सिरोंज नजीक दुराई सराई येथें निजामानें बाजीरावास तह लिहून दिला, ' ता. ८ जानेवारी १७३८ ). ' कालपासून आजपावेतों नबाब उभेच केले आहेत. नबाब व फौज सत्वहीन झाली आहे. दाणा, गल्ला, घांस लकडी बंद केली, एक रुपायास एक शेर अन्न झालें. तेंही कोणास प्राप्त, कोणास अप्राप्त. घोडीं पळसाचा पाला खाऊं लागलीं. परवां ( ६ जानेवारी ) मोगल पठाणांनीं भाड्याचे बैल खाल्ले. रजपुतांस तों केवळ उपास पडूं लागले. नबाबांनीं सर्वांचें दुःख पाहून बहुतच काहील होऊन, सलूखाविशीं त्वरा केली. आनंदराव पंडित सुमंत[1] नबाबापाशीं होते त्यांस त्यांनीं बोलीचालीचा संदर्भ सांगून, आम्हाकडे पाठविलें. त्यांजला मजकूर सांगून आम्ही पिलाजी जाधव, बाजी भीवराव व बाबूराव मल्हार यांस त्याच्या वकिलाकडे लष्करापुढें टेकडी होती तेथें पाठविलें बोलीचालीचा ठराव केला. माळवा दरोबस्त जहागीर सुभेदारीचे यादीवरी दस्कत करून दिलें. द्रव्यही साधेल तें बादशहापासून धोंडो गोविंद यांचे पहिले बोलीप्रमाणें करून घेऊं, ऐसें दस्तकानिशीं लिहोन दिलें. पिलाजी जाधव व बाबूराव मल्हार यजपाशीं दस्तक स्वतांनिशीं याद करून दिली.' दुराई सराईच्या तहांतील कलमें:–१ माळवा प्रांत देणें. २ नर्मदा व चंबळ यांजमधील मुलूख देणें. ३ या दोहोंबद्दल बादशहाची सनद आणून देणें. ४ मराठ्यांच्या खर्चाचे ५०लाख रुपय बादशहापासून देवविणें. (अर्व्हिन३०५). या प्रसंगीं निजामास सबंध बुडवावयाची संधि बाजीरावास प्राप्त झाली नाहीं. नबाबाचा तोफखाना जबरदस्त होता, शिवाय रोहिले, बुंदेले, रजपूत रजवाडे यांची त्यास मदत होती. ' हा अर्थ व तुह्मीं कित्येक विचार लिहिला,

१ आनंदराव सुमंत हा साताऱ्यास न राहतां शाहूच्या तर्फेनें बहुतेक निजामाजवळ राही. बाजीरावाचा त्याजवर विश्वास नव्हता असें दिसतें. म्हणून बाजी भीवराव व बाबूराव मल्हार बरवे हे बाजीरावानें आपल्या भरंवशाचे वकील निजामाकडे बोलीस पाठविले.

तो चित्तांत आणून सौरस्याचा प्रसंग संपादिला. जो नबाब चौथाई सरदेशमुखीचीं नांवें घेत नव्हता त्यांनीं माळवे दरोबस्त ऐसें खास दस्तकानें लिहितां उच्चार केला, कीं या मागें कधींच गोष्ट न जाहली ते या प्रसंगीं झाली. पुत्राचे नांवें सुभेदारी करून समागमें आणिलें, त्या माळव्याची दरोबस्त सनद करून देतां नबाबाच्या चित्तांत कल्पांत आला. परंतु काय करील, संकटाचा प्रसंग देखोन यावें लागलें. आप्पा, रा. स्वामींचें तपोबळ, वडिलांचें पुण्य समर्थ, ह्मणोनच ही गोष्ट घडोन आली. आज पातशाहींत नबाबासारखा दुसरा अमीर कोण आहे ! अतःपर नबाब दिल्लीस जातील, व बंदोबस्त कर्तव्य तैसा केल्यावर होईल तें वर्तमान लिहून पाठवूं. करार झाला यांत अंतर न करावें, अशी मनरोटी नबाबानें दिली.' स्वामींचें तपोबळ व वडिलांचें पुण्य, यामुळें यश येतें. ही भावना आज आह्मांस देवभोळेपणाची वाटत असली तरी तत्कालीन लोकांना ती आवेश भरण्यास कारणीभूत होत असे.

येणेंप्रमाणें ही पुष्कळ वर्षांची मोठी मोहीम समाप्त झाली. नर्मदा आणि चंबळ या नद्यांच्या दरम्यानचा दरोबस्त मुलूख बहुतेक स्वराज्यादाखल मराठ्यांनीं हस्तगत केला. बाजीरावाच्या पराक्रमाचें हें आत्यंतिक फल होय. बादशहाकडून या प्रांताची लेखी सनद बाजीरावाच्या हयातींत मिळाली नाहीं. तें काम नानासाहेब पेशव्यानें तडीस नेलें. स. १७३८च्या जानेवारींत भोपाळची लढाई आटोपल्यावर बाजीराव कांहीं काळ तिकडेच बादशहापासून तह पुरा करून घेण्याकरितां जिंकिलेल्या प्रदेशांत आपला अंमल बसवीत राहिला. त्या वेळीं तिकडील हिंदु राजांनीं त्यास करभार दिला. नंतर तिकडे मोगलांच्या पाठीवर फौजांसह सरदार ठेवून स. १७३८ च्या जुलई महिन्यांत बाजीराव पुण्यास परत आला. त्या वेळीं चिमाजी आप्पाची वसईची मोहीम तयारींत होती. 'सुजातखानास रघूजी भोसले यांनीं बुडविलें. हजार घोडे, सहा हत्ती व पालख्या व जेजाला पाडाव केल्या. खुद्द सुजायतखान दस्त केले पांचलाख रुपये दंड घेऊन सोडले, ह्मणोन लिहिलें आलें. मृत्युही पावलासा सुजायतखानाची खबर आहे.' ह्या ता. २९.१२.१७३७ च्या पत्रांत वरील मजकूर आहे. ह्मणजे, बाजीरावानें निजामास भोपाळवर कोंडला ती संधि साधून, एलिचपुरच्या नबाबाचा साह्यकारी सुजायतखान याचा रघूजीनें पाडाव करून वऱ्हाडांत आपला अंमल बसविला. ( काळेकृत वऱ्हाडचा इ० पृ. १८३. )

**७. भोपाळच्या संग्रामाची चिकित्सा.**—भोपाळच्या संग्रामांतील यशाचा वांटा चिमाजी आपासही बऱ्याच अंशीं दिला पाहिजे. उत्तरेच्या मार्गावर तापीनदीच्या कांठीं चिमाजीआपा बंदोबस्तानें ठांसून बसला. औरंगाबादच्या फौजेस त्यानें अडकवून ठेविलें; रघूजी व दाभाडे यांच्या हालचालींवर नजर ठेवून त्यानें बाजीरावाचा शक्य तितका पाठपुरावा केला, म्हणूनच निजामास जेरीस आणणें शक्य झालें. बाजीराव व चिमाजीआपा यांचें बंधुप्रेम इतिहासांत वाखाणलें जातें तें युक्तच आहे. मोठीं कार्यें अशा पाठपुराव्याशिवाय सिद्धीस जात नसतात. नानासाहेब व जनार्दनपंत हे दोन बाजीरावाचे होतकरू मुलगेही पुढील उद्योगाचें बाळकडू घेत होते. बाजीरावाजवळ तोफखाना नव्हता; आणि शत्रूचा तोफखानाही मराठ्यांच्या गनिमी काव्यापुढें असमर्थ ठरला. तरी मोगलांचा तोफखाना मराठ्यांस काबीज करतां आला नाहीं. येवढेंच नाहीं तर मोगलांच्या तोफां पुढें मराठे जेरीस येऊन कित्येकदां पराभवाच्या बेतांत आले होते. अशा स्थितींत सिरोंजच्या उत्तरेस ६४ मैलांवर दुराई सराई येथें ८ जानेवारी रोजीं निजामानें जिवावर येऊन तहावर सही केली, तेव्हां बाजीरावाचा जीव हलका झाला. अशा रीतीनें नामोहरम होऊन निजाम परत गेला तो एप्रिलांत दिल्लीस पोंचला. पालखेड व भोपाळ या दोन ठिकाणीं निजाम व बाजीराव यांचे सामने झाले. दोन्ही प्रसंगीं निजाम बलवान असतां बाजीरावानें त्यास युक्तीनें हरविलें. यावरून युद्धकलेंत व राजकारणांत बाजीराव निजामाहून वरचढ ठरतो; आणि मराठ्यांच्या वर्धमान शक्तीची कल्पना होते.

बाळाजी विश्वनाथानें मराठ्यांचें मुख दिल्लीकडे फिरविल्यापासून मराठे व मोगल यांचा झगडा एकदां जुंपला त्याचा सोक्षमोक्ष केव्हां तरी होणें अपरिहार्य होतें. आलेली अडचण निवारण करीत मराठे एक एक पाऊल सालोसाल धिमेपणानें पुढेंच टाकीत होते. या सर्व हालचालींची चर्चा उघडपणें साताऱ्यास शाहूच दरबारांत होऊन साधक बाधक गोष्टींचा विचार पूर्णपणें होत होता. प्रथम निजामास नरमाईनें वागवून आणि दक्षिणेंतच त्यास गुंतवून ठेवून उत्तरेंतील उद्योग मराठ्यांनीं हळूहळू पुरा करीत आणिला. चिमाजीआपा, पिलाजी जाधव, सिंदे, होळकर व पवार एवढेच मुख्य सरदार आरंभीं तिकडील उस्तवारी करीत होते. बाजीरावानें स्वतःच्या अंगावर उत्तरेंतील मोहीम घेतली,

ती सन १७३६ च्या पावसाळ्यानंतर; आणि ती सुद्धां जयसिंगाच्या मदतीनें बादशहापासून चौथाईचे करार पुरे करून घेण्यासाठीं. त्यापूर्वी मराठे सरदारांनीं बादशाही सरदारांचें व फौजेचें पाणी पूर्णपणें जोखलें होतें. विशेष प्रसंग आला तर तो निजामामुळें येईल, इतरांच्या ठिकाणीं कांहींच सामर्थ्य नाहीं, हीही गोष्ट उघड होती. हे सर्व प्रकार शाहूच्या संमतानें चालले होते, आणि त्या संबंधानें तमाम मराठमंडळाची एकवाक्यता होती. रघूजी भोसले व सेनापति दाभाडे रुसल्यासारखे बाजूस राहत, तरी ते केवळ पेशव्यांच्या द्वेषानें; पण एकंदर मराठशाहीचा उद्योग त्यांस नापसंत नव्हता. रघूजीनें तर याच सुमारास मराठशाहीचा हा उद्योग वऱ्हाड नागपुरचे बाजूस फैलाविला. सारांश, भोपाळचें युद्ध हा मराठे मोगलांच्या झगड्याचा पहिला निकर होय. पुढें पानपतचा प्रसंग तरी याच सांखळींतला दुसरा एक निकर समजला पाहिजे. मात्र त्या वेळच्या वातावरणाच्या व्यक्ति वेगळ्या. मोगलांच्या बाजूचीं कारस्थानें निजाम हालवीत होता, तर नानासाहेबाच्या बळेस तें काम नजीबखानानें केलें. समग्र मोगल बादशाहीची एकवटलेली सत्ता निजामानें भोपाळचे संग्रामांत बाजीरावावर ओतली. वेळ मोठी आणीबाणीची होती. जर का बाजीराव हरला असता तर मराठे पुनः वर डोकें काढूं शकले नसते; आणि शाहूच्या दरबारांत बाजीरावाचा पाडाव होऊन पेशव्यांचें कर्तृत्व संपलें असतें. कठिण प्रसंगांत धैर्यानें उडी घालून यश संपादन करणें, वादळाचा घोडा उधळवून त्याजवर आरोहण करणें, हा जो थोर व्यक्तींचा गुण तोच भोपाळावर बाजीरावानें दाखविला, आणि मराठशाहींत वाहवा मिळविली. सर्व सरदार बाजीरावास भजत होते, धन्याची त्याजवर मर्जी होती, म्हणून नाना युक्त्यांनीं शत्रूंस हैराण करून बाजीरावास आपला डाव सिद्धीस नेतां आला.

भोपाळावर निजामास कायमचाच नाहींसा कां केला नाहीं ही शंका अवास्तव आहे मोगलांची उतरती कळा आणि मराठ्यांची चढती कळा यांचें प्रमाण भोपाळावर समसमान ठरलें. पैशाच्या व तयारीच्याच दृष्टीनें पाहिलें तर बादशाही पक्ष मराठ्यांस पुष्कळच वरचढ होता. गनिमी काव्यानें व फसवाफसवीच्या युक्त्यांनीं बाजीरावानें कसें बसें शत्रूंस जेरीस आणिलें इतकेंच. कमावलें हेंच पुष्कळ असें बाजीरावास वाटलें. ' नबाब ठिकाणीं राहिल्यावर अवघी दक्षिण निर्वेध होईल,'

असें सूत्रवाक्य बाजीराव या संग्रामासंबंधानें वारंवार सांगतो. म्हणजे यापलीकडे बादशाही घशांत टाकणें किंवा त्या पक्षाचा संपूर्ण पाडाव करणें हें मुळीं बाजीरावाचें किंवा तत्कालीन चालकांचें ध्येयच नव्हतें. 'वडिलांचे व खांवदाचे पुण्यानें नबाबास घेतच आहों, वडिलांचें पुण्य व धन्याचें प्राक्तन उत्तमच करील. आपा, स्वामींचें तपोबळ व वडिलांचें पुण्य समर्थ ह्मणोनच ही गोष्ट घडोन आली.' या शब्दांत बाजीरावाच्या भावनेचें सार आहे केली ही मोठी अघटित गोष्ट केली दैव सबळ म्हणूच यश मिळालें, म्हणजे याहून ज्यास्त फलप्राप्ति शक्यच नव्हती हें उघड आहे. निजामाचा कायमचा निःपात करणें ही गोष्ट त्या वेळच्या मराठ्यांच्या आवांक्या बाहेर होती. बेरबोलानें आम्हांस चौथाई द्या; न द्याल तर ती आम्ही हिसकून घेणार, एवढेंच सर्व मराठ्यांचें बादशहापाशीं मागणें. तें खरें करून दाखविणें एवढेंच त्यांचें उद्दिष्ट. हिंदुपदपातशाहीचा उद्योग म्हणजे एवढाच. हें उद्दिष्ट बाळाजी विश्वनाथानें अंगीकारलें, बाजीरावानें अनेक प्रसंगांत तें खरें करून दाखविलें, नानासाहेवानें तें सिंदे होळकरां मार्फत बादशहाकडून योग्य करारांत स. १७५२ त उच्चारविलें, आणि पानिपतचें अरिष्ट सोसल्यावरही थोरल्या माधवरावानें स. १७७१ च्या डिसेंबरांत बादशहास दिल्लीस स्थापून तें पूर्ण केलें. असें हें पहिल्या चार पेशव्यांचें उद्योगसातत्य बघील त्यास स्पष्ट दिसणारें आहे. शाहूची बादशहाबद्दलची पूज्यबुद्धि जमेस धरून तत्कालीन मराठमंडळास जितकें साध्य व शक्य कोटींतलें वाटलें आणि जितक्यास शाहूनें संतोषानें अनुमोदन दिलें, तितकेंच त्यांनीं सिद्ध करून दाखविलें. त्यासंबंधानें शाहू व पेशवे यांचा बिलकूल मतभेद किंवा विरोध नव्हता. बाजीराव मर्जीविरुद्ध वागता तर त्यास नरम करण्याची ताकद या वेळीं शाहूंत चांगली होती. परंतु धन्याची कृपा हेंच आपल्या यशःसिद्धीचें मूळ कारण, ही गोष्ट पेशवे कधीं विसरले नाहींत. शाहूच्या पश्चातही त्यांनीं ही आपली स्वामिभक्तीची भावना कायम ठेविली, आणि पूर्वीचाच उद्योग तडीस पोंचविण्याचा निश्चयार्थ दाखविला. मानवी व्यवहार यदृच्छेनें घडत नसतात. विचारवंतांकडून त्यांस चलन मिळतें, आणि संकल्पसातत्य कायम राहतें, ह्मणूनच इतिहास हा विषय शास्त्रपदवीस पोंचला आहे.

८. **नादीरशहाची स्वारी** ( फेब्रुवारी–एप्रिल स. १७३९ ).—तह झाला ह्मणजे युद्ध संपलें असें ह्मणतां येणार नाहीं. कारण तह अमलांत आणण्यासही लढाईच्या इतकाच नेट लागत असतो. भोपाळच्या लढाईनें हिंदुमुसलमानांच्या झगड्याचा कायम निकाल लागला नाहीं. निजामाचा तर हा केवळ जुलमाचा रामराम होता. तो पुढें दिल्लीस गेला, परंतु तहाप्रमाणें माळवा वगैरे प्रांताच्या सनदा त्यानें बादशहाकडून बाजीरावास पाठविल्या नाहींत. मराठ्यांचे वकील निकड लावीत होते, आणि निजामाचा त्याजविरुद्ध अंतस्थ कारस्थानें चालू होतीं. इतक्यांत इराणच्या नादीरशहाचा व दिल्लीच्या बादशहाचा अफगाण हद्दीसंबंधानें तंटा लागून नादीरशहा हिंदुस्थानावर स्वारी करणार अशी बदंता आली. कदाचित् निजाम, सादतखान वगैरेंनीं त्यास येण्याची भर दिली असावी. निदान त्याजबद्दल संतोष मानून त्यांनीं स्वारीचा प्रतीकार करण्याची आगाऊ तजवीज केली नाहीं. आपल्या हातून मराठ्यांचा बंदोबस्त होत नाहीं; तर शेजारचा मुसलमान राजा आपण होऊन येत आहे, त्याचा फायदा घेऊन तरी मराठ्यांस व इतर शत्रूंस ठिकाणीं बसवावें, अशी या उमरावांची भावना असेल. नादीरशहा दक्षिणेंत चालून येणार ह्मणून जी भूमका उठली होती त्याचें बीज हें आहे. पुढें अब्दालीच्या वेळेस सुद्धां मराठ्यांचा व त्याचा परभारें सामना जुळवून स्वतःच्या बचावाचा प्रयत्न बादशहांनीं केला.

नादीरशहाची स्वारी हा हिंदुस्तानच्या इतिहासांतील एक मोठा प्रळय होय. या प्रळयाचें वर्णन मुसलमानी रियासतींत आलें आहे. तथापि मुसलमानी व मराठी कागद पत्रांचें संशोधन करून प्रो. जदुनाथ सरकार यांनीं नुकताच आर्व्हिनच्या दुसऱ्या भागांत शेवटीं पाऊणशें पानांचा भाग जोडला आहे, त्यांतील कित्येक मुद्याच्या गोष्टी या ठिकाणीं संदर्भापुरत्या घेतल्या पाहिजेत. बादशाहींतील व्यक्ती व मराठशाहींतील व्यक्ती यांच्या भावना अजमावण्यास हा प्रसंग फार चांगला आहे.

नादीरशहाचा जन्म स. १६८८ त झाला आणि ता. २६·२·१७३६ रोजीं त्यास इराणची गादी मिळाली. तो जातीचा इराणी नसून तुर्क होता. अफगाणिस्तान दिल्लीच्या बादशहाच्या ताब्यांत असून, तेथील बंडखोरांचा नादीरशहास उपद्रव होऊं लागला, त्या निमित्तानें त्यानें दिल्लीच्या

बादशहाकडे तक्रारी केल्या, आणि बंडखोरांचा बंदोबस्त करण्याविषयीं त्यानें दोन तीन वेळां दिल्लीस वकील पाठविले असतां, बादशहानें त्यांजकडे लक्ष दिलें नाहीं. तेव्हां अफगाणिस्तानावर स्वारी करून त्यानें ता. १२-३-१७३८ रोजीं कंदाहार काबीज केलें. काबूल येथें दिल्लीचे तर्फे नासीरखान नांवाचा गृहस्थ कारभारावर होता, त्यानें वारंवार बादशहास लिहून मदत मागितली असतां ती बिलकूल आली नाहीं. ता. १०-५-१७३८ रोजीं नादीरशहा काबूलवर चालून आला. ता. १९ जून रोजीं तें शहर त्याच्या हातांत पडलें, तेव्हां पुनरपि त्यानें दिल्लीच्या बादशहाकडे पत्रें व वकील पाठविले. पण त्यांजकडे कोणीं लक्ष दिलें नाहीं. हें पाहून नोव्हेंबरचे आरंभीं नादीरनें आपला मोर्चा हिंदुस्थानाकडे वळविला. पेशावर व अटक काबीज करून ता. ८-१-३९ रोजीं चिनाब उतरून शहा लाहोरावर आला. लाहोरचा सुभादार झकारियाखान चांगला हुशार होता. पण त्याच्या विनंत्यांकडे दिल्लींतील अधिकाऱ्यांनीं कांहींच लक्ष दिलें नव्हतें. नादीरनें त्याचा पराभव करून १२ जानेवारी रोजीं लाहोर काबीज केलें. नंतर ता. ५ फेब्रुवारी रोजीं तो सरहिंदला पोंचला. इकडे दिल्लीस या बातम्या कळल्यावर बादशहानें लढाईची तयारी करून सर्व अमीरउमरावांसह फौजा घेऊन ता. १८ जानेवारी रोजीं नादीरशहावर चाल केली. सुमारें ८० मैलांवर कर्नाळ येथें प्रचंड छावणी देऊन बादशहा बंदोबस्तानें राहिला. त्याची फौज मोठी होती, तरी सर्व हुकमत एकाच हुशार सेनापतीकडे नसून हत्ती, बाण, तलवारी, भाले वगैरे पुरातन चालीचे प्रकार सुधारले नव्हते. नादीरशहाची फौज आटोपसर असून तो स्वतः त्या वेळच्या पद्धतीचें उत्कृष्ट सेनापतीचें काम चांगलें समजत होता. त्याजवळ तोफखाना व लांब पल्ल्याच्या बंदुका होत्या. ता. १३-२-१७३९ रोजीं दोन प्रहरनंतर बादशहानें करनाळच्या छावणींतून चाल करून नादिरशहाशीं लढाई केली, तींत बादशहाचा पूर्ण पराभव झाला. खानडौरान जखमा लागून पडला व पुढें दोन दिवसांनीं मरण पावला. सादतखान जखमी होऊन नादिरच्या कबजांत सांपडला. निजामानें मात्र या लढाईंत यत्किंचित् भाग घेतला नाहीं. वास्तविक बादशहाकडे अत्यंत हुशार असा गृहस्थ निजामच होता; परंतु खानडौरान व सादतखान यांचा पाडाव व्हावा अशी त्याची इच्छा असल्यामुळें तो स्वस्थ राहिला. लढाई तीन तास चालली.

तींत सुमारें १०० अम्मलदार व तीस हजार शिपाई कापले गेले. खानडौरानचे तीन मुलगे व भाऊ मुजफरखान हे मारले गेले. लढाई आटोल्यावर रात्रीं नादिरनें सादतखानास भेटीस आणून विचारिलें, ' तूं माझा देशबंधु आहेस, बादशहाकडून मोठी रकम कशी उपटावी तें सांग. ' सादत म्हणाला, ' सर्व किल्ली निजामाचे हातांत आहे, त्याला बोलवा. ' दुसऱ्या दिवशीं १४.२.१७३९ रोजीं नादिरशहानें निजामास बोलावून आणिलें, आणि विचारलें, ' तुमच्या सारखे उमराव बादशहाजवळ असतांना भुरट्या मराठ्यांनीं दिल्लीवर येऊन खंडण्या घ्याव्या, याचा अर्थ काय ! ' निजामानें उत्तर दिलें, ' बादशहांनीं नव्या नव्या मंडळींस जवळ करून माझ्या सारख्यांची सल्ला तुच्छ मानली, तेव्हां नाइलाज होऊन मी दक्षिणचा पंथ पाहिला. ' पुढें वाटाघाट होऊन असें ठरलें कीं ५० लाख रुपये खर्च घेऊन नादिरशहानें तेथूनच स्वदेशीं परत जावें. हा करार झाल्यावर निजामाबरोबरच नादिरनें दुसऱ्या दिवशीं महंमदशहास भोजनाचें आमंत्रण दिलें. १५.२.३९ रोजीं महंमदशहा नादिरचे भेटीस गेला. भोजनाहून परत आल्यावर खानडौरान मरण पावल्याची बातमी बादशहाला कळली. मरणापूर्वी त्यानें अशी सूचना केली कीं, 'या राक्षसाला कसेंही करून येथूनच घालवून द्या. दिल्लीस जाऊं देऊं नका. त्यावर बक्षीगिरी बादशहानें निजामास दिली. ती जागा सादतखानास पाहिजे होती.' बादशहानें ती निजामास दिल्याचें ऐकून सादतखानास फार वाईट वाटलें, आणि पुढील भेटींत त्यानें नादिरशहास कळविलें, कीं '५० लाख घेऊन परत जाण्याचें कबूल केलें हें काय ? दिल्लीस गेलांत, तर निदान २० कोटींस मरण नाहीं. बादशहाजवळ पराक्रमी पुरुष आहे कोण ? येऊन जाऊन एक निजाम आहे. परंतु तोही पक्का कार्यसाधु पांडित्य करणारा आहे.' त्यानंतर चार पांच दिवसांत नादीर व बादशहा यांच्या कित्येक भेटी व मेजवान्या झाल्या. तेवढ्या अवधींत नादिरनें बादशहाची छावणी पूर्णपणें वेढून घेतली, तेव्हां आंतील लोकांचे अन्नावांचून भयंकर हाल होऊं लागले. नादीरशहानें ता. २२ फेब्रुवारीं रोजीं निजामास भेटीस बोलावून अटकेंत ठेविलें; आणि त्याजवळ बादशहापासून २० कोट रकम मागितली. निजाम बोलला,' मोगल बादशाहींत अजून २० कोट कोणीं ऐकिलेही नाहींत, व पाहिलेही नाहींत. शहाजहान बादशहानें फार मोठा संचय केला होता, असें

म्हणतात. परंतु तो सर्व संचय औरंगजेबानें दक्षिणच्या युद्धांत खर्च केला. आज तिजोरींत ५० लाख सुद्धां शिल्लक नाहींत.' त्यावर नादिरनें निजामाकडून बादशहास पत्र लिहून भेटीस बोलाविलें. शनिवार ता. २४-२-३९ रोजीं महंमदशहा भेटीस गेला असतां नादिरनें त्यासही अडकवून ठेविलें; आणि लगेच महंमदशहाचा जनानखाना व वजीर कमरुद्दीनखान वगैरे सर्वांस पकडून आणून बंदोबस्तांत ठेवून बाकी सरदार व फौज होती त्यांस पाहिजे तिकडे निघून जाण्याचा हुकूम फर्माविला. मराठ्यांचा वकील बाबूराव मल्हार बर्वे महंमदशहाच्या छावणींत होता, तो पळून जयपुरास आला. त्यानें या प्रसंगाचें वर्णन मार्मिक दिलें आहे. ता. २६ फेब्रुवारी रोजीं नादिरशहानें सादतखानास बरोबर देऊन आपल्या एका सरदारास दिल्लीचा कबजा घेण्यास पुढें पाठविलें; आणि त्याजबरोबर महंमदशहाचेंही पत्र घेऊन दिलें. ता. २७ रोजीं दिल्लीचा कबजा नादिरशहाकडे आला. नंतर दोघे बादशहा १-३-३९ रोजीं कर्नाळहून निघून ७ मार्च रोजीं दिल्लीस येऊन शालेमार बागेंत उतरले. दुसऱ्या दिवशीं महंमदशहाला आपल्या वाड्यांत येण्यास परवानगी मिळाली. शुक्रवार ९ मार्च रोजीं नादिरनें दिल्लींत प्रवेश केला महंमदशहानें त्यास आपल्या वाड्यांत ठेवून घेतलें. सादतखान सदैव नादिरबरोबर असे. पहिल्याच रात्रीं त्यास नादिरनें निक्षून सांगितलें, कीं "२० कोटींची भरपाई ताबडतोब न कराल तर तुम्हांस देहदंड भोगावा लागेल." तें कठोर वचन ऐकून सादतनें रात्रीं विष पिऊन प्राणत्याग केला. दुसऱ्या दिवशीं ता १० मार्च रोजीं नादिरशहानें दिल्लीस पातशाही पद धारण करून आपल्या नांवानें द्वाही फिरविली. तेव्हांपासून ता. १ मे पर्यंत त्याचा मुक्काम दिल्लीस होता. तेवढ्या अवधींत जे अनन्वित प्रकार त्यानें दिल्लींत केले, त्यांचें वर्णन मशहूर आहेच. कत्तल, लूट व जाळपोळ यांची दिल्लींत कमाल झाली. मोठमोठ्या धनिकांचे हाल करून पैसे उकळण्यांत आले. वजीर कमरुद्दीनखान यास उन्हांत उभें करून एक कोट नक्त, व शिवाय हत्ती, जवाहिर वगैरे त्याजकडून घेण्यांत आलें. मंगळवार ता. १ मे रोजीं नादिरशहानें मोठा दरबार भरवून महंमदशहास तखतावर बसविलें; आणि सुमारें एक अब्ज संपत्ति आणि सिंधुनदीच्या पश्चिमेकडील प्रदेश कबजांत घेऊन हा भयंकर प्राणी स्वदेशीं निघून गेला. बरोबर त्यानें येथून ३०० गवंडी, २००

लोहार,२०० सुतार,१०० पाथरवट, आणि १३० हिशेबनीस, दिल्लीसारखें शहर इराणांत बांधण्यासाठीं नेले. ही जी अपरंपार संपत्ति नादिरशहानें स्वदेशीं नेली ती कांहीं त्याजवळ टिकली नाहीं आठ वर्षांनीं त्याचा खून होऊन हिंदुस्तानांतून आणलेली लूट चोरापोरांनीं जिकडे तिकडे लांबविली. या भयंकर व अविचारी बनावास जगाच्या इतिहासांत फारच थोड्या उपमा मिळतील.

९. **मराठे वकिलांनीं केलेलें या प्रळयाचें निदान.**—स. १७१० पासून रजपूत व मराठे यांनीं संगनमत करून मोगल बादशाहीवर आघात चालविले, त्यामुळें नादीरशहाशीं टक्कर देण्याचें सामर्थ्य बादशाहींत राहिलें नाहीं. रजपूत व मराठे यांची योग्य प्रकारें समजूत काढून त्यांस या प्रसंगीं दिल्लीदरबारानें आपल्या मदतीस आणलें असतें, तर नादीरशहाचा बंदोबस्त होऊन पुढील अनर्थ टळले असते. नादीरशहा निघून गेल्यावर, निजामास बादशहानें अमीरुल्–उमराव ही पदवी देऊन आपल्या जवळ ठेवून घेतलें. सुमारें दीड वर्षानंतर मुलगा नासिरजंग दक्षिणेंत बंड करूं लागल्याचें वर्तमान आल्यावरून, वडील मुलगा गाजीउद्दीन यास दिल्लींत बादशहासंनिध ठेवून निजाम स.१७४१त दक्षिणेंत आला, तो पुनः दिल्लीकडे गेला नाहीं.

नादीरशहाच्या स्वारीचा परिणाम मराठ्यांच्या उद्योगावर काय घडला हें समजून घेण्यासारखें आहे. मराठ्यांच्या ठिकाठिकाणच्या वकिलांनीं स. १७३९त त्या वेळच्या हकीकती लिहून पाठविल्या त्या पाहण्याजोग्या आहेत. त्यांवरून मराठ्यांचे हेतु कळतात.[१] व्यंकाजीराम, विश्वासराव दादाजी, गोविंद नारायण, सदाशिव बल्लाळ, बाबूराव मल्हार, महादेवभट हिंगणे, ही मंडळी बाजीरावाचे तर्फेनें वकील ह्मणून ठिकठिकाणीं होती. हे सर्व वकील विशेषतः हिंगणे व बाबूराव मल्हार बरवे मोठ्या धूर्ततेनें वागत असून, त्यांची चाणाक्षता त्यांचे पत्रांत दिसून येते. जयसिंगानें आपल्या तर्फेनें कृपाराम यास फौज देऊन दिल्लीस ठेविलें होतें. पिलाजी जाधव माळव्यांतील बंदोबस्तास होता. आनंदराव सुमंत निजामाजवळ असे, तो कांहीं दिवस या वेळीं जयसिंगाकडे गेलेला होता. या सर्वांचीं त्या वेळचीं पत्रें आहेत.

१ पहा, इ. सं. ऐ चर्चा ले. ४ यांतील पत्रें महत्वाचीं आहेत; ब्र. च ले. ४१, ४२ रा. खं. ६ ले. १३०, १३१, १३३, १३४ व १३७; इ. सं. ऐ टि. २·६.

नादीरशहा आला, तेव्हां काय प्रकार घडले, बादशहाच्या सरदारांची त्रेधा कशी उडाली, कोण कोठें कसे पळाले, इत्यादि हकीकती वरील पत्रांत कळून येतात, आणि त्यांत जयसिंग व बाजीराव यांचे बेतही व्यक्त होतात. जयसिंगाचे मनांत बादशहाजवळ निजाम, सादतखान, खानडौरान वगैरे हिंदूंचा द्वेष करणारे जे प्रबळ सरदार होते, त्यांचा परभारें पाडाव व्हावा असें होतें. ' पातशहांनीं व खानदौरानीं राजेंद्रास ( जयसिंहास ) बोलाविलें, तेव्हां हे अवघे राजे गेले नाहींत. त्यांची फत्ते होईल म्हणून दुश्चित्त होते. ईश्वरें यांचे मनोदयानुरूप केलें. फौज पातशहा मारिले. आतां हे तहमास्पकुली ( नादीरशहा ) व आपण एक होणार, म्हणून ( जयसिंगानें ) चितांत संतोष मानिला, विचार तो ऐसा झाला, तरी स्वामीनें ( बाजीरावानें ) हे गोष्टीचा विचार करून लिहावें, त्याप्रमाणें उभयतां ( जयसिंग व नादीरशहा ) विचार करणें तो करतील.' असें व्यंकाजीरामाचें फब्रुवारींत बाजीरावास लिहून आलें. ' राजेन्द्र साहित्यास गेले नाहींत, यामुळें चित्तांत शरमिंदगी आहे. तहमास्पकुलीखानाची फत्ते ऐकून चित्त प्रसन्न होतें. मागती महंमदशहाची फत्ते झाली त्यावरून मागतीं चित्त दुःस्थित असे.' असें पुनः जयसिंगासंबंधानें बाजीरावाचा वकील लिहितो. दुसरा वकील धोंडो गोविंद स. १७३९ च्या मार्चांत बाजीरावास लिहितो, ' आतां नवी सृष्टि जाहली, तहमास्पकुलीस निजामाचे नामर्दीनें मोठें यश आलें. आतां राहिले राजे. त्यांत मातबर सवाईजी. त्यांचा विचार स्वामीस विदित आहेच. त्यांनीं तहमास्पकुलीस मुबारकीची अर्जदास्त ( अभिनंदपर पत्रिका ) लिहिली आपले सलुखाचे विचारांत आहेत. इकडे स्वामीसही बोलावितातो. जैसें बनेल तैसा प्रसंग संपादून घेतील. स्वामीचा प्रताप सर्वांस विदित आहे. स्वामीस माळव्यांत यावें हे मसलती निमित्य. मोहरा प्रथम माळवा आहे. यावें अशी मसलत आहे. न यावें हेही मसलत आहे. यावें तेव्हां बहुत खबरदारीनें मातबर फौजेनें यावें. तहमास्पकुली कांहीं देव नाहीं, जे पृथ्वीस कापून काढील. तोही शहाणा आहे. जबरदस्तांशीं सलूख करील. परंतु स्वामीनें पैरवी करून यावें. पोक्त विचार करावयाचा तो करून आज्ञापत्र लिहिलें पाहिजे. इकडे आपणही पाहतों, कोणी लाग लावाया योग्य असलिया लावूं. रा. बाबूरावजी हुजूर आहेत. तेही चुकणार नाहींत. आधीं

जबरदस्ती, मग सलूख. पहिले भांडभाड उत्तम आहे. भ्रमाभ्रमीमध्यें काम होऊन येतें. आतां सारे रजपूत व स्वामी एका जागां जालिया कांहीं निकाल पडेल. समस्तांस, बुंदेले वगैरे एका जागां करून मोठा भाव दाखविला पाहिजे. फलदाता श्री आहे.' या पत्रांत मराठे वकिलांची कारवाई चांगली व्यक्त होते. 'राजाधिराज स्वामींचा मार्ग लक्षीत आहेत.' दुसऱ्या एका पत्रांत बाजीरावाचा वकील ह्मणतो, 'सांपडले ते धरून आणिले. सवाईजींनें पुशिलें, कीं तुह्मी कोणाचे चाकर आहां? त्यांनीं सांगितलें, कीं निजामाचे बातमीचाकर आहों. तेव्हां कित्येक मारिले, कित्येकांचे नाककान कापून सोडिले. त्यावरून दिसोन येतें जे, सर्व खेळ निजामाचे आहेत, निजामाचा जर फितूर आहे, तर नादीरशहा माघारा जात नाहीं,हिंदु राज्यांवर निघेल. निजामानें सादतखानानें मिळून नादीरशहा खानदौरास मारायास आणिला येथील आबालवृद्ध विश्वतोमुखीं खानदौरास धन्य धन्य ह्मणताती. खानदौरा मरतांच महंमदशहा आणून भेटविला. सादतखान द्राही फिरविण्यास दिल्लीस गेले. परंतु कपट सिद्धीस जात नाहीं. सादतखान तर खानेजंगींत जखमी होऊन दुसरे दिवशीं मृत्यु पावले. निजाम वांचले, पण मृत्युहून विशेष झालें. खेचरावर बसून दरबारास जावें दक्षिणेंत अंमल उठला.स्वामींसच यश आलें.आतां राणोजीस विपत्तीनें मरणही पावेल. रायांचे मनी राणोजीस दिल्लींत तख्तीं बैसवावें.' इ० इ० यावरून नादीरशहास आणण्याचें कारस्थान निजामाचें असून तें त्यास कसें भोवलें तें दिसून येतें. बाकी बादशहा व वजीर खानदौरान बाजीरावास अनुकूल होते. उदेपुरच्या राण्यास दिल्लीस तख्तावर बसवावें असाही विचार चाललेला होता. त्यावरून दिल्लीच्या तख्तावर मराठा राजा बसवावा अशी कल्पनाही कोणाचे मनांत नव्हती. तोच वकील पुढें आणखी लिहितो, 'मुख्य गोष्ट स्वामींचे आगमनावरी आहे. सेवक नित्य नित्य राणाजीस सांगतो कीं, रा॰ राऊ कूचदरकूच येतात. परंतु ऐसें सांगतां सांगतां दोन मास झाले. हिंदु राजे सर्व सवाई आदिकरून स्वामींचे स्वारींची प्रतीक्षा करितात. स्वामींचें पुष्टिबल होतांच आठ वगैरे फौज दिल्लीवर पाठवून सवाईजी आपणही जाणार, ऐसी तजवीज आहे.' त्यानंतर पुनः बाजीरावास वकील लिहितो 'नवी सृष्टीचा प्रकार दिसतो. ईश्वर इच्छा नकळे. स्वामींहीं याउपरी इकडील याबयाचा प्रसंग न करावा. लक्ष

प्रकारें माळव्यांत राहवें. मंडळीचे खेळ कसे होतात ते दृष्टीस पडतील, तशी वर्तणूक करणें लागेल. याउपरी शपथपूर्वक इकडे यावयाचा प्रसंग न करावा. तिकडे सावधपणें राहावें. उत्पातास कारण आहे.'

मराठ मंडळाची इच्छा बादशहास मदत करून नादीरशहास घालवून द्यावा अशी होती. शाहूबाजीरावाचाही तोच बेत ठरला. त्या वेळीं वसईचें कारस्थान रंगांत येऊन चिमाजीआपा व मोठमोठ्या फौजा वसई काबीज करण्यांत गुंतल्यामुळें बाजीरावास जोरानें हिंदुस्थानांत जातां आलें नाहीं. पुढें वसई काबीज झाल्यावर मराठ्यांच्या फौजा हिंदुस्थानांत गेल्या. मुसलमानांची लक्ष फौज जमा करून नादीरशहा दक्षिणेंत येणार अशी बातमी आली. तेव्हां वसईचें काम आटपतांच सर्व सरदारांसह बाजीराव त्यांजवर निघाला ' पातशहाची कुमक या समयीं केलियानें या राज्याचा लौकिक आहे,' असें पिलाजी जाधव लिहितो. ह्मणजे परशत्रूंपासून पातशहाचें संरक्षण करणें हें चौथाईतलें तत्त्व नादीरशहाच्या वेळेस उद्भवलें. बाबूराव मल्हाराचें मार्च ७ स. १७३९ चें जयपुरचें पत्र महत्त्वाचें आहे. नादीरशहाच्या स्वारीनें दिल्लींत गडबड उडाली, त्यांत बाबूराव मल्हार पळून जयपुरास आला, तेथून त्यानें हें पत्र लिहिलें. ' चकतियांची पातशाही बुडाली, इराणी जाली, दिल्लीचा बंदोबस्त जालियावरी, नादरशहा अजमिरावरी पिराच्या दर्शनास येणार आहेत. यास्तव सवाईजीनीं आपले व लोकांचे कबिले, उदेपुरास पाठवून सडे जाले आहेत. इकडील दक्षिणच्या फौजा मातबर जातील तेव्हां नादरशहाशीं प्रसंग पडेल. परंतु एप्रिलच्या आरंभीं नादिरशहा परत गेल्याच्या बातमीचें बादशहाचें पत्र घेऊन, कासीद बऱ्हाणपुराजवळ जैनाबाद येथें २२·५·१७३९ रोजीं बाजीरावास भेटलें त्यापूर्वीं थोडे दिवस वसई काबीज झाल्याची बातमी बाजीरावास आली होती.

स. १७३७ च्या अखेरीस बाजीरावानें उत्तर हिंदुस्थानांत मोठी स्वारी करून भोपाळ नजीक निजामाचा कोंडमारा केला त्या प्रसंगीं सर्व मराठे सरदारांस बाजीरावाच्या मदतीस जाण्याविषयीं शाहूनें निकडीचे हुकूम सोडिले होते दाभाडे व रघूजी भोसले या दोघांशिवाय बाकीचे सरदार पेशव्यास येऊन मिळाले. रघूजीस निकडीचीं पत्रें गेलीं असतां तो आला नाहीं, उलट त्यानें पूर्वेकडे ओढ्या प्रांतांत कटकपर्यंत स्वारी करून पुष्कळ लूट आणिली; आणि भोपाळ येथें निजाम

बोंडला गेला असतां रघूजी भोसल्यानें वऱ्हाडांतून उत्तरेकडे अलाहबादपर्यंत स्वारी करून तिकडूनही मोठी लूट आणिली. या स्वारींत बंगालचा सुभेदार सुजाखान यासीं रघूजीनें लढून त्यास ठार मारिलें, असें डफ लिहितो, तो मागें पृ. ३७४ वर सांगितलेला सुजायतखान असावा.[1]

बाजीरावानें आवजी कवडे यास रघूजीवर वऱ्हाडांत पाठविलें, परंतु त्याचा फेब्रुवारी १७३९ त रघूजीनें खरपूस समाचार घेतला. पेशव्यांच्या फौजेची टोळी आवजी कवडे याच्या हाताखालीं वऱ्हाडांत लूट करीत होती, तिचा पराजय भोसल्यांनीं केला, त्या वेळीं भोसल्याकडे शिउबा पटवर्धन होता. हा शिवाजी केशव रामचंद्र हरींचा चुलत भाऊ. रामचंद्र हरि वगैरे पटवर्धन सरदार बाजीरावाकडे असून शिवाजी केशव हा एकटाच घरांतून रुसून रघूजी भोसल्याचे चाकरीस जाऊन २१३ वर्षें राहिला होता. (ह. ब.) रघूजीनें हुकमाची अमान्यता केली. परवानगीशिवाय स्वतंत्रपणें स्वाऱ्या करून मराठमंडळास तो जुमानीनासा झाला, याजबद्दल त्यास शासन करण्याचा विचार बाजीरावानें शाहूशीं ठरवून स. १७३९ त त्याजवर चालून जाण्याचा बेत केला. इतक्यांत नादीरशहा दिल्लीवर चालून आला, आणि लवकरच तो मोठ्या फौजेनिशीं दक्षिणेंत येणार अशी बातमी आली. 'हिंदु लोकांस संकट थोर प्राप्त झालें आहे. अद्याप वसई आली नाहीं. आवजी कवडे रघूजी भोसल्यांच फौजेनें लुटला. ऐशास तमाम मराठी फौजा एक होऊन चंमलीपार व्हावें, त्यास अलीकडे येऊं न द्यावें असा विचार आहे.' हिंदुमुसलमानांनीं एक होऊन नादीरशहावर चालून जावें असा बाजीरावानें बेत ठरविला, आणि नासिरजंगास आपल्या मदतीस बोलाविलें. अशी तयारी करीत असतां नादीरशहा परत गेल्याची बातमी आली. नादीरशहानें परत जाण्यापूर्वी शाहू, बाजीराव वगैरे सर्वांस पत्रें पाठविलीं, कीं 'महंमदशहांस आम्हीं तख्तावर स्थापिलें आहे. आम्ही त्यांस भाऊ समजतों. इतःपर सर्वांनीं यांची आज्ञा पाळावी. न पाळल्यास आम्ही पुन्हां येऊन सर्वांचें पारिपत्य करूं.' हें सर्व कृत्य निजामाचे मार्फत झालें असावें. बाजीरावानें लगेच बादशहास नम्रतेचें पत्र लिहून १०१ मोहोरांचा नजराणा पाठविला. बादशहानें उलट पूर्वींचे करार सर्व पाळण्याचें फर्मान बाजीरावास पाठवून खिलत वगैरे दिली. हीं कामें आटपून स. १७३९ च्या जुलईंत बाजीराव साताऱ्यास आला.

१ सुजाखान स. १७२९ त विषप्रयोगानें मरण पावला. मु. रि. पृ. ८४०–४२.

**१०. या स्वारीच्या वेळची राजकीय परिस्थिति.**—मोगल बादशाहीची हीनावस्था मराठ्यांच्या व्यवहारांवरून फार चांगली अजमाविता येईल. नादीरशहासारखा पुरुष येऊन क्षणांत दिल्लीची पातशहात उलथी पाडतो, हेंच त्या वेळच्या स्थितीचें निदर्शक आहे. अकबरापासूनच्या दीडशें वर्षांत असे हल्ले हिंदुस्थानावर आले नाहींत असें नाहीं, परंतु बादशाहीच्या एकसूत्री शक्ती-पुढें त्या हल्ल्यांचें कांहीं चाललें नाहीं जेव्हां तेव्हां त्यांचा प्रतीकारच होत गेला. निजामास तरी इतिहासांत अवास्तव मोठेपण मिळालें आहे. सर्वाधिकार हातांत असतांही त्याचे हातून नादीरशहाचा प्रतीकार झाला नाहीं. विशिष्ट तपशिलाकडे लक्ष देतांना मोठमोठ्या घडामोडींसंबंधानें दुर्लक्ष होण्याचा संभव असून, नादीर-शहाच्या स्वारीसारखी धाड देशावर इतक्या सुलभ रीतीनें येऊन कशी पडली हें सहसा लक्षांत येत नाहीं. नादीरशहानें स्वारी करण्यास कारणें काय झालीं असतील तीं असोत. मराठ्यांचा तरी एक सामान्य समज त्यासंबंधानें होता. ' वजीर व उमराव यांनीं विचार केला कीं, मराठ्यांचें प्राबल्य फार झालें, बाद-शहा वेडा. दिल्लीपर्यंत बाजीराव स्वाऱ्या करितात. बंगालाअयोध्येपर्यंत भोसल्यांनी मुलूख घेतला, सबब इराणी बादशहाशीं राजकारण करून दुसरा बादशहा स्थापावा. असें करून ऐशीं हजार घोडा व तोफखाना सुद्धां नादीरशहा आला. तेव्हां बाद-शहानें हिंगणे यांचे विचारें बाजीरावाकडे दोन लाख फौज मागितली 'निम्मे अम्मल हिंदुस्थान सुद्धां घ्यावा. तेव्हां बाजीराव दसऱ्यास हिंदुस्थानांत निघाले. ही खबर लागतांच नादीरशहा दिल्लीवर आला.' वरील अमीरउमराव मंडळी म्हणजे निजाम व सादतखान आणि तुराणी पक्षाची मंडळी होत. औरंगजेबाची प्रवृत्ति अन्यायाकडे होऊं लागतांच, राजसत्ता उत्तरोत्तर दुर्बळ झाली. दुर्बळतेनें धांदल उडाली; धांदलीमुळे स्वसंरक्षणाचा उपाय सुचेना. अशा बावरेपणांत राज्याचा व देशाचा नाश झाला. औरंगजेबाच्या मृत्यूपासून नादेरशहाच्या स्वारीपर्यंतच्या घडामोडींचें सूक्ष्मावलोकन केलें असतां हा अधःपात उघड होतो. घटकेंत निजामासारख्यास हाताशीं धर, घटकेंत रजपुतांस खूण कर, घटकेंत मराठ्यांस बोलाव, अशा धरसोडींत बाचाबाच होऊन नादीरशहाची धाड आली. शत्रु येतात ते अशी योग्य संधि साधूनच येतात. आपल्या विपत्तींत दुसऱ्या प्रबळ दोस्ताची मदत घेणें खासगी व्यवहारांत सुद्धां श्रेयस्कर होत नाहीं, मग

राजकारणांत तर नाहींच नाहीं. दुराईसराईचा तह लिहून देतांना निजामास परमावधीचें दुःख झालें. रजपुतांनी त्यास मनापासून साह्य केलें नाहीं. अर्थात आतां हिंदूंचें राज्य होऊन पांचशें वर्षें चालत आलेली मुसलमानांची सत्ता लयास जाणार. याजबद्दल उद्विग्नता उत्पन्न होऊन, निजाम, सादतखान वगैरे हिंदुविद्वेषी मुत्सद्यांना नादीरशहास बोलावलें असेल; निदान तो येत असलेला पाहून आनंद मानून त्याच्या प्रतीकारार्थ उपाय योजला नाहीं हें खास. या वेळीं दिल्लीच्या मुत्सद्यांनीं वाटेल त्या अटी कबूल करून मराठे व रजपूत यांची मदत घ्यावयाची होती. ती घेतली असती तर नादीरशहाचा प्रतिकार त्यांस सहज करितां आला असता. या मदतीबद्दल मराठ्यांनीं भलतेंच बक्षीस मागितलें असतें; गुजराथ माळव्याची सुभेदारी नव्हे तर दिल्लीची वजिरीही कदाचित बाजीरावास द्यावी लागली असती. कदाचित् रजपुतांची व मराठ्यांची स्वतंत्र राज्यें तोडून द्यावीं लागलीं असतीं. पण नादीरशहा आल्यानें जो परिणाम झाला त्या मानानें वरील परिणाम कांहींच नव्हे. दिल्लीतील लोकांवर भयंकर अनर्थ कोसळले. १५ कोटि रुपये लूट, ५० कोटींचें जडजवाहीर ( मयूरसिंहासन धरून ) व इतर वस्तु सुमारें १० कोटि म्हणजे जवळ जवळ ७५ कोटींची संपत्ति, कोहिनूर हिरा, काबूल, ठठ्ठा व मुलतान म्हणजे सिंधूच्या पश्चिमेकडील सर्व प्रदेश, अफगाणिस्तान सुद्धां त्या वेळीं बादशाहींत मोडत होता तो, इतका अपहार नादीरशहानें केला. पण याहीपेक्षां कष्टतर दंड नादीरशहानेंच या देशावर बसविला. आपला हस्तक अहमदशहा अब्दाली यास त्यानें आपल्या कृतीचा कानमंत्र शिकविला. नादीरशहा गेल्यानंतर दिल्लीची पातशाहत हस्तगत करण्याची संधि मराठ्यांस चांगली होती. परंतु दिल्लीतील संपत्ति परदेशीं गेल्यानें बादशाहांतून मराठ्यांस फायदा होण्याजोगी स्थिति राहिली नाहीं. खजिन्यांत येऊन पडणारा सालोसालचा वसूलही बंद झाला. तेणेंकरून रघुनाथराव, सदाशिवराव वगैरेंनीं पुढें दिल्लीचा कबजा घेतल्यावर त्यांस लभ्यांश कांहींच झाला नाहीं उलट स्वतःचेंच खर्च भागविण्याची त्यांस पंचाईत पडली. या वेळचा दिल्लीतील वकील बाबूराव मल्हार बर्वे, बाजीरावाच्या मामाचा मुलगा हा मोठा चाणाक्ष होता, असें त्याच्या पत्रांवरून दिसतें. त्याचीं पत्रें मणस्पणीत, स्पष्ट-

वक्तेपणाची असून त्यांत तत्कालीन परिस्थितीची व मराठ्यांच्या कर्तव्याची कल्पना स्पष्ट दिसते. बाबूराव मल्हारास बाजीरावानें रांजणगांवीं इनाम दिल्याचा उल्लेख आहे[१], या बाबूरावानें नादीरशहाच्या स्वारीची हकीकत दिल्लीहून लिहिली आहे. नादीरशहा आला त्या सुमारास मराठ्यांचें व हिंदूंचें मुसलमानांचे विरुद्ध जंगी कारस्थान उभारलें जात होतें. जाठ, बुंदेले वगैरे लहान मोठे संस्थानिक या कारस्थानांत सामील होते. हें कारस्थान उभारून तयार करण्याचें काम हिंगणे, दीक्षित, बाबूराव मल्हार वगैरे मराठे वकिलांनीं केलें. मराठ्यांचा मुत्सद्दी कारभार एका मध्यवर्ती पुरुषाच्या किंवा खात्याच्या हातांत सर्वस्वी असता, तर या कारस्थानास यश येण्यास विलंब लागला नसता. परंतु याची वार्ताही साताऱ्याच्या सूत्रचालकांस नव्हती. ते केवळ जाग्यावर बसून कल्पना करणारे होते. कोणतें तरी एक काम हातीं घेऊन तेवढ्याचीच सर्वस्वी सिद्धता करण्याचें या सूत्रचालकांनीं मनावर घेतलें असतें, तर पुष्कळ कार्यभाग झाला असता. परंतु इकडे प्रतिनिधींनीं एक कारस्थान रचावें, तर बाजीरावानें दुसरें, आणि फत्ते-सिंग भोसल्यानें तिसरें, असा प्रकार होऊन शत्रूस ते प्रकार उलकण्याची ताकद नसल्यामुळें, एकही कारस्थान यथायोग्य सिद्धीस गेलें नाहीं. उत्तरहिंदुस्थानांत मोगल बादशाहीची पडती कळा पाहून कोणत्या ना कोणत्या उपायानें बादशा-हीस ऊर्जित कळा आणण्याचे प्रयत्न कित्येक मुसलमान मुत्सद्दी करीत होते. बाजीरावाच्या वेळेस हिंदुमुसलमानांच्या वैराचें हें कारस्थान रंगांत आलें नाहीं. पुढें त्यास हळू हळू रंग चढून वीस वर्षांनीं परिपक्व दशा प्राप्त झाली, त्याचा परिणाम पानपतचा संग्राम होय. या दृष्टीनें पाहिलें असतां नादीरशहाची स्वारी व बाजीरावाचे बेत हे अहमदशहा अब्दाली व सदाशिवराव पेशवे यांच्या पुढील हालचालींचें पूर्वस्वरूप होत. उत्तरेंतील कारस्थान किती जोरांत होतें याचा अंदाज शाहूस नव्हता. त्यास भूगोलिक स्थिति सुद्धां कळत नव्हती; आणि बादशाहीच्या ठिकाणीं त्याची मातृभक्ति होती. शिवाय त्याच वेळीं वसईच्या मोहिमेंत चिमाजीआपा व दुसरे मोठमोठे सरदार गुंतल्यामुळें बाजी-रावाचे बेत बरेच लंगडे पडले. दिल्लींतही पुष्कळ अंदाधुंदी चालून तूर्त बाजी-

१ ब्र. च. पृ. ११७–११९; का. सं. प. या. ९; खं. ६-१२१, १२३, १२४.

रावानें फौज घेऊन पुढें येऊं नये, अशी सल्ला वकिलांनीं दिली. अशा अस्वस्थ चित्तवृत्तींतच बाजीराव नर्मदातीरीं मरण पावला.

११. नासिरजंगावरील स्वारी व बाजीरावाचा मृत्यु.[१] नादिरशहा स्वदेशीं निघून गेल्यावर बाजीरावानें बादशहास पत्र लिहून १०१ मोहोरांचा नजराणा पाठविला, त्यावर बादशहाचें उत्तरही आलें कीं, पूर्वी कबूल केलेले सर्व करार यथायोग्य पाळण्यांत येतील, जहागीर व मनसब देण्यांत येईल; बाजीरावानें मात्र कराराप्रमाणें बादशहाची नोकरी करून दाखवावी. तथापि निजामानें हे करार अंमलांत आणण्याची टाळाटाळ चालविली. इकडे बाजीरावानें या एक दोन वर्षांत बुंदेलखंडांतील सर्व रजपूत राजांशीं तह व ठराव करून आपला अंमल मजबूद केला; त्या कामीं गोविंदपंत बुंदेल्याची त्यास चांगली मदत झाली. हळूहळू निजामास जेरीस आणून पूर्वीचे करार पुरे करून घेण्याचा बाजीरावाचा उद्योग चालू होता.

स. १७३९ त चिमाजीआपा वसई काबीज करून व कोंकणांतील प्रदेशाची व्यवस्था लावून ता. ३ सेप्टेंबर रोजीं पुण्यास आला, त्याचे अगोदर २९ जुलैस बाजीराव खानदेशांतून पुण्यास आला होता. नानासाहेब शाहूचे स्वारींत मिरजेस होता, तो नोव्हेंबर ४ तारखेस पुण्यास आला. त्यानंतर मस्तानीचें प्रकरण विकोपास गेलें. आपणास कबूल केलेली जहागीर नासीरजंग देत नाहीं हें आपसांतील अंतीं ठरल्यावर बाजीरावानें ता.१२डिसेंबर रोजीं त्याजवर मोर्चा फिरविला. थोड्या दिवसांनीं चिमाजीआपाही त्यास अहमदनगरनजीक येऊन मिळाला. नासिरजंगानें चाळीस हजार फौजेनिशीं त्यांजवर औरंगाबादेहून चाल केली. उभय फौजांनीं गोदावरी तीरीं दोन महिने खूब रेंटारेटी केली. मराठ्यांनीं मोगलांस थेट औरंगाबादेपर्यंत मागें फिरविलें. तेव्हां नासिरजंगानें जेरीस येऊन, हांडे व खरगोण हे प्रांत पेशव्यास देऊन मुंगीपैठणास २७ फे० १७४० रोजीं तह केला; आणि ३ मार्च रोजीं त्यानें बाजीरावाची भेट वरखेडें मुक्कामीं घेतली. तेथून ७ मार्च रोजीं बाजीराव उत्तरेस गेला आणि चिमाजी १२ मार्च रोजीं औरंगाबाद येथें नासिरजंगास भेटून पुण्यास आला. निजामुल्मुल्क दिल्लीस आहे ही संधि साधून, बाजीरावानें एकाएकीं नासिरजंगास वेढलें हें ग्रँट डफचें

१ रा. श्री. [illegible] आठल्ये यांचें २८-८-१९०९ च्या केसरींतील विवेचन पाहावें.

विवान बरोबर नाहीं. बिघाडाचें कारण, वचन दिलेली जहागीर दिली नाहीं, हें होय. पूर्वीचा तह कायम करून घेण्याकरितांच बाजीराव निघून उत्तरेकडे गेला; आणि चिमाजी आपा पुण्यास येऊन मानाजी व संभाजी आंग्र्यांचे तंटे तोडण्याकरितां नानासाहेबास घेऊन कुलाब्यास गेला. बाजीराव आपल्या नवीन जहागिरींत खरगोण जिल्ह्यांत नर्मदेच्या कांठीं रावेर[1] येथें असतां थोडे दिवस आजारी पडून एकाएकीं ता. २८ एप्रिल १७४० रोजीं मरण पावला. त्या वेळीं त्याचा धाकटा मुलगा जनार्दनपंत व बायको काशीबाई त्याजवळ होती. मृत्यूची बातमी नानासाहेबास कुलाब्यास समजली. तेथेंच उत्तरक्रिया आटपून तो ता. २५ मे. स. १७४० रोजीं चिमाजीआपासह पुण्यास दाखल झाला.

# प्रकरण चौदावें.

## बाजीरावाची योग्यता.

१. बाजीराव व चिमाजी, कौटुंबिक. २. मस्तानीचा वृत्तान्त व संतति.
३. शनिवारवाडा, पुणें. ४. उदेपुरच्या राण्याचीं संस्कृत पत्रें.
५. बाजीरावाची योग्यता:— (१) कर्तबगारीचा अंदाज.
(२) शाहू, बाजीराव व निजाम. (३) कागदपत्रांचा अंदाज.
(४) राज्यकारभाराची अव्यवस्था. (५) मराठशाहीच्या वृद्धींतील दौर्बल्य बीज.
६. बाजीरावाच्या वेळचीं कित्येक घराणीं.

**१. बाजीराव व चिमाजी, कौटुंबिक.**—बाजीरावाचा जन्म स.१६९८ सालचा असून मृत्यु वैशाख शु.१३, १२ सफर, ता.२८-४-१७४० रोजीं झाला. बेचाळिसचे वयांत मृत्यु म्हणजे तारुण्यांतच समजला पाहिजे. त्याची स्त्री काशीबाई इला बाळाजी ऊर्फ नानासाहेब, रामचंद्र, रघुनाथ व जनार्दन असे चार मुलगे झाल्याचा उल्लेख आहे. नानासाहेबाचा जन्म मार्गशीर्ष वद्य त्रयोदशीसह चतुर्दशी, शके १६४३, बुधवार ता. ८ डिसेंबर १७२१ रोजीं नाणेमावळांत मुक्काम सातें येथें झाला बाजीरावास आणखी कांहीं मुलें झालीं असावीं. सर्व मुलांपैकीं

[1] खांडव्याचे उत्तरेस व इंदूरचे दक्षिणेस सनावाड स्टेशनाजवळून.इ.वृ. १८३८ पृ.२०.

नानासाहेब व रघुनाथराव हे दोघेच पुढें प्रसिद्धीस आले. रघुनाथरावाचा जन्म माहुलीस शके १६४६ आनंद संवत्सर, श्रावण शुद्ध त्रयोदशी, ता १ ऑगस्ट १७३४ रोजीं झाला. त्याची मुंज माघ शुद्ध द्वितीया, शके १६६१, जानेवारी १९ स. १७४० रोजीं नानासाहेबानें लावली; आणि लगेच सहा दिवसांनीं सदाशिवरावाचें लग्न उमाबाईशीं ता. २५ जानेवारी १७४० रोजीं झालें. बाजीराव स्वारींत असल्यामुळें या समारंभास हजर नव्हता. चिमाजी आपाचें लग्न रखमाबाई त्रिंबकराव पेठ्याची बहीण इच्याशीं स. १७१६त झालें (ब्र. १९,११४), तिच्या पोटीं सदाशिवरावाचा जन्म शके १६५२च्या मोहरम अखेरीस ३.८.१७३०रोजीं पुण्यास झाला. जन्म झाल्यावर चिमाजीची बायको रखमाबाई ता ३१-८-१७३० रोजीं वारली, आणि चिमाजीनें दुसरें लग्न ९ डिसेंबर १७३१ रोजीं पुण्यास केलें. या दुसऱ्या बायकोचें नांव अन्नपूर्णाबाई. मस्तानीपासून बाजीरावास संतति झाली तिचा उल्लेख स्वतंत्र आहे. नानासाहेबाचें लग्न स. १७३० त भिकाजी नाईक रास्ते याची कन्या गोपिकाबाई इच्याशीं झालें. तेव्हां त्याच्या वयास नुकतीं आठ वर्षे पुरीं झालीं होतीं. ( खं. २ पृ ४६ ).

चिमाजी आपास अन्नपूर्णाबाईपासून बयाबाई नांवाची मुलगी झाली होती. ती एक महिन्याची असतांच आईबाप वारले सदाशिवरावाची मुंज २० मार्च १७३६ रोजीं झाली. वसईच्या स्वारीहून आल्यावर चिमाजी आप्पा बहुतेक आजारीच झाला. ' अलीकडे खोकल्यानें हैराण केलें. शरीरास फारच पीडा होत आहे. अद्यापही उतार नाहीं, यामुळें पत्र लिहिण्यास चार दिवस अंतर पडलें.स्वामींच्या आशीर्वादें शरीर आरोग्य होईल,' असें १० सप्टेंबर १७३९च्या पत्रांत चिमाजी ब्रह्मेंद्रस्वामींस लिहितो. (ब्र. ले. १३९). स. १७४० च्या ऑक्टोबरांत त्याची प्रकृति फारच बिघडली, म्हणून तो स्वारींतून पुण्यास परत आला. परंतु दिवसेंदिवस त्याचा वाखा जास्त होऊन १७ डिसेंबर १७४० रोजीं तो पुण्यास मरण पावला, आणि अन्नपूर्णाबाई सती गेली. त्याची उत्तरक्रिया व बाईचें सहगमन यांचा खर्च फक्त रु ११७१ झाल्याचा उल्लेख आहे. बयाबाईचें लग्न गंगाधरनाईक ओंकार याजबरोबर ता. १४ एप्रिल १७४५ रोजीं झालें. त्यावेळीं तिचें वय ८॥ वर्षांचें होतें. ती १८ एप्रिल १७९९रोजीं वारली. चिमाजीचें शरीर आजन्म कष्ट सोसून झिजलेलें होतें, आणि त्याचा आजार बहुधा

क्षयाचाच असावा. पेशव्यांच्या घरांतील पुरुषांचें अल्पायुष्य पाहतां त्या कुटुंबांत क्षयाची व्यथा असावी असा बळकट संभव वाटतो. ( ना. रे. १-१३६).

बाजीरावाच्या कीर्तीमुळें चिमाजी आप्पाचें नांव पुष्कळसें लोपून गेलें आहे. योग्यतेच्या मानानें पाहिलें तर चिमाजी बाजीरावाहून कमी नव्हता. उलट, कांहीं कांहीं बाबतींत तो बाजीरावाहून श्रेष्ठ होता असेंच वाटतें. बाजीरावाच्या दोषांवर पांघरूण घालून चिमाजीनें मोठ्या प्रेमानें व आस्थेनें त्याचा चांगला पाठपुरावा केला. आपलाच हेका चालविण्याचा प्रयत्न त्यानें कधीं केला नाहीं. त्याचा स्वभाव विचारी, मनमिळाऊ व धोरणी होता. दुसऱ्याचें मन न दुखावतां युक्तीनें व निश्चयानें काम करून घेण्याची हातोटी त्यास साधलेली होती. प्रत्यक्ष बाजीरावावरही त्याचा दाब असून या दाबामुळें राष्ट्राचें काम बरेंचसें चांगलें झालें. मस्तानीच्या वगैरे बाबतींत चिमाजीच्या धाकामुळेंच बाजीराव बराचसा मर्यादेंत राहिला. शाहू व सरदारही बाजीरावाकडे एखाद्या बाबतीसंबंधानें परभारें बोलणें न करतां चिमाजीच्याच तंत्रानें कार्यभाग करून घेत. कुटुंबांतील व बाहेरच्या मंडळीचे बरे वाईट व्यवहार चिमाजीच परभारें उलगडीत असे; बाजीरावाच्या हातून त्यांचा निकाल झाला नसता. बाजीरावाचीं मुलें तर नेहमीं चिमाजीजवळच असत. नानासाहेबास लहानपणचें शिक्षण चिमाजीकडून मिळालें. बहुतेक स्वाऱ्यांत तो चिमाजीबरोबर हजर असे. अर्थात् राज्यकारभारांत पुढें दिसून आलेलें त्याचें धोरण त्यानें चिमाजीपासून उचललें असावें असें दिसतें. कुटुंबांतील लग्नकार्यें, घरांतील लढे, आप्तसोयऱ्यांचा परामर्ष, तीर्थयात्रा, दानधर्म इत्यादि गृहकार्याचे प्रकार बहुधा चिमाजी उलगडीत असे. शाहू महाराजाचें मन तर या दोघांनीं व विशेषतः नानासाहेबानें अगदीं आपल्या अंकित करून घेतलें होतें. रघुनाथरावाची मुंज व सदाशिवरावाचें लग्न, हीं कार्यें पुण्यास झालीं, तेव्हां बाजीराव स्वारींत असून शाहू छत्रपति या प्रसंगासाठीं मुद्दाम साताऱ्याहून पुण्यास आला होता, यावरून चिमाजी व नानासाहेब यांजवर त्याचा केवढा लोभ होता हें दिसून येतें. बाजीरावाशीं सरदारांचे खटके उडत, त्यांची निरवानिरव चिमाजीकडून होत असे. बाजीराव आपल्या पराक्रमाच्या घमेंडींत अनेक प्रकरणें उपस्थित करी, त्यांपैकीं कित्येकांची तड चिमाजीनें लाविलेली आहे. चिमाजीच्या शौर्याची कसोटी वसईच्या युद्धांतलागलीच आहे. हबशा-

वरील मोहीम बाजीरावानें अर्धवट टाकली, ती शेवटीं चिमाजीनें हातीं घेऊन व सीदी सातास ठार मारून यशस्वी केली. सन १७३७ त फिरंग्यांवरील मोहीम अशीच अर्धवट राहिली होती, तिची तड चिमाजीनें सन १७३९ त पोंचविली. बाजीराव अकालीं मृत्यु पावला हें तर खरेंच. चिमाजी त्याजपेक्षां पांच सात वर्षांनीं लहान होता, तेव्हां तो तर अगदीं अल्पायुषीच वारला. तो ज्यास्त जगता तर त्याचें शौर्य, मुत्सदी धोरण व अनुभव यांचा उपयोग नानासाहेबास मिळून तेणेंकरून मराठशाहीचा पुढील कारभार जास्त व्यवस्थित व बळकट झाला असता. बाजीराव-चिमाजीसारखे पुरुष अकालीं मृत्यु पावावेत, हें मराठशाहीचें मोठेंच दुर्दैव होय. दुहीमुळें जितकें मराठशाहीचें नुकसान झालें, तितकेंच बहुधा बाजीराव, चिमाजी, नानासाहेब, विश्वासराव, माधवराव आणि सदाशिवराव अशा पराक्रमी पुरुषांच्या अकालीं मृत्यूनें झालेलें आहे. सदाशिवरावाच्या अंगीं बापाची तडफ चांगलीच उतरली होती.

बाजीरावाची स्त्री काशीबाई ही पतिनिष्ठ, गरीब व शांत स्वभावाची दिसते. सन १७४२ त रामेश्वरची व सन १७४६त काशीची यात्रा केल्यावर ती ता. २७–११–१७५८ रोजीं वारली. तिला घरांत ताई म्हणत. तिची सासू राधाबाई फार शहाणी व प्रसंग पडल्यास राज्यकारस्थानेंही तडीस नेण्यांत कुशल होती. तशा प्रकारची कर्तबगारी काशीबाईंत दिसत नाहीं. बाजीरावावर तिचें वजन बेताचेंच होतें. कदाचित् अशा सहनशील स्वभावामुळेंच मस्तानीपुढें नवऱ्याशीं तिचा निभाव लागला. राधाबाई व पुढें गोपिकाबाई या विशेष जाज्वल्य दिसतात. ' श्रीमंत विषयलंपट झाले, यामुळें चिमाजीआपाशीं अंतर पडून निघून नर्मदा तीरास गेले; महादाजी अंबाजी व नानासा. राजश्रींजवळ गेले.' या उल्लेखावरून बाजीरावाच्या कौटुंबिक स्थितीवर कांहीं प्रकाश पडतो. ( का. सं. श. पृ. ७ ).

बाजीरावाचा स्वभाव कसा होता हें समजण्यास प्रत्यक्ष पुरावा नाहीं. ' बाजीरावसाहेब बहुत उद्दाम प्रकृतीचे, शिपाइगिरींत अवघा वेळ मग्न, राज्यभार चालवावयास सबुरी असावी तो भाव नव्हता,' असा एक उल्लेख पूर्वी दिला आहे. बाळाजी विश्वनाथ आपल्या दोघां मुलास स्वारी शिकारींत आपल्याबरोबर हजर ठेवीत असे. तो प्रघात बाजीरावाचा नव्हता. नानासाहेब बापाबरोबर स्वारींत

गेल्याचा उल्लेख नाहीं. नानासाहेब बहुतेक चिमाजीआप्पाबरोबर असे. जें शहाणपण त्याच्या अंगांत आलें तें बहुधा चिमाजीआप्पा, पुरंदरे व शाहूच्या दरबारची मंडळी यांच्या परिचयानें आलें, बापाकडून सहसा आलें नाहीं. नानासाहेब दहा बारा वर्षांचा झाला, तेव्हां बाजीरावाचें मस्तानीशीं सहचारित्व सुरू झालें. अर्थात् त्यापुढें बाजीरावाचा कुटुंबांत संबंध कामापुरता राहून, घरांत व मुलां-बाळांत त्याचें संघटन फारसें राहिलें नसावें. शेवटीं शेवटीं तर बाजीरावाचें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष होऊन मस्तानीच्या सहवासांत त्याचा पुष्कळ काळ जाऊं लागल्यामुळें, चिमाजीआप्पा, नानासाहेब व कुटुंबांतील मंडळी यांस चिंता उत्पन्न होऊन, त्यांनीं मस्तानीच्या बंदोबस्ताचा विचार चालविला. त्यामुळें बाजी-रावाचें कुटुंबांत रहस्य राहिलें नव्हतें. बापलेकांचें तर पटतच नसे. एकंदरींत बाजीरावाचा स्वभाव मुळांत गोड व मनमिळाऊ नव्हता, आणि त्यांत शिपाई-बाण्याची उद्दाम वृत्ति होती असें अनुमान होतें. बाजीरावाचीं पत्रें वाचून हें अनु-मान दृढ होतें. त्याचीं पत्रें गोड किंवा दुसऱ्यावर छाप बसविणारीं नाहींत. जीं आहेत तीं बहुधा औपचारिक व नीरस आहेत. राष्ट्रनेतृत्वाला मधुर स्वभावाची जोड अवश्य पाहिजे. बाजीराव सुस्वरूप होता, आणि त्यासंबंधाच्या आख्या-यिका प्रचलित आहेत. बहुतेक सर्व पेशवे गोरे व देखणे होते. बाजीरावाची खात्रीलायक तसबीर भा. इ. सं. मंडळानें छापली आहे.

**९. मस्तानीचा वृत्तांत व संतति.**—मस्तानी ही बाजीरावाची रक्षा असून तिचा वंश बांदा संस्थानांत राज्य करी. हल्लीं त्यांचे वंशज इंदुरास राह-तात. या बाईचें चरित्र बरेंच चमत्कारिक असून तिच्या नादानें बाजीराव राज्यकारभाराकडे दुर्लक्ष करूं लागला होता. ही मस्तानी खुबसुरत असून बाजी-रावास केव्हां कशी प्राप्त झाली तें समजत नाहीं. बुंदेलखंडावर बाजीरावानें स्वारी केली तेव्हां ती त्याला राजा छत्रसाल अगर त्याचा मुलगा यांजकडून प्राप्त झाली अशी एक हकीकत आहे ती प्रथम निजामाजवळ असून त्याजकडून ती बाजीरावास मिळाली अशी दुसरी हकीकत आहे. तिसरी हकीकत पेशव्यांचे बखरींत अशी आहे कीं, निजामावर सुजायतखान नांवाचा सरदार दिल्लीहून चालून आला, त्या वेळीं चिमाजीआपानें निजामाच्या विनंतिवरून सुजायतखाना-वर स्वारी करून त्यास ठार मारिलें, तेव्हां त्याजवळ मस्तानीह्मणूना रक्षा होती,

ती प्राणत्याग करूं लागली. तिला चिमाजीआप्पानें बाजीरावाकरितां आपणाकडे घेतलें आणि पुढें बाजीरावाचे हवालीं केलें. ( वर पृ. २७४ पहा ).

यांपैकीं छत्रसालाचे मार्फत ती बाजीरावास प्राप्त झाली हा पहिलाच प्रकार ज्यास्त विश्वसनीय दिसतो कारण तिच्या संततीला राज्याचा हिस्सा देण्याचें वचन बाजीरावानें दिलेलें असून समशेरबहादराचे वंशास पुढें बुंदेलखंडांत कमावलेली बांद्याची जहागीर देण्यांत आली. मस्तानी स. १७३३ च्या सुमारास बाजीरावाकडे आली असावी. बुंदेलखंडचा राजा छत्रसाल याची एक मुसलमान रक्षा होती, तिची मुलगी मस्तानी बाजीरावानें बुंदेलखंड जिंकल्यानंतर त्यास प्राप्त झाली मग ती छत्रसालानें नजर केलेली असो, अगर आपखुषीनें आलेली असो. तिनें आपल्या लावण्यानें बाजीरावाचें चित्त आकर्षून घेतलें. शनिवारच्या वाड्यांत तिच्याकरितां बाजीरावानें स्वतंत्र जागा बांधिली, तिचें नांव मस्तानी-महाल आणि त्या बाजूच्या दरवाजास ' मस्तानी दरवाजा ' असें नांव होतें. ती नृत्य व संगीत यांत कुशल होती. बाजीराव तिला बहुधा आपल्याबरोबर स्वारींत नेत असे. सातार्‍यास तो शाहू छत्रपतीच्या भेटीस गेला असतां एकदां मस्तानीस त्यानें आपल्या बरोबर घेतलें. शाहूनें बाजीरावाची याजबद्दल पुष्कळ निर्भर्त्सना केली. सातार्‍यास जोशी व अनगळ पेशव्यांचे सावकार होते, त्यांनीही बाजीरावाची पुष्कळ कानउघाडणी केली. पुढें पुण्यास आल्यावर बाजीरावाचा हा नाद वाढतच गेला. राधाबाई, चिमाजी आपा, नानासाहेब इत्यादि मंडळींस हा प्रकार पाहून बाजीरावाचा चीड आली, आणि हें त्याचें वेड कसें सोडवावें या संबंधानें त्यांच्या मसलती सन १७३९ त जोरानें चालू होत्या. बाजीरावास जास्त जोरानें सांगितल्यास तो कदाचित् वैताग करील, जिवास वगैरे अपाय करील, अशीही या जवळच्या मंडळींस भीति पडली होती. स. १७३९ च्या नोव्हेंबरच्या सुमारास चिमाजी आपा, पुरंदरे वगैरे वजनदार लोकांनीं बाजी-रावाचा चांगला निषेध केला. त्यावरून रुसून बाजीराव देवदर्शनाकरितां म्हणून करकुंभ्यास जाऊन तेथून पाटसास जाऊन राहिला. इकडे चिमाजीआपानें मस्तानीला वाड्यांतील एका खोलींत अडकवून बाहेर चौकी पहारा बसविला. तेथून युक्तीनें आपली सुटका करून ती २४ नोव्हेंबर रोजीं पळून पाटसास बाजी-रावाकडे गेली. मागोमाग पुरंदरे, मोरशेट काका वगैरे मंडळी पाटसास गेली,

आणि त्यांनी बाजीरावाकडून तिला पुण्यास परत पाठविलें. त्यानंतर बाजीराव नासिरजंगावरील मोहिमेंत असतां, चिमाजीचे सांगीवरून स. १७४०च्या ता. २६ जानेवारीस पर्वतीच्या बागेंत नानासाहेबानें मस्तानीस युक्तीनें आणून कैद केलें.

इकडे बाजीराव निजामावर चालून गेला. 'मस्तानीच्या पार्यी नासिरजंगाच्या मनसुबा बुडाला, राजाची मर्जी गेली,' असें नानासाहेब लिहितो. मस्तानीचें पुढें काय झालें हें समजत नाहीं. स. १७४० च्या एप्रिलांत बाजीराव मरण पावला, तेव्हां मस्तानी सती गेली असें सांगतात. पुढें तिचें नांव आढळत नाहीं. पाबळ, केंदुर ही गांवें मस्तानीला इनाम दिलेलीं होतीं. शिरूरनजीक पाबळ येथें मस्तानीची कबर गांवानजीकच आहे.[1] (वि. ज्ञा. वि. एका कामगाराच्या रोजनिशींतील उतारा, मे १९१५.)

रा. ब. पारसनीस व किंकेड यांनीं हिंदुस्थान रिव्ह्यूच्या ऑगस्ट १९०९ च्या अंकांत बाजीरावावर दारूबाजीचा चुकीचा आरोप केला आहे. मस्तानी कदाचित मद्यप्राशन करीत असावी; परंतु प्रसिद्ध असलेल्या कागदांवरून बाजीरावावर हा दोषारोप करितां येत नाहीं. या प्रश्नाचें यथायोग्य खंडन रा. आठल्ये व रा. राजवाडे यांनीं केलेलें असल्यामुळें, त्याची येथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं. बाजीराव विषयलंपट होता, परंतु मद्यपी नव्हता. तसेंच मस्तानीनानासाहेबांचा निंद्य सहवास ध्वनित केलेला आहे तोही अवास्तव होय.[2]

बाजीरावापासून मस्तानीस मुलगा झाला त्याचें नांव समशेरबहादूर. हा पानपतावर पडला, त्या वेळीं त्याचें वय २७ वर्षांचें होतें. त्यावरून त्याचा जन्म १७३४ त झाला असावा. यावरून १७३३ चे सुमारास मस्तानी बाजीरावाकडे आली असें ठरतें. समशेर बहादूराची मुंज करून त्यास ब्राह्मण करावें अशी बाजीरावाची इच्छा असून तो प्रकार ब्राह्मणांनीं मानला नाहीं अशी आख्यायिका आहे. त्याचें लग्न १८ ऑक्टोबर स. १७५३ रोजीं झालें. निंबगिरीकराची मेहरबाई बायको केली. तेव्हां त्याचें वय १९ वर्षांचें होतें. परंतु इतक्या वयापर्यंत लग्न झालें नसेल हें संभवनीय नसल्यामुळें त्याचा जन्म सन चुकलेला असेल किंवा वरील लग्न पहिलें नसेल. समशेरबहादूर हा पुढें पेश-

१ ऐ. चर्चा ३, का. सं. शकावली पृ. ६; पारसनीसकृत बुंदेलखंड प्रकरण पृ. ८३-८४; राजवाडे खं. ६ पुरंदरे यादी पृ० ३०,व९६;ऐ. टि.२०७ व पे. ब.
२ केसरी, मार्च-सप्टेंबर १९०९.

त्यांचे फौजेंत खासा सरदार असे; आणि शौर्याबद्दल त्याचा मोठा लौकिक होता. रामबाई व फुलबाई या दोन रक्षा त्याच्या होत्या. मेहरबाईच्या पोटीं त्यास एक पुत्र होता, त्याचें गांव अलीबहादर, यासच कृष्णसिंग असें दुसरें नांव होतें. त्याचा जन्म १७५८ त झाला. तोही बापासारखाच पराक्रमी होता. महादजी शिंदे उत्तर हिंदुस्थानांत प्रबल झाला, तेव्हां त्यास शह देण्याकरितां नाना फडणिसानें अलीबहादरास फौज देऊन तिकडे पाठविलें. त्यानें बुंदेलखंडांत पराक्रम करुन पाऊण कोटीचा मुलूख काबीज केला. त्या वेळचीं त्याचीं पत्रें स. १७८८ पासून ९० चीं इतिहाससंग्रहांत छापिलीं आहेत. नाना फडणिसाच्या परवानगीनें त्यानें सागरच्या ईशान्येस बांदा येथें आपलें

बाजीराव मस्तानी[१]
|
समशेर बहादर १७३४–६१.
|
अलीबहादर १७५८–१८०२.
|
समशेरबहादर १७८४–१८२३ — मुल्फिकारअली मृ १८२३
|
अलीबहादर मृ. १८७३.

वास्तव्य केलें; आणि पुण्याहून लोक नेऊन तेथें अठरा कारखाने स्थापिले. गोरे नांवाचा एक इसम त्यानें तेथें आपल्या दिवाणगिरीवर नेला त्या घराण्याचे वंशज हल्ली बांदे येथें आहेत अशा रीतीनें बांद्याची जहागीर नाना फडणिसाचे वेळेस स. १७८८ त उत्पन्न झाली. कालिंजर किल्ला घेत असतां अलीबहादर स. १८०२ सालीं मारला गेला. त्याची स्त्री बादशहाबेगम लहानपणींच वारली. दुलजबेगम व बक्षीबेगम अशा आणखी दोन बायका त्यास असून, दुलजबेगमचा मुलगा समशेरबहादर व बक्षीबेगमचा झुल्फिकारअली. रहिमत बिबी नांवाची अलीबहादरची रक्षा होती. अलीबहादरचा मुलगा समशेरबहादर दुसरा याजला इंग्रज सरकारानें दरसाल चार लाखांचा तनखा देऊन बांद्याचें राज्य सन १८०४ त खालसा केलें. समशेर बहादर सन १८२३ त मरण पावला. पुढें त्याचा भाऊ झुल्फिकारअली बांद्याचा नबाब झाला, तोही त्याच सालीं वारला. त्याचा मुलगा अलीबहादर नबाबगिरीवर असतां सत्तावनसालचें बंड झालें, त्या गडबडींत बांद्याचा उत्कृष्ट

१ Pogson's Bundellas; भा. व. २ मस्तानीचा वंश.

शृंगारलेला वाडा व जडजवाहीर जळून गेलें. त्यानंतर इंग्रजांनीं बांदा शहर आपल्या कबजांत घेऊन नबाबास ३६००० नेमणूक देऊन आपल्या नजरेखालीं इंदुरास ठेविलें. तेथें त्याचे वंशज आहेत. बांदा येथें नवाबाची मशीद आहे, ती या नबाबांच्या वैभवाची साक्ष देते. अलीबहादूर स. १८७३ च्या ऑगस्टांत मरण पावला, तेव्हां त्याचे कुटुंबास बाराशें रुपयांची नेमणूक देण्यांत आली.

३. **शनिवारवाडा, पुणें.**—सर्व सरदार आपापल्या वास्तव्याकरितां स्वतंत्र जागा व वाडे करूं लागले, त्याप्रमाणें बाजीरावानें पुणें येथें राहण्याचें ठरवून तेथें शके १६५१ माघ शु. ३ शनिवार ता. १० जानेवारी १७३० रोजीं वाडा बांधण्यास सुरुवात केली. स. १७३१ त वाड्याचें काम पुरें होऊन पेशवे त्यांत राहवयास गेले. वाड्यास खर्च रु. १६११० रुपये लागला होता. ' शके १६४३ त बापूजी श्रीपत, बाजीरावाचे तर्फेनें पुणें प्रांतास सुभेदार असतां, बाजीराव पुण्यास मोरोविश्वनाथ व गणेश नारायण धडफळे यांचे वाड्यांत येऊन राहिला. दोन तीन वर्षे येत जात होते. नंतर पुण्यांत वाडा बांधावयाची योजना केली. शके १६५० त पुरातन नदीकिनारा, कोटकिल्ले, हिसार मोगलाई ठाणें होतें, तो कोट बाजीरावांनीं पाडून मैदान केलें, आणि मुत्सद्दी वगैरे लोकांस घरें बांधावयास जागा दिली; आणि पूर्वेचे बाजूस दोन गांव होते ते मोडून कसबा केला. हा कसबा शाहूनें पेशव्यांस इनाम दिला. शके १६५१ त मावळवेसीजवळ जागा घेऊन वाडा बांधावयास आरंभ केला. नवबुरजी कुसूं वाड्यास घालून आंत इमारत केली उत्तरेस थोर करीत होते त्यास छत्रपतींनीं मनाई केली सबब दरवाजाचें खिंडार राहिलें. पुणें आहे तें शहर करावें ह्मणोन आज्ञा केली.' वाड्यासभोंवार कोट बांधण्याची मनाई केली त्याचा उल्लेख शकावलींत आहे. ' चिरेबंदी कोट बांधावयास प्रारंभ केला. महाराजांनीं पत्रें व हुजरे पाठवून किल्ला गढी बांधण्याची मनाई केली. त्यावरून फिरून परवानगी घेऊन राहिलें काम तें वीटबंदी केलें.' स. १७३६ त नवीन दिवाणखाना बांधून त्यांत मुहूर्तानें राहवयास गेले. या वाड्यांत जयपुराहून कारागीर आणवून भिंतींवर सुंदर चित्रें बाजीरावानें काढविलीं आणि मागाहून मस्तानीमहाल ह्मणून स्वतंत्र जागा बांधिली. हा पेशव्यांचा पहिला जुना वाडा होय. त्यांत प्रथम दोन मजले व दोन चौक होते. पुढें नानासाहेब पेशव्यानें त्यांत अनेक फेरफार करून तो

विस्तीर्ण केला. त्याचे चौक चार व कांहीं भागाचे मजले सहा केले. चौक फरसबंदी असून मध्यें कारंजीं होतीं. शाहूनें कोट बांधण्यास प्रतिबंध केला, तो कोटही नानासाहेबानें १७५५ त मजबूद दगडी बांधिला तो अद्यापि आहे. या कोटास तीन मोठे दरवाजे व दोन लहान दिंड्या असून, मुख्य दरवाजा उत्तरेकडचा त्यास दिल्ली दरवाजा असें नांव होतें. बहुधा महाराष्ट्रांतील सर्व मोठमोठ्या सरदारांचे वाडे उत्तराभिमुख असून तिकडील मुख्य दरवाजास हें नांव असे. यावरून मराठे सरदारांची दृष्टि दिल्लीकडे असून त्यावरून दिल्ली पादाक्रान्त करण्याची त्यांची भावना व्यक्त होते. शनिवारवाडा सागवानी लांकडाचा असून त्यांतील नक्षीचें काम प्रेक्षणीय होतें. सर्व चौकांस व दालनांस निरनिराळीं नांवें असून पेशव्यांच्या कचेरीची जागाही वाड्यांतच होती. बाजीरावाच्या वाड्याचें काम दोन वर्षांत पुरें होऊन ता. २२ जानेवारी स. १७३२ रोजीं त्याची वास्तुशांत झाली. शनिवारचे वाड्यास ता. २१ फेब्रुवारी १८२८ रोजीं आग लागून तो पंधरा दिवस जळत होता. इतिहाससंग्रहांत या वाड्याचें निरनिराळ्या इसमांनीं वर्णन दिलें आहे. पेशव्यांचा वाडा शिवछत्रपतीच्या कसब्यांतील वाड्याजवळच होता.

'येथील शनवारवाडा इंद्रप्रस्थ येथील पुराणप्रसिद्ध वाड्याचे बरहुकूम बांधला गेला असें ह्मणतां येईल. शनवारवाडा शके १७४९ गुरुवार फाल्गुन शु. ६ ता. २१-२-१८२८ रोजीं अग्निनारायणाचे स्वाधीन झाला. पेशवेसरकारच्या या वाड्याचे सभोंवार उत्तम बागशाही असून, वाड्यांत व वाड्याचे सभोंवार कारंजांतून पाणी खेळविलेलें होतें हें आतां दृष्टोत्पत्तीस येत आहे. या कारंज्यापैकीं कमलाकृतिकारंजें हिंदुस्थानांत सर्वांत मोठें असून या कल्पनेचा उगमहि आपल्याकडेसच झाला असल्याचें नुकतेंच जाहीर झालें आहे. यापुढें शनवारवाड्यांतील ही बाग पेशवा बाग या नावानें संबोधली जाऊन, दिल्लीदरवाज्यासमोरील चौक पेशवा चौक (Peshva Square) या नावानें ओळखला जावा, अशी कोणासहि इच्छा होईल, यांत शंका नाहीं. शनवारवाड्याखेरीज पेशव्यांचे तीन वाडे होते, ते ह्मणजे शुक्रवारवाडा, बुधवारवाडा व विश्रामबाग. हे तीनहि वाडे दुसरे बाजीराव साहेब यांच्या अमदानींत बांधले गेले. शुक्रवारवाडा इ. स. १८२० सालीं भस्मसात् झाला. बुधवारवाडा व विश्रामबागवाडा हे दोनहि ता. १३ मे

स. १८७९ रोजीं बुधवार वाड्यांतील सरकारी बुकडेपोमधील दोघां कारकुनांनीं जाळले. याच वेळीं कै. वासुदेव बळवंत फडके यांची धामधूम चालू असल्यामुळें हें कृत्यही त्यांचेंच असावें असा त्या वेळीं वृथा समज झाला होता.इ.स.१८७९च्या मे महिन्यामध्यें विश्रामबाग वाडा जळाल्यानंतर सरकारानें सार्वजनिक वर्गणीनें येथील म्युनिसिपालिटीच्या मदतीनें वाड्याचा पुढील जळालेला भाग दुरुस्त केला हल्लीं बाहेर दिसत असलेले सुरूचे खांब, सोनेरी मुलामा दिलेला कळस व बाहेरील एकंदर भाग ( Frontage ) हा सर्व अलीकडील म्हणजे वाडा दुरुस्त केल्यावेळचा भाग आहे. वाड्याचे आंतील चौकांत तुळशीवृंदावन वगैरे जुने अवशेष परवां परवांपर्यंत कायम होते. ते हायस्कूलचे माजी हेडमास्तर मि. डड्ले यांच्या कारकीर्दींत बुजविले, असें म्हणतात. विश्रामबागेच्या इमारतीस इ. स. १८०३ सालीं सुरुवात होऊन ती इ. स. १८०९ सालीं पुरी झाली.'[१]

पेशव्यांनीं पुण्यास आपली स्वतंत्र व्यवस्था केली हा प्रकार अप्रत्यक्ष रीतीनें राज्यास अपायकारक झाला. प्रधानांनीं नेहमीं राजाचे संनिध राजधानींत राह-वयाचें, तें सोडून इतर सरदरांप्रमाणें त्यांनीं स्वतंत्र व्यवस्था केल्याबरोबर मराठ-मंडळांतील फूट राजरोसपणें चालू झाली. शाहूलाही हा प्रकार आवडला नाहीं. राज्याचे व्यवहार उत्तरेकडे वाढल्यामुळें सातारा राजधानी कांहीं अंशीं गैरसोयीची झाली.परंतु असें होतें तर शाहूमहाराज सुद्धां सर्वच राजधानी पुण्यास आणली असती म्हणजे अनिष्ट परिणाम झाले नसते. याचा परिणाम शाहूमहाराज मरण पावतांच दृग्गोचर झाला. त्या वेळीं राज्यकारभार हळू हळू पुण्यास चालू झाला, आणि महाराज तेवढे सातान्यास बाहुल्यासारखे राहिले. अर्थात् पेशव्यांनीं राज्यापहार केला असा प्रवाद या कृतीनें बळकट होऊन पेशव्यांबद्दल मराठमंडळाचा आदर ओसरूं लागला. राज्यांत ज्याच्या अंगीं पराक्रम असेल तो बलवान होणार, हा सृष्टिनियमच असून पेशव्यांनीं राज्याची जोखीम अंगावर घेतली यांत कांहीं गैर होतें असें नाहीं. मात्र असें करितांना लोकांच्या मनांतील भावनांना होईल तितकें करून त्यांनीं दुखवावयाचें नव्हतें.

---

१ ध. या. ले.,८७, खं. २ पृ. ६६; शा. च. पृ. ४३; वि. ज्ञा. वि. सेप्ट १९२०; ऐ. स्फु. ले. ३ पृ. ५३; पे. ब.; इ. वृ. १८३५ पृ. ४०२; केसरी २०-४-१९२०; खं. ६.७७.

सारांश, या अनिष्ट समजाची उत्पत्ति कदाचित् पुण्यास वाडा बांधल्यापासून झाली असेल. बाकी प्रतिनिधीनीं कऱ्हाडास, सचिवांनीं भोरास, सेनापतींनीं तळेगांवास अशा रीतीनें अनेक सरदार आपआपलीं स्वतंत्र ठिकाणें बांधूं लागले होते, तोच कित्ता पेशव्यांनींही उचलिला. पुणें सासवडकडील प्रांतावर बाजीरावाचें अत्यंत प्रेम असून लोकांस अभयपत्रें वगैरे देऊन ते रयतेची जोपासना चांगले प्रकारें करीत असत.

**४. उदेपुरच्या राण्याकडून आलेलीं संस्कृत पत्रें.**—मराठ्यांचा संचार उत्तर हिंदुस्थानांत झाला, तेव्हां तिकडील लोकांशीं महाराष्ट्रीयांचें दळणवळण सुरू झालें. या दळवळणाची भाषा हिंदी व क्वचित् संस्कृतही होती. पुढें पुढें मात्र जसजसा मराठ्यांचा अंमल बाहेर भक्कम होत गेला, तसतशीं तिकडे त्यांनीं आपली मराठी भाषा व्यवहारांत उपयोगाची ठरविली. उदेपुरचा महाराणा संग्रामसिंह याचीं आलेलीं संस्कृत पत्रें कौतुकास्पद समजून मासल्यासाठीं खालीं देतों. त्यांवरून बाजीरावप्रतिनिधिसंबंधानें रजपुतांचा आदर मोठा होता असें दिसून येतें.

( १ ) श्रीएकलिंगः ( ता. २३·३·१७३० इ. स. )

स्वस्तिश्री महाराजाधिराज महाराणा श्री संग्रामसिंहनृपवर्यादेशात् स्नेहसंदोहसद्मसु स्वामिकार्यैकनिष्ठान्तःकारणप्रवृत्तिषु मुख्यामात्य राजश्री बाजीरावजीबल्लाळेषु सुप्रसादो लिख्यते । यथा श्रीमत्कृपया शमिह, भवदीयमनिशमाविच्छिन्नमनिरतसाधारणमेधमानमीहामहे । श्रीमताऽत्रत्य भाविकोषिणोह्यकृत्रिमतया यादृगन्योन्यं प्रेम वर्तते तदधिकवृद्धिमुपयातु । अपरंच । चतुःशास्त्रिणो राजद्वारीयमुख्यपंडिता वीरेश्वरभट्टा विवाहार्थं दक्षिणप्रान्ते यास्यन्ति । भवन्मीलनानन्तरमेषां पथि निष्प्रत्यूहं गमनागमने, भवन्तस्तथा विधास्यन्ति । श्रीमतः किमधिकं सुवित्सु । संवत्सरे रसवसुमुनीन्दुसंख्ये मधुमेचकपूर्णायां चन्द्रे प्रग रचितोऽयं वर्णचरः ॥

( पत्त्यावर )—मुख्यामात्य राजश्रीबाजीराववल्लाळेषु योग्यमदः पत्रम्

( २ ) श्रीएकलिंगः ( ता. २३·३·१७३०. )

स्वस्तिश्रीमन्महाराजाधिराजमहाराणासंग्रामसिंहनृपवर्यादेशात् स्नेहसंदोहसद्मसु स्वामिकार्यैकनिष्ठान्तःकरणप्रवृत्तिषु राजश्री श्रीपतरावप्रतिनिधिषु सुप्र-

सादो लिख्यते । यथा श्रीमत्कृपया शमिह, भवदीयं वरीवर्धतां प्रत्यनेहसं । भवन्तोऽस्मदीयहितेच्छवः सन्ति । यादृगन्योन्यं प्रणयोऽस्ति तदधिकतरः समुल्लसतु । अन्यच्च । चतुःशास्त्रिणो राजद्वारीयमुख्यपंडिता वीरेश्वरभट्टाः कार्यार्थमस्माभिः श्रीमत्पार्श्वे प्रेषिताः सन्ति । वचनरचनाभिरस्मद्हृद्गतं सर्वं वृत्तान्तं श्रीमद्भ्यो निवेदयिष्यन्ति । परंतु कर्कस्थे सत्येव गुरावेते दक्षिणप्रान्ते विवाहार्थं यास्यन्ति । तदर्थं यथा तेषां निर्विघ्नं गमनागमने भवस्तथा यत्ना विधेयाः । विवाहं विधाय पश्चाद् भूयोऽपि श्रीमत्पार्श्वे समागमनमेतेषां निश्चितमेव । तदासमाप्तेरस्मदुक्तकार्यस्य स्थित्वा श्रीमद्भिरतिप्रसन्नतया दत्तामनुज्ञामधिगम्यास्मन्निकट आयास्यन्ति । तेऽस्माभिः प्रतीत्यास्पदमिति मत्वा नियुक्ताः सन्ति । स गाभिः साभिर्वाङ्माधुर्यधाराभिः श्रीमन्त आनन्दयिष्यन्तीत्यलं सुज्ञेषु । पत्राणि भूयोभूयः प्रेष्याणि । संवत्सरे रसवसुमुनीन्दुसंख्ये मध्वमेचकपूर्णायां चन्द्रे प्रगे रचितो वर्णचरः ।

( पत्यावर ) राजश्री श्रीपतरावप्रतिनिधिषु योग्यमदः पत्रम् ।

श्री भास्करराय नांवाचा एक विद्वान संस्कृत पंडित बाजीरावाचे वेळेस महाराष्ट्रांत होऊन गेला. चंद्रसेन जाधवानें त्यास आपला गुरु केलें होतें. देशांतील विद्वान ब्राह्मण पुण्यास आणून त्यांची संभावना करण्याचा बाजीरावाचा प्रघात असून एका प्रसंगीं त्यानें भास्कररायास पुणें येथें मोहरांचा एक हंडा बक्षीस दिला, अशी आख्यायिका आहे. ( पं. सं. वृ. ले. १३ ).

५. **बाजीरावाची योग्यता, (१) कर्तबगारीचा अंदाज.**—बाजीरावाची कर्तबगारी ठरविण्यांत दोन मुद्दे उद्भवतात ते, हें कीं बाजीरावाचा स्वभाव उद्दाम व तुसड होता, मनमिळाऊ नव्हता, आणि ( २ ) बाजीराव केवळ योद्धा होता, मुत्सद्दी नव्हता. बाजीरावाच्या कर्तृत्वाचा विचार करितांना दृष्टीपुढें मुख्यतः त्याचा बाप बाळाजी व मुलगा नानासाहेब हे दोन पुरुष येतात. या तीन पुरुषांच्या उद्योगांत एक प्रकारचें सातत्य असून, शाहूच्या आगमनापासून पानपतापर्यंतचा सरासरीनें पन्नास वर्षांचा काळ परिस्थितीच्या मानानें मराठ्यांच्या इतिहासांत एका विशिष्ट प्रवाहाचा किंवा प्रगतीचा निदर्शक आहे. तेव्हां या तीन पुरुषांचाच विचार करितां, स्वभावाच्या संबंधानें बाळाजी विश्वनाथाची किंवा नानासाहेबाची अष्टपैलू मनमिळाऊ हातोटी बाजीरावास नव्हती, असें

म्हणणें भाग येतें. बाळाजी विश्वनाथानें अल्पारंभापासून उद्योग वाढवीत वाढवीत, एका चंद्रसेन जाधवाशिवाय इतर सर्व कर्त्या मंडळीस एका उद्योगांत गोंवून शाहूचा पक्ष जोरांत आणिला, आणि त्याच्याच विद्यमानें मराठशाहीचें पुढील धोरण ठरवून दिलें. हें धोरण कायमचें अमलांत आणून फौजेची, जहागिराची वगैरे व्यवस्था बांधून पुढील राज्यकारभाराचा पाया भक्कम करण्यास बाळाजी जगला नाहीं. तो जरी योद्धा नव्हता, तरी बऱ्याच योग्यतेचा मुत्सद्दी असून त्यानें जरुरीपुरते कर्तृत्ववान योद्धेही हाताशीं ठेविले.

पेशवा म्हणजे राजाचा व राज्याचा मुख्य प्रधान ही जाणीव नानासाहेबानें सर्वांस भासविली. परंतु ती हातोटी बाजीरावास साधली होती कीं नाहीं हा प्रश्न आहे. तो प्रधानपदावर आला त्या वेळीं अगदींच तरुण असल्यामुळें वयानें व अनुभवानें इतर मुत्सद्यांवर त्याचा पगडा एकदम न बसणें साहजिक होतें. परंतु उत्तरोत्तर त्याची छाप सर्वांवर बसली पाहिजे होती, ती बसली नाहीं. अखेरपर्यंत प्रतिनिधि, दाभाडे, रघूजी व फत्तेसिंग भोसले, आंग्रे, पवार इत्यादि अनेक प्रमुख सरदार बाजीरावाचे विरुद्ध वागत. प्रत्यक्ष शाहू त्याजविषयीं पुष्कळदां साशंक असे. शाहूपाशीं, त्याच्या राण्यांपाशीं व सरदारांपाशीं आपलें वजन कसेंबसें ठेवण्यासाठीं ब्रह्मेन्द्रस्वामीचा त्यानें उपयोग केला. अशा साधनांवर भिस्त ठेवून राजकारणें सिद्धीस जातील हा समज बाजीरावाच्या मुत्सद्देगिरीस कमीपणा आणितो. शिंदे व होळकर हे दोनच सरदार त्याचे आज्ञांकित होते, पण तेवढ्यांवरून बाजीराव सर्व सरदारांवर छाप बसविणारा होता असें सिद्ध होत नाहीं. ते दोघेही बाजीरावाचे लहानपणापासून सोबती होते. अशा जिवश्चकंठश्च सोबत्यांवर त्यानें भरंवसा ठेविला यांत आश्चर्य नाहीं. पण ते राज्याची कामगिरी करूं लागतांच, खासगी स्नेहसंबंध बाजूस ठेवून, राज्यकारभाराशीं या सरदारांचा संबंध कसा राहवयाचा हें आरंभापासूनच बाजीरावानें ठरवून, अंमलांत आणलें असतें तर ते पुढें डोईजड झाले नसते. या दोन सरदारांनीं मराठशाहीची सेवा चांगली बजाविली, हा प्रकार जरी खरा असला तरी ते आरंभापासून सर्वथैव मुकत्यारीनेंच वागत असल्यामुळें, त्यांचा डोईजडपणा पुढील राज्यकर्त्यांस जाचक झाला. नवीन सरदार उत्पन्न करितांना, राज्यांतील त्यांच्या कामाची व अधिकाराची मर्यादा ठरवून देणें हें महत्त्वाचें काम बाजीरावाकडून झालें नाहीं.

येथें जहागिरी किंवा सरंजामी पद्धतीचा संबंध येतो. नवीन स्वतंत्र जहागीरदार उत्पन्न करावयाचे नाहींत, उलट असलेले कमी करून स्वतंत्र सरकारी फौज ठेवावयाची अशी योजना बाजीरावानें झटून केलेली दिसत नाहीं. राज्यसत्तेचें मुख्य साधन जी फौज तिची व्यवस्था एकतंत्री नव्हती. बारभाईच्या कारभारानें कसा घोटाळा उडतो, याचा अनुभव अनेकवार बाजीरावास आला असतां, तो प्रकार सुधारण्याचा त्यानें प्रयत्न केल्याचें आढळत नाहीं. दक्षिणेकडील कर्नाटक वगैरे ठिकाणीं लक्ष घालावयाचें नाहीं असा निर्धार करून, केवळ उत्तरेकडे बाजीरावानें आपला उद्योग चालविला. यावरून सर्व राज्याच्या कारभारावर देखरेख ठेवणें हें पेशव्याचें काम त्यास साधलें नाहीं किंवा त्यानें केलें नाहीं, असें म्हणावें लागतें. पुढील कामांत मागील अनुभवाचा उपयोग करून दाखविणें हें मुत्सद्देगिरीचें लक्षण आहे. शिवाय राज्यकारभाराचें मुख्य साधन पैसा. त्याची पैदास सुरळित राज्यकाराभाराशिवाय होणें शक्य नाहीं. बाजीराव सदा कर्जात बुडालेला असे. ही गोष्ट त्याच्या मुत्सद्देगिरीस कमीपणा आणते.

गनिमी काव्याच्या युद्धपद्धतींत बाजीराव निष्णात होता, ही गोष्ट त्याच्या पराक्रमांवरून सिद्ध आहे. याच पद्धतीचा पुरस्कार विशेषतः पुढें मल्हारराव होळकर व रघुनाथराव यांनीं केला. बाजीरावास शिपाइगिरीची हौस होती आणि शिपाईगडी त्याजवर अनुरक्त असतः पण शिवाजी किंवा इतर थोर पुरुषांप्रमाणें घरच्या किंवा बाहेरच्या कारभारांत बाजीराव हा लोकांचीं मनें आकर्षण करून घेणारा नव्हता. या कमीपणाबद्दल बाजीरावाची जबाबदारी किती, शाहूची किती व परिस्थितीची किती, याचाही विचार झाला पाहिजे. परिस्थितीचा घोडा बनवून त्याजवर जो भरारी मारतो आणि बिकट प्रसंगांतून आपणास अनुकूल अशीं साधनें उत्पन्न करितो, तोच थोरपणास पोंचतो.

बाजीरावास राष्ट्रीय भावना होती, आणि मोगल बादशाहीच्या मुळाशीं आघात केल्यानें त्याच्या शाखा आपोआप पडतील, हा त्याचा अंदाज खोटा नव्हता. हाताखालच्या सरदारांस व त्याच्या ठिकठिकाणच्या वकिलांस ही भावना त्याजपासून मिळालेली दिसते. बाजीरावाची ही भावना दुसऱ्याही सरदारांच्या ठिकाणीं होती. या भावनेच्या जोरावर वीस वर्षेपर्यंत बाजीरावानें मराठी राज्याचा विस्तार किती केला, हें त्याच्या आरंभीं व अखेरीस मराठी राज्याची

मर्यादा कशी होती हें मनांत आणल्यानें कळून येतें. मराठी राज्याचा हा एवढा विस्तार हेंच बाजीरावाच्या कर्तबगारीचें निदर्शक होय. हा विस्तार केवळ युद्ध-कौशल्याचा निदर्शक आहे कीं त्यांत मुत्सद्देगिरी भरलेली आहे, याविषयीं वाद आहे. कै. रानडे यांनी शिवाजीच्या खालोखाल बाळाजी विश्वनाथाची योग्यता ठरविली आहे. त्यावरून बाजीरावास ते कमी समजतात असें दिसतें. बाजीरावानें राज्याचा उद्योग केला, त्यांत त्याचें युद्धनैपुण्य झळकतें, आणि युद्ध-नैपुण्य हें एक राज्योत्कर्षाचें अंग आहे.परंतु हाच बाजीरावाचा उद्योग शिवाजी-सारखा, सावधपणानें व क्रमाक्रमानें एकएका प्रकरणाची व्यवस्था ठरवून झाला असता, तर त्यांत राज्याचें हित झालें असतें. बाजीरावास आयुर्मर्यादा ज्यास्त असती तर त्यानें कदाचित् राज्याची व्यवस्था बांधिली असती. ज्या निजा-माची कायमची व्यवस्था बाजीरावाकडून वीस वर्षांत झाली नाहीं, तीच त्याच्या मृत्यूनंतर त्याच्या मुलानें हातीं घेऊन १७४१-४३ पावेतों लाविली.बाजीरावाच्या प्रचंड उद्योगाचा फायदा नानासाहेबास मिळाला. लढाईच्या धाडशी व द्रूड कामांत बाजीराव निमग्न असे लेखणीच्या जोराची त्यानें परवा केलेली दिसत नाहीं. एका विद्वान् गृहस्थांनीं हाच आशय खालील शद्बांनीं व्यक्त केला होता.

Bajirao yielded to the exigencies of the occasion and did not formulate or follow anything like a settled system or policy. Sivaji's caution gradually extending his base, seems lacking in Bajirao's mind. Time had come, after Shahu's accession, for the formulation of a policy of Government, which Balaji attempted but which he did not live to complete and consolidate. Bajirao tried to work out the situation as handed down by his father, often proceeding wildly and glorying in the show of temporary results. He seems to make a haste for the empire, trying to compress politics within impossible limits, without a solid base for the structure. It is

instructive to recall in this connection the slow but sure progress of the British enterprise in India, where the wild ambitions and temptations of indidual aggressors were openly restrained, soas ultimately to accomplish more than the wildest dreamers ever conceived.'

हा दोष एकट्या बाजीरावावर येतो असें नाहीं. मराठ्यांची मनोभावना नेहमींच स्वार्थाला चिकटून असणारी आहे. राज्याच्या एकंदर हितापेक्षां आपापला वैयक्तिक स्वार्थ ज्याला त्याला ज्यास्त वाटतो. क्लाइव्ह, हेस्टिंग्स वगैरेंनी गैरशिस्त प्रकार केले असतील. परंतु आपल्या राष्ट्राचें अहित त्यांनीं केलें नाहीं. अशाच स्थितींत शिवाजी व बाळाजीविश्वनाथ यांनीं आपपल्यापरी उद्योग केले, त्या मानानें बाजीरावाचा उद्योग कमी दिसतो, इतकाच मुद्दा आहे. दुसऱ्या एका गृहस्थांनीं या बाबतींत खालील अभिप्राय व्यक्त केला आहे.

'Bajirao had no low aims; but his foresight and statesmanship were limited, and he had no sound grasp of men and events. His name however was doubtless a terror to all parties. When left to himself, Bajirao handled any situation with consummate skill; but he was hampered at every step by selfish intriguers.'

मराठ्यांच्या वैभवरवीचें उदयतेज शिवाजीच्या ठिकाणीं, आणि त्याची अस्तमय प्रभा महादजी सिंदे व नानाफडणीस यांच्या ठिकाणीं दृग्गोचर होते असें समजलें तर, बाजीराव हा मध्यान्हींचा प्रतापरवि होय असें मानण्यास हरकत नाहीं. सारांश, बाजीरावाच्या कर्तबगारीसंबंधानें साधक बाधक मुद्दे वाचून मनावर जो एक सामान्य ग्रह राहतो, तोच मतलबाचा समजला पाहिजे.

( २ ) **शाहू, बाजीराव व निजाम.**—आपल्याकडचे व्यवहार संस्थाप्रधान नसून व्यक्तिप्रधान असतात, मग ते राजकीय असोत किंवा खासगी असोत. व्यक्तीचा स्वभाव व शहाणपण यांचें वळण त्या व्यवहारांस लागतें.

तसाच प्रकार बाजीराव व शाहू यांचा आहे. शाहूचा स्वभाव मृदु, पापभीरु, निष्ठुर प्रसंग टाळणारा, असा होता. धूर्तता किंवा राजकारणचातुर्य त्यास बेताचेंच होतें. त्याचा अधिकार मात्र अनियंत्रित होता, तसेंच मराठमंडळावर त्याची छापही अतोनात होती. ह्मणजे त्याचे हुकूम तोडण्यास किंवा त्याचे इच्छेविरुद्ध वर्तन करण्यास कोणीही प्रधान किंवा बलाढ्य सरदार सुद्धां धजत नसत. अशा स्थितींत चार चौघांच्या तक्रारी ऐकून किंवा एकत्र वाटाघाटी करून जेवढा निर्णय किंवा हुकूम सरदारांस मिळे, तेवढ्यांतच शक्य तो उद्योग सरदारांस करितां येई. अर्थात् अंगच्या मुत्सद्देगिरीनें राज्याचीं कामें उपस्थित करून तीं सिद्धीस नेण्याची स्फूर्ति शाहूकडून सरदारांस कधींच प्राप्त झाली नाहीं. देशभर वावरणाऱ्या सरदारांचे उद्योग व राजकारणें शाहूला उमजत नव्हतीं. इंग्रजांसारख्यांचे खोल कावे तर शाहूला कधींच उमगले नाहींत. वसईच्या युद्धांत प्राणहानि झाली त्यानें शाहूचें चित्त विव्हळलें, परंतु वसईचें राजकारण आपल्या राज्यास किती पोषक आहे याची कल्पना त्यास आली नाहीं. त्यास मनुष्याची पारख होती. पण दोन विरोधी इसम किंवा पक्ष समोर झगडूं लागले कीं त्याच्या मनाची त्रेधा उडे. अशा स्थितींत तो आपल्या खासगी वजनाचा उपयोग करून भांडणारांस गप्प करी, त्यामुळें भांडणाचें बीज नाहींसें होत नसे. ह्मणून तोंडावर ते विरोधी पक्ष गप्प बसत, परंतु दूर गेलें ह्मणजे संधि साधून आपापले कावे तडीस नेत. यामुळें बाजीरावाच्या अमदानींत मराठशाहीच्या राजकारणास एकसूत्री तेज चढलें नाहीं. जें काय थोडें बहुत कर्तृत्व बाजीरावास दाखवितां आलें, तें शेवटच्या पांच सात वर्षांत शाहूवर त्याची छाप बसल्यानंतरचें आहे. दाभाड्याचे प्रकरणापूर्वी शाहूला बाजीरावाचा दरारा वाटत नव्हता, ह्मणून त्यापूर्वींच्या स्वाऱ्यांत नेटाची फलप्राप्ति कांहींच झाली नाहीं. मोंगल पातशाहीबद्दल अवास्तव पूज्यभाव व निश्चित धोरणाचा अभाव या कारणांनीं, बाजीराव, चिमाजी, रघूजी भोसले, शिंदे, होळकर वगैरे अनेक सरदारांची करामत फुकट गेली; व पुष्कळशीं कामें रेंगाळत पडलीं. निजामास कायमचा आळा बाजीरावाकडून बसला नाहीं याचेंही कारण शाहूचें हें दुर्बल किंवा अनिश्चित धोरण होय. निजाम आपला शत्रु आहे असें शाहू समजत नसे. बाजीरावाचा बाणा याच्या उलट होता. बादशाही सनदांच्या जोरावर ' सारी दक्षिण सोडवा-

यची, सोनपतपानपत य॒ ॒ापार मुलूख ताराज करावयाचा,' ही त्याची मरा-ठीची भावना सिद्धीस जाण्यास पुढें कैक वर्षे लागलीं.

राजकारणाच्या दृष्टीनें बाजीरावाच्या अंमदानींत मुख्य पांच सहा कामें महत्वाचीं झालीं तीं अशीं:—कोल्हापुरच्या भाऊबंदकीचा निकाल, पश्चिम किनारा व कोंकणपट्टी यांचा बंदोबस्त, मराठे सरदारांची फाटाफूट, निजामाचा जाच, माळवा दिल्लीकडील चढाई, आणि दक्षिणहिंदुस्थान अगर कर्नाटक यांसंबंधीं मराठशाहीचें कर्तव्य. या सर्व बाबतींचे निकाल मराठ्यांचें राज्य कायम होण्याचे दृष्टीनें झाले नाहीत. ' मराठा तितुका मेळवावा ' हें तत्त्व बाजूस राहून, संभाजीच्या प्रकरणांत मराठशाही दुभंगली गेली. संभाजीला स्वतंत्र राज्य तोडून न देतां, फत्तेसिंग भोसल्याप्रमाणें एकाच राज्याचे अंगभूत ठेवलें असतें तर एकंदर राज्यास बळकटी आली असती. कोल्हापुरचें राज्य सर्वथैव स्वतंत्र झाल्यामुळें त्याची अडचण अखेरपर्यंत मराठशाहीस भोंवली, आणि कोल्हापुरचेंही ह्मणण्यासारखें हित झालें नाहीं. कोंकणचे किनाऱ्यावर पोर्तुगीझ नाहींसे झाले. तरी हबशी कायम राहिला आणि आंग्रे दुर्बळ झाले, त्यामुळें इंग्रजांस पुढें सरण्यास वाव मिळाला. आंगऱ्यांचा मुलूख धनोत्पादक नसल्यामुळें त्यांची द्रव्यशक्ति वाढविण्याचा कांहीं तरी उपाय केला पाहिजे होता. सरदारांना उद्योगस्वातंत्र्य देण्यांत आलें, त्याबरोबर त्या सर्वांस कांहीं तरी एक नियंत्रण मध्यवर्ती सरकारांतून घातलें गेलें नाहीं, यामुळें राज्यांत फूट पडण्यास कारण झालें. निजामाला नाहींसा करणें तत्कालीन परिस्थितींत बाजीरावाच्या आटोक्या बाहेरचें काम होतें. पुष्कळसे मराठे सरदार निजामाच्या बाजूस होते, त्यांस आपल्याकडे वळवून आणण्याचा प्रयत्नच कोणीं केलेला दिसत नाहीं. रजपूत राजांस सुद्धां हिंदुत्वाचे भावनेंत सामील करण्याचे प्रयत्न झाले, परंतु मराठे सरदार निजामशाहींत कायमचे राहिले. निजामशाही हें एक मराठीच राज्य होय अशी भावना अद्यापि आहे. निजाम मराठी राज्यांत बंडें उत्पन्न करी, तशीं मराठ्यांनीं त्याचे राज्यांत केलीं नाहींत. तरी, निजाम आणि दिल्ली यांच्यामध्यें माळवा बुंदेलखंडची पाचर उत्पन्न करून, सरदारांना नवीन कार्यक्षेत्र बाजीरावानें उत्पन्न करून दिलें, गनिमी युद्धपद्धतीचा अभ्यास वाढविला, आणि उत्तरेंत मराठ्यांचा दरारा बस-

पिला, यामुळें सालोसाल मराठ्यांचें पाऊल त्या बाजूस पुढें पुढेंच पडत गेलें, हें निव्वळ बाजीरावाच्या शहाणपणाचें फळ होय. तसेंच बादशाहीबद्दल देशांत रूढ झालेली पूज्यबुद्धि ध्यानांत घेऊन, बादशाही न बुडवितां केवळ तेथील सूत्र-चालकत्व आपल्याकडे ठेवण्याचा उपक्रम बाजीरावानें केला हेंही योग्यच होय. हा उपक्रमच पुढील बादशाही धोरणाचा उगम म्हणतां येईल. हा उगम बाजी-राव बापाबरोबर दिल्लीस गेला असतांच निर्माण झाला होता. मात्र नादीरशहानें दिल्ली शोषून नेल्यावर त्या बाजूनें द्रव्यप्राप्ति होण्याची आशा राहिली नाहीं. त्या ऐवजीं दिल्लीचें राजकारण रजपुतांकडे सोंपवून आणि वैषम्याची ब्याद परभारें दुसऱ्यांचे गळयांत अडकवून आपण अयोध्या बंगाल वगैरे पूर्वोत्तर भागीं लक्ष घालणें मराठ्यांस शक्य होतें. पण तत्संबंधीं ठाम तर्क बांधण्यास लागणारा पुरावा उपलब्ध नाहीं. तसेंच जाळपोळ, लूट, नासाडी, किंवा स्वार्थासाठीं दुस-ऱ्याचा निःपात व निष्कारण प्राणहानि करण्याची प्रवृत्ति बाजीरावानें किंवा इतर मराठे सरदारांनीं कधीं ठेविली नाहीं, हेंही त्याच्या राज्याचा आरंभीं झपाट्यानें फैलाव होण्याचें एक कारण आहे. कर्नाटक व दक्षिण हिंदुस्थान या संबंधीं विवेचन पूर्वी आलेंच आहे.

बाजीराव आणि निजाम या दोन व्यक्ती अठराव्या शतकाच्या प्रथमार्धाचा इतिहास बनवीत होत्या असें सामान्य विधान करण्यांत येतें; आणि निजामाचा कायमचा बंदोबस्त बाजीराव करूं शकला नाहीं, म्हणून निजाम हा अलौकिक मुत्सद्दी होऊन गेला असेंही कित्येकांचें म्हणणें आहे. परंतु तत्कालीन प्रकरणें चांगलीं तपासून पाहिल्यास निजामास एवढें मोठें महत्त्व देतां येणार नाहीं. उद्योग, निर्व्यसनता वगैरे बाबतींत तो औरंगजेबाची तालीम शिकलेला असला, तरी त्याची धरसोड व त्रेधा पाहिली म्हणजे, तो त्या बादशहाचे पासंगासही टिकत नाहीं. औरंगजेबाचे पश्चात् कोणताही निश्चित पक्ष धरून तो वागला नाहीं. घटकेंत सय्यदांस खुष कर पुनः लगेच त्यांचे विरुद्ध शस्त्र धर, असे त्याचे खेळ चाळीस वर्षें चालले, आणि एकाही डावांत त्यास यश आलें नाहीं. वचनें व करार झुगारून देऊन वेळ पडेल तशी पाठ फिरवणारा तो केवळ स्वार्थसाधु होता. सादतखानानें नादीरशहाजवळ त्याचें वर्णन 'पांडित्यपूर्ण कार्यसाधु[1]' असें केलें आहे. तेंच यथार्थ ठरतें. बाजीरावापुढें त्यास नेहमींच

1 A cheat and a philosopher, Irvine 2-356.

हार खावी लागली. बादशाही दरबारांत त्यास आपलें वजन बसवितां आलें
नाहीं. दुर्बळ बादशहास आपल्या अक्कलेनें तारण्या ऐवजीं किंवा बुडत्या बाद-
शाहीस सावरण्या ऐवजीं, त्यानें दक्षिणेंत स्वतंत्र पंथ पाहिला. असा स्वतंत्र पंथ
काढणारा पहिला बादशाही उमराव निजाम होय. त्याचेंच अनुकरण पुढें नादी-
रशहा येऊन गेल्यावर इतरांनीं केलें. माळवा व गुजराथ हे प्रांत सुद्धां घशांत
टाकण्यांची त्याची तयारी होती, परंतु मराठ्यांनीं ते त्यास पचूं दिले नाहींत.
पण या सर्व दुष्ट वर्तनावर कळस चढविण्याकरितांच कीं काय, नादीरशहाचे
स्वारींत त्यानें अत्यंत नीचपणाचें वर्तन केलें. नादीरशहास त्यानें आणिलें,
आणि बादशहा सुद्धां सर्व मंडळी त्या जबरोबर आपापल्या योग्यतेप्रमाणें लढत
असता, निजाम केवळ मजा पाहत स्वस्थ राहिला. सर्व बादशाही धुऊन गेली,
त्याची त्यास खंत वाटली नाहीं. नादीरशहानें त्यास अटकेंत ठेवून त्याज-
कडूनच दिल्लींतील अपरंपार संपत्ति हरण केली, आणि
त्याजवर यत्किंचित् भरंवसा ठेविला नाहीं. खानडौरान व सादतखान
हे केवळ निजामाच्या कारवाईनें मारले गेले. मनुष्याचा थोरपणा
त्याच्या प्रमाणिकपणावरून अथवा स्वार्थत्यागावरून अजमावयाचा असतो.
निजामांत अशा सत्याचा किंवा स्वार्थत्यागाचा लवलेश नव्हता. त्यानें बादशा-
हीची यत्किंचित् सेवा केलेली नाहीं. धूर्ततेनें वागून त्यानें लहानसें राज्य
स्थापिलें, तें पानपतच्या अरिष्टामुळें मराठ्यांचे तावडींतून सुटलें. पण अशीं
राज्यें बंगाल अयोध्या वगैरे प्रांतिक अंमलदारांनीं सुद्धां स्थापिलीं. स्वजाति,
स्वराष्ट्र, स्वधर्म, इत्यादि बाबतींत मराठ्यांचे अंगीं जो अभिमान होता, तसला
निजामाचे अंगीं बिलकूल नव्हता. म्हणून मराठ्यांचा उज्ज्वल उद्योग व निजा-
माचा कपटाचा उपद्व्याप यांत केवढें तरी अंतर दिसून येतें. त्यास नाहींसा
करणें हें शाहूनें आपलें कर्तव्य मानलें नाहीं, ह्मणूनच तो बाजीरावाचे तावडीं-
तून निभावला, असेंही ह्मणतां येईल.

आपल्याकडे एखाद्या व्यक्तीच्या स्वभावावरून राजकारण कसें बदलतें
याचे दाखले शाहूच्या अमदानींत विपुल सांपडतात. शाहूचा स्वभाव जितका
दयार्द्र तितकाच पायभीरु होता. कान्होजी भोसल्यासारखा पराक्रमी व साह्य-
कर्ता सरदार बदफैली वर्तनामुळें शाहूस नकोसा झाला; आणि शेवटीं

रण कैदेंत पडला. अशीं लहान मोठीं उदाहरणें पुष्कळच आहेत. वाडीकर फोंड सावताच्या एका सरदारानें ' एक नऊ दहा वर्षांची ब्राह्मणाची मूल एकटीच अटकेंत ठेवावी, हा कोण विचार ! यवनादिकही ऐसें कर्म करणार नाहींत. याउपर त्यास नशियत करून ब्राह्मणाची मूल सोडून देणें, ' अशी ताकीद शाहूनें सावंतास दिली. त्याच सावंतास आणखी पुढें सहा महिन्यांनीं शाहूनें, अटकेंत ठेविलेला ब्राह्मणाचा कबिला सोडून द्यावा असें निक्षून लिहिलें. ' ब्राह्मणाचा कबिला अटकेंत ठेवावा, हा महाराष्ट्रधर्म नव्हे. ' गोब्राह्मण प्रतिपालनाची एवढी जाणीव शाहूस होती. सोनारांचे उपाध्ये सोनार असून त्यांजबरोबर ब्राह्मण जोशी उपाध्येपणासाठीं भांडूं लागले, तेव्हां शाहूनें जोशांचा निषेध केला. त्या वेळीं बटीक वगैरे मुली कर्जाच्या पेट्यांत विकीत असत. एका बटकीचे रु. १२ कर्जांत वजा घालण्यांत आले. छत्रपति भोसल्यांनीं आपल्या सोयीरगतीसाठीं गुजर, शिर्के, कदम बांडे, महाडिक वगैरे कित्येक उच्च कुळींचीं घराणीं राखून ठेविलेलीं असून, त्यांचे शरीरसंबंध छत्रपतींच्या परवानगीनें व्हावे असें ठरलेलें होतें. खंडेराव दाभाडे याच्या मनांत आपली मुलगी शिर्के अनूपसिंग यास देण्याची बोली जाहली, आणि त्यांनीं त्याबद्दल शाहू महाराजांची परवानगी मागितली, ती शाहूनें दिली. असे आणखी सामाजिक प्रकरणांचे व न्यायनिवाड्यांचे अनेक उल्लेख आहेत, परंतु त्यांचें विवेचन करण्याचें हें स्थळ नव्हे. मस्कत व अरबस्थान येथून अरब व्यापाऱ्यांनीं घोडे व जिन्नस आणून बंदरोबंदरीं आपल्या राज्यांत व्यापार करावा, असे तह शाहूनें ठरवून दिले होते. मराठशाहींत इंग्रजांचे मार्फत पाश्चात्य घड्याळांचा प्रवेश बाजीरावाचे वेळेस झालेला दिसतो. बाजीरावाचीं घड्याळें मुंबईहून दुरुस्त करून आणल्याचा उल्लेख आहे. उत्तरकाळांत तर घड्याळांचा फैलाव चांगलाच झाला.[१] "

बाजीरावाच्या वेळेपासून मराठशाहीचा उद्योग एखाद्या चांगल्या पोसलेल्या झाडाप्रमाणें फोंफावत गेला. हिंदुस्थानच्या अनेक भागांत निरनिराळे सरदार संचार करूं लागले. त्यांच्या अडचणी, भांडणें, जयापजय वगैरे प्रकार शाहूच्या-कानांवर येऊन त्या प्रसंगांची निभावणूक करण्यांत शाहू किती दंग होता, कितीपत्रें लिहीत होता व किती भानगडी उलगडीत होता, हें त्याच्या रोजनिशींतील

१. शा. रो. २२१,३७९ ३७७,३६७,३७४,३६१,३३,६२; ऐ. टि., २-३७; ४-२.

कागद बारकाईनें वाचल्या शिवाय ध्यानांत येणार नाहीं. निरनिराळाया ठिकाणांहून फौजांच्या मागण्या येत त्या पुऱ्या पाडतांना शाहूची त्रेधा उडे. आज आपणास दहा पांच मोठ्या सरदारांचीं तेवढीच नांवें त्या वेळच्या उद्योगांत भाग घेणारांचीं परिचित आहेत. परंतु यांशिवाय आणखी किती तरी लहान मोठ्या सरदारांचे उल्लेख रोजनिशींत आहेत. दावलजी व आनंदराव सोमवंशी, सूर्याजी पांढरे, कदम बांडे, पवार, बांडगर, थोरात, मोहिते, जाधव, निंबाळकर, पिसाळ, धुमाळ, इत्यादि मराठ्यांचीच यादी केली तर ती प्रचंड होईल. याशिवाय ब्राह्मण, सारस्वत, प्रभु वगैरे दुसरेही अनेक इसम या राष्ट्रीय उद्योगांत खपत होते. त्यांस मिळालेले किताब, जहागिरी, इनामें वगैरेंच्या अनुरोधानें त्या वेळीं हा राष्ट्रीय उद्योग करणाऱ्या इसमांची संपूर्ण हकीकत त्यांच्या वंशजांनीं बाहेर आणण्याचा प्रयत्न केल्याशिवाय त्या वेळचा इतिहास परिपूर्ण होणार नाहीं. पेशव्यांनीं मराठे घराण्यांचा उच्छेद मुद्दाम केला हा प्रवाद निराधार ठरतो. जुन्या घराण्यांचें ऊर्जित करावें ही बुद्धि पेशव्यांचे ठिकाणीं जागृत होती. नरसोजी नाईक वणजारे यास बाजीराव लिहितो. ' तुम्ही पुरातन राज्यांतील सेवक, तुमचे हातून सेवा घेऊन सर्व प्रकारें ऊर्जित करावें हें अवश्यक आहे. स्वामिसेवा केलीया तुमचें बरें सर्व प्रकारें पूर्ववत् प्रमाणें चालेल, ऊर्जित होईल यांत संदेह नाहीं. अशा प्रकारचीं पत्रें स. १७२७त वीस सरदारांस लिहिलेलीं आहेत. असेंच ममतेचें पत्र जिवाऊ शिंदे (बहुधा नेमाजी शिंद्याची बायको) इला बाजीरावानें लिहिलेलें आहे. ' हें घर तुमचें आहे, आम्ही सर्वस्वें तुमचें असों. यास संदेह नाहीं. मराठशाहीच्या कारभारांत ब्राह्मणांची संख्या व महत्त्व आरंभीं फारच कमी होतीं हिशेबी व कारकुनी पेशाबाहेर ब्राह्मणांचा भरणांचा बाळाजी विश्वनाथाचे वेळेस फारसा नव्हता. बाजीरावानें तर ब्राह्मण जातीला विशेष अगत्य दाखविल्याचें मुळींच दिसत नाहीं. शिंदे होळकर, पवार, जाधव वगैरे मंडळीच त्याच्यां जिव्हाळयाची असून, सोवळ्या ओवळयाचे बाबतींत सुद्धां हा मस्तानीचा यजमान विधि निषेध बाळगणारा होता असें दिसत नाहीं. लष्करांत वगैरे असतांना जातिनिर्बंध त्यानें पाळलेच नसावे नानासाहेबाचें धोरण अगदींच वेगळें असून त्यानेंच ब्राह्मणांची भरती विशेष केली, तरी मराठे मंडळींचेंही त्यानें चालविलें. माधवराव पुनः निस्पृह निघाला, आणि नारायणरावानें तर उलट बाजूची कमाल

केली. वास्तविक निरनिराळे कालखंड घेऊन नोकरीतील शेकडेवारी तपासल्यास ती उपयुक्त होईल. राष्ट्रोद्योगाची भावना बाजीरावानें फैलावली. हैदराबाद, दिल्ली, बुंदेलखंड, राजपुताना, माळवा इत्यादि दूरदूरच्या प्रदेशांत बाजीरावाचे वकील मराठशाहीच्या हितासाठीं झटत होते. सवाई जयसिंगाशीं बाजीरावाचें राज्यसंधान एकसारखें चालू होतें. या वकिलांचीं बाजीरावास व इतरांस आलेलीं पत्रें कांहीं उपलब्ध आहेत त्यांवरून बाजीरावापासून या वकिलांस राष्ट्रीय धोरणाची व आपल्या कर्तव्याची स्फूर्ति मिळत असावी, असें दिसतें. विशेषतः दिल्लीकडील वकिलांनीं नादीरशहाच्या स्वारीच्या वेळेस ज्या हकीकती कळविल्या आहेत त्यांवरून मराठशाहीचा फैलाव देशभर व्हावा, ही त्यांची जाणीव व्यक्त होते ( ए. टि. २-३७, ४७; जु. ऐ. गो २.४६. )

( ३ ) कागदपत्रांचा अंदाज.—अलीकडे बरेच ऐतिहासिक कागदपत्र प्रसिद्ध झाले आहेत, त्यांत बाजीरावासंबंधीं प्रत्यक्ष माहिती फारच थोडी आहे. वास्तविक शिवाजी, संभाजी, राजाराम व ताराबाई या चार कारकीर्दींतील अनेक प्रकरणें व घडामोडी यांसंबंधानें निरनिराळ्या व्यक्तींचे व नाना प्रकारचे उल्लेख बरेचसे स्पष्ट व विस्तृत सांपडतात. शाहूच्या संबंधानेंही बखरींतून व निरनिराळ्या सरदारांच्या हकीकतींतून बरीच माहिती मिळते. बाळाजी विश्वनाथाच्या हालचाली व वर्तनोद्देश यांचा स्पष्ट उलगडा लावण्याजोगी नवीन माहिती उपलब्ध झालेली आहे. परंतु मराठशाहींतील दुसऱ्या नंबरच्या या प्रसिद्ध व्यक्तीसंबंधानें खुलासेवार माहिती फारच थोडी आहे. बाजीरावाच्या पूर्वीच्या व पुढच्या व्यवहारांचा व उलाढालींचा बराच समर्पक उलगडा लावतां येतो, तसा प्रत्यक्ष बाजीरावासंबंधानें लावतां येत नाहीं. त्या बाबतींत पेशव्यांची बखर व शाहूची बखर ह्या दोन उत्तरकालीन लेखांवरच भिस्त ठेवावी लागते. या बखरी तत्कालीन नाहींत आणि त्यांतील उल्लेख बरेचसे काल्पनिक असून लेखकांनी आपापल्या कल्पनेप्रमाणें मागाहून सजविलेले आहेत. बाजीरावासंबंधीं प्रचलित असलेले बरेचसे ग्रह कै नागेश विनायक बापट यांच्या पुस्तकावरून बनलेले आहेत. त्यामुळें बाजीरावाचा खरा इतिहास रचतांना अनेक मिथ्याग्रह दुरुस्त करावे लागतात. अशा स्थितींत अस्सल पत्रांचा उपयोग होतो मराठशाहींतील बऱ्याच प्रसिद्ध व्यक्तींचीं अनेक पत्रें उपलब्ध असून

त्यांवरून त्या व्यक्तींचे वर्तनोद्देश, त्यांच्या अडचणी व त्यांची कामगिरी यांचा
अंदाज करितां येतो. परंतु अशा प्रकारचीं बाजीरावानें लिहिलेलीं पत्रें फार
थोडीं आहेत; आणि जीं कांहीं आहेत त्यांत त्याचें अंतरंग भरपूर उतरलेलें
असें बहुधा एकही पत्र नाहीं. रा. राजवाडे यांचे खंड ३ व ६, रा. ब.
पारसनीसकृत ब्रह्मेंद्रस्वामीचें चरित्र, व का. सं. पत्रें यादी, या पुस्तकांत
बाजीरावाचीं कांहीं पत्रें आलेलीं आहेत[१] हीं सर्व मिळून फार तर सुमारें ८०
पत्रें होतील. यांपैकीं बरींचशीं पत्रें पावतीवजा, निवाडपत्रें किंवा मोहिमांच्या
हकीकती देणारीं आहेत. राजवाड्यांच्या सहाव्या खंडांतील ले. ५९१–६२१
पावतींच्या कागदांत नंदलाल मंडलोई याच्यामार्फत माळवा प्रांत जिंकल्यासंबंधाचा
उल्लेख आहे. बरीचशीं पत्रें बाजीरावानें ब्रह्मेंद्रस्वामी, चिमाजी आप्पा व पुरंदरे
यांस लिहिलेलीं आहेत. पिलाजी व सटवाजी जाधव यांस लिहिलेलीं पत्रें केवळ
पावतीच्या स्वरूपाचीं आहेत. सारांश, राज्याच्या घडामोडी व स्वतःचे उद्देश
दाखविणारीं बाजीरावाचीं पत्रें नाहींत. ब्रह्मेंद्रस्वामीस लिहिलेल्या पत्रांत कर्जाच्या
गांजणुकीचा प्रकार आहे. बाजीरावाचे उद्योग व व्यवहार, सर्व देशभर चाल-
लेल्या त्याच्या हालचाली, त्याचे ठिकठिकाणचे वकील व त्यांच्या मार्फत चाललेलीं
कारस्थानें, या गोष्टी मनांत आणल्या ह्मणजे, बाजीरावानें कितीं तरी
पत्रें लिहिलीं असलीं पाहिजेत, परंतु तीं उपलब्ध नाहींत. एकंदरींत स्वकीय व पर-
कीय सरदार, परदेशस्थ इंग्रज वगैरेशीं बाजीरावाचा पत्रव्यवहार होता असें अनेक
उल्लेखांवरून दिसतें. मुंबईचे गव्हर्नरास बाजीरावाचें पत्र आहे.

---

१ का. सं. प. या. ले. ४२, ४४, १६६, १६९. रा. खंड ३. १६, २६,
३०, ३६७. रा. खंड ६, ले. १६, ५६, ७२, ७६, ७८, ८१, ८२, ९०,
११०, ११३, १२३, १३२, १४२, व ले. ५९१–९३, ५९९, ६१३, ६२०,
६२१, १८, १९, २९, ३०, ३३, ३६, ३९, ४१, ४३, ४५, ५९, ९१,
९२. रा. खंड ८, ले. ११६, १६०–१६२. ब्र. च. ले. २६–४२ व
११४–१२७. इ. सं. ऐ. टि. व पे. द. माहिती पृ. १२७ ले. २, भा. व. १
प. या. "'बर्वे घराण्याचा इतिहास' 'चंद्रचूड द.' अशा सारख्या पुस्तकांतून
कांहीं सनदापत्रें वगैरे बाजीरावाचे आणखी कांहीं कागद आहेत.

बाजीरावासंबंधानें इतरांचे उल्लेख ठिकाठिकाणीं आलेले आढळतात, त्यांवरून त्याचा वचक लोकांस फार होता. शाहू तर त्याजविषयीं पुष्कळदां साशंक असे; आणि हा केव्हां काय करील याजबद्दल त्यास धाक वाटे. म्हणून एखादें प्रकरण मुखत्यारीनें तडीस लावण्यांत शाहूकडून बाजीरावास अडथळा होत असावा. 'सात किल्ल्यांवरील दारूगोळा व दाणा उतरून पेशवे विकतात असा कोणीं बोभाटा शाहूजवळ केला, तेव्हां ही गोष्ट खोटी आहे, तपास करावा, असा पुरंदऱ्यानें शाहूस आग्रह केला असतां, शाहू ह्मणाला, ' असे तपास पुष्कळांचे होऊन गुन्हेगार ठरले त्यांचें कोणीं काय केलें ! ' त्यावर पुरंदऱ्यानें जबाब दिला कीं. ' आमचे धनी पेशवे अशी गय करणारे नाहींत. खरें करून न दिलें तर चहाडखोरांचें डोचकेंच मारतील. ' हा रोखठोक जबाब ऐकून शाहू गप्प बसला. तथापि अडचणीच्या प्रसंगांतून मार्ग काढण्यासंबंधानें शाहूचा विश्वास जितका बाजीरावावर होता, तितका प्रतिनिधिवरही नव्हता. एका प्रसंगीं प्रतिनिधीनें शाहूकडून कांहीं हस्तलेख मागितला असतां, शाहू बोलला, ही गोष्ट कांहीं सुधी नाहीं; जर जाली तर राजश्री प्रधान पंताचीच गोष्ट उत्तम.

कोंकणांत पेशव्यांनीं जिंकलेला मुलूख शाहूनें त्यांजकडे न ठेवितां चिट-णिसास वांटून दिल्याचा उल्लेख वरील पुस्तकांतील ले. ७१ यांत आहे. राज. खं. ८६ व १६ ही शाहूनें बाजीरावास लिहिलेलीं पत्रें वाचल्यावर शाहूचें मन त्याजविषयीं कसें उद्विग्न होतें हें दिसतें. उलट पक्षीं बाजीरावास सासवडसंबं-धानें उपसर्ग होत असे तो शाहूनें बंद केल्याचा उल्लेख खं.६, ले.७७ यांत आहे. बाजीरावाचीं पत्रें प्रतिनिधि, आंग्रे, फत्तेसिंग भोंसले, नागपुरकर भोंसले इत्यादि त्या वेळच्या प्रमुख मंडळीस लिहिलेलीं आढत नाहींत. राज्यांतील सर्व अवयवांना एका कार्याच्या लगामीं लावून सर्व राज्यकारभार पुढारीपणानें हांकण्याचें कसब बाजीरावास साधलें होतें असें दिसत नाहीं. शिवाय, बाजीरावाचे वेळीं शाहूच विशेष मुखत्यारीनें कामें पाहत असल्यामुळें बाजीरावास तशी मुखत्यारी स्वीकारतां आली नाहीं. नानासाहेबाचे वेळेस शाहू हळूहळू वृद्ध व निर्बल होत जाऊन राज्यकारभराची जोखीम आपोआप नानासाहे-

---

१ शा. म. ब. पृ.५३ व भारतवर्ष, १ पत्रें यादी ले. ३६, ३८. ६३, ७१. ले. ६३ हें पत्र स. १७३६ व ४० च्या दरम्यानचें आहे. ऐ. टि. ५-१६.

बाच्या हातांत आली. वास्तविक, बाजीरावाची परिस्थितिच लोकांना साशंक करीत असे. त्याचें कर्तृत्वही इतरांच्या मानानें विशेष चमकत असल्यामुळें, हा केव्हां काय करील, याजबद्दल लोक चपापलेले असत. बाजीरावाच्या भजनीं लागलेले सरदार फार थोडे होते, आणि त्याचा स्वभावही कान्होजी आंग्रे, किंवा रघूजी भोंसले यांच्याखारखा मिठ्ठा नव्हता. बाजीरावास सरदार भीत असत, भजत नसत. बाजीरावासंबंधानें संभाजी आंग्रे लिहितो, " राजश्री बाजीराव पंडित प्रधान यांनीं बेलभाकर पाठविली, आह्मींही त्यांस पाठविली. तत्राप तो अर्थ एकीकडे ठेवून इमानास खता केला. इमानरोटी देऊन बेइमान केली. ऐसा विचार तुमचा आमचा नसावा. " या पत्रांत बाजीरावानें वचन देऊन आपणांस फसविलें असें संभाजी आंग्रे भगवंतराव अमात्यास सन १७३६ त लिहितो.[१] असेच उद्गार दुसऱ्या सरदारांचेही आढळतात. हें बाजीरावाच्या स्वभावाचें वैगुण्य असेल, अगर आपमतलबी लोकांच्या कपटवर्तनाचा परिणाम असेल. कांहीं असलें तरी बाजीरावाची छाप सर्व सरदारांवर बसलेली नसल्यामुळें त्याच्या कर्तबगारीस पुष्कळ कमीपणा आला. ' दौलतेंत कांहीं ताकत नसतां लौकिक उत्तमच केला.मुख्य गोष्ट राजश्री रावसाहेब पुण्यवंत, त्यामुळें यश येतें.'[२] यावरून बाजीरावाच्या कर्तबगारीसंबंधानें लोकांचा आदर चांगला होता, आणि अडचणीच्या प्रसंगांतून निभावणूक करण्यास त्या वेळीं एकटा बाजीरावच काय तो समर्थ होता, अशी भावना सार्वत्रिक व शाहूचीही होती यांत संशय नाहीं. अनेक प्रसंगीं शाहूनें प्रधानांस किंवा सरदारांस सांगितलेल्या कामगिऱ्या सिद्धीस गेल्या नाहींत; शेवटीं बाजीरावास बोलावून त्याजकडून त्या शाहूनें सिद्धीस नेल्या. खंड ६ ले. ४८ चें पत्र, बाजीराव व चिमाजी यांस कोणीं तरी लिहिलेलें, वाचलें असतां, शाहू व बाजीराव यांच्या बेबनावामुळें राष्ट्रकार्य कसें बिघडलें, तें कळून येतें. खंड ८, ले. ११६ चें पत्र बाजीरावानें सन १७३० त भगवंतराव अमात्यास लिहिलेलें असून त्यावरून इतर सरदारांस संतुष्ट ठेवण्याचा प्रयत्न बाजीराव करीत असे असें दिसून येतें. रघूजी भोसले, नंदलाल मंडलोई, पिलाजी व सटवाजी जाधव यांस प्रसंगानुसार जोराची दरडावणी दाखविण्यास बाजीरावानें कमी केलेलें नाहीं. खं. ६ ले. १९ यांत तर

१ खं ८, ले. १५१. २ खं. ३०७.

बाजीरावानें पिलाजी जाधवाची जवळजवळ माफीच मागितली आहे. खंड ६ ले.८५,८६ यांवरूनही बाजीरावाचा स्वभाव व शाहूचा अविश्वास यांचा अंदाज करितां येतो.'सर्वांचें मनोधारण करून कार्यसिद्धि करणें. प्रतिनिधि व सचिवपंताकडील जमाव तुह्मांसन्निध आहे त्यांचा दिलदिलासाकरून खर्चावेंचास देत जाणें. उभयतां एकमतें वर्तोन स्वामिकार्य सिद्धीस पाववून आपले सेवेचा मजुरा करून घेणें.'असें शाहूनें बाजीरावास कळविलें आहे. त्यावरून आपसांतील दुहीमुळें काम कसें बिघडतें आणि बाजीरावाच्या तुटक स्वभावामुळें लोक कसे नाराज होतात, याची जाणीव शाहूस होती असें दिसून येतें. ' आजपर्यंत कोंकणस्थांचा लौकिक बरा झाला. परंतु या गोष्टीनें श्रम गेला,-' इत्यादि उद्गारांवरून बाजीरावाविषयीं शाहूचें मन कसें साशंक होतें हें कळतें. भारतवर्ष पत्रें यादी ल. ६३, ६४ यांवरूनही शाहूच्या साशंकतेची व पेशव्याविरुद्ध त्याजकडे जात असलेल्या कागाळ्यांची कल्पना होते. एकंदरींत बाजीरावाच्या कर्तबगारीचा अंदाज बांधणें कागदपत्रांच्या अभावामुळें कठीण असून, त्यास पराक्रमाच्या मानानें जितकें यश यावें तितकें आलें नाहीं, हे निर्विवाद आहे. नानाफडणिसानें लिहविलेल्या पेशव्यांचे बखरींत बाजीरावासंबंधानें प्रशंसापर उद्गार फारसे नाहींत, हेंही ध्यानांत ठेवण्याजोगें आहे. बाजीरावाचें ठेविलेलें नांव विश्वनाथ ऊर्फ विसाजी असें होतें. पेशवाई मिळाल्यावरच्या कांहीं कागदांवर ' विश्वनाथ बल्लाळ प्रधान ' असें त्याचें नांव शिक्यांत आहे.

बाजीरावासंबंधानें डफचा अभिप्राय कित्येक गोष्टींत वरील विवेचनास धरूनच आहे. अडचणी, संकटें व विरोधी मंडळींचीं कारस्थानें यांजमधून त्यास मार्ग काढावयाचा असल्यामुळें राज्यकारभारांत त्यास पुढच्या स्थितीचा फारसा पोंच ठेवतां आला नाहीं. तथापि अनेक कारस्थानांचें निर्मूलन करून त्यानें निजामासारख्याचे डाव हाणून पाडिले, हें कांहीं लहान काम नव्हे. तो शूर, साहसी, अडचणीच्या प्रसंगांतून चातुर्यानें निसटून जाणारा, व भाषणानें लोकांवर छाप बसविणारा होता. शिवाजीची व त्याची तुलनाच करतां येण्यासारखी नाहीं. आजूबाजूच्या राज्यांत गोंधळ माजवून देणें हेंच मराठी राज्याचें जीवनसाधन होतें, असा टोमणा डफ वारंवार मराठ्यांना मारितो. त्यांत तथ्य असेल तर, युरोपियन राजनीतींत तो एक गुणच मानला जाईल.

( ४ ) **राज्यकारभाराची अव्यवस्था.**-कोणताही नवीन प्रदेश जिंकल्याबरोबर तेथील बंदोबस्ताची तजवीज करणें हें राज्यकर्त्यांचें पहिलें कर्तव्य होय. यासाठीं फौज जय्यत तयारींत पाहिजे, आणि ती एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं तावडतोब पाठविण्याची सोय पाहिजे. असे रस्ते किंवा सोयी नसल्या, तर जिंकलेल्या प्रदेशांत आपल्या भरंवशाचे फौजबंद सरदार ठेवावे लागतात. अशा रीतीनेंच आंग्रे, शिंदे, होळकर, बुंदेले वगैरे सरदारांची स्थापना झाली. आंग्रे कोंकणांत नेऊन बसविलेले नसते,तर कोंकणचा भाग मराठशाहींत राहिला नसता.तसाच प्रकार इतर ठिकाणींही झाला असता. नवीन रस्ते व राज्यव्यवस्था बनाविण्यास अवकाश नसल्यामुळें सरंजामी सरदारांची हा सापी पद्धति स्वीकारण्यांत आली. जिंकलेल्या प्रदेशांत या सरदारांचे हितसंबंध कायमचे जडल्यामुळें त्यांना आपापल्या प्रदेशाचा बंदोबस्त कोणत्याही उपायानें करणें भाग पडून, शत्रूंचा बंदोबस्त परभारें झाला. मात्र या व्यवस्थेनें नवीन राज्यें निर्माण होऊन आरंभापासूनच फाटाफुटीचें बीज राज्यकारभारांत शिरलें. प्रत्येकानें स्वतंत्र राज्याचे अधिकार धारण केले. असें केल्याशिवाय त्या अंदाधुंदीच्या काळांत चालण्यासारखेंही नव्हतें. हुकूम आणवून अडचणींचें निरसन करण्याची सोय नव्हती.हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याची वाढही, मुख्य सरकारचे हुकूम बाजूस ठेवून, प्रसंग पडेल त्याप्रमाणें स्थानिक अधिकाऱ्यांनीं वर्तन केल्यामुळें, झालेली आहे. सारांश, सरदारांनीं संपूर्ण सत्ताधीशाचे अधिकार धारण केले. इनामें देणें किंवा असलेलीं इनामें खालसा करणें, अशा महत्त्वाच्या बाबतींत सुद्धां मुख्य सरकाराची मध्यस्थी राहिली नाहीं. मध्यवर्ती कारभाऱ्यांनीं अशा सर्व बाबतींत कांहीं तरी विशिष्ट पद्धति बांधून दिली पाहिजे होती; पण तसें मनःस्वास्थ्य किंवा संधि मराठमंडळास मिळाली नाहीं.

पुष्कळदां विशिष्ट राज्यपद्धतीनेंच राष्ट्रैक्य उत्पन्न होत असतें. कोणतेंही मोठें काम तडीस नेण्यास निरनिराळ्या घटकावयवांनीं एक दिलानें एकदम उद्योग केला पाहिजे. राज्यकारभार म्हणजे एक अत्यंत गुंतागुंतीचें प्रचंड यंत्र आहे. त्या यंत्राचे सर्व भाग व्यवस्थित ठेवणें हेंच राज्यसूत्रचालकांचें कर्तव्य असतें. हें यंत्र व्यवस्थित चालविण्याचें काम प्रमुख मुत्सद्यांकडून सिद्धीस गेलें नाहीं. अर्थात् संघशक्ति किंवा टिकाऊ राष्ट्रैक्य मराठशाहींत उत्पन्न झालें नाहीं.

बाळापुर,पालखेड, डभई इत्यादि अनेक युद्धप्रसंगांत मराठे मराठ्यांशींच झगडत होते. औरंगजेबाशीं लढतांना तोच प्रकार चालू होता. हा प्रकार बंद करण्याचा प्रयत्न पुढें नानासाहेब पेशव्यानें केला, आणि तो शेवटीं शेवटीं बराच सिद्धीस गेला; कारण पानपतावर सर्व मराठे संपूर्ण राष्ट्रैक्याच्या भावनेनें एकत्र झाले. तथापि पुढें रघुनाथरावानें मराठशाहींत दुही माजविली. या दृष्टीनें राज्यकारभाराचा विचार करणें बोधपर होईल.

बाजीराव व त्याचे साथीदार यांनीं देश जिंकण्याचा उद्योग केला, त्याचा अखेरपर्यंतचा अजमास त्यांच्या डोळ्यांसमोर होता असें दिसत नाहीं. युरोपियन इतिहासांत बिस्मार्क, ग्लॅड्स्टन वगैरे मुत्सद्दी आपापल्या राष्ट्राचें पुढील शें दोनशें वर्षांचें ध्येय दृष्टीपुढें ठरवून तदनुरूप उद्योग अगोदरपासून चालू करितात. तसा विचार दूरदृष्टिपूर्वक निदान बाजीरावानें तरी केलेला दिसत नाहीं. वसईचेंच उदाहरण घेतां येईल. खंड ४ मधील पेशव्यांच्या बखरींत खालील वाक्यें आहेत. 'आपासाहेबीं वसईचा सुभा शंकराजी केशव यांसी व साष्टीचा सुभा खंडोजी माणकर यांसी सांगोन आपण सरदार सुद्धां पुण्यास आले. वसईतील मसलतीस बारा चौदा हजार माणूस स्वार व हशम कामास आले. आपासाहेबीं या मसलतीस भगीरथ प्रयत्न करून फिरंगाण प्रांत हस्तगत करून हिंदुधर्मराज्यस्थापना केली.' यावरून हा प्रदेश जिंकण्याचा मराठ्यांचा हेतु धार्मिक स्वरूपाचा दिसतो. राष्ट्रीय हेतु त्यांस कळला असता तर पोर्तुगीझ सत्ता कशी चालली होती, त्यांचे राज्यसंरक्षणाचे व धनोत्पादनाचे उगम कोणते होते, इत्यादि पुढील विचार मराठमंडळास करावे लागले असते. वसई जिंकल्याबरोबर तेथें नवीन प्रचंड आरमाराची स्थापना मराठे मुत्सद्यांनीं केली पाहिजे होती. वसई बंदर चांगलें होतें. जहाजें बांधण्याचे पोर्तुगीझांचे कारखाने तेथें होते. त्यांचा दारूगोळा तेथें तयार होता. शेजारीं इंग्रजांचा उद्योग मुंबईस काय चालला होता आणि वसईच्याच प्रकरणांत इंग्रजांनीं कशी ढवळाढवळ केली, हें सर्व बाजीराव व चिमाजीआपा जाणत होते. 'हे इंग्रज व पोर्तुगीझ येतात कोठून, थोड्याश्या जहाजांनीं व लष्करानें,लाखों फौज बाळगणाऱ्या मराठ्यांबरोबर टक्कर देतात कसे, ते एवढा पैसा कोठून आणितात, व्यापाराच्या व्यवहारांत केवढी किफायत त्यांस होते,' या गोष्टींचा तपास व विचार करून, त्यासंबंधानें आपल्या राज्याचे धोरण

बाजीराव व चिमाजींनीं कांहीं एक ठरविलें नाहीं. हा विषयच त्यांस कळला नाहीं. पुढील उद्योगाची जाणीव त्यांस असती तर मुंबईचाच इंग्रजांचा उद्योग वसईस उठवून देतां आला असता. ठाणें, वसई वगैरे साष्टीचा सर्व प्रदेश त्यांचे हस्तगत झाल्यानें पुढील उद्योगाची रचना याच वेळीं झाली पाहिजे होती. कॅप्टन इंचबर्ड व कॅ. गोर्डन, हे इंग्रजांचे वकील मराठ्यांच्या याच उद्योगाच्या भीतीनें त्यांजकडे शिष्टाई करून तो हाणून पाडण्याचा बेत करीत होते. हे बेत पेशव्यांस कळत होते. पश्चिम-किनाऱ्यावर आंग्रे शिरजोर होता. त्याचा नकशा, गृहकलहाचा फायदा घेऊन, पेशव्यांनीं चांगलाच उतरला होता. अर्थात् आंग्र्यास मोडल्याबरोबर स्वतःचें आरमार एकदम वसईस स्थापिलें पाहिजे होतें. तशी व्यवस्था झाली असती तर पुढें नानासाहेबानें आंग्र्यास सर्वस्वी बुडवून कोंकणकिनारा पाश्चात्य लोकांस मोकळा करून दिला, हें अपेश पेशव्यांवर आलें नसतें, आणि पहिल्या मराठी युद्धांत राघोबास मदत करून मराठशाहींत घुसण्याची ताकद इंग्रजांस आली नसती. नुसता देश जिंकून रणांगणावर पराक्रम गाजविल्यानें राज्याचें काम भागत नाहीं. जिंकिलेल्या प्रदेशांत सुव्यवस्थित व संरक्षक राज्यव्यवस्था निर्माण करणें हेंच ज्यास्त जोखमीचें व शहाणपणाचें काम होय. पेशवे व्यवस्था लावीत, पण आजूबाजूस काय चाललें आहे तें पाहत नसत. इंग्रजांच्या तुलनेनें या बाबतींत पेशवे पुष्कळ कमी ठरतात. वसईस नवीन आरमार स्थापण्याची सोन्यासारखी संधि पेशव्यांनीं फुकट घालविली. शंकराजी फडके, खंडोजी माणकर, रामाजी महादेव हे व्यक्तिशः हुशार असून त्यांजकडून आरमाराची, दारूगोळ्याची व व्यापाराची नवीन व्यवस्था करण्यास हरकत नव्हती. पण ही गोष्ट कोणास सुचल्याचें दिसत नाहीं. राज्यकारभार व्यवस्थित चालण्याचें बीज द्रव्यबल होय. त्याविषयीं तर बाजीरावाच्या कारभारांत अनास्था होती, हें ठिकठिकाणीं दाखविलेंच आहे. मग रस्ते वगैरे लोकोपयोगी कामें करावयाची भावना कारभाऱ्यांचे ठिकाणीं नव्हती याचें आश्चर्य करावयास नको.

**५. मराठशाहीच्या वृद्धींतील दौर्बल्यबीज[१].**—रा. खरे यांनीं मराठी राज्याच्या खऱ्या स्वरूपाचें विवेचन चांगलें केलें आहे. त्यांनीं मराठी राज्यास

---

१ इचलकरंजी इ. प्र० पृ० ६१–६८.

'संयुक्त संस्थानिक-मंडळ' 'Confederacy of States' असें नांव दिलें आहे. तें एकप्रभुसत्तात्मक असतें तर इंग्रजांस जिंकितां आलें नसतें. शिवाजीच्या वेळेस तें एकप्रभुसत्ताक असून शाहूच्या वेळेस त्याचें संयुक्त संस्थानिक मंडळांत रूपान्तर झालें. अर्थात् शाहूनेंच हें राज्य गमावलें असा निष्कर्ष निघतो. मरण-समयीं त्यास चिरस्थायिकता आणण्यासाठीं शाहूनें मुख्य अधिकार पंतप्रधानाच्या हवालीं केला. हें सारें शाहूच्या आलस्याचें व अनास्थेचें फल होतें. आपल्या राज्याचा व तें स्थापन करणाऱ्या पूर्वजांचा शाहूस पराकाष्टेचा अभिमान होता. तें राज्य वृद्धिंगत करण्याविषयीं त्याचा उत्साह वर्णनीय होता. तो उदार, शूर, धार्मिक व प्रजावत्सल होता. पण एवढ्याच गुणांनीं राज्य टिकतें असें नाहीं. राज्य हें करणाऱ्याचें आहे, भोगणाऱ्याचें नाहीं. स्वसुखाविषयीं निरपेक्ष होऊन राजानें महत्त्वाच्या कार्यांत शरीर व मन शिणवावें तेव्हांच त्याचें प्रभुत्व कायम राहतें. पाहिल्या तीन महाराजांप्रमाणें स्वारींत हजर राहून, अंगमेहेनत दगदग सोसून, सरदार व फौज कह्यांत ठेवणें हें त्याचें कर्तव्य होतें; पण तें त्यास झेपलें नाहीं व आवडलें नाहीं. राज्य वाढविण्याचा हव्यास मोठा, पण दगदग करावयास नको, अशी स्थिति असल्यामुळें, मुलूख जिंकून त्याचा कारभार कर-ण्याचें काम त्यानें सरंजामी सरदारांवर सोंपविलें. अर्थात् मोठमोठ्या सरदारांस सनद देऊन निरनिराळे प्रांत जिंकण्याचा उद्योग सुरू झाला, तेव्हांच जे प्रांत त्या सरदारांचे बनले, ते त्यांजकडून काढून घेण्याचा मार्ग राहिला नाहीं.

'शाहूकडून सरदारांस सनदा मिळाल्याबरोबर त्यांनीं व त्यांच्या कारभाऱ्यांनीं शेंकडों सावकार गोळा करून, त्यांजकडून कोट्यवधि रुपये कर्ज मिळविलें, व हजारों शिलेदारांस अनुकूल करून लक्षावधि रुपये व लक्षावधि फौज गोळा केली. अशी फौज घेऊन हे सरदार, सावकार व शिलेदार सर्व मिळून त्या त्या प्रांतांत जाऊन, रात्रंदिवस मेहेनत करून, तेथील शत्रूंचा बीमोड करून, ते ते प्रांत काबीज करते झाले. वर्षानुवर्ष झगडा चालवून हातचें, पदरचें भरीस घालून व प्रसंगीं प्राणही खर्च करून जे प्रांत मिळविले, ते जर छत्रपति मागूं लागले तर ते त्यांस कसे मिळावे! सरदार वगैरे लोकांचें सर्व नुकसान भरून देऊन व सावकारांचीं कर्जें फेडून प्रांत आपल्या ताब्यांत घेण्याचा मार्ग होता, पण एवढी अगणित संपत्ति त्याजवळ नव्हती. याकरितां कोणी सरदारानें प्रांत

जिंकिला म्हणजे तो त्याच्या फौजेच्या खर्चास सरंजाम ह्मणून नेमून द्यावा, आणि हुजूरखर्चाकरितां ' दिवाण देणें ' ह्मणून कांहीं नियमित रक्कम ( बहुधा निम्में उत्पन्न ) त्याजपासून घेत जावी असा प्रघात शाहू महाराजानें व पेशव्यांनीं प्रथमपासून ठेविला. या योगानें सरदारांस व कार्यकर्ते पुरुषांस उत्तेजन येऊन ते राज्य वाढवीत सुटले; पण त्याबरोबरच ते स्वतंत्र पंथ काढूं लागले. शाहू नुसता महाराष्ट्रवादी नसून महत्तरराष्ट्रवादी अथवा हिंदुपदपात-शाहीचा अभिमानी होता. स. १७०७ त राज्यारोहणाचे वेळीं शाहूचे ताब्यांत भीमा व कृष्णा या नद्यांमधला मुलूख देखील धडपणें नव्हता, पण मरणसमयीं त्याच्या नांवाचा शिक्का काशीपासून रामेश्वरापर्यंत चालत होता हें सर्व राज्य सरदारांनीं मिळविलेलें सरदारांच्याच ताब्यांत होतें. त्याची सुव्यवस्थित घटना बांधून घेण्याचें सामर्थ्य व कौशल्य शाहूच्या, पेशव्यांच्या, किंवा इतर प्रधानांच्या ठिकाणीं दिसून आलें नाहीं. तोच ईस्ट इंडिया कंपनीचा प्रकार किती भिन्न झाला पहा.

' आपल्या अभ्युदयाचा उगम महाराजांच्या कृपेपासून आहे हें ओळखून शाहूचे सरदार त्याच्याशीं नम्रपणानें व आज्ञाधारकपणानें वागत. हें त्यांचें वर्तन केवळ औपचारिक होतें असें नाहीं. शाहूशीं ते कृतज्ञ व भक्तिपूर्ण भावनेनें वागत; परंतु शाहूचें हें सारें तेज, व दरारा त्याच्या बरोबर लयास गेला. पुढील राज्यकर्त्यांवर सरदारांची भक्ति बसली नाहीं. आह्मा पौरस्त्य लोकांचे राजकीय कारभार संस्था-प्रधान नसून व्यक्तिप्रधान असतात.

' एकदां जो प्रघात पडला तो कायमचा चालविण्याविषयीं आमचे लोक अत्यंत दक्ष असतात. एकदां दाखला पडला कीं तो मोडूं द्यावयाचा नाहीं ही मिरासदारी येथून तेथून सर्व कारभारांत प्रबळ झाली. ' जुनें मोडूं नये, नवें करूं नये, ' या वाक्यद्वयांत या मिरासदारीचें रहस्य सांठलेलें आहे. पेशव्यांस एखादा किल्ला पाहिजे असला, तरी त्यास किल्लेदाराचा मिराशी हक्क आडवा येऊं लागला. सरकाराचें धान्य, खजीना व बंदिवान हें सर्व हवालीं करून घेऊन राखणें व परचक्र आलें तर लढाई करणें, हीं कामें जेथपर्यंत आपण करीत आहों, जेथपर्यंत आपण राज्याशीं हरामखोरी केली नाहीं, तोंपर्यंत आपणास काढण्याचा पेशव्यास अधिकार नाहीं असा किल्लेदारास भरंवसा होता. एखाद्या शंभर

स्वारांच्या पथक्यास, स्वाराचें पथक मोडून पायदळाचें पलटण तयार कर, असें पेशव्यांनीं सांगितलें तर तो पथक्या ह्मणणार, महाराजांच्या वेळचा जसा सरंजाम होता तसा बाळगून मी चाकरी करणार. त्या बाहेरची गोष्ट मला करावयास सांगण्याचा तुह्मांस अधिकार नाहीं. यदाकदाचित् एखादा पथक्या कबूल झाला, तरी त्याचे कारभारी, मजुमदार, फडणीस व स्वार सुद्धां असली गोष्ट कबूल करावयाचे नव्हत. कारण सर्वांचाच ठरलेला हक्क आड यावयाचा. महादजी सिंद्यानें पलटणें तयार केलीं, तीं बादशहाच्या दौलतींतून केलीं. मराठी राज्याच्या उत्पन्नांतून तीं तो करूं जाता, तर त्याचेंच उचाटन झालें असतें. या मिरासदारीमुळें, आपलें चालत आलें आहे तसें पुढें चालविण्याच्या प्रघातामुळें, कोणासच भय नाहींसें झालें. कशीबशी चाकरी भरून काढण्याची चाल पडली, आणि राज्याची वाढ खुंटली. राज्य ह्मणजे प्रगति, सुधारणा, इष्ट फेरफार; हे इष्ट फेरफार करण्याची सोय ज्या राज्ययंत्रांत नाहीं, ज्याची घटना प्रतिगामी झाली, तें राज्य टिकणें शक्य नाहीं. दोन तीन पेशवे बरे निघाले तोंपर्यंत राज्याची भरभराट झाली. ते नाहींसे होतांच संस्थांचा किंवा घटनेचा जोर नसल्यामुळें राज्य बुडालें ( खरे ).

बाजीरावाची कारकीर्द येथें संपली, तरी त्याच्या मृत्यूनें राज्यकारभारांत क्रान्ति अशी घडून आली नाहीं. उलट त्यानें उपक्रमिलेले उद्योग त्याच्या मुलानें नेटानें पुढें चालविले. तसेंच श्रीवर्धनकर पेशव्यांना मराठशाहींत प्रमुख स्थान मिळाल्यापासून नवीन व्यक्ती व घराणीं अनेक पुढें आलीं, त्या सर्वांचा यथायोग्य निर्देश मुख्य हकीकतींत करितां आला नाहीं. राष्ट्रोद्योगांत ज्यांनीं ज्यांनीं म्हणून यथाशक्ति उद्योग केला, त्यांचें वर्णन राष्ट्रीय इतिहासांत येणें इष्ट असल्यामुळें, अशा कित्येक घराण्यांच्या हकीकती पुढें स्वतंत्रतेनेंच देण्यांत येत आहेत.

**६. बाजीरावाच्या वेळचीं कित्येक घराणीं.**—इतिहासाच्या हकीकतींत व जुन्या कागदपत्रांत अनेक घराण्यांचा व व्यक्तींचा उल्लेख येतो. त्या व्यक्तींचा बरोबर छडा लावण्यास, त्यांच्या समग्र वंशावळींची जरूर लागते. शिवाय कित्येक घराण्यांतील अनेक पुरुष पिढ्यानुपिढ्या राष्ट्रोद्योगात खपत होते. त्यांची ओळख पटण्यासाठीं या वंशावळी दृष्टिसमोर पाहिजेत. अशा कित्येक

घराण्यांच्या वंशावळी व हकीकती दरएक भागांत सवडीप्रमाणें व उपलब्ध झाल्या तशा, दिल्या आहेत. येथें तूर्त खालील घराणीं देण्यांत येत आहेत.

१ इचलकरंजीकर जोशी, घोरपडे. २ बर्वे. ३ हणमंते. ४ पेठे.
५ जोशी चासकर. ६ कदम बांडे. ७ जाधव, सिंदखेडकर व इतर शाखा.
८ छत्रपतींचे पारसनीस प्रभु.

**१ इचलकरंजीकर जोशी, घोरपडे.**—वरवडेकर जोशी विश्वनाथपंत यांस पुत्र दोन, नारोपंत व महादाजीपंत. पैकीं नारोपंताचा वंश हुपरीकर या नांवानें प्रसिद्ध असून त्यांतील पुरुष पुढें पेशवाईंत सावकाऱ्या व सुभेदाऱ्या वगैरे महत्त्वाचीं कामें करीत. दुसरा मुलगा महादाजीपंत याचा पुत्र नारोपंत, हा सन १६६३ त जन्मला. पुढें चार वर्षांनीं महादाजीपंत वारला, आणि गरिबीमुळें निर्वाहाची पंचाईत पडून महादाजीची स्त्री मुलांस बरोबर घेऊन कोंकण सोडून कापशीस आली. तेथें तिला म्हाळोजी घोरपडे यानें आश्रय दिला. म्हाळोजीचा मुलगा संताजी याची नारोपंतावर चांगली मर्जी बसली. राजारामाच्या वेळेस संताजी पराक्रम करीत असतां नारो महादेव नेहमीं त्याजबरोबर असे. संताजी त्यास पुत्राप्रमाणें वागवी. या उपकाराची फेड नारोपंतानें फार चांगली केली. संताजीच्या वधानंतर त्याच्या कुटुंबाची व मुलांची व्यवस्था नारोपंतानें स्वतःच्या जबाबदारीवर लाविली. संताजीचा मुलगा पिराजी यास घेऊन नारोपंत कोल्हापुरच्या आश्रयाखालीं कापशीस राहूं लागला. पटवर्धन घराण्याचा मूळ पुरुष हरभटजी बाबा यास नारोपंतानें आपल्या घरचें उपाध्येपण दिलें. स. १७११ च्या सुमारास ताराबाईनें नारोपंतास कोल्हापुरच्या राज्याचें सचिवपद दिलें. पुढें बाळाजी विश्वनाथानें नारोपंताचा मुलगा व्यंकटराव यास आपली मुलगी अनूबाई दिली. या संबंधामुळें पेशव्यांचा पाठिंबा त्यांस मिळून अनेक घोर संकटांतून नारोपंताच्या घराण्याचा बचाव झाला. स. १७१५ त संताजीचा मुलगा पिराजी यास कोल्हापुरचें सेनापतिपद मिळून त्याचें वास्तव्य कापशीस झालें तें अद्यापि चालू आहे. स. १७१६ नंतर लवकरच नारोपंत मरण पावला, आणि त्याचा मुलगा व्यंकटराव बाळाजी विश्वनाथाचा जांवई याचा कोल्हापुरास बेबनाव होऊन, तो कांहीं वर्षें शाहूचे पदरीं येऊन राहिला. व्यंकटराव व अनूबाई पुष्कळ वेळे पुण्यास येऊन राहत असत. स. १७२२ सालीं त्यांस राहण्या-

करितां बाजीरावानें पुण्यांत वाडा बांधून दिला. व्यंकटराव नारोपंताइतका धूर्त नव्हता, तरी अनेक मोहिमांत हजर राहून त्यानें शाहूची मेहेरबानी संपादिली. स. १७३८–३९ त चिमाजी आप्पानें वसईवर स्वारी केली असतां व्यंकटरावाची रवानगी दोन हजार फौजेसह शाहूनें गोव्यावर केली. त्या स्वारींत पोर्तुगीजांस नामोहरम करून व्यंकटरावानें फत्ते मिळविली. ता. २६-१-१७३९ रोजीं व्यंकटरावानें मडगांव काबीज करून जवळच आपला तळ दिला, तेव्हां पोर्तुगीज लोक साष्टींतून पळून गेले. (पृ.३०३ व वि. ज्ञा.वि.डिसेंबर १९२४ ). स. १७३१ त शाहूसंभाजींचा तह झाल्यावर व्यंकटरावास पुनः कोल्हापुरचे

---

**वंशावळ.** [ रा. खरेकृत इ० इतिहास ]

मू. पु. विश्वनाथपंत जोशी बरवडेकर.

नारोपंत (हुपरीकर वंश). महादाजीपंत

१ नारोमहादेव ज. १६६३-१७१६.

× २ व्यंकटराव मृ. १७४५

३ नारायणराव तात्या मृ. १०-११-१७७०

४ व्यंकटराव दादासा०=रमाबाई आत्महत्या २-१-१७९५

५ नारायणराव बाबासा० द० मृ. ३-१-१८२७=गंगाबाई

६ व्यंकटराव रावसा० मृ. १६-२-१८३

७ केशवराव तात्यासा० मृ. ७-२-१८५२

८ व्यंकटराव द. मृ. ८-४-१८५४

९ गोविंदराव आबासा० द० मृ. १५-२-१८७६

१० नारायणराव बाबासा० दत्तक ता० १०-८-१८७६ ( प्रस्तुत )

× २ लग्न अनुबाई, बाळाजी विश्वनाथ पेशव्याची मुलगी, सुमारें स. १७२०त लग्न झालें.

राज्यांत शाहूनें जहागीर देवविली, तेव्हांपासून सातारा व कोल्हापुर या दोनही राज्यांत त्याचें वजन चांगलें पडूं लागलें. स. १७३९ च्या सुमारास इचलकरंजी येथें तटबंदी करून व्यंकटरावानें आपल्या जहागिरीचा बंदोबस्त केला. व्यंकटराव शाहू महाराजाशीं फार उद्दामपणानें वागे असें गोडननें आपल्या हकीकतींत लिहिलें आहे. व्यंकटरावाची मुलगी बेणूताई ही त्रिंबकराव मामा पेठे यास दिलेली होती. स. १७४५ त व्यंकटराव वारला. पश्चात् अनूबाईचें व तिच्या मुलाचें पटलें नाहीं. त्याचें नांव नारायणराव तात्या. त्यास मद्यपानाचें व्यसन लागून तो दुर्वृत्त निघाला. वेश्याही त्यानें ठेविल्या. दिवसेंदिवस बिघडत चालल्यामुळें अनुबाईनें कारभार त्याचे हातीं दिला नाहीं. तीस पेशव्यांचें व पटवर्धनांचें साह्य असल्यामुळें, तिजपुढें तात्याचें कांहीं चाललें नाहीं. ( ऐ. ले. सं. पृ. ९०६ ). त्या वेळीं सुद्धां थोर कुटुंबांत मद्यपानाचा प्रवेश होता हें ध्यानांत ठेवणें जरूर आहे. अनूबाई कारस्थानी होती. तिचा व कोल्हापुरच्या संभाजीची बायको जिजाबाई इचा ऋणानुबंध असे. स. १७७६ त सदाशिव राव भाऊचा तोतया उत्पन्न झाला, त्यास अनूबाईचें पाठबळ होतें. अनुबाई १७८३ त तुळापुर येथें मरण पावली; त्या वेळीं तिचें वय पाउणशेंच्या वर होतें.

## २ नेवरेकर बर्वे.

**नारायण विठ्ठल बर्वे**

जोगदेवभट (सु. स. १६००) विठ्ठलभट.
वडील स्त्री | कनिष्ठ स्त्री

दादो विठ्ठल नाना बाळो केसो राघो.

(दादो): मल्हारपंत राधाबाई=बाळाजी विश्वनाथ. त्रिंबकपंत

(मल्हारपंत): अंताजी ऊर्फ बाबूराव. रामाजीपंत विठ्ठल मनूबाई[1].

संधि मिळतांच अंगचा पराक्रम कसा झळकूं लागतो हें, व पेशव्यांचे वेळेस अशा घराण्यांस कसें व किती उत्तेजन मिळत गेलें, हेंही या बर्वे घराण्याच्या इतिहासावरून चांगलें दिसून येतें. स. १६००च्या सुमारास रत्नागिरीचे उत्तरेस दहा मैलांवर नेवरें गांवीं जोगदेवभट बर्वे या नांवाचा एक थोर ब्राह्मण वतनदार राहत होता. 'आगर जोगदेवभट ' नांवाची बाग

१ मनूबाई लग्न कृष्णराव चासकर.

अद्यापि त्या गांवांत आहे. या जोगदेवभटाचा वंशविस्तार मोठा झाला. त्यास पुत्र सहा, पैकीं पांच पुत्रांचे वंश हल्लीं ठिकठिकाणीं हयात आहेत. दादो, विठ्ठल व केसो यांचे वंश पुणें, नाशिक व सातारा जिल्ह्यांत आहेत. बाळो याचा वंश नेवरें येथें वडिलार्जित वतनांत नांदत आहे. राघोचा वंश देशावर बरेच ठिकाणीं आहे. दादोपंताची मुलगी राधाबाई बाळाजी विश्वनाथास दिलेली होती. दादोपंताचा मुलगा मल्हारपंत हा बाळाजी विश्वनाथाबरोबर देशावर आला. बाळाजीनें शाहूसाठीं फौज जमविली, त्या कामीं त्यास मल्हारपंतानें चांगलें साह्य केलें. पुढें गंगथड, सरकार संगमनेर, चौदा महाल, येथें सरदेशमुखीचा अंमल बसविण्यासाठीं मल्हारपंताची योजना शाहूचे आज्ञेनें झाली. त्या वेळीं त्यानें सिन्नर परगण्यांत कोटुरगांवचें वतन संपादिलें. बहिरोपंत पिंगळे याचे भावाची मुलगी शाहूचे विद्यमानें अंताजी मल्हार यास देण्यांत आली, तेव्हांपासून देशस्थ व कोंकणस्थ यांचे विवाहसंबंध होऊं लागले. मल्हारदादो पुष्कळदां साताऱ्यास येऊन राज्यसंबंधीं कामें करीत असे. पुढें त्यास सिन्नरचा मोकासा मिळाला. या प्रांतीं बऱ्यांनीं वास्तव्य करून नाशिक, पुणें व इतरत्र वाडे वगैरे बांधले, आणि आपल्या परिचयाचीं दुसरीं अनेक कुटुंबें कोंकणांतून आणून शिबंदी ठेविली. अशा रीतीनें ह्या वंशाचा विस्तार झाला. पांडुरंगाचे ठिकाणीं मल्हारपंताची भक्ति बसून तो सालदरसाल देवास व बडव्यास पूजापत्री, दक्षिणा पाठवीत असे. शके. १६४४ (स. १७२२) सालीं पंढरपुरक्षेत्रीं धर्मशाळेदाखल वाडा बांधिला. 'कोटुरें मुक्कामीं गंगास्नानास पालखींत बसोन जावें, ब्राह्मणास दक्षणा भिकार भणंग्यास नित्यशा देत जावी. पेशवे यांजकडून निवाडे करण्यास खटले यावे, ते वाजवी फैसल करावे.' मल्हारपंताची अमदानी शके. १६७० (स. १७४८) पर्यंत चालली. मल्हारपंताचे तीनही मुलगे हुशार निघाले. पैकीं वडील अंताजी ऊर्फ बाबूराव मल्हार हा प्रथम निजामाकडे औरंगाबादेस व पुढें दिल्लीस पेशव्यांचे तर्फे वकिलातीचे कामावर होता. नादिरशहाच्या स्वारीच्या वेळचीं बाबूराव मल्हारचीं पत्रें महत्वाचीं आहेत. मल्हारपंताची मुलगी मनूबाई कृष्णराव महादेव जोशी चासकर यास दिलेली होती. बाबूराव मुत्सद्दी ह्मणून नांवाजलेला होता. सदाशिवराव भाऊचें व बाबूरावाचें पटलें नाहीं. तेव्हां बाबूराव साताऱ्यास शाहूकडे गेला; आणि दिल्लीच्या वकिलातीवर पुरुषोत्तम महादेव हिंगणे याची नेमणूक झाली. बाबूराव मल्हार

स. १७४९ त कोठुरें येथें मरण पावला. या घराण्याचा स्वतंत्र वृत्तान्त छापलेला आहे. रघुनाथरावाची पहिली बायको जानकीबाई बर्व्यांचे कुटुंबांतली. तिचा भाऊ गोपाळराव गणेश उत्तर हिंदुस्थानांत कामगिरीवर होता. या गोपाळरावाचा मूळ बर्वे घराण्याशीं संबंध कसा पोंचतो, त्याचा खुलासा वरील पुस्तकांत नांहीं.

**३. हणमंते घराणें.**—हनुमंते कुलामात्य भोसल्यांचे, मुद्गल गोत्री, ऋक्शाखीय वैष्णव. त्रिमल्ल ऊ. तिमाजी मू. पु. हनुमंतासारखा पराक्रमी असल्यामुळें हणमंते हें आडनांव पडलें.




बाळकृष्णपंत जिजाबाईचे गरोदरपणीं तिच्या जवळ शुश्रूषेसाठीं शिवनेरीवर होता. नारायण ऊ. नारायणाध्वरि हा शहाजीचा मुज्मुदार. यानें विजापुर-तंजावरकडे शहाजीचा प्रवेश करविला. तो १६५३ त मृत्यु पावला. रघुनाथ नारायण राज्यव्यवहारकोशाचा कर्ता. यानेंच शिवाजीच्या हुकुमानें संस्कृत नांवें प्रचारांत आणिलीं. बाळकृष्ण वासुदेव हाच शाहूचा अमात्य जंबूराव ऊ० बाबूराव.'अशौच निर्णय' ग्रंथाचा कर्ता तिमाजी रघुनाथ हा कोल्हापुरकर संभाजीचा प्रधान होता, आणि गंगाधर त्रिमल तेथें सुमंत पदावरचें होता. या घराण्यास संस्कृत विद्ये मोठें अगत्य होतें.पुष्कळांचे संस्कृत ग्रंथ विद्यमान आहेत.

**४. पेठे.**-विसाजी कृष्ण पेठे नागपुरकरांच्या पदरीं असून त्याची मुलगी चिमाजी आपास देलेली होती. तिचाच भाऊ त्रिंबकराव मामा पेठे होय. हा मराठशाहींत एक प्रमुख पुरुष असून शाहू छत्रपतीच्या मृत्यूनंतर पेशव्यांच्या कारभारांत त्यांचा मुख्य हस्तक होता. बाळाजी विश्वनाथाचा जांवई व्यंकटराव घोरपडे याची मुलगी वेणूताई त्रिंबकराव पेठे यास दिलेली होती. त्रिंबकराव कासेगांवच्या लढाईंत ता. २७-३-१७७४ रोजीं जखमी होऊन मरण पावला.

* हणमंते घराण्याची वंशावळ म. रि. प्रथमार्ध पृ. ४१५ व ७५१ वर दिलेली चुकली असल्यामुळें, रा. ब. साने यांनीं चित्रमयजगत् जानेवारी १९१६ इ. वृ. १८३६ ले० ७६ येथें दिलेली वर घेतली आहे. पहा मागें पृ. ४७.




### ५. जोशी चासकर.




जोशी आडनांवाचीं-तीन घराणीं पेशव्यांशीं विवाहसंबंध होऊन मराठशाहींत प्रसिद्धीस आलीं एक चासकर जोशी महादाजीकृष्ण यांचें, दुसरें बारामतीकर जोशी पेशव्यांचे सावकार होते त्यांचे, आणि तिसरें वरवडेकर जोशी व्यंकटराव घोरपडे इचलकरंजीकरांचे पूर्वज यांचें. हीं तीनही घराणीं एकमेकांपासून अगदीं पृथक् आहेत. चासकरांचा पूर्वज महादाजी कृष्ण हा मोठा वजनदार गृहस्थ होता. त्याचा बाप कृष्णाजी नाईक जोशी हा

शिवाजीपाशीं पन्हाळ्यास सुरनीस असून शिवाजीनें तीन भले इसम तंजावरास व्यंकोजीकडे हिस्सा मागण्यास पाठविले त्यांत हा असावा. या कृष्णाजीस मुलगे तीन. महादाजी, नारोपंत व गोविंद. राजारामानें या त्रिवर्गांचे नांवें इनाम गांव देतांना, ' तुह्मी स्वामीचे पुरातन सेवक, सेवा एकनिष्ठपणें करीत आहां, ' असा उल्लेख केलेला आहे. शाहू मोगलाईतून येते समयीं "स्वामींच्या व स्वामीच्या राज्याचे कल्याणाविषयीं बहुत श्रमसाहस करून एकनिष्ठेनें सेवा केली, त्याजवरून स्वामी कृपाळू होऊन पोतदारीचा धंदा हुजूरचा व सरकारकून व सरदार यांजकडील वंशपरंपरेनें करार करून सनदा करून दिल्या आहेत.[१]" पूर्वींचे पोतदार श्रीगोंदेकर पुंडे ताराबाईकडे राहिले. सबब शाहूनें त्यांची पोतदारी काढून घेतली. 'रा. महादाजी कृष्ण व गोविंदकृष्ण उपनाम ज्योतिषी, गोत्र शांडिल्य, हे स्वामींचे पुरातन सेवक, थोरले स्वामींपासून बहुत निष्ठेनें सेवा केली व संभाजीराजे काका यांची सेवा केली, त्या उपरांती. स्वामी चंजीस असतां, ताम्राचें संकट प्राप्त झालें, ते समयीं महादाजी कृष्ण हे संताजी व धनाजी समवेत फौजा घेऊन गेले, विशेषात्कारें सेवा केली, त्याजकरितां स्वामींनीं चंजीचे मुक्कामीं मौजे खवली हा गांव इनाम दिल्हा. या उपरी मशारनिल्हेनीं व त्यांचे पुत्र बाळाजी महादेव यांनीं रा. शिवाजीराजे दाजी यांची सेवा केली, ऐशास महादाजी कृष्ण व गोविंद कृष्ण, महादाजीचे पुत्र बाळाजी, रामचंद्र व कृष्णाजी हे स्वामीचे एकनिष्ठ सेवक, सबब मौजे खवली गांव त्यांजला वंशपरंपरेनें इनाम करून हें आज्ञापत्र सादर केलें असे. ' हें कोल्हापुरच्या संभाजीचें इनामपत्र स. १७२२ चें आहे. ' बाळाजी विश्वनाथाची स्थापना रांगण्याचे मुक्कामीं ताराबाईचे हातें महादाजीनें केली, ' महादाजीच्याच मदतीनें बाळाजीचा कान्होजी आंगऱ्याशीं स्नेह जमून त्यास बाळाजीनें शाहूचे बाजूस वळविलें. ' चित्पावन जातीमध्यें श्रीवर्धनकर देशमुख अवतंस झाले. बाळाजीपंतांनीं महादाजीपंतांस म्हटलें जे, ' तुमची कन्या बाजीराव पुत्रास करीन. बहुत वजीद झाले, तेव्हां कन्या काशीबाई दिली. त्यावर कितेकां दिवशीं बाळाजीस पेशवाई जाली. ' काशीबाईच्या आणखी दोन बहिणी होत्या, पैकीं एक पेणचे मनोहर यांजकडे व दुसरी गोरे यांजकडे दिली.

---

१ भा. व. १ प. या. ५८.

( मावजी कृत कैफीयती व फॉरेस्ट ) ६. **वंशावळ कदम बांडे,** मौजे तोरखेड पा। सुलतानपुर ( खानदेश ).




१ अमृतराव यास प्रथम ताराबाईनें खानदेशांत आपल्या मोकाशावर पाठविलें असतां नंदुरबार व सुलतानपुर हीं ठिकाणें काबीज करून तो कोकरमंड्यास राहूं लागला. पुढें शाहूचें त्याचें वांकडे येऊन लढाइ झाली, तींत अमृतराव ठार झाला. त्या वेळीं मुलगा त्रिंबकराव एक वर्षाचा होता. पुढें अमृतरावाचे बंधूस दाभाडे सेनापतींनी आपल्या दिमतीस घेतलें, आणि गुजराथेंत अंमल बसविण्यास पाठविलें. तेथें रघूजीचा पराक्रम व्यक्त झाल्यावर त्याचा मुलगा मल्हारराव यास शाहूनें आपली मुलगी गजराबाई देऊन जांवई केलें.[1] पिलाजी गायकवाड व बांडे यांची लढाई होऊन बांडे पराभव पावल्यावर गुजराथेंतील कामगिरी सोडून ते खानदेशांत रनाळ्यास येऊन राहूं लागले. यांजकडे रनाळे, कोपरली व ठाणें हे गांव [illegible] होते. २ त्रिंबकरावाची मुलगी पहिले सयाजीराव गायकवाड यांस दिली होती.

---

शा. रो. ९२; २ शा. च. पृ. ९०.

**८. छत्रपतींचे पारसनीस.**—पारसनीस नांवाचीं घराणीं ब्राह्मण व प्रभु अनेक आहेत. आंगऱ्यांचे पारसनीस महादाजीराम याची वंशावळ म. वि. ३ पृ. ३१८ वर दिली आहे. पेशव्यांचे पारसनीस ब्राह्मण होते. पहिले प्रभु पारसनीस घराणें शिव छत्रपतीजवळ उदयास आलें.त्याचा प्रथम पुरुष नीळकंठ येसाजी महाडकर,शिवाजीचा पारसनीस.हा शिवाजीबरोबर आगऱ्यास असतां अडचणींत त्याच्या फार उपयोगीं पडला. त्याचे मुलगे दोन बाबाजी व गोविंदराव. पैकीं बाबाजी नीळकंठ हा कोल्हापुरचे सुमंताचा मुतालिक असून, त्यानेंच जिजाबाईचे सल्ल्यानें १७३१त संभाजी व शाहू यांचा तह घडवून आणिला.बाबाजीचा मुलगा रामचंद्र हा कोल्हापुरचा सुमंत झाला. तेव्हां भाऊ गोविंदराव नीळकंठ याजकडे पारसनिसी राहिली. शंभु छत्रपतीनें रामचंद्र बाबाजीस हल्याळ परगणा इनाम करून दिला, त्याची सनद ११·१०·१७३८ च्या विजयादशमीची छापली आहे, त्यांत मजकूर आहे कीं,' तुमचे पिते बाबाजी नीळकंठ मुतालिक सुमंत, व चुलते गोविंदराव नीळकंठ पारसनीस हे पुरातन राज्यांतील प्रमुख सेवक, थोरले महाराजांपासून मातबर स्वामिकार्य करून कृपा संपादित आले; संस्कृत, फारसी हिंदी व कानडी विद्येमध्यें निपुण. त्यांचे पुत्र तुम्ही त्यांजप्रमाणें सर्वविद्या निपुण. नबाब निजामुल्मुल्क यांची व स्वामींची भेट जाली ते समयीं उभयपक्षींचे मध्यस्तींत फारसी विद्येचे निपुणतेनें व बुद्धिकौशल्यें करून निजामाशीं संतोषी केलें. ' गोविंदरावानें फार वर्षे कोल्हापुरची सेवा केली. जिजाबाईनें स.१७६२त दत्तक घेतला, त्या वेळीं पेशव्याची परवानगी मिळविण्यांत गोविंदरावाचीच खटपट होती.

वंशावळ. का. प्र. इ. साधनें पृ. ८७·९०; महाराष्ट्र सारस्वत डिसें. १९२३.

**नीळकंठ येसाजी**

| बाबाजी, सुमंत | गोविंदराव पारसनीस |
|---|---|
| \| | \| |
| रामचंद्र बाबाजी | खंडेराव. |

# सूची.


अजितसिंग—७६, ७८, ७९, ८६, ८७, ८९, खून ९१, १५२.
अंताजी माणकेश्वर-३४१,३४६,३५१
अंताजी रघुनाथ कावळे—२९२,२९४.
अनूबाई—१२५.
अन्वरुद्दीनखान—१७०.
अंबाजी पुरंदरे-३८,३९,१३६,१३८, १८८,२१०, २२२, २३२, २५२,
अंबूराव हणमंते—१२, ४७, ४२९.
अब्दुल्ला (सय्यद)—७५, ७७, ८९, १४३, १५०.
अभयसिंग—९१, २२८, २३२, पिलाजीचा खून २४२,२४३,३४९.
अमानतखान १६२ मुबारीजखान पहा.
अमीनखान—७६, ८८, ८९, ९२, १४९-१५१, मृ. १६१.
अलीबहादूर—३९८.
अहंमदशहा अब्दाली—३८८.
आनंदराव पवार—२३०, मृ. ३३७.
आनंदराव सुमंत—१६३,१६८,१९१, ३५४, ३७३, ३८२.
आलम अली—६७, ८७, १४३ १४५, बाळापुरची लढाई व मृत्यु १४८, १५८, १५९.
आवजी कवडे २३३, ३८६.
इंग्रज—सीदीस मदत २५५, २५८, २५९, २६०, २६३, २७०, ३०४, चौलची वाटाघाट ३०६, मराठ्यांकडे वकील ३०६, ३०७.
इचलकरंजीकर घोरपडे—४२५.
इंद्रकुमारी—७९, १४२.
उदाजी चव्हाण—६०, ६३, १८६, २०३, २०५, इतिवृत्त २०७, २०८, २१२.
उदाजी पवार—८६, १०७, २२३, २२४, २३०, २६२, २६३, ३१७, बडतर्फ ३५२, पूर्वपीठिका ३३६, बाजीरावाशीं वैर ३३७.
उद्धव योगदेव—राजाज्ञा. २.
उमाबाई दाभाडे—२३९, २४०,२४२, २५९, २७८.
ऐवजखान—१६८,१८७, १९५,१९६.
कंठाजी कदम—१८५, १८८ २२०, २३०, ३२२, ३४८, ४३२.
कदम बांडे—४३२.
कमरुद्दीनखान—१६७, ३४६, ३५३, ३५४, ३५६, ३६९, ३८१.
कान्होजी आंग्रे—७, १५. उदय ५१ शाहूशीं भेट ५४, इंग्रजांशी झगडा ५२-५८, सीदीशीं झगडा

५९, २४६, २४७, बायका मुलें २६५, वंशावळ २६६, ४१७.
कान्होजी भोसले–८६, १०१, १८७, १८८,१९६,२००, कैद २०१,४११.
कान्होजी शिर्के–३७.
कामबक्ष–२३.
काशीबाई–बाजीरावाची बायको ३९१, ३९४, ४११.
कृष्णराव खटावकर-४३, वंशावळ ४४.
कृष्णाजी नाईक जोशी–३९.
कृष्णाजी परशुराम–४९.
कृष्णाजी भास्कर–२०, २५, ५९.
कृष्णाजी महादेव जोशी–२, २९२.
केशव त्र्यंबक प्रधान–२०७.
खंडेराव दाभाडे–१५, १७, सेनापति २२, ४१, ५०, मोगलांचा पराभव ८१, ८५, ८६, १५८, पूर्वपीठिका २१६,वंशावळ२१७,मृ.२१८,४१२.
खंडोजी माणकर–२९४, ३००.
खंडो बल्लाळ चिटणीस–७, ९, १०, १३, १६, ८६, मृ. १३८.
खान डौरान–७६, ८७, २२८, ३४६, पूर्वपीठिका ३४९,३५२,३५५,३५६, ३६७, ३६९, मृ. ३७९, ४११.
गंगाजी नाईक अणजूरकर-२९२,२९४.
गजराबाई बांडे–शाहूची मुलगी ४३२.
गदाधर प्रल्हाद–१४, ४८.
गाजीउद्दीन–१४४, १६७, ३६२, ३७०, ३८२.
गिरिधर बहादुर-३१९, वंशावळ ३२०, ३२१, मृ. ३२३.
गोपिकाबाई–३९२.
गोविंदपंत बुंदेले–३४२,वंशावळ३४३, सागरची स्थापना ३४४ ३५१.
गोविंद हरि पटवर्धन–१२७, उत्तरेंत मोहीम ३५३.
चंद्रसेन जाधव–२१, सेनापति २२, रुसवा ३४, बाळाजीशी वैर ३६, ३८, ६३, १५९, १६०, १६१, १६७, १८४, २४१, ३१५,
चिमणाजी दामोदर-३,३८,८२,१६८, १८६, १८७,१९८, प्रधान २०७, २३०, डभईवर कैद २३५,३२३.
चिमाजी आपा–१२५, १३८,२०३, २१३, २२४. २२६,२६४,२७८. कोंकणची परिस्थिति २८८, २९३, २९४,२९७,२९८, इंचबर्ड वकील ३०६, सारंगपुरची लढाई ३६५, ३५५, ३७१, ३७५, मृत्यु,परिवार, योग्यता ३९२–९३.
चौथाई–९६. ९७.
छत्रसाल–३३९.
जंजिऱ्याचे सीदी-५९, १६०, २४५, स्वारीची तयारी, २४८, अधिकारी २४९, पेंच २५२, गोवळकोटची

लढाई २५७,नवद्-याचा तह २६१.
जनार्दन बाजीराव-३५९, २६६.
जयसिंग सवाई-७६,७८, बादशहाचे विरुद्ध करार ७८, ३१७, ३२८, ३४९, ३५६.
जहांदरशहा-६७.
जाधव सिंदखेडकर-४३३.
जानोजी नाईक निंबाळकर-१८५.
जिजाबाई संभाजीची बायको-२०६, २१५.
जिवाजी खंडो चिटणीस-२६४ ३०९.
जोशी-तीन घराणीं व चासकर४३०.
झुल्फिकारखान-४,२३, मृ.६७,६८,
ताराबाइ-मराठीराज्यावर हक्क ५, ८, १६, १८, स्वतंत्र राज्य २०, स्वभाव ४२, ९५, ११४, १२४, २०६, २०८, २०९.
तिमाजी रघुनाथ हणमंते-२०६,४२९.
तुळाजी आंगरे-२६५, पेशव्याशीं वैर २७४.
त्रिंबकराव दाभाडे-५, २१७,२१८, निजामाशीं कारस्थान २२५. २३०, रागाचें कारण २२७, डभईची लढाई २३३.
त्रिंबकराव पेठे-१२५, ४२९.
दत्ताजी शिवदेव सोमण राजाज्ञा ३१, १०३.
दमाजी गायकवाड-१५८, २३३, २४४, २५९.
दमाजी थोरात-५९.
दयाबहादुर-३१८, ३२१, ३२५, तिरलाची लढाई व मृ. ३३२.
दाऊदखान पन्नी-मराठ्यांस चौथाई देण्याचा करार ६८, ७३ मृ. ८०, २१९.
दावलजी सोमवंशी-२३,८१, ३१७, ३४१.
दिलावर अली-१४३, १४५.
धनाजी जाधव-७, १०, ११, १२, मृत्यु व योग्यता २०.
धारराव प्रभु कळंबेकर-१६१.
धोंडो मल्हार पुरंदरे-३५७, ३५८.
नंदलाल मंडलोई-३२०,वंशावळ३२१, ३२४, मृ. ३३२.
नाडगौडा-१००, १०८.
नादीरशहा-३७८, ३८९.
नानासाहेब पेशवा-२१०, २७०, २७१, २८३, ३०९, ३७४-७५, जन्म ३९१, लग्न ३९२.
नारो गंगाधर-३३, मुजुमदारी ३४.
नारोराम-१०६, २१०, ३०९.
नारोशंकर राजे बहादर-३२२.
नारोशंकर सचिव-६१, ६२, १०१, १०६.
नासिरजंग-३७२, ३८२, ३९०.
निजामुल्मुल्क्-६७, ६८, पूर्वज ६९, वंशावळ ७०, दक्षिणेंतील व्यूह

७१, ७३, ७६, ८५, ९९, ११६, १४२, खांडव्याची लढाई १४४; बाळापुर ल. १४८, १५४, वाजिरी १६१, १६३, साखरखेर्डा ल. व स्वातंत्र्यारंभ १६९, शाहूशीं सख्य १७९, चढाई १८३ पुण्यावर चाल १८७, मराठ्यांवर उठाव १९२, पालखेड ल. १९०, १९४–१९७, हैदराबादेस वास्तव्य १९१, वंगशाशीं कारस्थान २२९, दाभाड्याशीं कारस्थान २३०, सलुखाचें धोरण ३४९, ३५७, बादशहाचें पाचारण ३६९, भोपाळचा आश्रय ३७२, दुराई सराईचा तह ३७३, ३७७, ३७९, ३८२, ३८८, योग्यतेचा अंदाज ४११.

नीलकंठ मोरेश्वर पिंगळे–७, ११, ४५.

नेमाजी शिंदे–३, २३, ८०.

पडदुल्लाखान–१२३.

परशुरामपंत प्रतिनिधि–६, ९, १२, कैद ३९, ४५, ४७, अमात्यपद ४८, मृत्यु व परिवार ४९.

परसोजी भोंसले–३, १०, १७, मृ. २० व १९९,

पारसनीस छत्रपतींचे–२१०–वंशावळ. ३३७

पिलाजी गायकवाड–१८६ १८८, २१९ गुजराथची चौथाई २२०, २२१, सोनगडची स्थापना २२३, २२७, दाभाड्यास सामील २३०, डभईची लढाई २३३, खून २४२, ४३९.

पिलाजी जाधव–३७, १०४ १०७, १६६,१७९, २५७, २६३, २९२, ३१७, ३३४, ३५१, ३५५,३५९, ३६९, ३७१,३७३, ३७५,४१८.

पोर्तुगीझ–२८८, अधिकारी २८९, भूगोलिक स्थिति २९०, युद्धाचीं कारणें २१२, वसईचा पाडाव व तह ३०२.

फत्तेसिंग भोंसले–५, १७,१०१,१२३, १३९, १७८, १८२, २६२, २६४.

फर्रुखसेयर–६७, ७५, खून ८९, १४२, ३१९.

फोंड सावंत–२६२, ४१२.

बर्वे घराणें–४२७.

बहादुरशहा–मृ. ६७, ७८.

बहिरोपंत पिंगळे–३८, ४५ ५२.

बाजी कदम ७२, ७४.

बाजी भीवराव-२६३,२९५, मृ.३००,

बाजीराव पहिला–चढावाची पद्धति ११९, जन्म १२५, वंशावळ १२६, शिक्षण व पेशवाईचीं बखें १३५ १३७, दरबारांतील मंडळीशीं वर्तन १३९ व १७१, हिंदुपदपातशाहीची भावना १४०, १४१, कारभाराचे

दोन भाग व हालचाली १५३, १५५–१५८, निजामाशीं वर्तन १५८, निजामाची भेट १६१, प्रतिनिधीशीं वाद १६३, १७१, १७४, ३४७, चढावाची युद्ध-पद्धति ७१३, शाहूकडून कानउघाडणी १६४, विरुद्ध मंडळी व अडचणी १७२, १७३, हिंमत १७५, निजामाशीं डाव १८०, १८९, कर्नाटक स्वारी व अनास्था १८०–१८३ गनिमी कावा १९०, १९८, पालखेडची ल. १९०, १९४-१९७ तह व प्रतिष्ठा १९७, मोहिमा १९९, दाभाड्याशीं चुरस २२३, २२५, गुजराथची चौथाई २२६, दाभाड्याची आगळिक २२८, त्याजवर मोहीम २३१, अभयसिंगाची भेट २३२, डभईची लढाई २३३, निजामाशीं चकमक व व सल्लख २३८, दाभाडे प्र० ची चिकित्सा २३९ सीदीबर चढाई २५१–२६४, २६१, २६५, आंग्र्यास नरम करण्याचे प्रयत्न २६९, २७२, २७३, ब्रह्मेंद्राचा उपयोग २७८, कर्जाची गांजणूक २८४, फिरंग्यांवर स्वारी २९३, २९४, अर्नाळा किल्ला २९५, ३११, माळव्याचा आरंभ ३१७, मंडलोईंचीं पत्रें ३२४, ३३०, माळव्याची वांटणी ३३३, उदाजीशीं बांकडें ३३७, छत्रसालास मदत ३३९, बुंदेल्याचा तह ३४२, माळव्याचा उद्योग ३४४, कर्ज ३४८, ३५० वसुलाची अव्यवस्था ३५१, चौथाईची बादशहाकडे मागणी ३५६, जयसिंगाशीं भेट ३५७, दिल्लीवर हल्ला ३५८–३६६, भोपाळावर निजामाचा पाडाव ३६९–३७७, शाहूशीं निष्ठा ३७७, नादिरशहाची स्वारी ३८३, त्याचें पत्र ३८६, हिंदुस्थानची परिस्थिति ३८७, नासिरजंगावर स्वारी ३९०, मृ. व परिवार ३९१, स्वभाव ३९४, मस्तानी १९५, मद्यपानाचा आरोप ३९७, शनिवारवाडा व दुसेरवाडे ३९९–४०१, उदेपुरचीं संस्कृत पत्रें ३०२ योग्यता ४०१, सरंजामी पद्धत ४०५, शाहूशीं संबंध ४०७ ४१०, निजामाशीं तुलना ४०८–४११, ब्राह्मण मराठे घराण्यांस उत्तेजन ४१३, कागदपत्रांचा अंदाज ४१४–४१६; कर्तबगारीस कमीपणा ४१७, राज्यकारभाराची अव्यवस्था ४१९, समकालीन घराणीं ४२४.

बापूजी श्रीपत–२९४.
बापूजी सोनाजी दिघे–३, १९६, २०१, २०२
बाबूजी नाईक–१२५.
बाबूराव मल्हार बर्वे– ३७३, ३८२, ३८५, २८८.
बाळाजीपंत भानु–२९,८६, मृ. ९२, ९३.
बाळाजी बाजीराव–नानासाहेब पहा.
बाळाजी विश्वनाथ–पूर्वपीठिका २६, मराठशाहींत प्रवेश ३०, धनाजीशीं संबंध ३०, सरसुभेदार ३०, ३१, सेनाकर्ते पद ३२, शाहूस उपयोग ३८, पेशवाईची प्राप्ति ४४—४७, आंगऱ्यांशीं तह ५३, फुटीचा स्वभाव ५७, सीदीशीं तह व थोरातांचें पारिपत्य ५९, शाहूचा इतबार ७३, सय्यदांशीं राजकारण ७७, ८०, ८३; दिल्लींतील उद्योग ९०, राज्य कारभार ९६, वसुलाची पद्धत १००–१०४, सरंजामी पद्धतीचा उगम व दोष १०४, बाळाजीची जबाबदारी ११५, कऱ्हाड कोल्हापुरची मोहीम १२३, संभाजीची समजूत १२४, मृ. व परिवार, योग्यता, १२४, वंशावळ १२६, १२७, कारभारावर दोष १२९, घराण्यांस प्रोत्साहन, १३१,वसूल व हिशेब १३१, विशिष्ट कामागिरी १३८, शाहूचें तंत्र संभाळणें १३४, ब्रह्मेंद्रस्वामीची ओळख २४५ व २७६.
बुवाजी नीलकंठ ( पारसनीस. )२०,
ब्रह्मेंद्रस्वामी–२९, ३३, २४४, हबशींची कामगिरी व मंदिराचा उच्छेद २४९, सीदी साताचा मृ. २६४, जीवनचरित्र २७४–२७७, व्यापार २७७,प्राप्ति२७९,मृ.२७९, योग्यता २८०–२८५, रामदासाशीं तुलना २८०, गादीबद्दल तंटा २८६
भगवंतराव अमात्य–२०३, २०५, २०९, २१४, ४१७.
भास्करराय, चंद्रसेनाचा गुरु–४०२.
भिऊबाई–१२५.
मथुराबाई आंग्रे–२५३, २६५, २४९ २५६, २७८.
मदनसिंग–८२, ८९,
मराठ मंडळ–( कॉन्फेडरसी ) ५७ उद्योगाचा फैलाव ८३, चढावाचा पद्धति ८४, स्वराज्य, चौथाई व सरदेशमुखीच्या सनदा ९६, प्रदेशाची वांटणी १०१, स्वच्छाचार १२८, राष्ट्रीय वैगुण्य १३१, अपायकारक रचना २४८, फुटीची चाल २७३, ४२१, ४१९. मिरासदारी ४२३.
मराठशाही–वसूल १००–१०२,प्रदेश वांटणी १०१, १०३, १२१ फैलाव

११६ १२२, अव्यवस्था ४१९; दौर्बल्यबीज ४२१.
मल्हारराव होळकर–१९८, २९८, ३२२, ३३०, पूर्वपीठिका ३३४, ३५१, ३५९, ३६१, ३७२.
मस्तानी–वृत्तांत, संतति, ३९५–३९८ कैद ३९६.
महंमद अमीनखान–अमीनखान पहा.
महंमदखान बंगस–२२९, निजामाची भेट २३०, पूर्वपीठिका ३३९, जैतपुरास पराभव ३४०, ३५६.
महंमदशहा–९१, ११६ राज्यारोहण १४२, मराठ्यांवर चाल ३५१, त्रेधा ३६२, कर्नाळ येथें नादीरशहाकडून पराभव ३७९, कैद व दिल्लीची लूट ३८१, बादशाहीचा अधःपात ३८७ नादीरशहाच्या लुटीचा अंदाज ३८८.
महादाजी कृष्ण जोशी–३१, ३९, १२५, ३४१.
महादाजीराम पारसनीस–२६७–२७०.
महादेवभट हिंगणे–३४७, ३५०, ३५६, ३५८, ३८२.
मानसिंग मोरे–२२, ५०, ८१.
मानाजी आंगरे–२५१, २५२ २६०, संभाजीशीं तंटा २६३, २६५, २६७, ३०६.
मुन्यिमखान–२३, मृ. ६८.
मुबारीजखान–१४९, १६२, १६३, १६७, १६८, मृ. १६९.
मुहकमसिंग–८१, ८७, ८९, १६१.
मोकासा–१०१, २२५.
मोगल–दरबार ६४, ६५, पक्ष ६५.
यमाजी शिवदेव–२४९.
यशवंतराव दाभाडे–२३६, २३७, सेनापतिपद २४०, २४१, ३५०, ३८५.
यशवंतराव पवार–२९९, ३३८, ३५२.
यशवंतराव महादेव पोतनीस–२०७, २४९, २५०, रायगडचें कारस्थान २५४, ३०९.
यादवराव मुनशी–८४.
याद्दो गोपाळ–२०५.
येसूबाई–दिल्लीस रवानगी २, ८५, ९०, सन्माननीय शेवट व चरित्र ९४, ९५.
रघुनाथराव पेशवे–जन्म ३९२.
रघूजी भोसले–१०७, १८८, १९९, वंशावळ २००, २०१, ३७०, ३७५, ३८५, आवजी कवड्याचा पराभव ३८६, ४१७.
रतनचंद–१५१.
राजसबाई–३९, ४१, १२४.
राणोजी घोरपडे–२१३, २१४.
राणोजी भोसले–८६, ९३ २००, ३००.
राणोजी सिंदे–पाटसचा बचाव १९५ २९९, पूर्वपीठिका ३३५, ३५१ ३५३, ३६१, ३७१, ३७२.
राधाबाई–१२७, २७७, ३९४, ४२७.
रामचंद्रपंत अमात्य–६, ७, ८, १६, कैद १७, शेवट ४२, ७३, १११, ११२

रामचंद्र महादेव चासकर–१२४,२९२
रामचंद्र महादेव जोशी–२९४.
रामचंद्र महादेव बिवलकर–पुष्कळ वर्षे कल्याणचा सरसुभा, २९४.
रामचंद्र हरि पटवर्धन–२९४, २९६.
रायभानजी राजे भोसले–८, १९, २४, ४८, ६८.
रावरंभा निंबाळकर–७१, ७४, १४४, १४५, १९७.
रुस्तुमराव जाधव–२.
विरूबाई–२७७.
वासुदेवजोशी–२७१,२९३,२९४,२९८
वेणूताई–अनूबाईची मुलगी, त्रिंबकराव पेठ्याची बायको ४२७.
व्यंकटराव घोरपडे–१२५, २०५, गोव्यावर स्वारी ३०३, ३०९, ३५३, ४२७.
शंकराजी केशव–२९४, २९६.
शंकराजी नारायण सचिव–७, मृ. १२, १११.
शंकराजी मल्हार–७७, ८२, ८४, ८५' ८६, १४९, मृ १५८.
शंकराजी महाडिक–९,१६,११४,१७७.
शनिवारवाडा पुणें–३९९, ४०१
शंभुसिंग जाधव–२१, २०४, २११.
शहामतखान–१६२ सुवारीजखानपहा.
शाहू–जन्म, सुटका व प्रयाण १-४, नागरास मुकाम ४, ताराईशीं लढाई ५, ९, राज्याभिषेक ११, प्रधानांच्या नेमणुका १३, ४७, रांगण्यावर मोहीम १४-१६, बादशाही पाठिंबा १९, २४, लग्नें व राण्या २५ संभाजीशीं आदर ४१, नरमाईचें वर्तन ४२, कान्होजी आंगऱ्याशीं समेट ५४, फुटीचा स्वभाव ५७, पुण्याचा कबजा ७१, बाळाजी वि. विषयीं अभिप्राय ७३, चौथाईचा तह ८२. ८४, मातुश्रीची भेट ९२, बादशाहीशीं आदरभाव ११८, १६३, १६४, १९७,१९८, व धोरण १२८, ३४५, माचीवर बाग १६०, बाजीरावाशीं वर्तन १६४, १७५, कर्नाटक स्वारी १७६, तंजावरच्या राजाविषयीं आस्था १७७, फत्तेसिंग राजपुत्र १७८, संभाजीचें कारस्थान १९३, १९४, मारेकरी २०४, संभाजीची भेट २०८, २११, वारणेचा तह २१२, संभाजीशीं वर्तन २१३, बाह्य स्थितीचें अज्ञान २३१, ३८९, डोईजडांस नरम करणें २४१,जंजिऱ्यावर स्वारी २४८, २५०, त्याबद्दल उत्सुकता २५५, स्वारीची अव्यवस्था २५७,सीदीशीं तह२६१, आंगऱ्यांचे व्यवहार २७०, तंटा न मिटविणें २७३, ब्रह्मेंद्राचा अगत्यवाद २७७, गोडनची वकिलात ३०७-३१०, ३११, मिरजेची स्वारी ३१२-३१५, मिरज काबीज ३१८, बाजीरावाची कळकळ ३६७, त्याजवर भरंवसा ३७७,बाजीरावाशीं संबंध ४०९-४१२, ब्राह्मण व मराठे घराण्यांस उत्तेजन ४१३; स्वभाव व तेज ४२२-४३३.
शिवाजी ( धाकटा ) कैद ३९, जन्म, मृ. व बायका ४०,

शिवाजी बल्लाळ जोशी–३१५.
शेख मिरा–१२, १६, २६३.
श्रीनिवासराव प्रतिनिधि-श्रीपतराव पहा.
श्रीपतराव प्रतिनिधि–४४, ५०, १२३, १३९, १७१, १७६, निजामाकडून जहागीर १९१, संभाजीवर चढाई २०५, २०९, २५३, २५५. २५६. २६९, ३०८.
सकवारबाई–२५. ९६ २७७.
सगुणाबाई घोरपडे–१८४.
सगुणाबाई निंबाळकर–१८७.
सगुणाबाई, शाहूची बायको–२५.९६, २७७.
संताजी डुबल–३१४.
संताजी भोसले–८६, मृ. ९२,२००
सदाशिवराव–जन्म १२७, २७९, २८३, जन्म व लग्न ३९२.
सफ्तरजंग–३६०, ३७२.
संभाजी आंगरे–२४९, बाजारावाची भेट २५१, २५८, मृ. २५९, २६५, ४१७.
संभाजी–कोल्हापुरचा संस्थापक, ३९ ४१, आज्ञापत्र १२२. लढाई १२३, १६०, १७१, निजामास मिलाफ १८३–१८५, १८९,१९३ पाडाव २०२, शाहूवर २०२, शाहूवर चढाई २०३,२०५–२०६, शाहूची भेट २०८, २११, शाहूस पत्र २०९, सत्कार २११ वारणेचा, तह २१२, पुढील आयुःक्रम, शाहूशीं भेटी व पेशव्यांशीं गुप्त तह २१४ मृ. व स्वभाव २१५.
समशेर बहादूर–३९७.
सय्यद हुसेन–६७, ७३ अजितसिंगाचा पाडाव ७९, दक्षिणचा कारभार व बऱ्हाणपुरची लढाई ८०, शाहूशीं सख्य ८१. ८७. ८८, कारभार ची अखेर १४२–१५०.
सरंजामी पद्धत–१०४, उगम १०७ ११२, नियम ११५, मूळ हेतूचा विपर्यास ११९, अवश्यकता १२० ४१९.
सरदेशमुखी–९६,९७, घतन. कर्तव्यें हक्क व इतिहास ९८तैनाती,फौजेशीं तुलना ९९, १००, १०२, ११०.
सरबुलंदखान–८५, १९५, २१८, २१९, २२१, २२५, अभयसिंगाशीं झगडा २२८.
सादतखान–३५५. ३५९, ३६६, ३७९, आत्महत्या ३८१. ४११
सावित्रीबाई–२, २५. शेवट ९५.
सीदी–१६० जंजिऱ्याचे सीदी पहा.
सीदी सात–२४५, परशुराम मंदिराचा उच्छेद व छळ २४६.२४८,.२५६, २५७, मृ. २६४.
सुजायतखान–३६४, ३८६.
सुलतानजी निंबाळकर–१८५,१८६,१९८
सेखोजी आंगरे– २४९, बाजीरावाची भेट २५१, २५८, मृ.२५९, २६१.
स्वराज्य– सनदा ९६, ९७.
हणमंते घराणें–४२९.
हमीदखान–१६५, २२०, २२२.
हैदर कुलीखान–१६५.
हैबतराव निंबाळकर–३, १३, २२, ३८, १०१.
होनाजी अनंत–३२, १०६.

# श्री सयाजी बाळज्ञानमाला.

| छापेलीं पुस्तकें | किंमत. |
|---|---|
| १ गिरनारनुं गौरव ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| २ ऋतुना रंग ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| ३ शरीरनो संचो ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ४ महाराणा प्रताप ( बीजीं आवृति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ५ कोषनी कथा ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ६ पाटण-सिद्धपुरनो प्रवास बीजी ( आवृत्ति ) | ०—६—० |
| ७ पावागढ ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| ८ औरंगझेब ( बीजी आवृत्ति ) ( सचित्र ) | ०—६—० |
| ९ मधपुडो ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| १० रणजीतसिंह ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| ११ सुखी शरीर ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| १२ श्री हर्ष ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| १३ सूर्यकिरण ( बीजी आवृत्ति ) ( साचित्र ) | ०—६—० |
| १४ वातावरण ( बीजी आवृत्ति ) | ०—६—० |
| १५ ग्रहण ( सचित्र ) | ०—६—० |
| १६ बाल नेपोलीअन | ०—६—० |
| १७ कोषकी कथा ( सचित्र हिन्दी ) | ०—६—० |
| १८ लोहीनी लीला | ०—६—० |
| १९ श्रीहर्ष हिन्दी ) | ०—८—० |
| २० सिकंदरनी स्वारी | ०—६—० |
| २१ सुरत | ०—६—० |
| २२ एशियानी ओळखाण, भाग पहेलो | ०—६—० |
| २३ भूस्तरनी कथा | ०—६—० |
| २४ लॉर्ड विलियम बेन्टिक. | ०—६—० |

| | | |
|---|---|---|
| २५ | नाना फडनवीस | ०-६-० |
| २६ | चंद्र | ०-६-० |
| २७ | वडोदरानो वैभव. | ०-६-० |
| २८ | महादजी सिंधिया. | ०-६-० |
| २९ | घरधोणी | |
| ३० | चांचड. | ०-६-० |
| ३१ | पाचनक्रिया अने दूध. | ०-६-० |
| ३२ | एशियानी ओळखाण, भाग बीजो. | ०-६-० |
| ३३ | गर्भनी कथा | ०-६-० |
| ३४ | बाल बाबर. | ०-६-० |
| ३५ | नाडीतंत्र | ०-६-० |
| ३६ | बौद्ध गुफाओ. | ०-६-० |
| ३७ | महाबळेश्वर. | ०-६-० |
| ३८ | हिंदुस्ताननुं वहाणवटुं. | ०-६-० |
| ३९ | जाति अने ज्ञाति, भाग पहेलो. | ०-६-० |
| ४० | जाति अने ज्ञाति, भाग बीजो. | ०-६-० |
| ४१ | विलियम युवर्ट ग्लॅडस्टन | ०-६-० |
| ४२ | शूरवीर शिवाजी ( सचित्र ) | ०-६-० |
| ४३ | आरोग्यता ( हिन्दी ) | ०-८-० |
| ४४ | दरियाकांठो ( सचित्र ) | ०-६-० |
| ४५ | बरफ अने पाणी. | ०-६-० |
| ४६ | अर्थशास्त्रनी ओळखाण. | ०-६-० |
| ४७ | संभाजी महाराज ( मराठी ] | ०-६-० |
| ४८ | महाराणा प्रताप ( मराठी ) | ०-६-० |
| ४९ | कोयलानी कथा | ०-६-० |
| ५० | जठरनी कथा | ०-६-० |
| ५१ | ड्युक ऑफ वेलिंग्टन | ०-६-० |
| ५२ | माकण अने जू | ०-६-० |
| ५३ | पाणीनां पराक्रम भाग पहेलो. | ०-६-० |

# श्री सयाजीसाहित्यमाला

| छापेलॉं पुस्तक. | किमत | |
|---|---|---|
| १. विज्ञान-गुच्छ— | काचा | पाकी |
| २. भूपृष्ठविचार ( बीजी आवृत्ति ) | | ०-१२-० |
| ११. देहधर्मविद्यानां तत्त्वो. | ०-१४-० | १- ०-० |
| १२. विज्ञानप्रवेशिका. | ०-११-० | ०-११-० |
| १३. जिंदगीना विमो. | ०-१०-० | ०-११-० |
| १७. उद्‌भिज्जविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र ). | ०-१५-० | १- ०-० |
| १८. करोळीआ ( सचित्र ). | ०-१३-० | ०-१४-० |
| २२. प्राणीविद्यानुं रेखादर्शन ( सचित्र ) | ०-१४-० | १- ०-० |
| २५. मनुष्यविद्यानां तत्त्वो. | ०-१५-० | १- ०-० |
| ३५. जीवविद्या ( सचित्र ) | ०-१४-० | १- ०-० |
| ३८. तुलनात्मक भाषाशास्त्र. | १- २-० | १- ४-० |
| ४६. राजनीतिनो संक्षिप्त इतिहास. | | १- ४-० |
| ४७. समाजशास्त्रप्रवेशिका | | ०-१४-० |
| ४८. बाळउच्छेर | | १- ८-० |
| ५०. बाळस्वभाव अने बाळउछेर. | | १- ८-० |
| ५१. शरीरयंत्रनुं रेखादर्शन ( सचित्र ) | | १- ४-० |
| ६३. विद्युत् ( सचित्र ) | | १- ४-० |
| ६४. सुप्रजनशास्त्र. | | ०-१३-० |
| ६७. प्राणीसृष्टि ( सचित्र ) | | १- ८-० |
| ७०. रसायनप्रवेशिका ( सचित्र ) | | १- ३-० |
| ७५. वडोदरानुं अर्थशास्त्र. | | ०-१२-० |
| ८१. सत्यमीमांसा. | | १-१०-० |
| ८४. सनईवादन पाठमाला पु. ३. ( मराठी ) | | १- २-० |
| ८५. सदर सदर पु. ४. ( मराठी ) | | १-१२-० |
| ८६. अवताररहस्य ( हिन्दी ) | | ०-१४-० |

| | काची | पाकी |
|---|---|---|
| ८८. सजीव सृष्टीची उत्क्रांति ( मराठी ) ( सचित्र ) | | २–११–० |
| ९१. यामिक प्रदीप ( प्रथम भाग ) (मराठी) (सचित्र) | | २– ६–० |
| ९२. सहकार्य अने राष्ट्रीय जीवन. | | ०–१३–० |

**२ चरित्र-गुच्छः—**

| | काची | पाकी |
|---|---|---|
| ८. प्रेमानंद ( सचित्र ). | ०–१२–० | १– ०–० |
| १४. दयाराम. | ०–१०–० | ०–११–० |
| २०. मीरांबाई. | ०–१०–० | ०–१२–० |
| ३०. गिरधर. | ०–१३–० | ०–१४–० |
| ३३. भालण ( सचित्र. ) | ०–१५–० | १– ०–० |
| ४०. तुकाराम ( सचित्र ). | | १– ०–० |
| ४१. महाराजा शिवाजी (मराठी) (सचित्र). | १–० –० | १– ६–० |
| ४५. विष्णुदास. | | १– ०–० |
| ४९. वीर शिवाजी ( सचित्र ) | | १– ०–० |
| ५२. दलपतराम | | १– २–० |
| ५३. मणिशंकर कीकाणी ( सचित्र ) | | १– ६–० |
| ७२. समुद्रगुप्त ( सचित्र ) | | ०–१३–० |
| ७४. मीरांबाई ( मराठी ) | | ०–१४–० |
| ७७. चक्रवर्ती अशोक. | | ०–१४–० |
| ८८. समुद्रगुप्त ( हिन्दी ) ( सचित्र ). | | ०–१२–० |

**३ इतिहास-गुच्छः—**

| | काची | पाकी |
|---|---|---|
| १. संस्कृत वाङ्मयाचा इतिहास. ( मराठी ). | | २– ८–० |
| ९ जगतनो वार्तारुप इतिहास, भाग १ लो. | | ३– ८–० |
| १९. ब्रिटिश राष्ट्रीय संस्थाओ. | ०–१२–० | ०–१३–० |
| २४. पॅलेस्टाइननी संस्कृति, | ०–११–० | ०–१२–० |
| २६. जगतनो वार्तारुप इतिहास, भाग २ जो. | | ३– ०–० |
| ३१. पार्लमेन्ट. | १– २–० | १– ४–० |
| ३४. इतिहासनुं प्रभात. | १– २–० | १– ४–० |

| | काची | पाकी |
|---|---|---|
| ४३. नवीन जापाननी उत्क्रांती. | | १-०-० |
| ५५. चीननी संस्कृति | | १-६-१ |
| ५६. नेपोलीएन बोनापार्ट, भाग पहिलो | | २-१२-० |
| ५७. नेपोलीएन बोनापार्ट, भाग बीजो | | २-१०-० |
| ६०. उन्नतिविचार ( पूर्वार्ध ) | | १-१०-० |
| ६१. प्राचीन हिंदुस्तानमां स्थानिक स्वराज्य | | १-१-० |
| ६५. मराठी रियासत, मध्यविभाग १, (मराठी) (द्वितीयावृत्ति) | | २-१२-० |
| ६६. सदर भाग २ ,, | | २-१२-० |
| ६८. सदर भाग ३ ,, | | २-४-० |
| ६९. हिंदुस्ताननी संस्कृति | | १-१४-० |
| ८२. रोमनो इतिहास | | १-०-० |
| ८३. पार्लमेंट. ( मराठी ) | | १-८-० |
| ९०. मराठ्यांच्या प्रसिद्ध लढाया ( मराठी ) | | ३-०-० |

## ७. वार्ता-गुच्छः—

| | काची | पाकी |
|---|---|---|
| ३. आपणा लघुबन्धु अंग्रेज ( अंग्रेज बालजीवन-बीजी आवृत्ति. ) | | ०-१५-० |
| ४. अलकानो अदभुत प्रवास ( सचित्र-बीजी आवृत्ति. ) | | १-४-० |
| १३. वीर पुरुषो. | | ०-१२-० |

## ८. धर्म-गुच्छः—

| | काची | पाकी |
|---|---|---|
| ६. हिंदुस्ताननां देवो ( सचित्र ). | | ४-०-० |
| २३. दीघनिकाय भा. १ ला ( मराठी ). | | १-८-० |
| ३२. तुलानात्मक धर्मविचार | ०-१२-० | ०-१३-० |
| ३६. धर्मनां मूळतत्त्वो | ०-९-० | ०-१०-० |
| ४२. विविध धर्मोनुं रेखादर्शन | | ०-१२-० |
| ४४. उत्तर युरोपनी पुराणकथा | ०-१२-० | ०-१४-० |
| ८०. तुलनात्मक धर्मविचार (.हिंन्दी ) | | १-०-० |

| | काची | पाकी |
|---|---|---|
| **६ नीति-गुच्छः-** | | |
| ५. मावापने बे बोल ( त्रीजी आवृत्ति ) | | ०-६-० |
| ७. नीतिशास्त्र | | ०-१४-० |
| २७. नीतिविवेचन | १-०-० | १-२-० |
| २९. कॉबेटनो उपदेश ( बीजी आवृत्ति ) | ०-१४-० | ०-१५-० |
| ३७. नैतिक जीबन तथा नैतिक उत्कर्व. | ०-१४-० | ०-१५-० |
| ७१. उदासीपंथनां नीतिवचनो. | | ०-१०-० |
| ७६. नीतिविवेचन ( हिंन्दी ) | | १-७-० |
| **७ शिक्षण-गुच्छः-** | | |
| १०. बालोद्यानपद्धतीचें गृहशिक्षण सचित्र मराठी | ०-९-० | ०-१०-० |
| २८. बालोद्यानपद्धतिनुं गृहशिक्षण ( सचित्र ). | ०-१२-० | ०-१४-० |
| ५२. शाळा अने शिक्षणपद्धति | | ०-१५-० |
| ८९. प्राचीन हिन्दमांनी केळवणी. | | ०-१३-० |
| **८ प्रकीर्ण-गुच्छः—** | | |
| १५. सुधारणा आणि प्रगति द्वितीयावृत्ति. ( मराठी ) | | ३- ०-० |
| २१. शिस्त ( मराठी ) | | १- ०-० |
| ३९. हिंदुस्तानचा लश्करी इतिहास व दोस्तराष्ट्रांच्या फौजा ( मराठी ). | | २- ८-० |
| ५४. संस्कृति अने प्रगति. | | २- ०-० |
| ७३. जबाबदार राज्यपद्धति [ मराठी. ] | | ०-१३-० |
| ७९. इंग्रजी शिष्टाचार [ मराठी ]. | | ०-१४-० |
| ८७. नागरीकांचीं कर्तव्यें ] मराठी ]. | | ०-१४-० |
| ९३. हिंदुस्तानमां क्षयरोग. | | १- ०-० |
| ९४. बडोद्याचें मराठी साहित्य [ मराठी ]. | | ०-११-० |

